सारा भरणें (गांवचे दरवाजे लावून ती वसूल करीत यावरून). [सं. विश्] **वेशी-वेशीवर-ला-स बांधणें-टांगणें**-मोठ्यानें सांगणें; जाहीर करणें; सर्वांना कळविणें. 'हें माझें वेड मी चवथ्या लेखांत जनतेच्या वेशीवर टांगलें आहे' -केकाआर्या १. **(दुखणें) वेशीस बांधणें**-आपली अडचण; आपत्ति जाहीर करणें. **०कट-ड**-स्त्री. कुंपणाच्या दाराची कवाडी, फाटक. **०कर-री**-पु. वेस राखणारा महार. (पूर्वी गांववेशीवर महारांचा पहारा असे). 'जोहार मायबाप जोहार। सारा घ्यावया आलो वेसकर।' -तुगा ३३६. **०वाटी**-पु. (कों.) घर राखणारा मूळ पुरुष (सर्प), किंवा देवता. ही घराला भुताखेतांची बाधा होऊं देत नाहीं.

**वेसंगणें**—अक्रि. (व.) दुबळ होणें; व्यंग पावणें. 'म्हातारपणीं हातपाय वेसंगला तर कोण संभाळ करील?'.

**वेसजो**—स्त्री. १ शुद्धि. २ प्रकाश. 'जयाचेनि आंगिकें तेजें। आपो रविशशीचिये वणिजे। म्हणऊनि जग वेसजे-। वीण असे तया।' -ज्ञा ६.११०. [सं. विशुद्धि; प्रा. विसुज्झि]

**वेसण-न**—स्त्री. १ बैल, टोणगा इ० कांनीं स्वाधीन रहावें म्हणून त्यांच्या नाकांत ओंवलेली दोरी; नथणी. 'कीं नासिकीं वेसण घालून। महावृषभ करिती दीन।'. २ (ल) पकड; छाप; वर्चस्व. 'मालकाचें गुप्त व बारीक काम नोकराकडे आलें म्हणजे नोकराची गुप्त आणि बारीक वेसण मालकाच्या मर्मस्थानीं बसलीच.' -सत्वपरीक्षा ५८. ३ एक नाकांतला अलंकार-बुलाख. 'त्याली वेसण साजिरी वसुमतीधोशात्मजा नासिकीं।' -शशिसेना. ४ (कुस्ती) आपल्या जोडीदारास खालीं धरून आपलीं बोटें जोडीदाराच्या नाकपुडींत घालून वर ओढून जोडीदाराला चीत करणें. [देप्रा. अवयासिणी=नासारज्जू; तुल० गवेसण] **वेसणी**-स्त्री. वेसण अर्थ १ पहा. 'वेसणी घालीन, माझा। मनोरथ पुरवी।' -दा ३.३.४२.

**वेसन-नी**—व्यसन-नी पहा. 'वेसन गेलें निष्काम झालें नर नव्हे नारी।' -तुगा २९७. 'चाहाड वेसनी निग्रही।' -दा २.३.२७.

**वेसवा**—स्त्री. १ वेश्या; कसबीण. २ गरती असून व्यभिचार करणारी स्त्री. ३ (सामा.) छचोर, बेढंगी स्त्री. ४ (शिवी) निर्लज्ज स्त्री. [सं. वेश्या]

**वेसवार**—पु. १ दोन तीन प्रकारच्या डाळी, धने, हळद, मिरच्या इ० पदार्थ तळून किंवा भाजून भाजी इत्यादिकावर घालण्यासाठीं त्याचें जें कूट करतात तो मसाला. २ मेतकूट. ३ (कों.) कच्चा मसाला. 'मांस व वेसवार यांचीं पोटीसें वाताबुंदावर बांधावीं.' -योर २.२६१. [सं. वेशवार] **वेसवाराचें लोणचें**-न. मोहऱ्या, मेथ्या, हिंग, हळद इ० चें चूर्ण आंत घालून करतात तें लोणचें.

**वेस्त-स्ती**—वि. अव्यवस्थित; व्यस्त पहा. 'मूर्ख अभक्त वेस्ती। दरिद्र भोगिजे।' -दा १४.८.२; -दा १२.९.१. [व्यस्त] **०वेस्ता**-वि. अस्ताव्यस्त. 'परंतु येथील कारभार वेस्तवेस्ता.' -पेद १४३.

**वेहकळी, वेहंकळी**—स्त्री. एक लहान झाड; विकळी. 'सोवणी टाहकळी वेहंकळी' -कालिका २२.१४.

**वेहणें**—अक्रि. (भिल्ली) राहणें. जिया हांकीं जीव खुस वेहतो.' -भि ३१.

**वेहरण**—न. आळ; दोष. 'याणें टाकिली ममतामाया। मजवरी वेहरण आलें वाया।' -भवि ४.२१०. विहरण पहा.

**वेहळा**—पु. बेहडा, झाड व फळ.

**वेहळा, वेहेळा**—पु. ओढा; नाला; ओहोळ. वहाळ पहा.

**वेहायली**—स्त्री. लगामाचा एक प्रकार. -अश्वप १.१८५.

**वेहाळ**—स्त्री. उषःकाल. 'वेहाळीचे वारे वांतां।' -उषा ७३.२१.

**वेळ**—पुस्त्री. १ कालविभाग; काळ. २ आतांचा काळ व कांहीं कार्य होण्याचा काळ यांमधील अवकाश, अंतर. 'पेरे होण्यास अझून वेळ आहे म्हणून अर्धी घरें शाकारून घ्या.' ३ फुरसत; न गुंतलेला, रिकामा वेळ. 'माझे पाठीसीं काम आहे वेळ सांपडल्यास येईन.' ४ अपेक्षित किंवा योग्य कालापेक्षां जास्त काळ; उशीर (क्रि० लावणें, लागणें). 'मला शाळेंत जाण्यास वेळ झाला.' 'वेळ लावला-ली, वेळ लागला-ली.' ५ (स्त्री.) समय; हंगाम; विशिष्ट काल. 'ही वेळ पोथी वाचावयाची नव्हे.' ६ दिवसाचा अर्ध भाग; सकाळ किंवा दुपार. ७ तीस घटिकांच्या (रात्रीं किंवा दिवसां) आठ विभागांपैकीं एक. अमृत, उद्योग, काळ (मृत्यु), चंचळ (चोर), रोग, लाभ, शुभ आणि स्थिर वेळ. यांखेरीज इतर पुष्कळ प्रकारच्या वेळा आहेत, उदा० अंधेरी-घोर-घात-राक्षस-वेळ, जाती-येती वेळ इ०. ८ मुहूर्त. ९ प्रसंग; संधी. -क्रिवि. वेळां पहा. 'तो दिवसास तीन वेळ जेवतो.' [सं. वेला] **०दवडणें**-व्यर्थ, निष्फळ वेळ घालविणें. **०मारून नेणें**-प्रसंगीं कमीपणा येऊं न देणें; युक्तीनें प्रसंग साजरा करणें; बाणी राखणें. 'केवळ शब्दामात्रें वेळ मारून न नेतां कृति करून दाखविली पाहिजे.' -निचं. **०वाहणें**-बरें किंवा वाईट होण्यास समय अनुकूल होणें. सामाशब्द- **०अवेळ**-स्त्री. उचित किंवा अनुचित, अनुकूल किंवा प्रतिकूल असा काळ, प्रसंग (विवक्षित कामाविषयींचा). 'वेळ अवेळ आहे चार रुपये जवळ अधिक असूं द्या.' -क्रिवि. वेळ किंवा अवेळ न पाहतां; वाटेल त्यावेळीं. 'वेळ अवेळ बाहेर जातोस परंतु एथें पिशाचांचा उपद्रव भारी आहे.' **०काळ**-पु. काळ-

वेळ पहा. ( क्रि० येणें; जाणें; गुदरणें; पडणें; टळणें ). **वेळा काळाला कामास येणें**–प्रसंगविशेषीं, अडीअडचणीला उपयोगी पडणें. **वेळणेवारचा, वेळणेवारी**–विक्रिवि. वेळेप्रमाणें; वेळेनुसार; वेळेच्या चांगल्यावाईट गुणांप्रमाणें व भाषा किंवा कृति याच्या प्रकारानुसार घडणारी ( गोष्ट इ० ). अनिष्ट परिणामाच्या, कृतीच्या, वचनाच्या प्रसंगीं योजतात. 'वेळणेवारचा उगाच तूं बोलतोस काय म्हणून.' [ वेळ आणि वार ] ०(**अ**)**नसार**–( वेळनसार ) –वेळेनुसार पहा. ०**नावारीं**–क्रि. बरीवाईट वेळ न पाहतां. वेळअवेळ पहा. **म्ह०** वेळ ना वारीं गाढव आलें पारीं. [ वेळ+ना+वार ] ०**प्रसंग**–पु. काळकल्ला, बळकुबल, वेळअवेळ पहा. ०**भर**–क्रिवि. १ सारा दिवस; वरचेवर. 'वेळ भर करसी वेरझारा धाक याचा वाटे मजप्रती।' –होला ९८. २ अर्धा दिवस पर्यंत. ३ बऱ्याच वेळपर्यंत. ०**मारणारा–माऱ्या**–वि. समयसूचक; प्रसंगावधानी. ०**वारीं**–क्रिवि. वेळेवारीं पहा. ०**साधणारा–साधु**–वि. १ संधी साधून काम करणारा. २ वक्तशीर. **वेळा**–स्त्री. १ हंगाम; समय; विशिष्ट काळ. २ आवृत्तिवाचक गणनाकाळ. **वेळां**–क्रिवि. संख्याचक किंवा गुणवाचक उपसर्ग लावून आवृत्ति दाखविण्यासाठीं योजतात. उदा० एक–तीन–बहुत–किती–वेळां. 'एक वेळां सोसीन, दोन वेळां सोसीन, तिसऱ्यानें बोलशील तर तोंडांत खाशील.' **वेळाईत**–वि. वेळेवर, संकटप्रसंगीं सहाय्य करणारा, मदतीस धांवणारा; कैवारी. –विउ ११.२८. 'तुका म्हणे देव भक्तां वेळाईत। भक्त ते निश्चित त्याचि यानें।' –तुगा २२७५. [ वेळ+आगत ? तुल० सिं. वेलाइतो= वेळेवर ] **वेळापत्रक**–न. आगगाडया, आगबोटी, शाळा इ० च्या कार्याचा वेळा दाखविणारा तक्ता. ( इं. ) टाईम–टेबल. **वेळाप्रकाशक**–पु. ( गणित ) पट दाखविणारी संख्या; वार संख्याक; गुणक. **वेळायित**–वेळाईत पहा. 'धावला राघव वेळायितु।' –दावि १४३. **वेळावणें**–अक्रि. आबाळणें; वेळेवर गरजेच्या गोष्टी न मिळाल्यानें खंगणें ( पीक, जनावर, मूल इ० ). **वेळावेळ**–स्त्री. १ वेळअवेळ पहा. २ ( क ) विलंब; उशीर. 'तो अलीकडे वेळावेळानें येऊं लागला आहे.' [ वेळ+अवेळ ] **वेळेन(नु)सार**–क्रिवि. १ वेळ, प्रसंग याला अनुसरून. २ वेळप्रसंगीं; कधींकधीं. **वेळेवारचा**–वि. वेळेवर असलेला. कधीं वेरेवाळचा असा अशुद्ध प्रयोग येतो. **वेळेवारीं**–क्रिवि. योग्य वेळीं; वेळ टळण्याच्या आधीं; वेळेचा अतिक्रम न होतां. 'तुला चाकरी सोडणें असल्यास वेळेवारींच सांग, नाहींतर आयते वेळेस फसवशील.' **वेळोवेळां**–क्रिवि. १ वरचेवर; वारंवार. २ वेळ येइल त्याप्रसंगीं; प्रत्येक वेळीं. [ वेळ द्वि. ]

**वेळ**—स्त्री. एक वनस्पति.

**वेळ**—स्त्री. समुद्रकिनारा. वेल पहा.

**वेळ**—पु. वेळू पहा. ०**अंवस**–स्त्री. पंढरपूर येथील कार्तिकी किंवा मार्गशीर्षी आवस. यादिवशीं वेणुनाद कृष्णाप्रीत्यर्थ नदीतील खडकावर लोक जेवतात. ०**कट–कूट**–न कळकाचा तुकडा. [ वेळू+काष्ठ ] ०**काठी**–स्त्री. कळक; बांबूचा वासा. ०**वन**–न. वेळूचें वन. 'यदुवंशाचीं वेळवनें। वनवावी असती।' –भाए ५३. **वेळवी**–वि. वेळूसंबंधीं. 'वेळवी वासा.' 'वेळाचे वेल वाचे न वदवति जसे तें तसें वेळवांचे।' –२ ( गजेंद्रमोक्ष ) ५४.

**वेळ**—न. ( गो. ) जीभ खरवडण्याची ( सोनें–चांदीची ) पट्टी.

**वेळ**—स्त्री. वळी ( गंधादिकाची )? 'ज्याच्या कपाळाची वेळ। सुर सकळ वांछिती।' –भारा बाल ६.५६. [ वळी ]

**वेळकोट**—एळकोट पहा. 'किं वाचे वेळकोट बोलती।' –वेप ९३.

**वेळटी**—स्त्री. ( क ) विळी. (•मराठेलोकांत प्रचार). [ विळी अल्प ]

**वेळण**—स्त्री. १ पेज. 'वेळिलें वेळण भाताचें।' –ययादि १७.१३३. २ वेळवण–णी पहा. 'शेवया वळिल्या अतिकुसरी। असार वेळण सांडिलें दुरी।' –एरुस्व १४.११३. **वेळणी**–स्त्री. १ वेळण काढण्यासाठीं केलेलें तव्यासारखें खोलगट पितळी भांडें. २ ( व. ) मडक्यावर झांकण ठेवण्याचें मातीचें भांडें. ३ झांकणी; वाढणी. 'कां घडे गाडगें वेळणी।' –एभा १३.३२४. ४ वाडगा; थाळी. 'त्या सापापुढें दुधाचि वेळणी ठेउनि। आपण घरासि आला।' –पंच ३.१४. [ सं. विल्=आच्छादणें–वेलनी ] **वेळणें**–उक्रि. १ ( शिजलेला भात, भाजी इ० ची ) पेज, पाणी निथळून काढणें. 'त्वरित परम तेथें भात हे वेळयेलें।' –सारुह ६.७२. २ ( कऱ्हाडी ) गव्हले, शेवया इ० उकळून हलक्या हातानें हालवून पाणी निथळून काढणें. ३ गाळणें **वेळवण–णी**–न. भाजी, डाळ, पुरण इ० पदार्थ वेळून त्याचें जें पाणी काढतात तें. [ वेळणें+पाणी. सं. वन=पाणी यापासून मराठी प्रत्यय ]

**वेळणें, वेळविणें–वेळावणें**—उक्रि. ( दुसऱ्या शब्दाशीं जोडून येतो) सईल सोडून हलविणें. उदा० डोई–मान–पाय–हात वेळणें. [ सं. वेल्लन ]

**वेळबोंड–डी**—न स्त्री. ( प्र. ) वेलबोंड–डी पहा.

**वेळा–ळ–ला**—स्त्री. दंडांत घालावयाचा एक अलंकार. 'दंडी वेळा वांकडया गुजऱ्याचा झणत्कार।' –अफला ५५. [ सं. वलय; म. वाळा ]

**वेळा**—स्त्री.अव. वेलची. एळा–ला पहा. 'लवंगा वेळांनीं समरसच रामा मुखरणी।' –किसुदाम ३८.

**वेळा**—स्त्री. १ समुद्रकिनारा. 'वेळा लंघुनि वेळही न लागतां, जाई त्वरें श्यामला।' –आसेतु ५. २ मर्यादा; हद्द. 'दर्पसागरु वेळा। सांडुनि उते।' –ज्ञा १६.३९३. [ सं. वेला ]

**वेळाउळ**–न. वेलाउळ पहा. मंदिर; गृह; मुख्य पेठ. ' तो जाण वेल्हाळ । ज्ञानाचें वेळाउळ ।, –ज्ञा १३.३११; –ऋ ९३.

**वेळिलवाणें**—( कुकीनें ) येळिलवाणें पहा.

**वेळीप**—पु. ( गो. ) गोव्यांतील एक हिंदु शेतकरी जात.

**वेळू**—पु. बांबू; कळक; वंश; बांस. [ सं. वेणु; प्रा. वेलु ] **म्ह०** बारा हात वेळू फिरतो आहे=मूर्तिमंत दारिद्र्य नांदत आहे. **०जाळ**–वेळूचें बेट. ' दैवें वायूच्या कल्लोळी । परस्परें वेळूजाळीं । स्वजाति कांचणी इंगळी । पेटली ते होळी वनाची करी । ' –एभा १३.१८९. [ सं. वेणु+जाल ]

**वै**—स्त्री. कुंपण; वई पहा.

**वै**—स्त्री. ( विणकाम ) ओवी पहा. **०काठी**–स्त्री. वैची पट्टी; कांबटी.

**वै**—स्त्री. बहुल्या मोंवतीच्या मडक्यांची उतरंड. वही पहा.

**वैकल्पिक**—वि. १ ज्याविषयीं मतभेद आहे असा ( मुद्दा, सिद्धांत ). २ ज्याविषयीं विकल्प सांगितला आहे असा ( नियम, विधि ); ऐच्छिक. ३ अनिश्चित; संशयित. [ सं. ]

. **वैकल्य**—न. १ वैगुण्य; पंगूपणा; अवयवाची मोडलेली, नासलेली, व्यंग पावलेली स्थिति. २ व्याकुळता ' देह वैकल्याचा वारा । झणें लागेल या सुकुमारा । ' –ज्ञा ८.१३२. ३ अपूर्णता; कमतरता ( धंदा, प्रयोग इ० तील ). **०पूर्ण**–( सांकेतिक ) ' ( राघोबादादा पेशवे ) वैकल्यपूर्णाबरोबर जावेंसें नव्हे ' –ख १२७०. [ सं. ]

**वैकळ**—वि. ( प्र. ) वायकळ पहा.

**वैकारिक**—पु. ( वास्तु ) दाब; ताण. ( इं. ) स्ट्रेस. [ ? सं. विकार–वैकारिक ]

**वैकुंठ**—पुन. १ विष्णु देवतेचें निवासस्थान; विष्णुलोक. ' तेणें वैकुंठा पासोनि विशाळें । मजलागीं केलीं राउळें । ' –ज्ञा ९.३८९. २ विष्णु; कृष्ण. –ज्ञा ११.१८१. ' वैकुंठाच्या कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या । ' –मोउद्योग ७.४४. [ सं. ] **०चतुर्दशी**–स्त्री. कार्तिक शुद्ध चतुर्दशी. **०नाथ-नायक**–पु. विष्णु. ' आतां यावरी तो वैकुंठनाथु । ' –ज्ञा १.२७४; ' तोषोनि वैकुंठ नायक । वर दिधला अलौकिक । ' –व्यं १०१. **०पीठ**–न. वैकुंठ पहा. ' नातरी वैकुंठपीठनायकें । ' –ज्ञा १०.१८; ' तुका झालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ । ' –तुगा ६७८. **०भवन**–न. वैकुंठलोक. ' वैकुंठभुवनीं देहासहित । नेला तुकया कलयुगीं । ' **०वासी**–वि. १ विष्णूचें अभिधान. ' शेषशयना सार्वभौमा । वैकुंठवासिया निरुपमा । ' –व्यं ५१. २ मृत्यु पावलेल्या विष्णुभक्तासंबंधीं कागदपत्रांत त्याच्या नांवापूर्वी लिहितात. **०समाराधना**–स्त्री. वधूपक्षानें वरपक्षास दिलेली मेजवानी.

**वैकृत**—वि. बदललेला ( आकार किंवा घटना यांत ). विकृत पहा; –पु. ( वास्तु. ) ताण; नेट. ( इं. ) स्ट्रेन.

**वैक्रांत**—न. एक रत्न; एक प्रकारचा हिरा. [ सं. ]

**वैखरी**—स्त्री. १ जिच्या योगानें शब्द बाहेर पडतात ती चतुर्विध वाणींपैकी चवथी; ( परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी ) स्वपरवेद्यवाचा. ' उच्चार होता अक्षराला । वैखरी बोलिजे । ' –दा १७.८२. २ वाचा; वाणी. ' फेडुनि जन्माची जवनिका । वैखरीयेतें करी वादक । ' –भाए ६०४. ३ वाग्देवता; वाचाशक्ति. ४ जीभ. ' घातल्या मुखामध्यें प्रेमानें वैखरा । वाटतो आतां तो हृदयांतरीं खरखरा । ' –प्रला २००. ५ भाषा. ' तुझें उदारत्व श्रीहरी । वर्दूं न शके प्राकृत वैखरी । '. [ सं. ]

**वैंगणें**—न. ( कों. ) उन्हाळयांत होणारें भात. –कृषि १९०. वायंगण पहा.

**वैगुण्य**—न. १ गुणामधील फरक, विरोध; गुणधर्मांचा विरोधीपणा. २ व्यंग; उणीव; दोष. [ सं. ]

**वै(वैं) णें**—उक्रि. सुपानें पाखडून, घोळून जाडा–बारीक अंश वेगळा करणें. ' नंतर तो रवा वैचावा ' –पाकशास्त्र २३. [ सं. विच्= न होणें ] **वैचपाखड**–स्त्री. ( व्यापकार्थी ) घोळणें–प [illegible] ं [ वैचणें+पाखडणें ]

**वैचंद**[illegible] स्त्री. ( व. ) एका कंदाच्या वाळलेल्या चकत्या. या तळून उपासाला खातात.

**वैचक्षण्य**—न. १ नैपुण्य; पारंगतता. २ संशोधनांतील प्रावीण्य. [ सं. ]

**वैचा**—पु. ( जरतार धंदा ) निरनिराळया आकाराचे व आकृतीचे जरीचे ठसे उमटविणें. [ ? वेंचा ]

**वैचित्र्य**—न. १ विविधता; भिन्नता ( रंग इ० ची. ). २ विलक्षणपणा; आश्चर्य. [ सं. ] **०वादी**–वि. रम्याद्भुत. ( इं. ) रोमॉन्टिक. –मनोरंजन मार्च १९१४ पृ. २८२.

**वैज**—पु ( कु. कों. ) वैद्य. [ सं. वैद्य; प्रा. वेज्ज ] **वैजी**–स्त्री. ( गों. ) १ स्त्रीवैद्य; डाक्टरीण. २ दाई; सुईण. ' तंव आणियेकु प्रबंदु करितु । दोघी वैजी होतिया देशांतु । ' –ख्रिपु १.१५. १२. **०पण**–न. सुईणपण.

**वैजयंती**—स्त्री. १ काळी तुळस. २ एक फुलझाड. ३ विष्णूच्या गळयांतील माळ हींत पृथ्वी–आप–तेज–वायु–आकाश या पांच तत्त्वांचीं दर्शक नीळ, मोतीं, माणिक, पुष्पराज व हिरा अशीं पांच रत्नें असतात. –ज्ञा ११.६०३. ' परम विसळ जेथें वैजयंती विराजे । ' –सारुह ८.११९. [ सं. ] **०माला-ळ**–स्त्री. वैजयंती अर्थ ३ पहा. ' वरी डोले वैजयंतीमाळ । '

**वैजात्य**—न. १ जातींची भिन्नता; वर्ग, प्रकार, तऱ्हा यासंबंधांत भेद. २ जात, प्रकार, तऱ्हा यासंबंधीचा परकेपणा. [ सं. ]

**वैडालव्रतिक**—पु. बोकेसंन्यासी; धर्मनिष्ठा, सद्गुण यांची बतावणी दाखवून मत्सर, लोभ, कठोरपणा करणारा. [ सं. बिडाल=मांजर+व्रत ]

**वैडुरी**—पु. ( महानु. ) एक राजनीतिग्रंथ ? ' बोधीला निज-वैडुरी उशनसी । ' –गस्तो. [ वैडूर्य ? ]

**वैडूर्य**—न. एक रत्न; नीलोत्पल. [ सं. वैडूर्य ]

**वैण**—पु. ( गो. ) वणवा. **वैणुचें**-अक्रि. ( गो. ) वणव्यांत सांपडणें.

**वैणव**—वि. बांबूचा केलेला; बुरुडी ( कणगा, टोपला इ० ) [ सं. वेणु-वैणव ]

**वैतरणी**—स्त्री. १ यमलोकची एक नदी. २ मृताला ही नदी तरून जातां यावें म्हणून उत्तरक्रियेच्यावेळीं ब्राह्मणास दान दिलेली गाय. ३ एक नदी. [ सं. ]

**वैताग**—पु. संताप, तिरस्कार यापासुन वाटणारी विरक्ति; उद्वेग; वीट; त्यागबुद्धि ( जग, जगांतील गोष्टी याविषयीं ). ( क्रि० घेणें; येणें ). [ सं. वै+त्याग ] **वैतागणें**-अक्रि १ तिटकारा वाटणें; त्रासुन जाणें. २ रागानें निर्भर्त्सना करून संबंध सोडण्याच्या गोष्टी बोलणें. वैतागून जाणें असा प्रयोग येतो.

**वैताद**—पु. ( गो. ) एकतृतीयांश तोळा.

**वैतालिक**—पु. प्रातःकाळीं गायनवादनानें राजाला जागा करणारा भाट, स्तुतिपाठक; बंदी. [ सं. ]

**वैद**—पु. ( विटीदांडू ) मराठी खेळांतील सहावा डाव; हात दुणून कोंपरावर विटी ठेवून ती थोडी उडवून दांडूनें मारणें. [ का. ते. अयिदु=सहा ? ]

**वैद**—पु. १ वैद्य ( अप. ). २ वैदू ( नाकाडोळ्याचा ). ' गदू नांवचा रे शब्दीं । मुख्य संग्रह कीजे वैदीं । ' –एरुस्व ११. ३६. [ सं. वैद्य ] **वदू**-पु. १ जडीबुटी–वनस्पतींचीं औषधें देणारी, रानावनांत राहणारी एक भटकी जात व तींतील व्यक्ति. २ अडाणी, न शिकलेला वैद्य. [ सं. वैद्य; ते. वैदू ]

**वैदर्भी**—स्त्री. १ विदर्भकन्या रुक्मिणी. ' नवल वैदर्भीच्या भावो । ' –एरुस्व ४.६७. २ ( साहित्य ) एक काव्यरीति. हींत समास बहुधा असत नाहींत व ही माधुर्याची व्यंजक आहे. ' वैदर्भी तशि मागधी स्फुरु आम्हा घेवोत रीती अशा । ' –कमं १.२. [ सं. ]

**वैदिक**—वि. १ वेदासंबंधी; वेदापासुन घेतलेलें, निघालेलें; वेदोक्त. २ वेदाध्ययनशील; वेद पढलेला ( ब्राह्मण, पंडित ). [ सं. ] ( वाप्र. ) **एकापेक्षां एक वैदिक**-प्रत्येकजण शहाणा ( विद्वानांच्या सभेविषयीं निंदाव्यंजक प्रयोग ) **वैदिकी**-वि. वैदिकाचा आचार, विधि इ० संबंधी; वैदिक पहा. –स्त्री. वैदिकाची वृत्ति, धंदा; वैदिकपणा.

**वैदिक**—स्त्री. ( गो. अशिष्ट ) वैद्यकी; वैद्यक. ' मी जाणती असे वैदीक । ' –उषा २८.७. [ सं. वैद्यक ]

**वैदुरा**—स्त्री. बेदर गांव. ' वैदुरा नगरीं जन्म घेसी । ' –गुच ९.३३.

**वैदूर्य**—पुन एक रत्न. वैडूर्य पहा. [ सं. ]

**वैदृति**—पु. १ भयंकर पोटशूल. २ वैधृति; एक योग.

**वैदेह**—पु. १ विदेह देशाचा. २ ब्राह्मण स्त्रीस वैश्यापासुन झालेला मुलगा. ' उत्तम वर्णाची जे नारी । हीन वर्णाचा गर्भ धरी ।...। तेचि संतति प्रसिद्ध । सुत वैदेह मागध । ' –एभा २०. ३०–३१. [ सं. ] **वैदेही**-स्त्री. सीता.

**वैद्य**—पु. ( विटीदांडू ) वैद पहा.

**वैद्य**—पु. रोगावर आयुर्वेदानुसार औषधादि उपचार करणारा तज्ज्ञ; देशी डॉक्टर; धन्वंतरि. –वि. °१ औषधी; वैद्यकासंबंधीं. २ वेदांसंबंधी. [ सं. ] **म्ह°** १ वैद्याचीं पोरें गाल गुंडानें मेलीं–स्वतःचा स्वतःला उपयोग नाहीं याअर्थी. २ वैद्याला वाटलें आणि संन्याशाला मुंडलें, कोणास समजत नाहीं **०क**-न. १ औषधीशास्त्र; वैद्याचें शास्त्र. २ औषधोपचारावरचा ग्रंथ, शास्त्र. [ सं. ] **०की**-स्त्री. वैद्याचा धंदा, व्यवसाय **०क्रिया**-स्त्री. शास्त्रोक्त औषधें, रसायनें इ० करण्याचें वैद्याचें काम. **०गिरी**-स्त्री. ( व्यापक ) वैद्यकी. **०नाथ**-पु. बारा ज्योतिर्लिंगांपैकीं मोंगलाईंतील परळीवैजनाथ. **०राज**-पु वैद्याला सन्मानपूर्वक म्हणतात. **०वाणी**-पु. ( व्यापक ) औषधोपचार, इलाज. ' वैद्यवाणी केले फार । परि गुण नयेचि अणुमात्र । ' **०शास्त्र**-न वैद्यक; औषधोपचाराचें शास्त्र. **वैद्योपचार**-पुअव. वैद्यकांतील उपचार, इलाज. सप्तोपचार पहा.

**वैद्युत**—वि ( शाप. ) विद्युतासंबंधी; विजेचें. [ सं. ] **०अणु–अयन**-पुन विद्युदणु असलेला फिरत्या द्रव्याचा कण; विद्युद्विश्लेषणांत ध्रुवाकडे जाणारें मूलद्रव्य. ( इं ) आयॉन. **०विघटन–पृथक्करण–विश्लेषण**-न. विजेच्या साहाय्यानें पृथक्करण. ( इं ) एलेक्ट्रोलिसिस.

**वैध**—वि. विधीसंबंधी; संस्कार–नियम–पद्धत इ० विषयींचें. [ सं. ]

**वैधर्म्य**—न. गुणविभिन्नता; विजातीयता. याच्या उलट साम्यर्थ. ' त्याला दोन्ही सभांमध्यें साद्दश्य अथवा वैधर्म्य काय दिसून येईल बरें ? ' –पाले २५३. [ सं. ]

**वैधव्य**—न. १ विधवापण. ' सौंदर्याला वैधव्याचा अलंकार सुद्धां करुण शोभा देतो. ' –एक ६२. २ विधवेची अवस्था, दशा. ' क्षत्रियां रणीं पळोनि जाणें । तें कोण साहे लाजिरवाणें । कां वैधव्यें पाचारणें । महासतियेतें । ' –ज्ञा १६ १७७. [ सं. ]

**वैधृत-ति**—पुस्त्री. पोटांतील भयंकर शूळ.

**वैधृत-ति**—पु. (ज्यो.) सत्ताविसावा योग. [सं.]

**वैन**—न. (महानु.) ज्ञान; बुद्धि.

**वैनजाब(बि)ता**—पु. दोषनिर्णयपत्रक. -राव्य ८.८.

**वैनतेय**—न. गरुड. [सं.]

**वैनसें**—न. वनसें पहा.

**वैपरीत्य**—न. १ विपरीतता; उलट प्रकार. २ वैमनस्य; स्पर्धा. [सं.]

**वैपुल्य**—न. समृद्धि; विपुलता; सुकाळ. [सं.]

**वैफल्य**—न. विफलता; निष्फलता; निरुपयोगिता; नापिकी; अनुत्पादकता. [सं.]

**वैभव**—न. १ ऐश्वर्य; थाटमाट; श्रीमंती. 'तैसी सर्वे वृत्ति-वैभवीं। बुद्धिचि एकली बरवी।' -ज्ञा १८.३४८. २ प्रताप; महिमा; थोरवी. [सं.]

**वैमत्य**—न. मतांतर; मतभिन्नता. 'आगरकर व टिळक यांच्या-तील वैमत्याचें ठोकळ स्वरूप पुढीलप्रमाणें आहे.' -मनोरंजन, आगरकर अंक. [सं.]

**वैमनस्य**—न. १ विमनस्कता; उदासीनता. २ मानसिक व्यग्रता; मनाची चलबिचल, गोंधळ. ३ वैर; विरुद्धभाव. [सं.] **वैमनस्व**-वैमनस्याचा अपभ्रंश.

**वैमात्र, वैमात्रेय**—वि. सावत्र; वेगळ्या आईच्या पोटचा (भाऊ) स्त्री-रूप वैमात्री, वैमात्रेयी (=सावत्र बहीण) अस होतें. [सं.]

**वैमानिक**—पु. विमान चालविणारा; विमानविद्येंत प्रवीण. -वि. विमानासंबंधीं; विमानाचें (शिक्षण इ०). [सं.]

**वैमुख**—वि. (चुकीनें) विमुख पहा.

**वैयधिकरण**—न. निरनिराळ्या विषयांचें, आधारांचें इ० अधिष्ठान, अस्तित्व; व्यधिकरणत्व. [सं.]

**वैयर्थ्य**—न. व्यर्थत्व; वैफल्य पहा. [सं.]

**वैयाकरण**—पु. व्याकरणशास्त्री; व्याकरणतज्ज्ञ. -वि. व्याक-रणासंबंधी (प्रक्रिया, इ०). [सं.] **वैयाकरणी-णीक**-पु. (चुकीनें) वैयाकरण पहा.

**वैयात्य**—न. उद्धटपणा; निलाजरा धीटपणा. [सं.]

**वैयी**—स्त्री. (सामा.) वई, वै पहा.

**वैर**—न. शत्रुत्व; वैमनस्य; प्रतिकूल भाव. [सं.] **म्ह०** जळांत राहून माशासीं वैर. **०उगविणें**-सूड घेणें. **०चाळणें**-शत्रुत्व करणें. 'हे देहमासीं। वैर चाळी अहर्निसीं।' -भाए ५०६. **०निर्यातन-प्रतिक्रिया**-नस्त्री. अपकाराचा अपकारानें प्रति-कार; सूड. **०फेरा**-पु. शत्रुत्व; द्वेष. 'जे चालवीती तुज वैरफेरे। वैरी असे ते सुख पावले रे।' -अक २. -हरिराजकृत रामार्याचें भाषांतर १३. **०भाव**-पु. द्वेष; शत्रुत्व. **०शुद्धि**-स्त्री. प्रत्य-पकार; वैरनिर्यातन; सूड. **वैराचार**-पु. (काव्य) १ शत्रुत्व; द्वेष. २ वैर प्रगट करणें. 'जनकें केला वैराचार.' **वैराडा**-पु. (महानु) वैरी; शत्रु. 'हा काळु उघडा। जगीं वैराडा।' -भाए ५२०. **वैरिणी**-स्त्री. वैर, द्वेष करणारी स्त्री. **वैरी**-पु. शत्रु; ज्याच्याशीं वैर असतें तो माणूस. 'वैरी जालियाही आर्तातें। न वंचणें जें कां।' -ज्ञा १६.८६. -वि. विरुद्ध; शत्रुसंबंधी. **वैरोद्धार**-पु. सूड घेणें, उगविणें. (क्रि० करणें). [वैर+उद्धार]

**वैरक्त्य**—न. विरक्ति. [सं.]

**वैरंगिक**—पु. इंद्रियनिग्रही तपस्वी. [सं.]

**वैरण**—स्त्री. लग्नांत नवरीमुलीच्या ज्या दोन चिरड्या अस-तात त्यांपैकीं जी अंगावर घ्यावयाची असते ती. दुसरी नेसु असते. -न. पांघरण्याचें वस्त्र; शेला. 'उत्तम वैरणें विराजत।' -वेसीस्व ९.१४५; -मुसभा १०.९. [सं. आवरण] **वैरण्य-गांठ**-स्त्री. वधूवरांच्या पांघरण्याच्या वस्त्रांची गांठ. 'वैरण्यगांठी वधुवरा।' -वेसीस्व १०.८६. [वैरण+गांठ]

**वैरण**—स्त्री. १ गुरांसाठीं चारा; ओलें गवत, वाळलेला कडबा इ०. २ गोठ्यांतील चारा घालण्याची जागा; गव्हाणी.

**वैरण**—नस्त्री. १ दळण्यासाठीं जात्याच्या पाळींत, भाजण्या-साठीं खापर, कढई इ० कांत किंवा कांडण्यासाठीं उखळांत एक वेळ घालतात तें धान्य; वैरा. 'पृथ्वी तेंचि उखळ जाण। नांगरें वीर घाली वैरण।' -एरुस्व १०.६०; 'पसेवरी वैरण घातलें। तांतडीनें जातें वोडिलें।' -दा १८.५.८. २ (सामा.) भर; पुर-वण. 'कां ताथुवाचां ताणां। ताथु घालिता वैरणा। तंतु तोचि विचक्षणा। होय पट।' -माज्ञा १८.३६०. (आडवा धागा, बाणा)-बंज्ञा. [?सं. वि+ईर्=फेंकणें] **वैरणें**-न १ वैरण अर्थ १ पहा; वैरा. 'कीं दळावेआं पृथिवीचां जातां। काळरात्रीं वैरणें घातलें मज पांतां।' -शिशु १०४४. २ ज्यांतून जातें, उखळ इ० कांत वैरण घालतात तें भांडें. -उक्रि. १ शिजणें, भाजणें, दळण इ० कारणासाठीं तपेलें, खापर, जातें इ० कांत धान्य ओतणें, घालणें, ओयरणें. २ (ल.) लोटणें; ढकलणें (निदार्थी प्रयोग). 'आपली मुलगी अशा ठिकाणीं वैरलीत.' -माझी कहाणी ५. ३ (सामा.) अर्पण करणें; देणें. 'ज्ञाला द्रुपदमदातें स्वशर शिखि-मुखांत वैरिता पार्थ।' -मोआदि २५.१४. **वैरा**-पु. १ एका वेळचा (डाळ, तांदूळ, इ०चा) शिधा; ओयरा. २ स्वयंपाकाचें साहित्य (चुलीपुढें ठेवलेलें). (वाप्र.) **मणाचा वैरा घरीं असणें**-मोठें कुटुंब, परिवार असणें.

**वैरल्य**—न. १ विरळपणा ( वस्त्रांतील धाग्यांचा ); वीण घट्ट नसणें. २ मनमोकळेपणा; ढिलेपणा ( स्वभावाचा ). ३ सैलभोंगळपणा ( कारभाराचा ). ४ (ल.) दुर्भिक्ष; टंचाई; कमतरता. [ सं. ]

**वैरस्य**—न. १ नीरसता; रसहीनता; शुष्कपणा. २ (ल.) कोरडेपणा; फिकेपणा; पाणचटपणा. विरस पहा. [ सं. ]

**वैरागर**—न. १ हिऱ्यांची खाण. 'वैरागरापुढें ठेविली गार। क्षीराब्धीपुढें ठेविलें तक्र।' -राव ३४.१६७. २ (सामा.) रत्नांची खाण. 'सभाग्यें खणितां वैरागर। रत्नांहूनि रत्नें परिकर।' -कथा १.१२.१. ३ (ल.) खाण; सांठा. 'ऐकें त्रैलोक्य सुंदरा। सकळ सौंदर्य वैरागरा।' -एरुस्व ४.४. ४ स्पर्शमणि; चिंतामणि; स्पर्शानें हिरा करणारा मणि. -एभा १२.२१०. 'वैरागर मणि पूर्ण तेजाचा होय। भेटल्या हरळ हिरा करीतचि जाय।' [ सं. वज्राकर ? ]

**वैरागी**—पु. १ संन्यासी; साधु; वैराग्य प्राप्त झालेला पुरुष. २ बैरागी; धर्माच्या नांवानें भिक्षा मागणारा. 'आधार वाटला वैरागी प्रति।' -दावि १६६. [ सं. वि+राग ] **वैराग्य**-न. १ प्रापंचिक इच्छा, आकांक्षा यांपासून निवृत्ति; अनासक्ति. 'तरी वैराग्याचेनि आधारें। जिहीं विषय दवडूनि बाहिरें।' -ज्ञा ५.१५१. २ वैषयिक सुखांचा त्याग करणें; विषयाचा कंटाळा. 'बुजली वैराग्याची वोरप। जिराली मनाची धाप काप।' -ज्ञा १७.२३१. [ सं. ] ०**पर**-वि. वैराग्याचें प्रतिपादन करणारें; वैराग्यबोधक. 'शृंगाररसाच्या भोक्त्यांना वैराग्यपर अर्थ कसा रुचणार? -मतिविकार ५७. ०**माला**-स्त्री. बैराग्याची माळ. ०**माला घेणें, वैराग्यमालेंत पडणें**-संसारत्याग करून बैरागी होणें.

**वैराट्**—वि १ ब्रह्मयानें उत्पन्न केलेल्या विराटपुरुषासंबंधी. २ विराट् राजासंबंधी. ३ वांई गांव-प्रांत यासंबंधी. [ सं. विराट ] **म्ह**० वांयीं वैराट बोली सैराट.

**वैराण-ळ**—पु. एक जात व तींतील व्यक्ति. हे लोक कांकणें इ० विकतात. लावण्या-पोवाडे आणि बायकी बोली यांतून हा शब्द येतो.

**वैराण-न**—वि. १ ओसाड; उजाड; पडित; उध्वस्त. 'सरकारचे फौजेचे जातांयेतां तीन मुक्काम जाहले, त्यामुळें गांव लुटले, व घरें जळालीं; सबब गांव वैराण जाहालें.' -वाडसमा १.९. २ (भूगोल) वालुकामय; निर्जल ( प्रदेश ). [ फा. वैरान्. तुल० सं. विरिण=शून्य ] **वैराणी-नी**-स्त्री. नासाडी; ओसाडी; गैरआबादी. 'त्या मुलखाची दशा आबादी वैराणीची काय पहावी?' -ऐटि ५.११. [ फा. वैरानी ]

**वैरूप्य**—न. विरूपता; विद्रूप आकार, घाट. [ सं. ]

**वैल**—पुन. चुलीचा बाजूचा भाग; अवेल पहा. [ सं. विलग; म. वायला ? ] ०**चूल**-स्त्री. वैल असलेली चूल.

**वैलंडी, वैलांडी**—वेलांडी पहा.

**वैलक्षण्य**—न. १ विलक्षणपणा; विचित्रपणा; नेहमीच्या गुणाहून, प्रकाराहून वेगळा गुण. २ वेगळेपणा; भिन्नता. [ सं. ]

**वैला**—वि. वरच्या, बाहेरच्या बाजूसंबंधी. [ वरला; गो. वैलो ] **वैलाटी-ठी**-स्त्री. वरचा प्रदेश; उंचावरचा भाग. वलाटी.

**वैलोम्य**—न. विलोमता; विरुद्धपणा. [ सं. ]

**वैवंथणें, वैवंतणें**—उक्रि. निकड लावून त्रास देणें; खनपटीस बसणें.

**वैवर्ण्य**—न. १ रंग अगदीं खराब होणें. विवर्णता. २ गुणधर्मांत भेद; विजातीयता. [ सं. ]

**वैवस्वत**—पु. चालू मन्वंतराचा अधिकारी; सातवा मनु. विवस्वानाचा पुत्र. [ सं. ]

**वैवाट, वैवाटणें, वैवाटदार**—( प्र. ) वहिवाट इ० पहा.

**वैवाडा**—पु. ( कों. ) घराभोंवतालचें परूस; वई-वयवाडा पहा.

**वैवाहिक**—वि. १ विवाहासंबंधी. 'तो मी आज पुरोहितत्व करितों वैवाहिकें मंगलें।'. २ नवराबायकोसंबंधाचा; दांपत्यधर्माचा. [ सं. ] ०**हक्क**-पु. नवरा किंवा बायको म्हणून वागणूक ठेवण्याचा हक्क. ( इं. ) कॉन्जुगल राईट. 'वैवाहिक हक्कानें वर्तणूक करावयाला लावण्याचा हक्क कोर्टास दिला आहे' -टिले ४.८९.

**वैव्हानी**—स्त्री. (महानु.) आवाहन; जमवाजमव (सैन्याची). 'करितां झाला वैव्हानी। चातुरंगांची।' -शिशु ७३०. [ सं. आवाहन ]

**वैशद्य**—न. १ स्पष्टपणा; साधेपणा; विशदपणा ( भाषा इ० चा ). २ मोकळेपणा; विस्तार ( जागा, भांडें इ०चा ). [सं.]

**वैशाख**—पु. चैत्रादि महिन्यांतील दुसरा महिना. [ सं. ] ०**रेचित( अंगहार )**-पु. ( नृत्य ) सर्व शरीर रेचित करणें, हात अपविद्ध करणें आणि आखंडलस्थान करणें, नंतर शरीर उंच करून कटिहस्त व कटिच्छिन्न हीं करणें. ०**रेचित( करण )**-न. हातपाय रेचित करणें; मान व कंबर रेचित करणें; व दोन्ही पाय वांकडे करून त्यांचीं बोटें दोन्ही बाजूंस होतील अशीं पावलें आडवीं ठेवणें. ०**स्थान**-न. ( नृत्य ) दोन्ही पाय वांकडे करून आडवे ठेवणें, म्हणजे त्यांचीं बोटें समोर न राहतां डाव्या व उजव्या बाजूस जातील. चक्र सोडणें वगैरे गोष्टी या स्थानांत उभें राहण्यानें सूचित होतात. ०**स्नान**-न. चैत्री पौर्णिमेपासून वैशाखी पौर्णिमेपर्यंत वसंतमाधवप्रीत्यर्थ प्रातःस्नान करणें; असें व्रत.

**वैशाखा-खी**-वि. वैशाख महिन्यासंबंधी. **वैशाखी**-स्त्री. वैशाखांतील पौर्णिमा.

**वैशिष्ट्य**—न १ निराळा गुण, विशेषता. २ भिन्नता; फरक; निराळेपणा; पृथक्पण. ३ (सामा.) बाळगण्याचा, धारण करण्याचा गुण. [सं.]

**वैशी**—स्त्री. (कु. कुण.) नशीब; दैव 'आमची वैशीच म्हणून आम्हांला हातीं घेतलेल्या प्रत्येक कामांत अपयश येतें.'

**वैशीक, वैसीक**—वि. (महानु.) वश करणारा. 'ओळखिजा वैशीक।' –भाए ७४६. 'वैशीकाचा पासी हे बांधौनि उपासी।' –भाए ७५१ [सं. वशीकृ]

**वैशेषिक**—न. षड्दर्शनांतील एक मत; कणादमत. 'विशेष' म्हणून एक नवीनच पदार्थ मानून कणादानें त्यास या दर्शनात महत्त्व दिलें आहे. –पु. वैशेषिक मताचा अनुयायी. 'यांचा (गुणांचा) विनाश हाचि मोक्ष। ऐसा वैशेषिकांचा पक्ष।' –विउ ३.५. [सं.]

**वैशेष्य**—न. १ निराळेपणा; विशिष्टपणा. २ अलौकिकत्व; अत्युच्चता. [सं.]

**वैश्य**—पु. १ हिंदूंच्या चार वर्णांतील तिसरा, व्यापारी उदीमांचा वर्ग. –ज्ञा ९.४६०. २ या वर्णांतील व्यक्ति; व्यापारी; वाणी. 'वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार।' –तुगा २३३१. ३ एखाद्या वस्तूचे गुणानुक्रमानें चार प्रकार कल्पिले असतां त्यांतील तिसरा प्रकार दर्शविण्याकरितां हा शब्द योजितात. उदा० वैश्य–हिरा–भाग–सब्जी–पिंपळ–इ०. [सं.]

**वैश्य**—वि. वश (अप.). 'करी रे मला वैश्य ते रामकांता।' –राक १.१४. [सं. वश]

**वैश्वदेव**—पु. रोज भोजनापूर्वी अग्नीला आहुती देण्याचा विधि; पंचमहायज्ञांपैकीं एक यज्ञ. [सं.]

**वैश्वानर**—पु १ अग्नि. 'मग लागलिया आगी कापुरा। ना काजळी ना वैश्वानरा।' –ज्ञा १५.४३९. २ एक औषधी पाक. [सं.]

**वैषम्य**—न १ विषमता; द्वैत. 'पार्था जयाचिया ठायीं। वैषम्याची वार्ताचि नाहीं। रिपुमित्रां दोहीं। सरिसा पाडु।' –ज्ञा १२.१९७. २ एकसारखेपणाचा अभाव; कमजास्तपणा. 'नाना कळावैषम्यें चंद्रु। कां सांडिला आर्धी नरेंद्रु।' –ज्ञा १७.२६. ३ अनियमितपणा; असमता. ४ विरोध; विषमभाव; अननुकूलता. ५ दुःख; मत्सर; हेवा. 'प्रेम असतें तेथें वैषम्य असलें तरी तें नाहींसें होतें; परंतु वैषम्य असलें म्हणजे आधीं असलेलें प्रेमहि विलय पावूं लागतें.' [सं.]

**वैषयिक**—वि. विषयासंबंधी (सुख इ०). विषय पहा.

**वैष्णव**—पु. विष्णुभक्त 'शैव यासी म्हणती सदाशिव। वैष्णव भाविती रमाधव।' –ह ३४.१७७. २ विष्णुभक्तिसंप्रदायाचा अनुयायी. याच्या उलट शैव. –वि. विष्णुसंबंधीं; विष्णूचें. 'ऐसी गीता वैष्णव प्रासादु।' –ज्ञा १८ ४९. [सं.]. ०**संप्रदाय**–पु केवळ विष्णूची निरनिराळ्या स्वरूपांत उपासना करणारा एक धर्मपंथ. ०**स्थान**–न. (नृत्य) एका पायाची मांडी किंचित् वांकडी करून पाय ताठ ठेवणें, दुसरा पाय जमिनीपासुन किंचित् उचललेला व बोटें बाजूस वळलेला असा पहिल्या पायापासून अडीच ताल अंतरावर ठेवणें, कमरेवरील भाग सरळ ठेवणें. अशा प्रकारें उभें राहण्याची तऱ्हा. नमन, अश्वारूढ होणें, ह्या गोष्टी ह्या स्थानांत उभें राहाण्यानें सूचित होतात. **वैष्णवास्त्र**–न. पिशाचास मारक असें अस्त्र; विष्णुसंबंधीं अस्त्र. 'कर्णकुमारें जाणोनि अतिसत्वर। वैष्णवास्त्र सोडिलें।' –जै ५.४४५. **वैष्णवी**–स्त्री एक मातृका. –वि. वैष्णवासंबंधी (आचार इ०). 'अनुष्ठान विधिमंत्र उपासना। सांगेन ते धारणा वैष्णवीची।' –ब २.९. **वैष्णवी भात**–पु वैष्णवांच्या गंधाप्रमाणें (वरती अक्षता (कच्चा), मध्यें गोपीचंदन (मऊ) व खालीं रक्षा।) झालेला भात.

**वैससें**—वनसें पहा.

**वैसा**—पु. (प्र.) वयसा. आयुष्य, वय. [सं. वयस्]

**वैस्वर्य**—न. १ स्वराचा बेसुरपणा. २ बेतालपणा. [सं.]

**वो**—या अक्षरानें आरंभ होणारे शब्द काव्यांतून व इतर लेखांतून जरी येतात तरी 'ओ' या अक्षरानें आरंभ होणाऱ्या शब्दापुढें त्यांचे अर्थ दिलेले आहेत. देशावर व अशिक्षित गांवढळ लोकांच्या तोंडी 'वो' नें आरंभ होणाऱ्या शब्दांचा विशेष प्रचार असला तरी 'ओ' रूप जास्त शुद्ध आहे. तव्हां वोकणें, वंक्ती, वोखटा इ० शब्द 'ओ' नें आरंभ होणाऱ्या शब्दखालीं पहा. वौ साठीं औ पहा.

**वो**—उद्गा. ओ! हांकेला उत्तर. –मोउद्योग ८.९९. 'भाविकासि दे वो बाहतांचि।' –दावि २७७.

**वो**—ओम् (अप.). 'वो नमो विश्वभरिता।' –ख्रिपु १.१.१.

**वो**—अ. आदरार्थी संबोधन (स्त्रीपुरुषांस); अहो (काव्यांत उपयोग). जयजय वो शुद्धे।' –ज्ञा १२.१. 'कैसिया वो तुम्हीं शिहाणियां।' –शिशु ६५; (अगे) 'तूं कोण वो गोरटी।' –मुआदि ३७.४१.

**वोइरणें**—उक्रि. वैरणें पहा. 'मन स्वप्नाचें काबाड। वोइरी निद्रा।' –ज्ञा १८.५४०; –भाए ७०४. ओइरणें पहा.

**वोक**—स्त्री. ओक, ओकारी पहा. 'पोटीं नडतां मळमूत्र वोक। तरी मरोन जाती सकळ लोक।' –दा ३.१.२६. **वोकणें**–ओकणें पहा. 'नकळत पतितांचें खादलें अन्न वोकी। तरि पतित नव्हे तो' –वामन भरतभाव. **वोकारा**–पु. वांति, ओकारा पहा.

'तयेच्या देखोनिया वक्रा। रावणा आला वोकारा।' –कथा ६. १७.५२.

**वोंकार**—पु. ओंकार. ओम् पहा. 'शब्द मौनाचा विचार। व्हावया मूळ वोंकार।' –दा ६.१०.३२.

**वोख**—वि. वाईट; वोखट पहा. 'नाठवी कव्हणाचें वोख चांग।' –गीता १२.७७२. 'तोही विषमत्व सूर्य तपणें। अनुराग वोखा।' –ज्ञाप्र २४२. **वोखट-टा-टें**–वि वाईट. ओखट पहा. 'देवा बहुती परी पाहतां। एथ वोखटें होईल झुंजतां।' –ज्ञा १.२०९; 'वोखटा तरीं मी विटलों देहासी।' –तुगा २१३९.

**वोखत**—पु. (भि.) वेळ, वखत पहा.

**वोखद**—न. औषध पहा. –ज्ञा १७.६२. 'वोखदीसी पाप न मिळें पाहाता।' –ब ४६०.

**वोखारणें**—अक्रि. (व.) रागावणें.

**वोगडचें**—अक्रि. (गो.) गहाळ होणें. **वोगडावचें**–उक्रि. (गो.) उधळणें; हरविणें.

**वोगमान**—पु. मानपान. 'व्याही जांवइयासी वोगमान। धनलोभें जाण कदा न करी।' –एभा २३.९७.

**वोगर**—पु. वाढलेलें अन्न; मूद; वाढप. ओगर पहा. 'आत्मबोधाचिया वोगरां। पुरे न म्हणेचि धनुर्धरा। आरोगितां।' –ज्ञा ४.१०७. 'वोगर वोगरिती अष्टदशा पक्कान्नें।' –धवळेपू ५३. [का. ओगर=भात. तुल० सं. अवगृ] **वोगरणें**–सक्रि. वाढणें; ओगरणें पहा. 'अन्न सुरस निपजलें। नेऊनी रोग्या वोगरिलें।' –ब ६१०.

**वोंगळ**—वि. घाणेरडा. ओंगळ पहा. 'नकळे ओंगळा उपदेश।' –तुगा ५७४१.

**वोगो**—पु. (कु.) कलम करण्याकरितां योजण्यांत येणारी आंब्याची फांदी.

**वोघ**—पु. ओघ पहा. १ पाट; ओहोळ. 'जरी सरिता वोघ समस्त। परिपूर्ण होऊनि मिळत।' –ज्ञा २.३५८. २ ओघळ; पाट. 'पात्रें भरूनि जाती वोघ।' –वेसीस्व १२.९४. ३ क्रम; रूढी. 'वोघ मागला क्वचित जरी असतां तरी हृदयीं भेतें।' –होला ९६. [सं. ओघ] **वोघणें**–वाहणें. 'प्रारब्ध मंदराचळाची सरिता। वोघ वोघील आतांची।' –नव २.३५. **वोघें**–क्रिवि. सहज; ओघानें. 'कां वाटे जातां वोघें। कल्हातांही डोळा लागे।' –ज्ञा १४.१८८.

**वोघरणी**—स्त्री. फोडणी; ओघरणें पहा. 'तक्रा दिधली वोघरणी।' –मुवन १०.१३२. [का. ओग्गरण=फोडणी]

**वोचकणें**—वचकणें पहा. 'ब्रह्मादिका जो हरि वोचकेना।' –सारुह ५.३६.

**वोज**—स्त्री. १ रीत; मार्ग. 'तेजाची वोज दावित। इंद्रनीला।' –ज्ञा ११.६००. २ चांगली रीत; व्यवस्था. 'जेणें मद्भक्त पूजिले वोजा।' ३ चांगुलपणा. [सं. ओजस्; ऊर्जा–उज्जा–वोजा. –भाअ १८३३; तुल० का. ओजे=व्यवस्था]

**वोजा**–वि. चांगला. 'सूर्यअस्तु हा समय वोजा।' –क्रिवि. १ व्यवस्थितपणें; चांगल्या रीतीनें. 'तया बैसवी आसनीं राम वोजा।' –माधवरामायण अयोध्या ४६. 'अमर करिती कृष्णपूजा। तैसीया वोजा पूजी द्विजा।' –एरुस्व ३.२४. २ सहज; सोप्या रीतीनें. 'कैसें बंधन तोडिजेल वोजां।' –विपू १.९५. ३ संवयीनें. 'प्रवर्ते वोजा श्वान जैसा।' –रंयोवा १.६९७.

**वोजावणी**–स्त्री. रीत; वोज. **वोजावणें**–क्रि. १ रीत, मार्ग दाखविणें; सुव्यवस्थित करणें. 'दाऊं वेल्हाळे देशी नवी। जे साहित्यातें वोजावी।' –ज्ञा १३.११५६. २ नीट होणें; सांवरणें. 'ऐसा अतिबळु संग्रामु झाला। न दिसे कोण्ही वोजावला।' –कालिका २५.१५. **वोजें**–क्रिवि. वोजा पहा. नीटपणें. 'पांचहि प्रलय वोजें। तुज निरूपिलें।' –दा १०.५.२८.

**वोजणें**—अक्रि. (महानु.) आचरणें; वागणें. 'मायेबहीनी वोजती ते तुम्ही वोजा.'

**वोझें**—न. ओझें पहा. 'माथां प्रपंचाचें वोझें। घेऊनि म्हणे माझें माझें।' –दा ३.१०.६. **वोझेल-ला**–वि. ओझें वाहणारा; ओझेल. 'भांडयादि वोझेला बैल उष्ट्र।' –दावि ४०१.

**वोटंगण**—न. आश्रय; टेंकण. ओटंगण पहा. **वोटंगणें**–क्रि. आश्रय करणें; अवलंबून राहणें. ओटंगणें पहा. 'आम्हीं तनुमनु जीवें। तुझिया बोला वोटंगावें। आणि तुवांचि ऐसें करावें। तरी सरलें म्हणे।' –ज्ञा ३.१२. **वोटिंगण**–न. लोड; गिर्दी; वोटंगण, ओटंगण पहा. 'मृदुमवाळ वोटिंगणें।' –मुआदि ४८. १७. **वोठंगण, वोठांगण**–न. लोड. ओटंगण पहा. 'वोठांगणें गादिया तेजाळ।' –पांप्र ५१.११२. **वोठंगणें**–क्रि. टेंकणें; आश्रय करणें. ओटंगणें पहा.

**वोटी**—स्त्री. ओटी पहा. 'तथापि मागे पसरून वोटीं।' –सारुह १.१३.

**वोठ**—पु. ओठ पहा. –एभा ३.३९२. 'सीतें वोठ तरकती।' –दा ३.७.२३.

**वोड-ढ**—न.स्त्री. १ त्रास; आपत्ति; ओढ पहा. 'हें वोढ ये काय यिच्या कपाळा।' –सारुह ८.२. २ तीव्र इच्छा; ओढा. 'अवघियांची वोढ कीं बिजेसिंग याचें पारिपत्य करावें?' –भाब १६. ३ ओढ; खेंचणी. 'जन्ममरणांचियां वोढी। नाना दुःखांचिया कोडी।' –एभा २.४७१.

**वोडउ**—वोडव पहा.

**वोडगस्त**—वि. ओढगस्त पहा. 'अभिमानी आणि निसंगळ। वोडगस्त आणि खळ।' –दा २.३:१८.

**वोड(ढ)ण**—न. ढाल. –ज्ञा ९.४९१. 'येतां वैरियाचें शस्त्र। वोडण पुढें करावें।' –रावि २७.६५; 'माझ्या देहाचें वोढण। आड असतां तुम्हां विघ्न। स्वप्नींहि परि नाहीं जाण।' –मुरंशु ९. [ओढणें]

**वोडंबर**—न. अवडंबर, आडंबर पहा. १ डोलारा. 'रावण गर्वाचें वोडंबर। त्रिंबक धनुष्य केला चूर।' –वेसीस्व ४.१०३. २ मिथ्या भास. 'प्रपंचाचें वोडंबर।' –एभा २८.२८४. ३ दंभ; ढोंग. **वोडंबरी**–स्त्री. गारुडविद्या; जादूगिरी. –अमृ ६.३२. 'मनुष्याची गौड विद्या। राक्षसांची वोडंबरी विद्या।' –दा १०.४.३४.

**वोडव**—न. मोटेचें चाक. 'तेथेही मोट फुटे कां नाडा तुटे। वोडव पडे बैल अवचटे।' –एभा ११.१५३२. [ओढणें]

**वोडव**—स्त्री. योग्यता. 'तेही अधिकाराचे वोडवेविण। काय सिद्धि जाय।' –ज्ञा ६.३३९. –पु. आदरसत्कार. –ज्ञा १३.६३७. –वि. नृत्याचा एक प्रकार. 'वोडव तांडवाची कुसरी। लावियेली यंत्रकारी।' –कथा ३.८.५८.

**वोडव**—पु. (महानु.) उद्गार; अवतरण. 'तो अळाप करी परावाचा। वोडवो वोडवी नवारसाचा।' –आदिपर्व (कृष्णदास) १.१.

**वोडवणें**—अक्रि. ओढवणें पहा. –अक्रि. १ प्राप्त होणें; येणें. 'किं निवृतिचा थळिऊं। वोडवला तो।' –भाए २५१. –तुगा २४८. २ अंगावर येऊन पडणें. –एभा १.३६०. –सक्रि. १ पुढें करणें. –ज्ञा ९.१५. 'राज्य सांडुन हात भिकेला। वोडवी तो लोकासी।' –नव १८.३९. २ घेणें. 'मुखींचिया तांबुला। वोडविलें करकमळा।' –कथा १.२.१७३. [ओढणें; तुल० का. ओड्डु=पुढें ठेवणें, करणें]

**वोडवन**—स्त्री. (महानु.) मांडणी; रचना. 'प्रमेयाची वोडवन।' –भाए १२.

**वोडसें**—न. (कों.) मोठा कोयता.

**वोडियाना**—पु. एक मुद्रा; उड्डियानबंध. 'आणि स्वधिष्ठाना वरौतें। नाभिस्थानाचिया हडौतें। बंदु जो आरोपे त्यातें। वोडियाना बोलिजे।' –स्वानु ९.४.६६; –अपरोक्षानुभव ११.८३. [सं. उड्डीयान]

**वोडौ**—पु. (महानु.) रसपरिपाक? वोडव पहा. 'हा संवादु श्रीकृष्णोद्धवाचा। मियां बोलिला प्राकृता वाचा। परि वोडौ सुकोस्रीचा। ठाको नेदी।' –भाए ८२४.

**वोढक**—वि. १ ओढक पहा. २ ओढगस्त. 'वोढक म्हणवून घ्यावें असा प्रसंग पडला.' –ख ४७६३. [ओढणें]

**वोढणी**—स्त्री. ओढणी पहा. 'वोढणी जरी बादली.' –वाडसमा १.३७.

**वोढणें**—उक्रि. ओढणें पहा. १ आकर्षिलें जाणें; जवळ येणें. 'लोक सहजचि वोढे। कामासाठीं।' –दा १४.६.२२. २ उपसणें. 'शस्त्रें वोढती भरार।' –दावि ३९६. ३ जवळ घेणें. 'संसारकृत्यीं तुजला नवोढे। त्या वल्लभावांचुन कोण वोढे।' –सारुह ७.२३. **वोढव(वि)णें**–ओढवणें, वोडवणें पहा. १ (हात इ०) पुढें करणें. 'कीं सत्य चंचु–पुट वोढविलें शुकानें।' –र १५. २ येणें; प्राप्त होणें. 'निर्माल्य साडितां मूर्ध्नी। प्रळयाचल वोढवी।' –मुसभा ४.१९.

**वोढणें**—न. पांघरूण. वेढणें पहा. **वोढवण**–न. पांघरूण. 'राव म्हणे मही आसन। अंबरासारखें वोढवण।' –नव १७.१५०. ओढवण पहा.

**वोढदाम**—पु. वाण्याच्या बैलावरील एक कर. –मसाप २.२.५२. [ओढणें+दाम]

**वोढवी**—स्त्री. (गो.) नवोढा कन्या. [सं. ऊढा]

**वोढा**—पु. ओढा पहा. 'कृष्णा कृष्णास वंदी प्रथम सुसमयीं धावुनी, दीन वोढा। भेटे निःशंक गंगेप्रतिहि...।' –मोकृष्ण ५८.३.

**वोढाकाढ**—स्त्री. खटपट; श्रम. 'सांपडला रथाबुडीं। वोढाकाढी निष्ठला।' –एरुस्व १०.६९. **वोढा वारा**–पु. मर्यादा; धरबंद. 'जयाचिया अंतरा। नाहीं वोढावारा। संयमाचा।' –ज्ञा १३.६९२; –एभा १०.५७०; –तुगा १३१०. [ओढणें+वारणें]

**वोढाळ**—वि. ओढाळ पहा. –ज्ञा ११.५४०; –एभा ७.७१३. 'स्वार्थी अभिळासी वोढाळ। अदत्त झोंड अदेखणा।' –दा २.३.२८. **वोढाळणें**–अक्रि. ओढाळपणा करणें; भटकणें. 'वोढाळितां लाविलें। ते तैसेंच कान पुंस वोलें।' –ज्ञा १३.७२९.

**वोढियाणा**—पु. (योग) एक मुद्रा; बंध; वोडियाना पहा. 'बंध पडे किरीटी। वोढियाणा तो।' –माज्ञा ६.२३०. [सं. उड्डीयान]

**वोढी**—स्त्री. वोढ, ओढ पहा. १ त्रास; कष्ट. 'परी धर्मपत्नी धांगडी। पोसितां जरी एकी वोढी। तरीं कां अपरवडी। आणावी आंगा।' –ज्ञा १८.९४२; –एभा २९.१००. २ कल; आकर्षण. 'उपरथीं परमानंद गोडी। यालागी श्रीकामाची अति वोढी।' –एभा ३.४४३. ३ ताण; नेट; जोर. 'आमुच्या बाणाची वोढी। केवीं साहतील बापुडीं।' –एरुस्व १.२. ४ टंचाई; कमतरता. 'अनर्घ्य रत्न हाता चढे। तैं भांगाराची वोढी पडे।' –ज्ञा १७.२६८. ५ धनुष्याची दोरी; ओढी पहा. (क्रि०काढणें) 'धनुर्षी काढूं जाणें वोढी।' –एभा ११.३५६. ६ धक्का; संकट. 'होता ब्रह्मांडा घडामोडी। वैकुंठ कैलासा नलगे वोढी।' –एभा २४.२३०.

**वोढें**—न. उद्दें; ओढें पहा. 'नगर पीडिलें त्याचें वोढें। आज काढीन एकदां।' –मुआदि ३८.८४.

**वोणत-ती**—स्त्री. (गो.) भिंत; ओणत पहा. 'त्याही वोणती थोडेआं दिवसांभितुरीं। मोडोनि पडळिया भूमीवरी।' –ख्रिपु २.४२.१३०.

**वोणवा**—वि. ओणवा पहा. ०**करणें**-खालीं वांकविणें. 'अर्थ देखोनि लविन्नला। तोजाण लोभें वोणवा केला।' –एभा १४.१६४.

**वोणवा**—पु. वणवा पहा. 'यांसी कवतुक दाखविलें रानीं। वोणवा गिळुनी गोपाळांसी।' –तुगा ३६. –र ५८?.

**वोणा**—पु. (महानु.) ओहोळ. कोंकणांत ल्हान प्रवहास ओहोण म्हणतात. 'बुंदेस्वरापासौनि तळेयांचा वोणा।' –ऋ ११६. [सं. वह्-उप-वहन]

**वोत**—पु. (महानु.) ओहळ; ओत पहा. 'वाजेश्वरा पूर्वे वोतु।' –ऋ ११४.

**वोतटी**—स्त्री. फार परिचय, संघटन. 'कां तुझा बोल न मनणें। हें वोतटीचेनि दाटणें।' –माज्ञा ११.५५४.

**वोतणें**—अक्रि. (महानु.) अवतरणें. 'माया घटाकारें वोते।' –चक्रधर. सि. सूत्रें २३.६. [सं. अवतार, प्रा. ओतर–वोतर–वोत]

**वोतपली**—स्त्री. १ कोंवळें ऊन. 'तैसोच गुरुकृपा उखा उजळली। ज्ञानाची वोतपली पडली।' –ज्ञा ७.१३१. २ थोडा शेंक, ताप. [सं. आतप–ओतप–वोतप+ली=अल्पार्थी प्रत्यय]

**वोतप्रोत-पोत**—क्रिवि. ओतप्रोत पहा.

**वोतंबर**—वि. ओथंबलेला; वांकलेला. 'वोतंबरू फलपुष्पीं!' –एभा १२.४२३. [ओथंबणें]

**वोतवर**—वि. उतूं जाण्याइतकें; भरपूर. 'वोतवर सुख तारुण्याचा भोगु।' –धवळे –मास्व १०६. [ओत. का. ओत्तु=पूर]

**वोंतवरा**—पु. जिल्हई; मुलामा. 'सोनेआ रुपेआचा वोतवरा। दिधला चांगु।' –ख्रिपु १.२६.७४. [ओप–वोप]

**वोतारी**—पु. ओतारी पहा. 'देवाच्या प्रतिमा वोतिती वोतारी।' –मध्व ४९८ **वोतीव**–वि. ओतलेली (मूर्ति इ०); ओतीव. 'तो वैराग्याचा कांतिउ। किं माहा तपाचा वोतिउं।' –भाए २५१. –स्त्री. मूर्ति; पुतळा. 'तियें गर्भभेद मुसें। रक्तमूत्र रसें। वोंतीव होऊनि असे। तें लाजिरवाणें।' –ज्ञा १६.१८०.

**वोथंबणें**—ओथंबणें पहा. 'करिती निर्लज्ज हरीचे दास। सकळ वोथंबले रस।' –तुगा ७२०.

**वोथंबा**—पु. ओथंबा पहा. १ ओळंबा. 'पावे उणेया पुरेया। वोथंबा जेविं।' –ज्ञा १३.५३६. २ आश्रय; टेंका; खांब. 'हा प्रकृतिमाजीं उभा। परि जुई जैसा वोथंबा।' –ज्ञा १३.१०२१.

**वोथरणें**—अक्रि. घाबरणें. 'सहस्र व्याघ्र गर्जता वनीं। जेवी हरणी वोथरे।' –मुसभा ९.७६. बोथरणें पहा.

**वोथरणें**—अक्रि. १ नाहींसा होणें. 'तेणें वोथरे विस्मयो।' –एभा १३.६७३. २ ढिला पडणें; मंदावणें. 'उठावला वोथरे वेका।' –अमृ ६.४६. [सं. उत्+स्थिर ?]

**वोथिजणें**—उक्रि. १ पातळ करणें. 'आइका पाणी वोथिजावें नलगे।' –ज्ञा ९.२१. २ विस्तारणें. [अव+थिजणें]

**वोदन**—पु. ओदन पहा. 'अनेक शाखा वोदना।' –वेसीस्व ८.६५.

**वोदरणें**—क्रि. (महानु.) (थर फुगुन) कोसळणें; उमळून पडणें; ढासळणें. 'वोदरे तेथ मध्यें टेंका श्रुति।' –दृष्टांतपाठ १०.

**वोनामा**—पु. ओनामा पहा. 'खडे मांडूनि शिकविला। वोनामा जेवीं।' –दा ६.६.२४.

**वोप**—पुस्त्रीन. १ मुलामा; तेज; ओप पहा. 'त्यावरी कनकाचे कलश। वोप जणो विजू प्रकाश।' –कथा ४.९.१९८; –मुविराट १.६४. २ शोभा; झळाळी. 'महाद्वारें विशाळ झळकती। नवरत्नांची चर्कें वोप देती।' –ह २९.७०. ०**सर-रा**–पु. १ रत्नाच तेज खुलून दिसण्यासाठीं त्याखालीं जो पदार्थ घालतात किंवा मुलामा देतात तो; ओपसरा पहा. 'उपाधीचा दुसरा घालिता वोपसरा।' –ज्ञा १५.७६. २ (ल) संबंध. **वोपसळें**–न. (महानु.) उजळा. 'कनकप्रभा सोलिजेती। वरी वोपसळें दीजती।' –पूजावसर ११.

**वोपणें**—उक्रि. १ देणें; अर्पण करणें. 'ऐसें युक्तिचेनि हातें। जै इंद्रियां वोपिजे भातें।' –ज्ञा ६.३५२. २ हाणणें; मारणें. 'शाल्व रथीं जंव चढे। तंव मुसळ वोपिलें रोकडें।' –एरुस्व १०.७२. ३ विकणें. 'पै सर्वभावेंसि उखितें। जें वोपिलें मज चित्तें।' –ज्ञा ९.३३५. –न. दान; अर्पण. 'मग देति ज्ञानाचें वोपणें।' –भाए ६२८. ओपणें पहा. **वोपविणें**–१ विकविणें. 'पुत्रपत्नी जीव। डोंबाघरीं वोपविलीं।' –तुगा १२५१. २ देवविणें; देणें.

**वोंबणें**—क्रि. ओथंबणें पहा. 'नां ते परिमळें वोंबिलें। चांपेयाचेनि।' –शिशु १९.

**वोभाण, वोभण**—न. १ पूर. 'जेथ प्रपंचाची वळणें। कर्माकर्मीचीं वोभाणें। वरी तरताती वोसाणें। सुखदुःखांचीं।' –ज्ञा ७.७३. २ वेग.

**वोमथणें**—अक्रि. लोंबणें. 'भंवईचीं पडळें। वोमथती शिनसाळें।' –ज्ञा १३.५६०. [उमतणें ?]

**वोमाय**—स्त्री. (प्र.) वधूमाय; नवऱ्यामुलीची आई. [ सं. वधू. प्रा. वहू+माय ]

**वोरकल-ली**—पुस्त्री. कसोटीचा दगड. वरकल पहा. ' तंव म्हणे वनमाळी । ब्रह्मविद्येचां वोरकलीं । ' –भाए ५४७.

**वोरख(खं)डा**—पु. ओरखडा पहा. ' पचाननें नखें कपाळीं वोरखंडा केला । ' –सप्र १८.४३.

**वोरंग**—वि. बेरंग. ' विषय वोरंग करी ' –दावि १४६. [ अव+रंग ] **वोरंगणें**-क्रि. विरणें; ओरंगणें. ' विषयें रंगीं वोरंगले । श्रीरंगरंगीं । ' –दा ३.१०.३२. [ वि+रंग ]

**वोरढाण-णी**—स्त्री. दुर्गंधी. वरढाण पहा.

**वोरप**—स्त्री. १ खाखा; उत्कंठा. ' बुजाली वैराग्याची वोरप । ' –ज्ञा १७.२३१. २ ओरखडा. [ ओरपणें ]

**वोरपणें**—ओरपणें पहा. १ ओढणें. ' वोरपिलीं कांटिया । कमळें जैसीं । ' –ज्ञा १६.३६७. २ ओरबाडणें. ' अस्थींचे नळे निरपे । शिराचे हीर वोरपे । ' –ज्ञा ६.२३४. **वोरपेकार**-वि. (महानु.) दरोडेखोर. ' वोरपेकारू गांवें घेताती । '.

**वोराबरा-र**—पु श्रम; खटपट. –ज्ञा ८.३५. ' निळा म्हणे म्हणोनि जागा । सांडोनि वोरवार वाउगा । ' –निगा १८९.

**वोरस**—पु. १ स्नेहभरानें फुटणारा पान्हा. –ज्ञा १४.६२. ' डोरली हे काय कृपेच्या वोरसें । ' –तुगा २१७९. २ प्रेम. ' जैसी भुलली वोरसें । माय बोले बाळा दोषें । ' –ज्ञा १८. १३२८. –न. पुत्र; वत्स. ' तूं माझी माउली मी तुझें वोरस । ' –नाम १५३९. ओरस पहा. [ सं. उरस्–औरस; प्रा. औरस्स ] **वोरसणें**-१ पान्हा सोडणें. ' जेवीं वोरसोनि तान्ही गाय । वत्सांपासीं धावूनि जाय । ' –भवि १७.२०३. २ प्रेम करणें. –एभा ३.८५०.

**वोराड**—न. (भि.) घर. ' एक दिही एका को ओरडा पांगवात आथी ' –भिल्लीभाषा २५. [ गु. वोरडी; म. ओरडी ]

**वोरें**—न. (प्रा.) वैरा पहा. –शर.

**वोल-ली**—स्त्री. तारण; गहाण. ' जें आपुलें सर्वस्व द्याल । मग इयेतें सोडउनि न्याल । म्हणोनि ग्रंथु नव्हे वोल । साचचि हे । ' –ज्ञा १३.३३०. ' ऐसें म्हणौति अंतरि वोलि घेऊनि घरासि पाठविलें ' –पंच ४.८. ओल पहा.

**वोल**—स्त्री. ओलावा; ओल पहा. ' जयांचिये आस्थेचेनि वोलें । सत्कर्म पाल्हाळीं गेलें । ' –ज्ञा ९.४७८. **वोलट**-स्त्री. ओल; ओली जमीन. –ज्ञा १८.९९९;–एभा ६.३०४. **वोला**-वि. ओला पहा. –एभा ८.२३३. **वोलावा**-ओलावा पहा. ' जरी पुण्याचा वोलावा । नाशिजैल । ' –ज्ञा १.२३२. **वोलांश-स**-पु. आर्द्रता; ओलेपणा, त्याचा अंश. –ज्ञा १८.४४६. ' सत्वाचेनि वोलांसें । बोधतरु वेल्हावतु दीसे । ' –भाए १८४.

**वोल्हावणें**-१ ओलें होणें. ' वोल्हावेल तनु होईल शीतळ । ' –तुगा २०१८. २ शांत होणें, करणें. –ज्ञा ११.२९०; १३. ११५८. **वोल्हावण-न**-न. ओला लेप; ओलेपणा. ' तया प्रमेयाची वोडवन । वरि दीजे साहित्याचें वोल्हावन । ' –भाए १२. **वोल्हावा**-पु. ओलावा; (ल.) आधार. ' नामरूपाही वोल्हावा । आपणचि जो । ' –ज्ञा ९.२८६. **वोल्हासा**-पु. ओलावा. –अमृ ६.३४.

**वोलंबा-बे**—पुस्त्री. वाळवी. –शर. वाळंबा पहा.

**वोलांडा**—ओलांडा पहा. ' ओलांडा आणि वळ । ' –दा ३.६.२३.

**वोलिंवठा**—पु. वाहती वाट; रहदारीचा रस्ता. ' जन्ममरणाचा वोलिंवठा । स्वभावें जें । ' –ज्ञा ८.१४४.

**वोलिसावलें**—नअव. (महानु.) स्त्रियांचीं महावस्त्रें; ओलीं वस्त्रें. ' कव्हणा एका रायाचा डींगरा असे । तो वोलिसाउलें ने । तें उपसाहे । ' –दृष्टांतपाठ ८२.

**वोली**—स्त्री. उपरणें. ' तदुपरि जरतारी मंदिले उंच वोली । ' –सारुह ३ ३९. –दावि ५००.

**वोल्हांटणें**—उक्रि. हांकलणें; परतविणें. ' चिंतामणीची खाणी लागली । तेणेंवरी वोढाळें वोल्हाटिलीं । ' –ज्ञा ११.५४०. [ उलटणें ]

**वोल्हावण**—न. (महानु.) ओलवण; शक्तिवर्धक औषधी उपाय. ' मग तो रावो म्हणे यासि वोल्हावण करी । ' –दृष्टांतपाठ ७७.

**वोवणी**—स्त्री. ओंवणी पहा. माळ. ' जैसी असे विमल वोवणि मोतियांची । ' –सारुह ५८५;–तुगा १०७२.

**वोवथा**—स्त्री. अवस्था पहा. –मनको.

**वोवरा, वोवरी**—पुस्त्री. ओरी, ओवरी पहा. –ऋ १०७. ' जो आत्मबोधाचिया वोवरां । पहुडला असे । ' –ज्ञा ६.६२. खोली; कोटडी. –ज्ञा ८.६१; –एभा १४६. [ ओवरी ]

**वोवसा**—पु. वसा; व्रत; नेम. ' माझें अधिष्ठान घरीं । आणि वोवसें आनाचें करी । ' –ज्ञा ११.८१६; –दा ७.९.२३. [ सं. उप+आस्; प्रा. उवास; म. वसा ] **वोवसणें**-व्रत घेणें; ओवसणें पहा. ' गौर वोवसली '. **वोवसी**-वि. वसा घेतलेला; व्रतस्थ. ' कां वाण धाडिजे घरा । वोवसीयाचे । ' –ज्ञा १७ २८६; –एभा २३.३१९.

**वोवळ-ळी**—नस्त्री. (गो.) बकुळीचें झाड; फूल. ओवळ पहा.

**वोवा**—पु. (अशिष्ट) १ वाम, वाव पहा. २ ओवा पहा.

**वोवांडणें**—अक्रि. १ फिरून परत येणें. ' मग वोवांडिती स्वर्गस्थ । पूर्वे पुरुष । ' –बंड्डा १.२५३. (पडणें-माझा). २ पार

पडणें. 'ऋतुकोटि वोवांडित।'-ज्ञा १३.१६४. (ओलांडणें-माज्ञा. ओंबाळून टाकणें. -ज्ञा. परिभाषा; मनको). ३ उपेक्षा करणें. 'आइकोनिचि वोवांडिले। कोण्ही जरी।'-ज्ञा १३.२६५. (उल्लंघणें-माज्ञा). ४ उघडण्याचा प्रयत्न करणें. 'हें घनगर्जना सरिसा। मयूर वोवांडे आकाशा।'-ज्ञा १८.४७४. (उलटणें-ज्ञा. परिभाषा). ५ झुकणें; कल जाणें. -दृष्टांतपाठ ४९.

**वोंवारा**—पु. (प्रां) आळा; मर्यादा. -शर.

**वोवांळणी**—स्त्री. ओवाळणी पहा. 'असो स्वप्रीतीची वोवाळणी। सदाजे करिती।'-रुग १.४७०. **वोवाळणें**-ओवाळणें पहा. 'श्वासामोदा भुलेल भृंग। वोवाळती सुखातें। -मुआदि ३९.५२. **वोवाळी**-स्त्री. ओवाळणी; कुरवंडी. 'तो चतुर्भुज वनमाळी। अर्धांगीं लक्ष्मी वेल्हाळी। देखूनी करिती वोवाळी। वनदेवता।'-कालिका १४.१९४.

**वोवी**—स्त्री. ओवी पहा. 'ते भगवद्गीता वोविया गावों। ऐसें केलें।'-ज्ञा १०.१९.

**वोंविळा**—वि. ओवळा पहा. 'जें शिवपणही वोंविळे। आंगीं न लवी।'-अमृ २.११; -ज्ञा १०.२०२; -एभा ४.२५८.

**वोशट**— वि. ओशट पहा.

**वोषद**—न. (प्र.) औषध पहा. 'साधे वोषध गुणवंत।' -दा १४.१.२.

**वोस**—वि. ओसाड; शून्य; ओस पहा. 'काय करावें गोमटें। वोस नगर।'-ज्ञा ९.४३३;-एभा ३.६७९. **वोसल-ळ, वोसाळ**-वि. शून्य. 'तैसें जें वायाणें। वोसाळ दिसे जाणणें।'-ज्ञा १८.५७७. **वोसावणें**-१ न्यून, कमी होणें. 'चंद्रमा कळीं धाला। न दिसे कोणें आंगीं वोसावला।'-ज्ञा १५.३०३. २ उदास होणें. 'तुज उद्विग्न वोसावलें देखोन।' -रंयो १.२०३. ३ ओस पडणें. **वोसि**-स्त्री. (महानु.) खिन्नता. 'न मिळतां आहारीं। काहीं वोसि न धरी।'-भाए ३३४. **वोसित्रा**-वि. वोसि पहा.

**वोंस**—स्त्री. (गो.) चरबी; वसा. [सं. वसा]

**वोसक**—पु. विषय. -मनको.

**वोसंग**—पु. मांडी. -ज्ञा ११.१०३. 'जगतुंडास वोसंगा घेऊन। विश्वजननी देत स्तनपान।'-शिली १४. ओसंग पहा. [सं. उत्संग] **वोसंगां असणें**-आश्रयाखालीं असणें.' दोघे पुत्र कांता निर्धारी। तुझे वोसंगां आहेत हरी।'. **वोसिंगा**-वोसंग पहा.

**वोसंडणें**—अक्रि. ओसंडणें पहा. १ भरून वाहणें; सांडणें. 'तें कृष्णवचनामृत। पार्थी भरोनि वोसंडत।'-ज्ञा १५.५८८; -ऋ १८. २ टाकणें; त्यागणें. 'कां समोर अग्नि देखोनि। जरी न वचिजे वोसंडोनी।'-ज्ञा १.२३०; -एभा २.२८६.

**वोसण**—न. केरकचरा; वाहून आलेले जिन्नस; वोसाण पहा. -एभा ७.५२१ [वोसंडणें] **वोसगणें**-वोसंडणें पहा. 'आनंदें त्या आळविती। वोसणती हरिनामें।'-निगा १४९.

**वोसण**—स्त्री. (प्र) वेसण पहा.

**वोसणणें, वोसणावणें, वोसाणणें**—अक्रि. बरळणें; बडबडणें ओसणणें पहा -ज्ञा ८.६; -एभा १०.३१२. 'गाढ मुद्रें निद्रिस्त जो। निद्राभरें वोसणे जो।'-भिसं ४१ 'नवल वैदर्भीचा भावो। रात्रीं वोसणावं देवो। भीमकी साडूं नको ठहो। आलों पाहवो पर्णावया।'-एरुस्व ४.६८ 'संसार हाच दीर्घ स्वप्न। लोभें वोसाणती जन।'-दा ७.१.२०. [सं उत्+स्वप्-स्वप्न]

**वोसंतणें**—उक्रि. १ आचरणें; करणें. 'वोमतिता रात्रिंदिवसें। नाराणुक जया।'-ज्ञा १६.९२. २ आक्रमण करणें. 'होतों अज्ञानाच्या आधारा। वोसंतीत जन्म बाहरा।'-ज्ञा १७.४२९. (भोगून टाकणें-माज्ञा).

**वोसन**—क्रिवि. फुकट; व्यर्थ. 'तेथें शस्त्रें जातीं वोसन।' -रावि २८.६६.

**वोसपणें**—अक्रि. भयभीत होणें. 'तैसे वोसपले जीव।' -तुगा ३८३९.

**वोसर**—पु. ओहोट; ओसर पहा. **वोसरणें**-अक्रि. ओसरणें पहा. १ कमी होणें; ओहटणें. 'मेघ उदार परी वोसरे। म्हणऊनि उपमेसी न पुरे।'-ज्ञा ९.२०५ २ नाहींसे होणें. 'तेथें तारुण्य वोसरेना। रोगव्याधिही असेना।'-दा ४.१०.१९. ३ मागें हटणें; दूर जाणें. -एभा ६.१७३ ४ खालीं पडणें. 'गगनिहूनि सुमनवृष्टि। भीष्ममाथां वोसरली।'-मुआदि २३.७४. **वोसरा, वोसारा**-पु. कमताई; न्यूनता. -ज्ञा १५.१६३; -एभा ११.१४०९.

**वोसरी**—स्त्री ओसरी पहा. 'सहजस्थिती जाऊनि वोसरी। बसती झालो शुभगात्री।'-नव २०.५१.

**वोसवणें**—वोसणणें पहा.

**वोसाड-डा**—पु. शिंतोडा. -वि. ओसाड. ओसाडा पहा. -एभा ११.१५.

**वोसाण**—न. पुरांत वाहून आलेला केरकचरा, इ०. 'वरी तरताती वोसाणें। सुखदुःखांचीं।'-ज्ञा ७.७३; -दा ११.६.६. वोसण पहा.

**वोह-हा**—पु १ कांस; ओटी. 'का वोहाचे दुधीं। सायचि असावी आधीं।'-अमृ ७.६३. -ज्ञा १८.७८५. २ पान्हा. 'वोहा दाटल्या चहूं स्तनीं। दुग्धधारा वर्षती।'-मुवन १२.६७. [सं. ऊधस्; प्रा. ऊह]

**वोहट**—स्त्री. ओहट; उतार; कमीपणा. (क्रि० पडणें). 'मग म्हणे उत्कंठे वोहट न पडे। अझुनि सुखाची सोय न सांपडे। –ज्ञा ११.१५४; –सारुह ४.११०. ओहट पहा. **वोहटणें**–१ ओसरणें; ओहटणें पहा. 'मद मत्सर वोहटेना। भुली पाडिती।' –दा १०.४. २ आकर्षणें; संकुचित होणें. 'तेथ आपानु आंतुलीकडे। ओहोटों लागे।' –ज्ञा ६.२००.

**वोहदा**—पु. हुद्दा पहा. अधिकार. 'येक वोहदेचा जालो किंकर।'–दावि ३५३;३५५. [अर.] **वोहदेदार**–वि. हुद्देदार 'जन्मविती भूवरी भोगावयाते। वोहदेदार देव ते यजमान।' –दावि ७६४.

**वोहमा**—पु. (प्र.) वहिमा, वहीम पहा. (क्रि० धरणें; येणें).

**वोहमाय**—स्त्री. वधूची आई; वहूमाय. 'वृद्ध परंपरा ऐसी आहे। वरचरण उटी वोहमाये।'–एरुस्व १४.८९;–मध्व ६८८. [सं. वधूमाता; प्रा. म. वहूमाय] **वोहोमा**–स्त्री. (अशिष्ट) वधूमाय.

**वोहर-रें**—न. वधूवर; नवें दंपत्य; मेहूण. 'वोहरेवीण वाधावणें। तो विटंबु गा।'–ज्ञा १३.८३७. 'परम साजिरीं शोभायमान। वोहरें पाहातीं विश्वजन।' –वेसीस्व १०.९० [सं. वधूवर]

**वोहर**—पु. (व.) कुणब्यांत श्राद्धपक्षांत देवस्थानीं ज्याला बसवितात तो.

**वोहरणें**—अक्रि. संपणें; ओहरणें पहा. 'गे बाई अघटीत संकटगती कवणें रिती वोहरे।' –आगो ११०.

**वोहरी**—स्त्री. शून्य; पोकळजागा. –शर. 'करीन शत्रु वोहरी।'

**वोहळ, वोहाळ, वोहोळ**—पु. ओढा; नाला. ओहळ पहा. –ज्ञा ९.४५८. 'लपौनि चोरखांचेचां वोहळीं। वळीत पळिताचे ताडवन घाली।' –भाए ५२१. 'चहूंकडून दाटले पूर। वोहाळ गंगा भरल्या समग्र।' –ह १०.१८२;–तुगा २२४०. [सं वह्]

**वोहळणें**–अक्रि. वाहून जाणें; ओहळणें. 'वार्षिये प्रथमदशे। वोहळलया शैल्याचें सर्वांग जैसें।' –ज्ञा ११.२४७; –अमृ ३.२९. **वोहोळणें**–अक्रि. ओघळणें; न्हाणें. 'अवघा रगतें वोहोळला।' –उषा १२०.

**वोहा**—पु. गांईम्हशीची कांस; ओहा. 'कां वोहाच्या दुधीं। सायिचि असावी आधीं।' –अमृ ७.६३. [सं. ऊधस्]

**वोहा**—क्रि. आज्ञा. (भि.) बसा! 'वोहा बा, जाहूं आमी रामराम।' –भिल्लीभाषा ३२.

**वोहारा**—वि (व) वाईट पायगुणाचा.

**वोहिनी**—स्त्री. वहिनी पहा. 'जेष्ठ बंधूची जे राणी। रेवती कृष्णाची वोहिनी।' –एरुस्व १४.७५; कचेप्रुच ९.

**वोळकंबणें**—क्रि. ओळकंबणें पहा. –एरुस्व ७.३३; 'वोळकंबलीं महावृक्षीं। अस्वलें आणि वाघुळें।' –मुआदि ३६.५५.

**वोळख**—स्त्री. (कों.) पाणी मरण्याकरितां केलेली दांडयाची नरोटी; डवली.

**वोळख**—स्त्री. ओळख पहा. परिचय; ज्ञान. 'जें चावळलें वोळखीं। शास्त्रांचिया।' –ज्ञा १७.३५६. **वोळखण**–स्त्री. ओळखण्याची खूण. 'अतां आइके वोळखण। अव्यक्ताची।' –ज्ञा १३.८९; –एभा ३.१२. **वोळखी**–स्त्री. ओळख पहा. 'चोरास वोळखी पुसो नये।' –द २.२.५.

**वोळग**—स्त्री. १ सेवा; उळिग पहा. 'होईन पुरेपण। वोळगेचें।' –ज्ञा १३.४२४. –एभा १४०. २ आश्रय; ओळग. 'चंद्रसतार वोळग घाली। नक्षत्रभेमाजो।' –पूजावसर ११. **वोळगण, वोळगी**–सेवा; वोळग. 'बहिणी म्हणे पूर्ण विरक्ति आनसीं। ज्ञान हें तयासीं वोळगण।' –ब १६०. 'जंव वेह हें असेल। तंव वोळगी ऐसी कीजेल।' –ज्ञा १३.६३०. **वोळंगणा**–वि. सेवक; उपासक. 'स्वधर्मे पंथीं वर्तता जाण। सिद्धी होती वोळंगण्या।' –मुआदि ८.८०. **वोळगणें, वोळंगणें**–क्रि. १ सेवा करणें; आश्रय करून राहणें. 'अष्टसिद्धि याचे द्वारीं। वोळंगत राहतील निरंतर।' –गुच ११.१८. –मुआदि १८.२०. २ बिलगणें; लोंबणें. 'वोळगे फळभार। लावण्येसी।' –ज्ञा ३.१००. ३ जवळ जाणें; भेटणें. 'नगरा येका जाउनि रायाते वोळगे।' –पंच ४.४. **वोळगविणें**–(महानु.) सेवे प्रीत्यर्थ अर्पण करणें. 'वाईसी कापुरे वीडा वोळगवीला।' –पूजावसर ३३.

**वोळग, वोळंग**—स्त्री. सभा; बैठक. 'वोळग वीसर्जेली तया ततक्षेणीं: सकळही यादवां देवें दीधली पाठवणी।' –धवळे पू. २०. –गुच २९ ११२.

**वोळघणें, वोळंघणें**–वोलगणें पहा. १ भिडणें; लगटणें. 'सुरत सुखालागीं स्वागें। मृगीवरी वोळंघती।' –मुरंशु ३५. २ चढणें. 'आपल्या माथां वोळघे। आपण कोण्ही।' –अमृ ४.१९.

**वोळणें**—अक्रि. ओळणें पहा. १ वळणें; अनुकूल होणें; प्रसन्न होणें. 'गुणानुवाद श्रवण करितां। वोळे सरस्वती।' –दा १.२.२६. तुगा ६६. २ भागणें; तृप्त होणें. 'तृषा वोळे तेंचि सुख। वांचूनिया।' –ज्ञा १८.५५९. ३ भरून येणें; समृद्ध होणें. 'आगर बागा नाहीं मिती। सुधाफळानें वोळती।' –वेसीस्व ३. ५४. 'मेघ वोळला अंबरीं। तळीं दुर्दैवी मयूरी।' [वळणें] **वोळवणें**–१ वोळणें; भागणें. 'करपात्रें प्राशितां वेख। तृषा समूळ वोळवते।' –जै १.३०. २ उदित होणें. 'गगनीं वोळवितु गभस्ति।' –मुवन १.२२.

**वोळणें**—(व.) वाळणें पहा.

**वोळंब**—पु सोंग. 'सुखें वोळंब दावी गोहा। माझें दुःख नेणो पाहा।' –तुगा २९५७.

**वोळंबणें**—अक्रि. ओळंबणें पहा. –अमृ ६.१००.

**वोळंबा, वोळिंबा**—पु. वारुळ करणारी मुंगी, किडा; वाळवी. वाळिंबा. –ज्ञा ८.८९. 'वोळंबा घर करी सायासें। त्यामाजीं सर्प राहे सावकाशें।'–एभा ९.१७६. 'आजि इंगळासि वोळंबे निश्चिती। लागलें ऐसें वाटतें।' –कथासा २५.१४६. ओळंबा पहा.

**वोळसा**—पु. १ वळसा; वेढा; फेरा. 'तुटला वोळसा मीपणाचा।'–दावि ४१६. २ भोंवरा. 'जातो तळा येतो मागुता लवकरी। वोळशाचे फेरीं सांपडलों।' –तुगा ५६२. [वळसा]

**वौ०**—वौसर (संक्षेप) पहा. 'देय दांड फुलें १०० वौ०' –चौऱ्याशीचा शिलालेख.

**वौर**—पु. (कु.) पूर; लोंढा. औेर पहा.

**वौंश**—पु. वंश पहा. 'उभय वौंशाचा उच्चार। ब्राह्मण मुखें होतसे।' –वेसीस्व १०८२. –मध्व ३८९.

**वौसर**—पु. पुडा; गड्डी.

**वौसा**—पु. वसा पहा.

**वौळ**—पु बकुळीचें झाड; ओऊळ पहा.

**व्यंकट**—वि. वांकडा; वक्र; कुटिल; वेंक पहा. 'भोंवया रेखिल्या कृष्ण रेखा। अतिसुरेखा व्यंकटा।' –एरुस्व ७.१५. 'चंद्ररेखा व्यंकटी। रुळती नखीं।' –कथा १.२.१४८. [सं. वक्र, वंक; आ. वंक, वंकुड] **०कटाक्ष**–पु. वांकडया डोळयानें पाहाणें. –एभा ८.७१. **व्यंकटी**–स्त्री. वक्रता; कुटिलता. 'जे खळाची व्यंकटी सांडो।' –ज्ञा १८.१७९४. **व्यंकटेश, व्यंकोबा**–पु. कर्नाटकांतील एक देवता; विष्णु; बालाजी (गिरीचा).

**व्यक्त**—वि. १ इंद्रियगोचर; स्वतंत्र अस्तित्व असलेला. 'अव्यक्त ब्रह्मापासून. हा व्यक्त प्रपंच झाला.' २ उच्चारतां येणारा (वर्ण, शब्द). ३ स्पष्ट; उघड; दिसाया, समजाया जोगा. 'आतां शांतीचें जी लिंग। तें व्यक्त मज सांग।' –ज्ञा १६. १३६. –मोसभा १.१००. ४ दृश्य. –एभा १.१५. ५ साकार. 'वोळी लिही व्यक्तु। आपणचि।' –ज्ञा १३.३०७. ६ ज्ञात; ज्ञातसंख्येचें (गणित, अंकगणित). याच्या उलट अव्यक्त (बीजगणित). 'किती एक पदें व्यक्त ... सांगितलीं आहेत.' –म. बीजगणित १. ७ (तत्त्व) नाशिवंत; क्षर. –गीर १४१. [सं.]

**व्यक्ति**—स्त्री. १ सत्य, प्रत्यक्ष गोष्ट; वस्तु; विशेष (मनुष्याचा, पदार्थाचा). २ स्पष्टपणा; उघडपणा; प्रगटता. –ज्ञा १७. ३७०; –एभा २४.८८. ३ आकार; स्थिति. –ज्ञा २.१५०. ४ स्पष्ट उच्चार. –ज्ञा १७.४०४. 'हें पोर नुगतें बोलूं लागलें, अजून वर्णाची व्यक्ति होत नाहीं.' ५ असाधारण, अलौकिक पुरुष. कोणताहि मनुष्य; असामी; इसम. ६ (ल.) अट्टल लबाड, बदमाष माणूस. ७ आविष्करण; दिग्दर्शन. ८ अ चा लोप झाल्याची अक्षरापुढील ऽ खूण. [सं.] **०दर्शन**–न. (लेखनकला) लेखकानें जें कांहीं लिहिलें असेल त्यावरून विवक्षित व्यक्तीचें प्रत्यक्ष दर्शन झाल्यासारखें वाटणें किंवा लेखकाच्या वर्णनानें वर्ण्य व्यक्ति वाचकांपुढें मूर्तिमंत उभी राहणें. –प्रतिभा साधन. **०वाचक**–वि. १ वैयक्तिक; व्यक्तीसंबंधीं. २ (व्या.) एखादें उदाहरण दाखविणारें, सिद्ध (नाम). याच्या उलट जातिवाचक. **०वैचित्र्य-वैशिष्ट्य**–न. एखाद्या व्यक्तीच्या ठिकाणीं असणारा विशेष गुण. 'एखादा कलावान् व्यक्तिवैचित्र्यानें नवीन सुधारणा–कसब दाखवूं लागला तर लोक त्याला मागें खेंचतात.' **०स्वातंत्र्य**–न. व्यक्तीला निर्बंध वागण्याची मोकळीक. 'व्यक्तिस्वातंत्र्यानें धर्मबंधनें तुटत चाललीं आहेत.' –केले १.१६७. **०स्वातंत्र्यवाद**–पु. (तत्त्व.) व्यक्तीला स्वातंत्र्य देण्याबद्दलचें मत. (इं.) इन्डिव्हिज्युॲलिझम्. **व्यक्तीकरण**–न. १ स्पष्टीकरण; विवरण; फोड. करण ७ पहा. २ चित्रकलेंतील अंग; साधनक्रिया. (इं.) आर्ट ऑफ एक्झेक्युशन.

**व्यंग**—वि. १ न्यून, उणेपणा असलेला (एखादा अवयव). २ ज्याच्या अवयवांत न्यून, उणेपणा आहे असा (माणुस); पंगु; विकलांग. ३ अपूर्ण; अखंड (वस्तु, पदार्थ); उणा; कमी. 'नाचों तेथें उभा राहे। जातां व्यंग करी साहे।'–तुगा ४०४८. ४ कमीपणा येणारी; अपमानाची (गोष्ट, इ०). 'हें कांहीं आपणांस वांचवीत नाहींत, मग व्यंग गोष्टी सांगणें हें विहित नव्हे.' –भाव ६६. –न. १ विकलत्व; पंगुता. २ अपूर्णता; अखंडता. ३ लंगडी बाजू; बिंग. ४ कातडीवरचा तीळ; वांग. [सं.] **व्यंगणें**–अपूर्ण होणें; यथासांग न घडणें. –ज्ञा १७.३९३. **व्यंगित**–वि. व्यंग पहा.

**व्यंग**—व्यंग्य पहा.

**व्यंगणें**—वेंगणें पहा.

**व्यंगुल-लि**—वि. बोटतुटका. –नस्त्री. अंगुलाचा साठावा अंश; एकसाठांश अंगुल. एक माप. [सं. वि+अंगुल]

**व्यंग्य**—वि. १ आडपडद्यानें, अप्रत्यक्षपणें, अलंकारिक शब्दानें सांगावयाचें, दिग्दर्शित करावयाचें; सूचक तऱ्हेनें, हावभावानें किंवा कृतीनें गुप्त गोष्टीबद्दल कळवावयाचें जें तें; व्यंजक; गर्भित. –न. १ छद्मी, सूचक भाषण; वक्रोक्ति. २ अलंकारिक भाषण. [सं.] **०चित्र**–न. थोडया रेषांनीं मूळवस्तूचें वैशिष्ट्य दाखविणारें चित्र; (इं.) कार्टून; टीकात्मक चित्र. **०व्यंजक-संबंध**–पु. (न्याय) वाच्य आणि गर्भित वस्तूमधील संबंध. **व्यंग्यार्थ**–पु. (साहित्य) शब्दांचे वाच्य; लक्ष्य, व्यंग–जे तीन प्रकारचे अर्थ आहेत त्यांतील एक, शब्दाचा वाच्य आणि लक्ष्य

यांखेरीज निघणारा खोल अर्थ. **व्यंग्योक्ति**–स्त्री. १ औपरोधिक, छद्मी भाषण. २ व्यंग्यार्थ-सूचक भाषण.

**व्यग्र**—वि. शोक, भय, चिंता इ० नीं क्षुब्ध, अस्वस्थ. (अंतःकरण. माणूस इ०).

**व्यंजक**—वि. सूचक; ज्ञापक; व्यक्त करून दाखविणारा. –ज्ञा १.४०२. [सं.] **व्यंजन**–न. १ (व्या.) स्वररहित ककारादि वर्ण प्रत्येकी. २ अनुस्वाराचें किंवा अनुनासिकाचें अक्षरावरील चिन्ह. ३ तोंडीलावणें; चटणी, लोणचें इ० ४ व्यंग्योक्ति; औपरोधिक भाषण. ५ खूण; चिन्ह; अभिज्ञान. –वि. व्यक्त; चिन्हित. 'एके अंगीं भिन्नपर्णी। जीव शिव वादिन्नले दोनी। तेणें झाली व्यंजन स्तनी।' –एरुस्व ७४० **व्यंजन(ना)संबंध**–पु. (न्याय) स्पष्ट आणि सूचित गोष्टींतील संबंध; वाच्यार्थ आणि व्यंग्यार्थ यांमधील संबंध. **व्यंजना**–स्त्री. उपरोध; गर्भितार्थ: ध्वनि; सूचना [सं.]

**व्य(व्यं)जन**—न. पंखा; विंझणा. 'मोले उणें व्यजन तें धरितां पुढारीं। छाया करी तपनदीप्तिसही निवारी।' –र. 'हातीं व्यंजन चेवोनि। श्रीगंध पुष्पमाळा आणुनि।' –कथा १.७.११२. [स व्यजन]

**व्यर्जीत जाणें**—(चुकीनें) अजित जाणें पहा.

**व्यतकरण**—न. (शाप.) अडथळा [सं.]

**व्यतिक्रम**—पु १ उलटा, विपरीत क्रम. २ उलट विरुद्ध वर्तन (आज्ञाभंग, स्वैरवर्तन इ०). ३ विपरीतता विरुद्धता. [सं.]

**व्यतिक्रांत**– वि उलटा: विपरीत झालेला: उफराटा. [सं]

**व्यतिरिक्त**—वि १ निराळा: भिन्न २ विरहित: विहीन; विना 'ज्ञानव्यतिरिक्त देह काष्ठोपम जाणावा' –शम खेरीज: वांचून शिवाय. 'मी तुला घेतल्या व्यतिरिक्त जाणार नाहीं.' [सं] **व्यतिरेक**–पु. १ असंबद्धता: वेगळी, भिन्न स्थिति. 'ईश्वरीं अज्ञानाचा सर्वथा व्यतिरेक आहे.' २ अभाव. ३ अव्याप्ति. ४ अभावाचा नियम परस्पर भाव. 'जेथें ईश्वरभक्ति नाहीं तेथें भूतदया नाही व्यतिरेक आहे.' ५ अपवाद. ६ एक अर्थालंकार; जेथें उपमान आणि उपमेय यांतून एकाचें अधिकत्व किंवा न्यूनत्व वर्णिलें असतें तो अलंकार. 'त्वदुदारता जसी तसि न सुरांच्या बहुमता अगा साधो।' -मोभीष्म १४७ [सं] ०**मुखें**–क्रिवि. व्यतिरेकाच्या म्हणजे अभावाच्या पद्धतीनें (प्रतिपादन). याच्या उलट अन्वयमुखें. ०**व्याप्ति**–स्त्री. अभावापासून निघालेला व्यापक सिद्धांत. **व्यतिरेक्युदाहरण**–न. विरुद्ध उदाहरण.

**व्यतिपात**—पु. १ (ज्यो.) विष्कंभ. प्रीति इ० २७ योगांतील १७ वा योग हा अशुभ व आपत्तिसूचक आहे. २ अपशकुन: अरिष्टसूचक चिन्ह ३ (ल.) खोडकर, उपद्व्यापी मुलगा. [सं.] ० **व्यतिपातावर होणें–जन्मणें(पोर)**–खोडकर मुलाबद्दल वापरतात.

**व्यत्यय**—पु. १ विरुद्धता; विपरीत भाव. २ उलटा प्रकार; विपर्यास. ३ उलटा क्रम. ४ (व्यापक) अडथळा; अडकाठी. [सं.]

**व्यत्यस्त**—वि. विध्वस्त; उलट, (वाईट अर्थी उपयोग). [सं] **व्यत्यास**–पु. १ विरुद्धता; विपरीतता. २ विपर्यास; सरळ, योग्य याच्या उलट स्थिति; उलटापालट. [सं.]

**व्यथक**—वि. व्यथा देणारा; दुःखद. [सं.] **व्यथा**–स्त्री. दुःख (शारीरिक किंवा मानसिक); क्लेश; आधिव्याधि. 'पैं पायीं कांटा नेहटे। तंव व्यथा जीवीं उमटे।' –ज्ञा १६.१५९. 'या भवीं रामदास। थोर पावतो व्यथा' –राक (नवनीत पृ. ४४९). [सं.] **व्यथानक–नीक**–वि. १ रोगी; दुःखी; नादुरुस्त. २ त्रासदायक; पीडा देणारें (मूल). **व्यथित**–वि. दुःखित; पीडित; आर्त. **व्यथिष्ट**–वि. फार दिवसाची व्यथा असलेला; नेहमीचा दुखणेकरी.

**व्यधिकरण**—वि. १ निरनिराळे विषय, अधिष्ठान, भूमिका इ० संबंधी, इ० त असणारा. २ (ल.) विसंगत; अननुकूल; स्नेहविरहित. ३ दुटप्पी; संदिग्ध; शिथिल (मत, तर्क, इ०). –न. आडफांटा; विरोध. [सं.] ०**बहुव्रीहि**–पु ज्या बहुव्रीहींतील दोन्ही पदांस निग्रह वाक्यांत भिन्न विभक्ति असतात तो.

**व्यपदेश**—पु. १ विशिष्ट नांवानें दिग्दर्शन, व्यवहार. २ नांव; संज्ञा. ३ कपट; अप्रामाणिकपणा. ४ बहाणा; सबब. [सं.]

**व्यपेक्षा**—स्त्री. १ उणीव; न्यूनता. २ (व्या.) परस्पर विनियोग (दोन नियमांचा). ३ परस्पर संबंध. [सं]

**व्यभिचार**—पु. १ सामान्य नियमाचा भंग; अनियम; अपवाद. 'जितके बुद्धिमान तितके आळशी असें म्हणतां येत नाहीं, कांकीं क्वचित् व्यभिचार दिसतो. कितीएक बुद्धिमान असुन उद्योगीहि आढळतात.' २ मार्गच्युति; व्यवहारातिक्रम; दुराचार. ३ परस्त्रीगमन; परपुरुषगमन. 'जै यमनियम ठाकती। तथ इंद्रियें सैरा राहाटती। म्हणऊनि व्यभिचार घडती। कुळस्त्रियासीं।' –ज्ञा १.२४९. ४ एकनिष्ठेचा अभाव; कृतघ्नपणा. 'जेथिचिया कृपा लाभिजे वरु। तेथेंचि मनें व्यभिचारु।' –ज्ञा २.३८. ५ वेगळेपणा; फरक. 'जे प्रकृतीचेनि आधारें। गुणाचेनि व्यभिचारें।' –ज्ञा ४.७८. [सं.] **व्यभिचरणें**–अक्रि. १ एकनिष्ठ, अनुकूल नसणें. 'तरी उचित काय आम्हां। जें व्यभिचरेना धर्मा।' –ज्ञा २.६३. २ सोडून जाणें; बदलणें. –ज्ञा १७.६०. ३ भलतीकडे जाणें; योग्य मार्गापासुन च्युत होणें. **व्यभिचरित**–वि. अपवाद करून मोडलेला; ज्यापासुन च्युति झाली आहे असा (नियम). **व्यभिचारी**–वि. १ अपवाद, भंग झालेला (नियम, शिरस्ता). २ व्यभिचार, परस्त्री (पुरुष) गमन

करणारा-री, केलेला-ली -एभा १ १९१. ३ दुराचारी; व्यसनी; स्वैरवर्तनी. **व्यभिचारी भाव**-पु. (साहित्य) रसाच्या उत्पत्तीस साहाय्यकारी असे ३२ भाव; संचारीभाव. निर्वेद, ग्लानि, शंका, असुया, मद, श्रम, आलस्य, दैन्य, चिंता, मोह, स्मृति, धृति, क्रीडा, चपलता, हर्ष, आवेग, जडता, गर्व, विषाद, औत्सुक्य, निद्रा, अपस्मार, सुप्ति विबोध, अमर्ष, अवहित्था, उग्रता, मति, अपलंभ, व्याधि, उन्माद, मरण. त्रास आणि वितर्क मिळून ३४ होतात

**व्यय**—पु. १ खर्च; वेंच. २ नाश. -ज्ञा १५.१२२. ३ एका संवत्सराचें नांव. -वि. नश्वर -एभा २ ३९४. [सं.] ०**बुद्धि**-स्त्री. १ खर्चिक स्वभाव; उधळेपणाची प्रवृत्ति. २ (क्व.) औदार्य-बुद्धि; सढळ हात. ०**वेत्ता**-वि खर्चिक; व्ययबुद्धीचा. 'पार्थ पहाशील सुखें व्ययवेत्ते वित्त वेंचिती यज्ञा।'-मोकर्ण (नवनीत पृ ३३६). ०**शंकित**-वि. कृपण; कद्रू. ०**शील**-वि. खर्चीक; उधळ्या. ०**स्थान**-न. (ज्यो.) कुंडलींतील बारावें स्थान. **व्ययित**-वि. खर्चलेलें; व्यय केलेलें. **व्ययी**-वि. सढळ हाताचा; खर्चिक.

**व्यर्थ**—वि. निरर्थक; निष्फल; फुकट. 'रे धर्मा व्यर्थ तुझें झालें सद्धार्मिक... ।' -मोभीष्म १.२४. -क्रिवि. वृथा. [सं.]

**व्यलीक**—स्त्री. फसवेगिरी; लबाडी. 'ऐशा तूझ्या व्यलीका समजुनि न कळे कोण जाणेल तूतें।' -निगा१; विठ्ठलस्तोत्र११. [सं.]

**व्यवकलन**—न. वजाबाकी; उणें करणें. [सं.] **व्यवकलित**-वि. वजा केलेलें. [सं.]

**व्यवच्छिन्न**—वि. १ निराळा; वेगळा केलेला. २ विशेष, भिन्न मानलेला; अपवादित. [सं.] **व्यवच्छेद**-१ निराळेपणा; विशिष्टीकरण. २ अपवाद. ३ पृथक्करण. ४ छेदन; कर्तन. [सं.] **व्यवच्छेदक**-वि. व्यवच्छेद करणारा. **व्यवच्छेद जीवन क्रिया**-स्त्री. (शाप. प्राणि) पृथक्करणपूर्वक अपचय. (इं.) कॅटॅबोलियम्. **व्यवच्छेदन**-न. (वैद्यक) फाडाफाडी; शस्त्र-क्रिया. [सं.]

**व्यवधान**—न. १ आड येणें, असणें. 'डोंगराचे व्यवधानानें सूर्य दिसत नाहीं.' २ मध्यवर्ती अवकाश; अंतर. ३ आड येणारी वस्तु; अडचण. 'तयाचिया ठायीं ज्ञान। या बोला म्हणती व्यवधान।' -ज्ञा १३.६२२. ४ अडथळा; प्रतिबंध (प्रतिबंध करणारी वस्तु किंवा कारण). 'भिंगानें वायूचें व्यवधान होतें. पण दृष्टीचें व्यवधान होत नाहीं.' ५ खंड; थोडा विराम; गतिरोध (सुरू असलेल्या कामांत). ६ दुर्लक्ष. 'पत्रिका पहावी सावधान। विलंब न करावा व्यवधान। प्रातःकाळीं शुभ लग्न। ऐशिया समयीं पावावें।' -एरुस्व १५ ६१. ७ उशीर; वेळ. 'नाहीं लग्नासी व्यवधान। वेगीं करा फळार्पण।' -एरुस्व १५. ६१. [सं.] **व्यवधायक**-वि. १ मध्यें, आड येणारा. २ प्रतिबंध, अडथळा करणारा. [सं.]

**व्यवसा**—(प्र.) व्यवसाय पहा.

**व्यवसाय**—पु. १ धंदा; व्यापार; व्यवहार. -ज्ञा१३.५५६. २ खात्री; निश्चय. ३ खटाटोप; श्रम; सतत काम. 'तरी कीर्तनाचेनि नटनाचे। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे।' -ज्ञा ९.१९७. **व्यवसायात्मक**-वि. निवडानिवड करणारी. -गीर १३६. **व्यवसायी, व्यवसायक-ईक, व्यवसाई**-वि. १ व्यापारी; धंदा करणारा. 'तो मार्गी करून व्यवसाइक। त्या वंजारें वृषभ कटक' -नव २४.१७६. २ खटपटी; उद्योगी. **व्यवसित**-वि. निश्चित केलेलें; ठरविलेलें. **व्यावसायिक**-वि. व्यवसाय, उद्योग करणारा; व्यापारी. 'कृषिक नव जाती कृषिके। तीर्थयात्रेसी पाथिकें। व्यवहार सांडिला व्यावसायिकें। धेनु वंना नवजाती।' -मुहूरिश्चंद्राख्यान (नवनीत पृ. १८६).

**व्यवस्था**—स्त्री. १ योजना; तजवीज. २ निर्णय; निकाल; शेवट. ३ कायद्याचें मत; कायदा. ४ मत. 'तरी अर्जुनिवरी पार्था। सांडी सांडी हे व्यवस्था।' -ज्ञा ११ ६३१. ५ रचना; प्रकार. 'या लागीं तया पार्था। विश्वतोमुख हे व्यवस्था। आली वाक्पथा। श्रुतीचिया।' -ज्ञा १३.८८०. ६ गणती; मोजदाद. 'पै महोदधीचिया तरंगा। व्यवस्था धरूं नये जवीं गा' -ज्ञा १० ३०१. ७ वर्णनसंगती. 'तैसें टणकोनी सर्वथा। हें तें ऐशीं व्यवस्था।' -अमृ ७.११८. [सं.] **व्यवस्थणें**-उक्रि. ठरविणें; निश्चित करणें. 'जें अतींद्रिय म्हणोनि व्यवस्थिलें।' -ज्ञा ११. १५९. **व्यवस्थापक**-वि. व्यवस्था करणारा; लावणारा. -पु. कारभारी; मॅनेजर. **व्यवस्थापत्र**-न. आपल्या मरणानंतर आपल्या मिळकतीची कशा प्रकारें व्यवस्था लावावी याबद्दलचा लेख; मृत्युपत्र. **व्यवस्थापन**-न व्यवस्था करणें; तजवीज; रचना **व्यवस्थापित**-वि. व्यवस्था केलेलें; नियोजिलेलें. **व्यवस्थित**-वि. १ नीट; चांगलें ठेवलेलें, रचलेलें, योजलेलें (काम, वस्तु, पद्धत इ०). २ यथायोग्य; खरें. 'गुण ते ते व्यवस्थित। दोषचि मानी' -ज्ञा १८.७२७. ३ पद्धतशीर; शिस्तीचा; बेतशीर (माणूस).

**व्यवहर्ता**—वि. व्यवहार चालविणारा, पाहणारा; व्यवस्थापक; चालक. [सं.] **व्यवहर्तृत्व**-न. व्यवस्था, देखरेख; कार्यकर्तृत्व.

**व्यवहार**—पु १ कार्य; क्रिया; व्यापार. २ वहिवाट; पद्धत; रीत. ३ धंदा; देवघेव; व्यापार. -ज्ञा ७.२६. ४ व्यवसाय;

उद्योग; काम. ५ न्यायालयाची वहिवाट; कोर्टाची रीत. ६ खटला; चौकशी. 'कोणत्याही व्यवहाराचा निर्णय करतांना सात सभासदांचे सल्ल्यानें निकाल करावा।'-टि १.१६०. ७ न्यायालयांत निर्णयासाठीं येणारी गोष्ट. ८ योग्य वर्तणूक, वर्तन. ९ भांडवल. 'कृतघ्ना उपेगु केला। कां चोरा व्यवहारु दिधला।' -ज्ञा १३.७२८. १०. संज्ञा. 'मग उत्तम ओघ सिंधु। हा तुरेचि व्यवहारभेदु।'-ज्ञा १६.१३९. [सं.] **०कुशल-चतुर-दक्ष-द्रष्टा-निपुण**-वि. व्यवहारांत हुषार, तरबेज, तज्ज्ञ. **०दर्शन**-न. न्यायतत्त्वशास्त्राचा अभ्यास. 'राजानें व्यवहारदर्शन नित्य करीत असावें.' **०धर्म**-पु. व्यवहारशास्त्र पहा. **०पद**-न. १ खटला होण्यासारखी गोष्ट. २ खटला; कायदेशीर इलाज. **०यात्रा**-स्त्री. व्यवसाय; व्यवहारक्रम. 'शब्दांच्या व विचारांच्या भरभक्कम शिद्रोरीवरच सगळे लेखक, वक्ते, धर्मोपदेशक, वगैरे लोकांची व्यवहारयात्रा चालते.'-शर (प्रस्तावना). **०विषय**-पु. व्यवहारपद पहा. **०शास्त्र**-न. सामाजिक चालीरीती, व्यवहार यांसंबंधी नियम. याच्या उलट धर्मशास्त्र. **०शुद्ध**-वि. योग्य वर्तनाचें, व्यवहाराचें; चोख. **०शून्य-ज्ञानशून्य**-वि. व्यवहाराच्या कामीं अडाणी; रीतीचा व्यवहार माहीत नसलेला. **०ज्ञ**-वि. १ वयांत आलेला; अज्ञान नसलेला; सज्ञान (कायद्याच्या दृष्टीनें). २ व्यवहारांत कुशल; तरबेज. **०ज्ञान**-न. व्यवहारासंबंधी चांगली माहिती. **व्यवहारणें**-उक्रि. योग्य कामीं लावणें; उपयोजणें. 'मनप्रवर्तें इंद्रियद्वारें। बाह्यविषयीं व्यवहारे।'-परमा ६.१२. **व्यवहारि(री)क**-वि. व्यावहारिक पहा. **व्यवहारी**-वि. १ व्यवसायांत, धंद्यांत गुंतलेला; धंदेवाईक. २ व्यापारी. **व्यवहारी अपूर्णांक**-पु. (गणित) एका संख्येचे वाटेल तितके भाग पाडून त्यांपैकीं कांहीं घेणें. **व्यवहारी ज्योतिषी**-पु. मुंज, लग्न इ० चें आन्हिक चालविणारा ब्राह्मण; कांहीं ठिकाणीं याच्याकडे धर्माधिकाऱ्याचेहि हक्क असतात. **व्यवहारी बस्तानी**-स्त्री. (गणित) रुपयाचे पैसे कितीहि असले तरी १६ गंडे (खुर्दातले) म्हणजे १ रुपाया असा हिशेब करणें. **व्यवहार्य**-वि. १ उपयोगाला, व्यवहाराला योग्य, अवश्य, शक्य (मनुष्य, वस्तु इ०). २ अनुसरण्याला, करण्याला योग्य (धंदा, उद्योग). ३ कायदेशीर इलाज करण्याजोगा. **व्यावहारिक**-वि. १ व्यवहारासंबंधी (भाषा, लिपि इ०). २ रूढ; सामान्य; नेहमीचें. ३ व्यवहारोपयोगी; व्यवहाराला योग्य, इष्ट. [सं.] **०अपूर्णांक**-पु. व्यवहारी अपूर्णांक पहा. **०दिवस**-पु (ज्यो.) मध्यम सौरदिवस. हा रात्रीं १२ पासून दुसऱ्या रात्रीं १२ पर्यंत धरतात. (इं.) सिव्हिल डे. **०नाम-नांव**-न. १ प्रचारांतील, परिचयाचें नांव; चालतें-वाहतें नांव. उदा० आण्णा, आबा, आत्या इ०. २ नक्षत्र नामाखेरीज मुलामुलीचें नांव ठेवतात तें. उदा० गणेश, नर्मदा इ० **०नीति**-स्त्री. शिष्टाचार; सामान्य, व्यवहारांतील नीति. **०वर्ष**-न. सरकारी वर्ष (३६५ दिवसांचें); कायद्याप्रमाणें ठरलेलें वर्ष. **०शिक्षण**-न. १ व्यवहार करण्यास उपयुक्त असें शिक्षण. याच्या उलट पुस्तकी शिक्षण. २ धंदेशिक्षण.

**व्यवहित**—वि. अडथळ्यामुळ थांबलेलें; प्रतिबंध केलें गेलेलें. व्यवधान पहा. 'ते अव्यवहिता भक्ति, तद्विलक्षण। व्यवहिता भक्ति तो दोष न असावा।'-यथादी १८.२४३८.

**व्यवहृत**—वि. उपयोजिलेलें; व्यवहारविषय केलेलें. व्यवहार पहा.

**व्यवाय**—पु. संभोग; रति. 'तिनें गर्भारपणी आनंदयुक्त व भ्रताररापासुन निराळें म्हणजे व्यवायाशिवाय रहावें.'-बाचि २. [सं.]

**व्यष्टणें**—क्रि. व्यापणें. 'मी माझिया विभूति। आणि व्यष्टलिया व्यक्ति।'-ज्ञा १० १०७. [वेष्टणें]

**व्यष्टि**—स्त्री. १ एकेकशः, व्यक्तिशः, व्याप्ति; अवयवभूत, विभाजित संस्थिति; एखाद्या समुच्चयाचा, मिश्रणाचा अंशविशेष किंवा व्यक्ति; जातींतील, वर्गांतील एक. याच्या उलट समष्टि. २ देह; पिंड. [सं.] **०ग्रह**-पु अवयवांचा, व्यक्तींचा बोध, ग्रह. याच्या उलट समष्टिग्रह. **०रूप**-वि. वैयक्तिक. 'व्यष्टिरूप सत्तेची परमावधी करून...अभिनंदन करितो.'-धनुर्भंग २०.

**व्यसन**—न. १ आसक्ति; चट; नाद; छंद. 'जो गुरुसेवा व्यसनें सव्यसनु निरंतर।'-ज्ञा १३.४४३. २ वाईट, दुष्ट संवय; खोड. ३ अडचण. 'सांगें पैलतीरा जावें। ऐसें व्यसन कां जेथ पावे।'-ज्ञा ३.४७. ४ पाप; गुन्हा; दुराचरण. ५ तन्मयता; एकसारखें लक्ष. ६ संकट; आपत्ति. 'नीच व्यसनीं बुडतां निंदिति देवास न स्वकर्मास।'-मोकर्ण [सं] **समान व्यसनाचें सख्य**-न. १ एकाच व्यवसायाच्या, आवडीच्या, संवयीच्या माणसांची एकी. २ संवय इ०च्या सारखेपणामुळें होणारें सख्य. ३ सारख्याच संकटांत पडलेल्यांचें सख्य. ४ सामान्य विपत्तीमुळें होणारें सख्य. **व्यसनाईत**-वि. १ व्यसनी. २ (ल.) अभिलाषी. 'आम्हीं व्यसनाईतु आवघे। कांहीं जाणोंचिना।'-ऋ २८. **व्यसनी, व्यसनीक**-वि. १ खोडी, चट, संवय असलेला; दुराचरणी. २ नादी; छांदिष्ट.

**व्यंसित(करण)**—न. (नृत्य) आलीढस्थान करून हात रेचित करून वक्षःस्थलावर ठेवणें व उंच करून खालीं सोडणें.[सं.]

**व्यसुता**—स्त्री. मरण; मृत्यु. 'मुनि सांगे वर्षांतीं येइल त्या भूप-पुत्रका व्यसुता।'-मोवन १३.२०. [सं. वि+असु+ता]

**व्यस्त**—वि. १ वेगळा; पृथक्; भिन्न. २ उलटा, विपरीत क्रमाचा. 'कालक्रीडित हें बघून रडला, हें व्यस्त कांहीं नसे।'

-केक ५३. ३ गोंधळलेला; बावरलेला; अस्वस्थ. ४ सर्वत्र पसरलेला; वांटलेला; पृथक्भूत असलेला. व्यष्टि पहा. ५ (गणित) दोन परिमेयांचा परस्पराशीं असा संबंध कीं एक वाढतांना दुसरें कमी होत जावयाचें; विपरीत. [सं.] ०प्रमाण-न. (गणित) एक कमी झालें असतां दुसरें वाढणारें प्रमाण. **व्यस्ताव्यस्त**-वि. १ अस्ताव्यस्त पहा. २ वेडेवांकडें. 'व्यस्ताव्यस्त गातां बोलतां सुशब्दें सन्मानिती।' -सप्र १९.११. **व्यस्ती**-वि. उफराटी; व्यस्त. 'बहु असत्क्रिया व्यस्ती। या नांव बद्ध।' -दा ५.७.३५.

**व्यहाळ**—न. अरण्य. व्याहाळ पहा. **व्यहाळी**-स्त्री. पारध; शिकार (क्रि० उठणें). 'तया तैशाकाळीं शबरहि व्यहाळीस उठिला।' -आमृगीचरित्र २.

**व्यक्षर**—वि. निरक्षर. [सं.]

**व्याकरण**—न. १ भाषेचा व्यवहार कोणत्या नियमांस अनुसरून होतो हें सांगणारें शास्त्र. यांत शब्दसिद्धि-जाति-संबंध इ० चें विवेचन केलें असतें. २ विस्तार करणें. -गीर १३३. [सं.] ०कार, **व्याकरणी**-पु. वैयाकरण; व्याकरणकोविद. 'व्याकरणकार शब्द साधिती। त्याच्या नामाचा अनेक अर्थ करिती।' **व्याकरणें**-क्रि. विस्तारणें; विवेचणें. 'धरूनि येथें स्फुट या श्रुतीतें। यथामति व्याकरिजेल तीतें।' -वामन, नामसुधा ३ (३) ३३.

**व्याकुल-ळ, व्याकूळ, व्याकुलित**—वि. १ शोक, हर्ष, भय इ० कानीं व्याप्त, आर्त, ग्रस्त. २ शारीरिक-मानसिक वेदनांनीं पीडित झालेला; बेचैन; विव्हळ. 'हरिणास एक बाण लागतांच व्याकुळ होऊन पडला.' ३ मग्न; लुब्ध; आपन्न याअर्थी लेखांतून पुढील शब्दांशीं संयोग करून वापरतात. हर्ष, आशा, आनंद, क्रोध, काम, चिंता, क्षुधा, इ०. ४ (ल.) चंचल. 'प्रतिबिंब सुय तें व्याकुळ।' -विपू ५.४४. [सं. व्याकुल] **व्याकुळणें**-अक्रि. व्याकुळ होणें. 'चंचळ मानसें व्याकुळला।' -दावि १७.९.

**व्याकृत**—वि. १ विवेचिलेलें; फोड केलेलें. २ स्पष्ट; उघड; ज्ञात (कोणत्याहि इंद्रियास). [सं.]

**व्याक्रोश**—पु. मोठ्यानें आक्रोश, शोक. [सं. वि+आक्रोश]

**व्याख्य**—स्त्री. व्याख्या पहा. 'जेणें जीवेश्वराचें ऐक्य। तया पदत्रयाची व्याख्य।' -विउ १.७. **व्याख्या**-स्त्री. १ विवेचन; स्पष्टीकरण; अर्थ. २ टीका; भाष्य; अर्थाची फोड, छाननी. ३ सविस्तर वर्णन; लक्षणें, गुणधर्म, प्रयोजन इ० चें निरूपण. ४ (गणित) संज्ञार्थ; निरुक्ति. ५ (व्यापक) गुप्त गोष्टीचा बोभाटा; परिस्फोट (दोष, गुप्त इ० चा). ७ हेटाळणी; औपरोधिक वर्णन; टिंगल. [सं.] **व्याख्या करणें**-एक गोष्ट इतर सर्वांहून कोणत्या बाबतींत भिन्न आहे हें निश्चितपणें सांगणें. ०गम्य-वि. टीकेची, विवरणाची जरुरी असलेलें. **व्याख्यात**-वि. १ व्याख्या झाली आहे असा; फोड केलेला. २ बोललेला; म्हटलेला. **व्याख्याता**-पु. १ व्याख्या करणारा; टीकाकार. २ वक्ता; व्याख्यान देणारा. **व्याख्यान**-न. १ ग्रंथ, वाक्य, श्लोक इ० ची फोड करणें; अर्थविवेचन. २ (सामा.) विवरण; प्रवचन. 'एवं प्रकारें करून। केलें मंगळाशुभाचें व्याख्यान।' -रास १.२९८. ३ जाहीरभाषण, विषयप्रतिपादन; कीर्तन. 'तें व्याख्यानीं निवाले सज्जन।' -दावि २६८; 'तो कोणत्याहि विषयावर व्याख्यान सुरेख करीत असे.' -नि ३२१. ४ (ल.) सबबी; आड मुद्दे; अळंटळं.

**व्याग**—पु. (कुंभारी) उत्तरक्रिया. -बदलापूर ७७. [सं. याग?]

**व्याघात**—पु. १ खंड; विराम; थांबणूक. 'तुम्ही एथें गोष्टी सांगू नका आमचे अध्ययनांत व्याघात होतो'. २ अडथळा; प्रतिबंध; आडकाठी. ३ आघात; तडाखा. ४ (ज्यो.) (सत्तावीस योगांतील) तेरावा योग. ५ एक अर्थालंकार. ज्या साधनानें एकजण कार्य करतो, त्याच साधनानें दुसरा त्याच्या उलट व यशस्वी कार्य करतो असें वर्णन. उद० 'रुद्रें नेत्रें केलें भस्म मनसिजा जनांस जो प्रेष्ठ। रमणी सजीव करि त्या नेत्रें, रुद्राहुनीहि ती श्रेष्ठ।'.

**व्याघ्र**—पु. वाघ; शार्दूल. 'जें व्याघ्राचें क्षेत्र। जें पण्यांगनेचें मैत्र। जें विषयविज्ञान यंत्र। सुपूजित।' -ज्ञा ८.१४६. [सं.] ०कांती-वि. (उन्हांत) वाघासारखा दिसणारा (घोडा). ०नख-न १ वाघनख. २ मुलाचा एक दागिना. ३ एक सुगंधी पदार्थ. ० ख-न. १ ज्याचीं मूलतत्त्वें हस्तगत होण्यास कठीण पडतें असें शास्त्र, कला. २ दुर्बोध, घोंटाळयाचें कोणतहि शास्त्र, ग्रंथ, वाक्य इ०. ०मुखी-वि. तोंडाशीं रुंद असून मागें निमूळता होणारा जमीनीचा तुकडा. **व्याघ्रांबर**-न. पांघरण्यासाठीं उपयोग करावयाचें वाघाचें कातडें. 'नाहीं नाहीं चर्मांआंतु। कृष्णाजिन व्याघ्रांबर।' -तुगा ३४२. **व्याघ्रांबरी**-स्त्री. १ एक क्षुद्रदेवता. २ (ल.) डाग पडलेली, जळकी भाकरी (वाघाच्या अंगावरील ठिपक्यांप्रमाणें डाग दिसतात यावरून). ३ एक वस्त्र.

**व्याज**—न. १ पैशाच्या वापरास द्यावी लागणारी किंमत. वृद्धि; ही पैशाचा पुरवठा व मागणी यावर अवलंबून राहते. -व्यापारी उलाढाली (प्रो. काळेकृत). २ (गणित) मुद्दलावर मुदतीप्रमाणें होणारी वाढ. [सं. वृद्धि; म. वाढ; हिं. ब्याजु] ०कटावणी-स्त्री. कटमितीनें व्याजाचा आकार करण्याची पद्धत. ०खाऊ-खोर-वि. १ फार व्याज घेणारा. २ व्याजबट्टयाचा

व्यवहार करणारा. ३ व्याज असणारें ( कर्ज ). ०फैलावणी-१ जमेकडील आणि नांवेकडील व्याज वेगवेगळें काढून कमी असेल तें अधिकांत वजा करून बाकी काढणें. २ सबंध मुदतीचें किंवा वर्षाचें व्याज आकारण्याचा प्रकार. याच्या उलट व्याज-कटावणी. ०बट्टा-पु. ( व्यापकपणें ) सराफी व्यवहार. ( कर्जाऊ रकमा देणें, नाणीं वटावणें, हुंडयापांडया देणेंघेणें, इ० ). ०भरी-वि. कर्जांत बुडून व्याजावारी ज्याचें सबंध उत्पन्न जातें आहे असा. व्याजाऊ, व्याजी-जू-वि. व्याज असणारें ( कर्ज ). व्याजानें दिली-घेतलेली ( रक्कम )

**व्याज**—न. १ निमित्त; कारण. ' जें धर्मालय म्हणिजे । तेथ पांडव आणि माझे । गेले असती व्याजें । झुंझाचेनि । '-ज्ञा १.८६. २ मिष; कपट; ढोंग. ' व्याज न जेथें नसे वक्रता, उपचारांची पीडा । ' -टिक २८. ३ रूप; वेष; बुंथी: ४ सबब; बतावणी. ' पितृवचनाचें करूनि व्याज । वना आलास तूं रघुराज । ' -रावि २२.१८. [ सं. ] ०निंदा-स्त्री. एक अर्थालंकार. खोटी निंदा; बाहेरून निंदा दिसावी पण गर्भितार्थ स्तुतिपर असावा; प्रच्छन्न-स्तुति. या शब्दाचे इतर अर्थहि उलटसुलट आहेत. १ एकाच्या निंदेनें दुसऱ्याची निंदा करणें. उदा० ' मीच मूर्ख म्हणून तुला हें काम सांगितलें '. २ प्रछन्न निंदा; व्याजस्तुति. ०स्तुति-स्त्री. एक अर्थालंकार. स्तुति करण्याच्या मिषानें निंदा किंवा निंदा करण्याच्या मिषानें स्तुति केली असतां हा अलंकार होतो. उदा० ( कोणी मुलगा पहिल्यापेक्षां वाईट वाचूं लागल्यास ) ' वाहवा ! आतां तर तूं फार चांगलें वाचूं लागलास; तसेंच ' ( निंदेच्या योगें स्तुति).' आज एवढया पहांटेस उठून धडा पाठ करायाची ही अवदसा तुला कोठून आठवली ? '. व्याजोक्ति-स्त्री. एक अलंकार. मनांतून जें बोलावयाचें तें स्पष्ट न बोलतां निमित्तांतरानें भाषण करून त्यांत स्वाभिप्रेत अर्थ आणावयाचा २ गुप्त गोष्ट, स्वरूप प्रगट झालें असतां तें कांहीं सबबी सांगून लपवून टाकावयाचें.

**व्याजबी**—वि वाजबी पहा.

**व्याज्य**—न. चिंता; घोर. ' काय तुलारे लागलें व्याज्य । ' -दावि ४३२.

**व्याध**—पु. १ पारधी; शिकारी. ' कां गोरिचिया भुली । मृग व्याधा दृष्टि न घाली । ' -ज्ञा १३.७३९. २ एक नक्षत्र; लुब्धक पहा. [ सं ]

**व्याध**—( प्र ). व्याधि पहा. व्याधि-स्त्री. ( संस्कृत शब्द पु.) १ शारीरव्यथा; रोग; आजार. हा शब्द आधि शब्दाशीं जोडूनहि येतो. ' कृष्ण पावलिया आधिव्याधी । जाती त्रिशुद्धी सर्वथा । ' -एरुस्व १३.७९. २ रक्तपिती; महारोग. ३ ( व्यापक ) संकट: आपत्ति. ४ पीडा; त्रास; लचांड. ५ अर्वाच्य, त्रासदायक पोरास निंदार्थी म्हणतात. [ सं. ] व्याधित-वि. रोगी; अजारी. [ सं. ] व्याधिष्ट-ष्ठ-वि. रक्तपिती, क्षय, शूल इ० मोठा आजार जडलेला; व्याधिग्रस्त.

**व्यान**—पु. पंचप्राणवायूंपैकीं एक; हा सर्व शरीर व्यापून राहतो. ' देह जसा व्यापिला सदा व्यानें । '-मोआदि ३४.२५; -ज्ञा १८.३३८. [ सं. ]

**व्याप**—पु. १ सतत वास, लक्ष, व्यग्र असणें, एकसारखें व्यापृत, उद्योगांत निमग्न असणें. ' तनु धन, विषयाचा । सर्व जो जो पसारा । अनृतचि परि माझा । त्यामध्यें व्याप सारा । ' २ प्रापंचिक उद्योग व त्रास; आयुष्यांतील हालअपेष्टा, कष्ट, इ०. ३ पसारा; विस्तार; मोठा व्यवहार. ' जितुका व्याप तितुकें वैभव ।' -दा १४.६.२६. ४ उपव्याप. [ सं. वि+आप ] म्ह० व्याप तितका संताप. व्यापक-वि. १ व्यापणारा; आच्छादणारा; सर्व विस्तार आपल्यांत घेणारा. २ पूर्णपणें भेदणारा व आक्रमणारा. ३ अंतर्भाव, समावेश करणारा; सर्व पोटांत घेणारा. ' मनुष्यत्व जाति ब्राह्मणत्वजातिपेक्षां व्यापक '. ४ पसरणारा; विस्तार पावणारा. ५ मोठया, उदार विचाराचा ( माणूस ). ' तेथें भले आडळती । व्यापक तेहि कळों येती । ' -दा १९.२.२१. व्यापणें-उक्रि. आच्छादणें; पोटांत घेणें; समाविष्ट करणें ( ल. व शब्दशः ). -अक्रि. १ पसरणें; व्यापृत होणें. २ भिनणें; फैलावणें ( विषादि अंगांत ). ' विष जों सर्वांगीं व्यापलें नाहीं तोंपर्यंत उपाय चालतो.' व्यापन-न १ आक्रमण; प्रसरण. २ समावेशन; व्यापण्याचा व्यापार. [ सं. ] व्यापी-वि. व्यापणारा; पसरणारा; समावेश करणारा. ( समासांत उपयोग ) जगद्व्यापी; सर्वव्यापी. व्याप्त, व्यापित-वि. १ व्यापलेला; आच्छादलेला; समाविष्ट केलेला. २ जिरलेला; मुरलेला. ३ परिपूर्ण; भरलेलें. ४ लब्ध; प्राप्त. व्याप्ति-स्त्री. १ आक्रमण; सर्वत्र विद्यमानता. २ विश्वव्यापकता; शिवादि देवतेचें एक अभिधान. ३ ( सामा. ) विस्तार; पसारा; व्याप. ' देखें हे शब्दाची व्याप्ति । ' -ज्ञा २.११४. ४ प्राप्ति; मिळकत. ५ ( शाप. ) वर्गीकरण; विभागणी. ६ ( शाप. ) स्थान; अस्तित्वाचें, मिळण्याचें ठिकाण. -सेंपू १.६३. ७ ( तर्कशास्त्र ) निकट व अविभाज्य साहचर्य; निश्चित अनुमानकारण. ' अग्नीची व्याप्ति धूमावर. ' ( धुरामध्यें अग्नीचा समावेश असतोच, तेव्हां अग्नीच्या अस्तित्वाचें अनुमान निश्चित ). व्याप्य-वि. १ व्यापावयाचें किंवा व्यापलेलें; आक्रमित. २ समाविष्ट व्हावयाचें किंवा झालेलें; अंतर्भूत. ३ ( तर्कशास्त्र ) अनुमानविषय असलेलें. ०कोटि-स्त्री अंतर्भूतवर्ग; गौण, पोटविषय, वर्ग व्याप्यकोटि-प्रविष्ट-अंतर्गत इ० समास. ०वृत्ति-स्त्री. ( तर्क. ) निरंतर साहचर्य. व्यापन. -वि. नेहमीं बरोबर, चिकटून असणारें; अंतर्वर्ती, अनुषक्त असणारें. ०व्यापक भाव-पु. एक व्याप्य आणि एक व्यापक असा असतांचा संबंध.

**व्यापादणें**—क्रि. मारणें; नाश करणें. [ सं. व्यापादन ]

**व्यापार**—पु. १ काम; कर्म; कृत्य. 'कां निमेषोन्मेषांचे व्यापार' -एभा २.४३३. २ क्रिया; व्यवहार; कार्य; उद्योग 'मेंदूला रोग झाल्यास त्याचे व्यापार बंद पडतात.' ३ हालचाल; चलनवलन; चळवळ. ४ धंदा; उदीम; व्यवसाय; देवघेव; व्यवहार. 'लुगडयांचा, भांडयांचा इ० व्यापार.' [ सं. ] **अव्यापारेषु व्यापार**-पु. ज्यांत कांहीं संबंध नाहीं अशा गोष्टी करणें; नसत्या भानगडी करणें. 'सरकारी शाळांची कशी काय व्यवस्था असते व तेथील विद्याभ्यासाच्या मानानें कोणत्या तऱ्हेचीं पुस्तकें तेथें चालणें जरूर आहे याविषयीं या पुस्तकांत उठाठेव करणें म्हणजे अव्यापारेषु व्यापार होणार' -नि. **व्यापारक**-पु. (शाप.) योगवाही साधन. (इं.) कॅटॅलिटिक एजंट. 'धातूंचें आसिडावर जितकें त्वरित कार्य घडतें, तितकें आल्कोहोलांचें आसिडांवर घडत नाहीं, दुसऱ्या व्यापारकाची मदत लागते.' -सेंपू १.२२२. **व्यापारणें**-उक्रि. १ कामाला लावणें; वापरणें; ज्याच्या त्याच्या विशिष्ट, योग्य कारणाला लावणें. -अक्रि. क्रिया करणें. 'तैसें प्रकृति आधारें। कर्मेंद्रिय विकारें। निष्कर्म्युही व्यापारे। निरंतर।' -ज्ञा ३.६२.

**व्यापारी**-पु. १ व्यापार, धंदा करणारा; दुकानदार; देवघेव करणारा. २ उपयोग करणारा; उपयोगास लावणारा; चालना देणारा. ३ कर्मकर्ता; क्रियावान्. 'एऱ्हवीं चामाचे डोळेवरी। जे देखती देहवरी। ते कीरतो व्यापारी। ऐसेंचि मानिती।' -ज्ञा १८.४३७. -वि. व्यापार-वाणिज्य यासंबंधी; उदीमधंद्याचे. 'व्यापारी कायदा-पत्रव्यवहार इ०.' 'त्या चाचे लोकांच्या जहाजांनीं व्यापारी गलबतांवर हल्ला करावा.' -कोरकि ४. **व्यापारी व्यापारोपयोगी वारे**-पु.अप. (भूगोल) सतत वाहणारे आग्नेय वारे. हे व्यापारी गलबतांना हितकारक असतात. (इं.) ट्रेडविंड्स. **व्यापृत**-वि. १ उद्योगांत, उपयोगांत असलेला; योग्य मार्गी लावलेला. २ गुंतलेला; मग्न. 'कार्यव्यापृत.'

**व्याम**—पु. सहा फूट (पुरुष) लांबीचें माप; वांव. [ सं. ]

**व्यामिश्र**--वि. १ (शाप.) मिश्र; संकीर्ण. -सेंपू १.३. २ संदिग्ध; दुटप्पी. 'व्यामिश्रवाक्यें बुद्धीतें करिसी मोहल्यापरी।' (-गीता ३.२. टीका). [ सं. ]

**व्यामोह, व्यामोहता**—पु. १ भ्रम; मोह. -ज्ञा २.११०; १५.१०२. २ विस्मरण; स्मृतिनाश. [ सं. ]

**व्यायाम**—पु. १ दंड काढणें, जोडी फिरविणें इ० शरीरावयवास मेहनत देणारी क्रिया, खेळ. २ कसरत; मेहनत. ३ (सामा.) शरीराला चलनवलन होईल अशा प्रकारचा उद्योग. (आरोग्य आणि शरीरपोषण यासाठीं). ३ वांव; व्याम पहा. [ सं. ] **०शाळा**-स्त्री. व्यायाम, मेहनत करण्याचें ठिकाण; आखाडा, तालीम. (इं.) जिम्नॅशिअम.

**व्याल**—पु. १ हत्ती. २ साप; सर्प. -ज्ञा १५.४२०. [ सं. ] **व्याली**-स्त्री. सर्पिणी. **व्यालनकुलन्याय**-साप आणि मुंगूस हे एकमेकांचे शत्रू आहेत. यावरून हाडवैराचा संबंध.

**व्याली**—वि. (प्र.) व्यालेली. -स्त्री. १ नुकतीच बाळंत झालेली स्त्री. २ विणारी; मूल प्रसवणारी स्त्री. 'तानयाचे लळे पुरवणें। हे व्यालीची वेदना व्याली जाणें।' -एभा २९.४९२. ३ जन्मदात्री आई. -एभा ३.६०७. 'व्यालीचा कळवळा। जीव बहुत कोंवळा।' -तुगा १९७५. म्ह० व्यालीच्या वेदना व्यालीस कळेत वांझेस काय समजे.

**व्यावर्तित(अंगुली)**—स्त्री.(नृत्य) एका हातानें दुसऱ्या हाताच्या कनिष्ठिकेपासून आरंभ करून त्या हाताच्या आंतल्या बाजूनें बाहेरील बाजूस वेढा घालणें.

**व्यावृत्त**—वि. १ अलग; भिन्न केलेला. २ बाहेर टाकलेला; वगळलेला. [ सं. ] **व्यावृत्ति**-स्त्री. १ वेगळेपणा; उच्चाटण; वगळणूक. 'चक्षुस दिव्य हें विशेषण दिल्यानें चर्मचक्षूची व्यावृत्ति होते.' या अर्थाचे सामाशब्द-दोष-भय-रोग-विघ्न-व्यावृत्ति. २ निराळेपणा; भिन्नपणा. 'घटादिक कार्याचे ठायीं मृत्तिकात्वाची अनुवृत्ति आहे परंतु मृत्तिकेचे ठायीं घटत्वादि धर्माची व्यावृत्ति.' ३ व्यतिरेक; नाहींपणा. ४ त्याग; खंडन. ५ निरास. -अमृ ५.१०. [ सं. ] **व्यावर्तक**-वि. १ वगळणारा; दूर करणारा; निराळा ठेवणारा. २ भिन्नभिन्न; निरनिराळा. 'वरील पद्धतीनुसार जबाबदार पद्धतीचें अस्तित्व अगर तिचा अभाव या गोष्टींकडे लक्ष देतां वसाहतींचे डोमिनिअन्स व क्राउन कॉलनीज असे दोन व्यावर्तक विभाग पाडतां आले असते.' -वसा १५. **व्यावर्त्य**-वि. वगळणारा; वेगळे करण्यास शक्य, योग्य, जरूर.

**व्यावृत्ति**—स्त्री. १ मनाचा गोंधळ; गडबड; अस्वस्थता. 'मी मोठया व्यावृत्तींत सांपडलों.' २ संकट; आपत्ति. 'तो काय हो व्यावृत्तींत पडला, घटकेमध्यें मरणार.' ३ त्रास; दगदग; लचांड. 'प्रपंचाची-लग्नाची-दुखणेकऱ्याची-पोराची-व्यावृत्ति.' ४ अडचण; किंतु; आक्षेप. 'ज्याच्या मनांत कोणत्याहि गोष्टीविषयीं व्यावृत्ति नाहीं तो सालाधाला.' [ सं. वि+वृत्ति ]

**व्यास**—पु. १ (भूमिति) वर्तुळपरिघाच्या एका बिंदूपासून निघून मध्यबिंदूतून समोरच्या बिंदूपर्यंत जाणारी सरळ रेषा; ही त्रिज्येच्या दुप्पट असते. २ विस्तार. [ सं. ] **०खंड, व्यासार्ध**-नपु. त्रिज्या.

**व्यास**—पु. १ महाभारत व पुराणें ज्यानें रचिलीं तो ऋषि. २ ज्यानें वेदांच्या संहिता केल्या तो ऋषि. कृष्ण द्वैपायन; बादरायण. 'तेथ व्यासादिकांच्या मती। तेचि मेखळा मिरवती।' -ज्ञा १.९. २ पुराणिक; प्रवचनकार. [ सं. ] **०पीठ**-न. १ पुराणिकाचें आसन. २ पोथी ज्यावर ठेवतात ती घडवंची. ३ उच्चासन.

(इं.) डायस (सभागृहांतील). °पूजा–स्त्री. पुराणसमाप्तीच्या वेळीं पुराणिकाची पूजा, बहुमान करतात तो. २ नेहमीच्या पुराणिकाची कार्तिकपौर्णिमेस जी पूजा करतात ती. ३ आषाढी पौर्णिमेस गुरु, संन्यासी इ० ची जी पूजा करतात ती. **व्यासासन**–न. व्यासपीठ. **व्यासो नारायण**–व्यास. अर्थ १ पहा.

**व्यासंग**—पु. १ एकसारखा परिश्रम, उद्योग (विद्या, कला इ० विषयीं). २ काळजीपूर्वक अभ्यास. ३ नाद. (समासांत) अध्ययन–विद्या–विषय–स्त्री–धन–व्यासंग. [सं.] **व्यासंगी**–वि. व्यासंग असलेला; अभ्यासी; उद्योगी; लक्ष घालणारा (विशिष्ट विषयांत).

**व्यासज्यवृत्ति**—वि. १ एकापेक्षां अधिक विषयाशीं संबद्ध, विषयांत अंतर्भूत (गुणधर्म, अनुबंध इ०). २ (ल.) दुटप्पी; तडजोड करण्याच्या वृत्तीचा, स्वभावाचा. [सं. वि+आ+सज्+वृत्ति]

**व्याहत**—वि. १ अडविलेला; प्रतिरोध झालेला. २ परावृत्त; प्रतिहत. ३ आघात केला गेलेला; आहत पहा.

**व्याहार**—पु. भाषण. 'व्याहार व व्यवहार' –पकोघे (टीका कोल्हटकर ६१). [सं.]

**व्याहाळ**—न. अरण्य; ओसाड जागा; रान. 'न जाऊनी अरण्य-व्याहाळीं।' –मुवन १२.३५. **व्याहाळी**–स्त्री. (महानु.) शिकार. 'रावो व्याहाळीए बाहिरी नीगे।' –दृष्टांतपाठ ७७. –एभा १३.७०१. **व्याहाळी जाणें–निघणें**–शिकार; करणें –एभा ६.३६४. 'तव राव गेला बाहेरा। व्याहाळीसि।' –कथा १.५.१२८. **व्याहाळणें**–शिकार करणें. –एभा ७.२६०.

**व्याही**—पु. स्वतःच्या मुलाचा किंवा मुलीचा सासरा. मुलामुलीचे वडील परस्पर व्याही असतात; परस्परांचे विहिणींचेहि व्याही होतात. [सं. वैवाहिक; प्रा. वेवाहिअ; गु. वेवइ; बं. वेहाइ] °**भोज–भाजन**–पुन. (लग्नांत) व्याह्यास विशेषतः मुलीच्या बापास दिलेली मेजवानी.

**व्याहृती**—स्त्री. गूढस्वर, मंत्र. भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यं या सात व्याहृती आहेत. वेदमंत्राला आरंभ करण्यापूर्वी ओंकारपूर्वक यांचा उच्चार करण्यांत येतो.

**व्याळ**—पु. साप. 'जैसा नखाग्रीं व्याळु लागे। तो शिखांत व्यापी वेगें।' –ज्ञा १.२५६; –तुगा १३६१. नाग, भुजंग यांनाहि हा शब्द वापरतात. [सं. व्याल]

**व्याळी**—स्त्री. रात्रीचें भोजन. –शर. [वेप्रा. विआलिउ= सायंकाळचें भोजन; हिं. व्यालु. तुल० सं. विकाल; प्रा. विआल= संध्याकाल]

**व्याक्षेप**—पु. १ विघ्न; अडथळा; आडकाठी. २ खोळंबा. ३ अढी; अस्वास्थ्य. 'इतकीं माणसें बरोबर नेलीं तर त्याचे चित्तास व्याक्षेप येईल.' –सुर्योदय ३३३. [सं. वि+आक्षेप]

**व्याक्षोभ**—पु. क्षोभ; अस्वास्थ्य; खळबळ (राग, लोभ इ० विकारांमुळें होणारी). [सं. वि+आ+क्षोभ]

**व्युत्क्रम**—पु. १ उलट, विरुद्ध प्रकार; विपरीत, प्रतिगामी व्यवस्था. २ अव्यवस्था; गोंधळ. ३ (गणित) व्युत्क्रांत; उलट मांडणी; उदा० $\frac{1}{5}$ चा व्युत्क्रम ५ [सं.] °**कोन**–पु. (भूमिति) समांतर रेषांतील विरुद्ध प्रतिकोन. (इं) आल्टरनेट अँगल. °**प्रमाण**–न. व्यस्त प्रमाण. 'कोणत्याही दोन प्रवाही पदार्थांची उंची व घनता व्युत्क्रम प्रमाणांत असतात तेव्हां ते परस्परांस तोलून धरितात' –मराठी ६ वें पुस्तक (१८७५) पृ. ९६. °**भाव**–पु. उलट क्रम; विपरीतता. –शिक्षणमीमांसा ११५. °**मिश्रगणित**–न. मिश्रगणिताचा एक प्रकार' याच्या उलट मध्यममिश्रगणित.

**व्युत्थान**—न. उत्थान. उठणें; समाधि अवस्थेंतून बाहेर येणें. 'यालागी समाधि आणि व्युत्थान। या दोन्ही अवस्था सहित जाण। बुद्धि होय ब्रह्मार्पण।' –एभा ९.२०९. [सं. वि+उत्थान]

**व्युत्पत्ति**—स्त्री. १ नैपुण्य; प्रावीण्य (विशेषतः शास्त्रांत); शास्त्रवाङ्मयाशीं परिचय, ज्ञान. 'तुझें नाम जरी ते पुसती। तरी बाहुक सांगे तयांप्रती। अश्वविद्येची व्युत्पत्ती। करी तेथें।' –कथा १.१०.२२. २ अर्थज्ञान (शब्दाचें विशिष्ट जागीं); विशिष्ट पदार्थास अनुगुण जी अर्थकल्पना ती. 'वैदिक या शब्दीं वेदातें जो जाणणारा किंवा वेदानें सांगितलें जें कर्म अशा दोनही व्युत्पत्ती संभवतात.' ३ शब्दाची घटना, उगम; निरुक्ति. ४ विद्वत्ता. –एभा २.४६३. ५ ज्ञान. –एभा २७.३४४. ६ उत्पत्ति; स्वरूप. –एभा ३.१२४. ७ हातोटी; युक्ति. 'स्वधर्मे घडे भगवद्भक्ती। ऐसी अति गुह्य आहे व्युत्पत्ति।' –एभा १८.३६७. ८ परिस्फुटता; व्याख्यान. 'वेदांतीं ब्रह्मस्थिती बोलिली मानी यथानिगुती। इतर स्तोत्रीं ब्रह्म व्युत्पत्ती। तेही अति प्रीति मानी तूं।' –एभा ८.१०१. ९ ज्ञानाचा गर्व; अभिमान 'पथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे। जैं जगा धाकुटें होइजे। –ज्ञा ९.३७८. [सं.] **व्युत्पन्न**–वि. १ शास्त्र आणि वाङ्मय यांत प्रवीण; विद्वान; पंडित. 'कवी व्युत्पन्नाची योग्यता।' –रामदास (नवनीत पृ. १६०). २ साधित; सामासिक (शब्द). ३ (पासुन) निघालेला; उत्पन्न झालेला. **व्युत्पन्नत्व**–न. विद्वत्व. 'तया शरीर जें जालें अज्ञानाचें बीं विरुढलें। तयाचें व्युत्पन्नत्व गेलें। अज्ञानवेलीं।' –ज्ञा १३.८४०. **व्युत्पादक**–वि. ज्याच्या योगानें व्युत्पत्ति समजते, दाखविली जाते असा (ग्रंथ, भाषण, इ०); उत्पादक पहा.

**व्यूह**—पु. सैन्याची रचना. याचे विविध प्रकार आहेत: दंड–भोग–मंडल–असंहत–शकट–मकर–पताका–व्यूह. 'तसें दळ

दुर्धर। नाना व्यूहीं परिकर।' -ज्ञा १.९१. २ शत्रुपराजयार्थ युक्ति, मसलत. ३ (सामा.) कट; कारस्थान; विभू. (क्रि० रचणें; ढासळून टाकणें). 'या माझ्या मूर्ख मुलांना कांहीं सांगितलें नाहीं तर हा माझा व्यूह ढांसळून टाकील.' -गुप्तमंजूष. ३ मूर्ति; शरीर. 'पूजिला जी श्रीपती। चतुमूर्ती व्यूहरूपें।' -एभा ६.११६. [सं.] ४ (योग. तत्त्व.) शारीरिक किंवा इंद्रियांची विशिष्ट रचना. ०**चतुष्टय**-न. सैन्यरचनेचे चार प्रकार-दंड, भोग, मंडल, असंहत इ०.

**व्येखंड**—न. (ग्राम्य) वेखंड पहा.

**व्येवसाओ**—(प्र.) व्यवसाय पहा. 'साधुसंगाचेनि भांडवलें। ज्ञानमार्गीचा व्येवसाओ फळे।' -शिशु ७२.

**व्योम**—न. आकाश. -अमृ ७.४५. [सं.] ०**कुसुम**-न. आकाशाचें फूल; खपुष्प. अशक्य गोष्ट. 'व्योमकुसुमांचा पांडवा। कवणें देंठ तोडावा।' -ज्ञा १५.२३५. ०**केश**-पु. महादेव; शंकर. ०**गामी**-वि. आकाशाकडे जाणारा. 'चित्तेसीं व्योम। गामिये करिती।' -ज्ञा ५.१५३.

**व्रज**—पु. १ गवळीवाडा; गोकुळ. -एभा १८.१५९. २ समुदाय; जमाव. [सं.] ०**प**-पु. गौळवाड्याचा मुख्य; गोकुळचा राजा (नंद). **व्रजांगना**-स्त्री. गोपी; गवळण. 'पाहें पां बालभाचेनि व्याजें। तिया व्रजांगनांचीं निजें।' -ज्ञा ९.४६५.

**व्रजबंबू**—वि. (व.) गलेलठ्ठ 'व्रजबंबू वाढला आहे नुसता.' [व्रज=(भटक्या)+बंबू]

**व्रण**—पु. १ क्षत; छिद्र; एक रोग. २ जखम; दुखापत; भेग. [सं.] ०**स्फोट**-पु. व्रण फुटणें, वाहणें. **व्रणित, व्रणी**-वि. व्रणविशिष्ट; क्षत पडलेला; जखमी झालेला.

**व्रत**—न. १ स्वतःला लावून घेतलेला एखादा धार्मिक नियम, नेम; देहदंडाचा एक मार्ग. -ह ८.१०. (क्रि० घेणें.) २ असा नेम पाळण्याची केलेली प्रतिज्ञा, पण. ३ ब्रीद; प्रतिज्ञा; बाणा. 'नतावनधृतव्रत ज्वलन तूंचि बा धावनीं।' -केका ६. [सं.] (वाप्र) **तीळ खाऊन व्रत मोडणें**-अगदीं क्षुल्लक कारणासाठीं, फायद्यासाठीं बाणा, नेम सोडणें. सामाशब्द- ०**बंध**-पु. मुंज; यज्ञोपवीत धारण करणें. हें एक प्रकारचें व्रतच आहे. [सं.] ०**भिक्षा**-स्त्री. व्रतबंधाच्या आनुषंगिक कर्मांपैकीं एक; भिक्षा मागणें. [सं.] ०**वैकल्य**-न. १ व्रताची अपूर्णता; त्यांतील न्यूनता, कमीपणा. २ लहानसहान व्रतें, नेम इ० व्रत अर्थ १ पहा. ०**संग्रह**-पु. व्रत घेणें; व्रतस्थ असणें. **व्रतस्थ, व्रती**-वि. १ व्रत पाळीत असलेला; व्रताप्रमाणें कांहीं नेम करणारा. २ स्त्रीसंग न करणारा; ब्रह्मचर्य पाळणारा. 'अमृतराव सात वर्षांचा असतांना त्याची आई स्वर्गवासी झाली; तेव्हांपासुन बापूसाहेब व्रतस्थ होते.' -मौनयौवना.

**व्रतति**—स्त्री. वेल; लता. 'साध्वीच देवता ही साध्वीला बा सुरव्रतति लाजे।' -मोवन १३.९६. [सं.]

**व्रथा**—(प्र.) वृथा पहा.

**व्रात**—पु. समूह; जमाव. [सं.]

**व्रात्य**—पु. १ योग्य कालीं उपनयन न झालेला द्विज. २ ज्ञातिधर्म न पाळणारा, बहिष्कृत माणूस. ३ अनार्य. -वि. अवाच्य; द्वाड. 'नित्य व्रात्य उपद्रवी म्हणुनियां त्या शापिलें सत्तमीं।' -आसे २८. [सं.] ०**स्तोम**-पु. १ व्रात्य. व्रतबंध न केलेल्यांना पुन्हां जातींत घेण्याचा विधि. २ अनार्य लोकांना आर्य समाजांत घेण्याचा संस्कार; शुद्धिसमारंभ. 'परकीयांस स्वसदृश करावें आणि त्यांस आपल्या समाजाचें सदस्य करावें म्हणून जी चळवळ झाली तींत व्रात्यस्तोमास महत्वाचें स्थान दिलें पाहिजे.' -प्राचीन महाराष्ट्र २८५ [सं.]

**व्रीडा**—स्त्री. लज्जा; संकोच. [सं.] **व्रीडित**-वि. लज्जित; लाजलेला.

**व्रीहि**—पु; तांदूळ; भात; साळी. 'यज्ञांत व्रीहींचा होम सांगितला आहे.' [सं.]

**व्हअेल**—वि. (खा.) झालेला; (ल.) म्हातारा. -भात्रै ७.१.४. [होणें]

**व्हकला**—पु. (बे.) लांकडाचा तुकडा. भकल पहा.

**व्हकाल, व्होकल**—स्त्री. (कु. गो.) नवरी. ०**पावणी**-वरात.

**व्हक्कळ**—(बे.) भक्कल पहा.

**व्हगळणें**—क्रि. (बे.) चहाडी करणें.

**व्हग्ग**—पु (बे.) हंगामी गवत कापण्याचा धंदा करणारा.

**व्हग्गाल**—न. (बे.) एकच खोल गेलेली चाकोरी.

**व्हंजी**—स्त्री. १ (माण.) वहिनी. २ (कों.) नणंद. [वहिनी+जी]

**व्हटाळी**—स्त्री. (व.) ओठाळी पहा.

**व्हट्ट**—न. (बे.) द्विदळधान्य मळून वेगळें काढल्यानंतर मळणींतून उरणारा पाला.

**व्हट्टी**—स्त्री. (बे.) गाईम्हशीची ओटी, कास. [का. होट्टे=पोट] ०**किच्च**-न. (बे.) द्वेष; मत्सर. [का.]

**व्हड**—वि. (गो.) मोठा. [सं. वृद्ध; प्रा. वड्ढ] **व्हडलो**-वि. वडील; मोठा.

**व्हंडा**—पु. (बे.) चारी बाजूंनी पाळी असून मध्यें असणारी जमीन; चौंडा.

**व्हंडागणें**—क्रि. (बे.) फेंकणें. **व्हंडागा**-पु. फेंकतां येण्यासारखें लांकूड.

**व्हणजे-से**—स्त्री. व्हंजी; नवऱ्याची बहीण; वनसें.

**व्हन**—(प्र.) होन पहा.

**व्हझोरा**—पु. (बे.) सोनामुखी.

**व्हयतो-ती-तें**—सना. (कु.) तो, ती, तें.

**व्हया**—क्रि. (कु. कों.) पाहिजे. 'तुकां केळां व्हया!'. [होणें, व्हावें]

**व्हरचें-प**—क्रि. (गो.) नेणें. [सं. हृ-हर]

**व्हरवई**—स्त्री. (गो.) उतावेळपणा; घाई.

**व्हलस**—वि. (बे.) वाईट. [का.]

**व्हल्यार**—पु. महार.

**व्हळें**—न. (बे.) भक्कल.

**व्हाईसरॉय**—पु. राजप्रतिनिधि. हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलला ही पदवी आहे. [इ. व्हाईस=दुय्यम+रॉय=राय, राजा]

**व्हाएन, व्हैन**—न. (राजा. कुण. बे.) उखळ (लहान दगडी). -मसाप २.४.१०६. वाईन पहा.

**व्हान**—स्त्री. (प्र.) वहाण. ०**वड**-न. (चांभारी) वहाणे-वरचा- ज्यावर पाय ठेवतात तो-तुकडा.

**व्हानी करणें**—(हेट.) समुद्रांत टाकणें.

**व्हाय**—स्त्री. (गो. सोनारी) एक हत्यार; अवटी पहा.

**व्हायोलिन**—न. एक युरोपीय तंतुवाद्य. याला चार ताती असून त्या म, सा, सा, प या स्वरांत लावितात. याला पडदे नसतात. हें गजानें वाजवितात. [इं.]

**व्हावटां, व्हायकाट**—न. (गो. कु.) पाण्यानें वाहून जाणारी जमीन.

**व्हावस**—वि. (गो.) विसंगत; बेफाट; गैर (भाषण इ०). [तुल० वाहेंसें?]

**व्हावळा**—वि. हांवरा; अधाशी; वखवखलेला. [व्हावें; हाव?]

**व्हावा**—क्रि. पाहिजे. (लिंगानुरोधें व्हावी, व्हावें अशीं रूपें होतात). 'तो सकळ जनासी व्हावा। जेथें तेथें नित्य नवा।' -दा १९.३.५. [होणें]

**व्हास**—पु. (क. जैन) संध्याकाळचें जेवण (सूर्य मावळण्यापूर्वी).

**व्हाळ**—पु. ओढा; नाला. [ओहळ, वहाळ] ०**कट**-पु. लहान ओढा. **व्हाळी**-स्त्री. १ लहान ओढा, ओहोळ. २ झरा; ओहळी.

**व्हाळ-ळी**—स्त्री. वेलबोंडीचें झाड.

**व्हिक्टोरिया**—स्त्री. एक प्रकारचें वाहन; बगी. तीन माणसें बसतील अशी एका घोड्याची गाडी. [इं.]

**व्हीर**—पु (गो.) हीर. नारळाच्या झावळीची काडी.

**व्हेळ**—स्त्री. (प्र.) वेळ पहा. 'ते व्हेळीं मज गमलें ऐसें।' -दाव ३६६.

**व्हेळा**—पु. (राजा.) एक झाड. वेहळा पहा.

**व्होवरी**—स्त्री. (कु.) खोली. [ओवरी]

**व्होवळीक**—स्त्री. (कु.) लग्नाचें आमंत्रण.

**व्होळसा**—पु. (गो.) पाण्याचा मोठा लोटा.

---

# श

**श**—मराठी वर्णमालेंतील तिसावें व्यंजन, आणि ऊष्म वर्णांपैकीं पहिला वर्ण; हा तालव्य वर्गांतील आहे. अक्षरविकासः—या वर्णाच्या पांच अवस्था-१ ली अशोकाच्या खालसी येथील शिलालेखांत, २ री, कुशानवंशी राजांच्या वेळच्या मथुरेच्या लेखांत (इ. स. १ लें व २ रें शतक); ३ री, राजा यशोधर्मनूच्या काळांतील मंदसोर लेखांत (इ. स. ५३२); ४ थी, जपानमध्यें मिळालेल्या एका (उष्णीषविजयधरिणी) ताडपत्री ग्रंथांत (इ. स. ६ वें शतक); व ५ वी, अपराजित नांवाच्या मेवाडच्या गुहिलवंशी राजाच्या वेळच्या कुंडेश्वर लेखांत (इ. स. ६६१).

**श**—पु. शंकर. [सं.]

**शं**—न. सुख; कल्याण. [सं.]

**शउर, शऊर**—पु. १ विवेक; तारतम्य. -राव्यको ८.२६. २ प्रज्ञा; चातुर्य. [अर. शुऊर]

**शक**—पु. १ शंका; संशय; संदेह. २ भीति; कुशंका; कुतर्क. -हमं १९८. [अर. शक्क] ०**अंदेशा**-पु. संशय; भय. 'कोणे विशीं शक-अंदेशा न धरणें.' -रा १५.६४. ०**दील**-वि. साशंकचित्त. 'रयत शकदील होऊन तजावजा झाली आहे.' -ब्रच२७. ०**शुभ**-पु. शंका; संशय. 'शकशुभ दिलांत न आणितां करार--मोजीब खातरखा सजा करावी.' -पया ४६६. [अर. शक+शुब्ह] **शकी**-वि. शंकी पहा.

**शक**—पु. १ ज्या दिवसापासून एखादा राजा एखाद्या कृत्याची किंवा आपल्या राज्यारोहणाची कालगणना सुरू करतो किंवा एखादी महत्त्वाची गोष्ट घडते त्या दिवसापासूनचा काल; वर्षे-कालगणना. हिंदुस्थानांत अनेक शक होते. -ज्ञाकोविभाग ५ पहा. 'नर्मदेचे अलीकडे शालिकाहन शक चालतो, पलीकडे विक्रमशक चालतो.' २ (विशेषतः) शालिवाहनाच्या जन्मदिवसापासूनचा किंवा त्यानें विक्रमाचा पराभव केल्या पासूनचा काल.—शकसंवत्सराचा उल्लेख शकाब्द ३८० तल्या एका जैन ग्रंथांत सांपडतो. याचा शालिवाहनाशीं संबंध विजयानगरच्या बुक्करायानें (शके १२७६) जोडून दिलेला दिसतो. -मसाप १.२. शातवाहन पहा या कालाचा आरंभ वैशाख शु॥ १ कलियुगाचें ३१७९ वें वर्ष, सोमवार ता. १४ मार्च इ. स. ७८. ३ एक लोकराष्ट्र; शाक; शाक(त)वाहनाचे-शालिवाहनाचे अनुयायी. ४ राज्य; राजाची

कारकीर्द. ५ अधिकार; आधिपत्य; अधिकाराचा हुकूम; आज्ञा. ६ श्रेष्ठपणा; वर्चस्व; वरचढपणा. ( क्रि० अमक्यावर शक चढणें; बसणें; लागणें ). ७ हुकमत; दरारा. 'श्रीमंतांचे प्रतापें मोठा शक केला.' [ सं. शक-ऐश्वर्ये या धातूवरून -राजवाडे ]. ०कर्ता-पु. १ ज्याच्या नांवें वर्षगणना चालते तो; शक संस्थापक. २ धर्म, पंथ, संप्रदाय इ० स्थापन करणारा. 'कलियुगांत ६ शककर्ते होतील.' ३ ( सांके. ) छत्रपती शिवाजी. -पया ३८९. [ सं. ] शकाब्द-न. शालिवाहन शकाचें वर्ष. [ सं. ] शके-अ. शकामध्यें, शकारंभापासून, ( संवत्सरसंख्येपूर्वी प्रयोग ). 'शके सतराशे बावन्न.' [ शक शब्दाचें सप्तम्यंत रूप ]

**शकट**—पु. १ गाडा; गाडी. २ रोहिणी नक्षत्रांतील पांच ताऱ्यांनीं झालेली शकटाची आकृति. ३ ( ल. ) खोडा; लोढणें; अडथळा करणारा मनुष्य, काम. [ सं. ] ०भेद-पु. १ रोहिणी या शकटाकृति नक्षत्रांतून एखादा ग्रह किंवा चंद्र यानें जाणें. २ शकटाकृति सैन्यरचनेमधून अगर घनव्यूहामधून भेद करून जाणें, त्यावरून फळी, जूट, कट फोडणें; फूट. 'मग अंतस्त शकटभेद ...न कळे.' -पद्रे ५.८२; -पया २५४. ३ ( अव. प्रयोग ) लांडया लबाडया; युक्त्या. 'वृंदेसी करूनियां शकटभेद । वधिला जालंदर रणरंगीं ।' -निगा १०३. ४ कारस्थानें; मसलती; डावपेंच. [ सं. ] ०व्यूह-पु गाडीच्या आकाराप्रमाणें-सैन्याची रचना, व्यूह. [ सं. ]

**शकटास्य( करण )**—न. ( नृत्य ) खालीं बसल्यासारखें करून तलसंचर पाय खूप पुढें पसरणें व वक्षस्थळहि पुढें करणें. -( भौमीचारी ) -नुसत्या चवडयावर उभा ठेवलेला पाय शक्य तितका पुढें सरकविणें म्हणजे कमरेच्या वरील शरीराचा भाग मागच्या बाजूस खालीं वाकेल व छाती वर येईल याप्रकारची स्थिति. [ सं. ]

**शकड**—न. सांकडें; संकट; शकट अर्थ ३ पहा. 'दुष्मान पळती, वैऱ्याला शकड घालीती.' -म. सा. प. २ ३.५४. [ सं. शकट ]

**शकणें**—अक्रि. समर्थ असणें, होणें; कांहींएक करण्याविषयीं कोण्याएकामध्यें शक्ति असणें. [ सं. शक्-शक्य; प्रा. सक्क; हिं. सकना ]

**शंकणें**—क्रि. संशय येणें, वाटणें; कुतर्क करणें; भीति, शंका वाटणें; आशंकणें. 'झणी शंकाल मद्रूपातें । माझें अभय सदा तुम्हातें ।' -मुआदि ५.३७. [ सं. शंक् ]

**शंकनीय**-वि. संशययुक्त; शंकास्पद; विवादनीय; वादग्रस्त. [ सं. ]

**शंकपाळ**—पु. (अप.) शकपाल. शककर्ता; शकारंभ. तुलनार्थ संकपाळ आडनांव. 'शंकपाळ शिवाजी महाराजानें केला' (शिवाजीनें नवीन शक सुरू केला. ) -ऐपो २३. [ सं. शकपालन ]

**शंकर**—पु. १ सांब; शिव; महादेव. २ सुप्रसिद्ध अद्वैतमत प्रस्थापक आद्य शंकराचार्य. -वि. शुभ; मंगल; सुखदायक; क्षेमकर. ( कों. ) शंखासुराचें झाड. [ सं. शम्=कल्याण; कर=करणारा] ०करणें-क्रि. श्रीकाराप्रमाणें. 'श्री शंकर'. असें पत्रावर सहीवजा लिहिणें. होळकर राजे अशी स्वदस्तुरी करतात. 'तुमच्या वडिलांस नोकरी देण्यांत येत आहे असा मजकूर लिहून शंकर केला.' -विक्षिप्त ३.६१. ०कोरा-पु. मध खाणारा एक जांभळा पक्षी. ०मत-पु. १ ( संगीत ) नोहारवाणी पहा. २ अद्वैत.

**शंकराचार्य**—पु. १ वेदान्त तत्त्वज्ञानप्रवर्तक एका धर्मगुरूची पदवी. २ ( ल. ) मठाधिपति; धर्मगुरु; पीठाधिष्ठित व्यक्ति. 'थोडया दिवसांपूर्वी रोम येथील ख्रिस्ती शंकराचार्यांनीं व्हनोस संतमालिकेंत गोवून, एका प्रसिद्ध ठिकाणीं त्याच्या पुतळयाची स्थापना केली.' -आगर ३.५३. ३ एक मतप्रवर्तक आचार्य, गुरु. ४ स्वामी. वरील आचार्यांनीं ठिकठिकाणीं स्थापन केलेल्या मठांतील अधिपति [ सं. ] शंकराचारी-पु ( अप ) मठाधिपति. 'शंकराचारीस साह्य जाले ।' -दावि ४२८.

**शंकरपट**—पु. ( व.नाग ) संक्रांत वगैरे प्रसंगीं होणारी बैलगाडयांची शर्यत; बैलांची शर्यत; गाडी-घोडयांची धांवण्याची शर्यत. 'आजच्या दिवशीं आमच्या गांवीं शंकरपट असतो.' [ सं. संगरपट ? ]

**शंकरपाळा-ळें**—पुन. एक खाद्य पदार्थविशेष; साखर अगर गूळ, तूप, कणिक यांचा तळीव गोड पदार्थ [ सं शंखपाळ. तुल० फा. सक ( क )र्-पारा; म. साखरपारा ]

**शंकरा, शंकराभरण**—पु. ( संगीत ) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति षाडव, षाडव, वादी गांधार, संवादी-निषाद. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. याचा दुसराहि एक प्रकार आहे.

**शकल**—न. तुकडा; फांक; खंड. 'दोन शकलें दोन बाजूला।' -ऐपो १६७. [ सं. ] ०पात्र-न फुटकें भांडें. 'शकल पात्रें घेऊनी धांवताती ।' -सप्र २०.१३२.

**शकल**—स्त्री. १ शक्ल पहा. योजना. 'तुम्ही मनसब्याची शकल बांधोन सर्वांची येकवाक्यता केली.' -पेद ५.२६. २ रीत; स्थिति. 'गांवची हे शकल व करोडचे दरमाईचाही कांहीं ठीक नाहीं.' -रा ६.५९२. [ अर. शक्ल् ]

**शकल**—शिकल पहा.

**शकस, शखस**—पु. मनुष्य. 'एक मातबर शकस रवाना करितों' -ख ७.३५६९; -ऐटि २.३५. [ अर. शख्स् ]

**शकस, शकस्त**—( प्र. ) शिकस्त पहा.

**शंका**—स्त्री. १ संदेह; भय; अविश्वास; खात्री नसणें; आशंका; किंतु. 'जैसें शंका जात खेंवो लोपे। सापपण माळेचें।' –ज्ञा ९.७३. २ आक्षेप; हरकत; विरुद्ध मताचा प्रश्न (वादग्रस्त बाबतींत). (क्रि० घेणें, करणें). ३ कल्पना; सूक्ष्मसंस्कार. 'तैसी या विषयांची शंका। मनीं वसती देखा। घातुक करी अशेखा। विवेकजाता।' –ज्ञा २.३२०. ४ (संगीत) गाण्यांत घाई करणें. ५ अडचण; अडथळा; गुंता; अडकाठी; व्यत्यय. 'शंका होती पहिली तिमी। निःशंक झाली व्यथिताचारासी।' –गुच ७.१५६. ६ लाज; भय. 'दिवसास रांडेच्या घरीं जातोस, लोक आपल्याला हांसतील ही कांहीं शंका बाळगीत जा.' [सं. शंक्=संदेह वाटणें] **०घेणें–बाळगणें**–लाज, भीति वाटणें. **०धरणें**–भीति, धाक वाटणें. 'लज्जावती फार तथापि त्याची। शंका न सीता धरि हो पित्याची।'. **०बाह्य**–वि शंकेपलीकडे; शंका घेण्यास जागा नाहीं असें. 'त्याचें वर्तन शंकाबाह्य आहे.' **०शील–ळ**–वि. साशंक; संशयखोर; शंकित मनाचा [सं.]

**शंकित**—वि. १ साशंक; भीतियुक्त; दिक्कत बाळगणारा. २ भीति बाळगलेला; शंकिलेला; शंकास्पद (विषय). **०दृष्टि**–वि. (नृत्य) दृष्टी आजूबाजूस वळविणें व बाहुल्या गोंधळल्यासारख्या करणें असा अभिनय (शंकित मनोभाव प्रगट करण्याकडे उपयोग). [सं.] **शंकी**–वि. संशयी; साशंक.

**शकी**—वि. दुर्दैवी; विपन्न. 'लढाई होऊन बाराभाई यांची फौज गारत होऊन पांडुरंग शकी' –पया ३८५. [अर. शक]

**शंकासूर**—पु. राजतुरा; एक फुलझाड व त्याचें फूल; शंखासूर.

**शकार**—पु. राजशालक; राजाच्या रखेलीचा भाऊ. –मृ. केवळ नात्यामुळें थोर अधिकार असणारा. २ (ल.) मूर्ख, आढ्यतेखोर व दुष्ट मनुष्य. [सं.]

**शंकु**—पु. १ अणकुचीदार वस्तु; खिळा; सळई; शूळ; टांचणी; कांटा; खुंटी; गज; मेख; काठी इ०. २ मोजणी करतांना काटकोन पहाण्याचें एक साधन. (इं. स्केअरस्टाफ). ३ छायायंत्राची सूची, कांटा. ४ एकावर चौदा शून्यें देऊन झालेली संख्या; संख्याविशेष; दहा महापद्म; दहाहजार अब्ज. ५ (भूमिति) सुची; सुळक्याच्या आकाराची वस्तु. (इं.) कोन. ६ (ज्यो) तारे, ग्रह इ० ची लंबोन्नतीची किंवा उंचीची ज्या. [सं.] **०छाया**–स्त्री. शंकुयंत्राच्या कीलाची पडलेली छाया. [सं.] **०यंत्र**–न. छायायंत्र; दिनमान पहाणें किंवा प्राचीसाधन या करितां याचा उपयोग करितात. (इं.) सन्–डायल. [सं.]

**शंक्वाकार**–वि. १ शंकु किंवा सुळका या आकाराचें (इं.) कॉनिकल. २ मळसुत्राकार. (इं) स्पायरल. –सेंपू २.४४. [शंकु+आकार] **शंक्वाकृति**–स्त्री. शंकूसारखी आकृति. शंक्वाकार पहा. [शंकु+आकृति]

**शकुंत**—पु. १ एक पक्षी; चाष. २ सामान्यतः पक्षी. [सं.]

**शकुंतल**—न. घोडयाच्या कानाचें मूळ. –अश्वप १ ६१.

**शकुन**—पुन. १ शुभाशुभ चिन्ह; भविष्य सूचक चिन्ह किंवा वस्तु; (शब्द, दर्शन इ० रूप) लक्षण. 'एका नाकें बहुसिका। सहदेव म्हणे शकुन निका।'. २ ज्या लक्षणचिन्हावरून–गोष्टीवरून ज्योतिषी, भविष्य कथन करतो ती. ३ कौल; देवानें दिलेलें उत्तर. ४ अनुकूल गोष्टी होण्याबद्दल केलेली प्रार्थना, स्तोत्र, मंत्र. ५ एक पक्षी. [सं.]

**शकुन**—पु. (कों.) माशाच्या आकाराचें पिठाचें केलेलें चित्र; याला काकडीच्या बिया टोचलेल्या असतात. 'धूपारतीनंतर कुंभारानें एका ताटांत शकुन व दिवा घेऊन यावयाचें.' –आडिवऱ्याची महाकाली. [सं.] **०उंडा**–पु. १ मंगलकार्याच्यावेळीं कणिकेंत साखर वगैरे घालून केलेलें पक्वान्न. उंडा पहा. २ पुरणाचा वडा. –पाकशास्त्र ५५. **०गांठ–ग्रंथी**–स्त्री. १ एखादी पुढें होणारी किंवा देशांतरीं झालेली जी गोष्ट ती विषयीच्या शकुनाची आठवण राहण्यासाठीं पदरास बांधलेली खूणगांठ. शकुनाला मान्यता देणें. (क्रि० बांधणें). 'स्वतंत्रप्राप्तीं हे त्वरित शकुनग्रंथि दिधली –सारुह ८.३८; –वेसीस्व १.४१. २ शुभदायक, हितकारक घटना, बनाव, प्रसंग; मंगलकारक, शुभचिन्ह, लक्षण. ३ लग्नांत वधुवरांच्या पदरांस वराच्या मेहुणीनें बांधलेली शुभगांठ. **०गांठ बांधणें–घालणें**–१ अगदीं पूर्ण मनावर बिंबणें; पक्कें ध्यानांत ठेवणें. २ खात्री असणें; चांगला, बरोबर अजमास करणें. 'इकडे हीं तिघेजणें वाघोबाच्या तडाक्यांतून कसची पार पडतात अशी त्यानें शकुनगांठ बांधून ठेविली.' –संभाजी. **०पोतें**–पु. शकुनाबाबतचा एक सरकारी कर. –पया १२९. **०लाडू**–पु. प्रयाणकालीं शुभदायक म्हणून पदरांत लाडू बांधतात तो. 'आतां वेळु नलवावा। राम या मुहूर्तें जावा। तां शकुनलाडू बांधावा। याच्या पदरीं।' –वेसीस्व २.७. **०वंती**–वि. भविष्य सांगणारी. 'इच्छि... ते शकुनवंती। होय वेती तात्काळ।' –तुगा ३२१६. –स्त्री. भविष्यग्रंथ-पोथी. ही वरून ज्योतिषी, ठोक जोशी भविष्यें वर्तवितात. **शाकुनिक**–न. शकुन; दुश्चिन्ह; उत्पात; अद्भुत. –वि. शकुनासंबंधी; अद्भुत कारक; अरिष्टकारक; अवलक्षणीय. [सं.]

**शकुनि**—पु. १ एक पक्षी; गिधाड. २ गांधार; दुर्योधनाचा मामा. ३ (ल.) कपटी, कारस्थानी, बदसल्ला देणारा आप्त, मनुष्य. ४ (ज्यो.) ववादि करणांतील आठवें करण. **शकुनिचतुष्टय**–न. १ दुर्योधन, दुःशासन, शकुनि व कर्ण हे चौघे. २ (ल.) दुष्ट इसमांची टोळी, कंपू; चांडाळचौकडी. [सं.]

**शकून**—पु. १ शब्द; भाषण; बोलणें; उच्चार. २ मसलत. ३ हुकमत. **शकुनांत असणें–चालणें–वागणें**–वचन किंवा

आज्ञा दिल्याप्रमाणें वागणें. **शाकुनांत घेणें**-१ एखाद्याशीं संबंध ठेवणें; बसणें, बोलणें, असणें ( निषेधार्थी-वारा न घेणें यासारखा प्रयोग होतो ). २ सल्लामसलत घेणें.

**शाकुनी**—वि. समर्थ; शक्त. ' साहे महापराधहि, दंड खळाला करावया शकुनी । ' -मोसभा ४.५८. [ सं. शक्-शकु ]

**शाकृत**—न. घाण; मैला; विष्ठा. [ सं. ]

**शंकेश्वर**—पु. ' शंकासुर ' पहा.

**शाक्क**—पु. संशय; शंका. शक पहा. [ अर. शक्क् ]

**शाक्कल**—स्त्री. १ युक्ति; कल्पना; तोड; उपाय; योजना. ( क्रि० काढणें; करणें; योजणें; निघणें; पाडणें ). ' हीच कां तू शक्कल काढलीस. ' -इंप ११३. ' शक्कल काढावयाला अक्कल लागते. ' -रणदुंदुभी ३७. २ -नस्त्री. स्थिति; प्रकार; स्वरूप ( एखाद्या कामाचें, वस्तूचें ). ' इकडून ही हे शक्कल जलद नमूदांत यावी म्हणोन पत्रें जातात. ' -पया ४७७. [ अर. शक्ल् ]

**शाक्त**—स्त्री. सामर्थ्य; बल; पराक्रम; जोर; ताकद; ( प्र. ) शक्ति पहा. -वि. १ समर्थ; कार्यक्षम; योग्य; लायक; तरबेज. ' हरी भक्त तो शक्त कामास मारी । ' -राम ८७. २ पराक्रमी; प्रबल; शक्तिमान. ' शक्त नामचि तुझें रघु-राया । ' -(वामन, नामसुधा नवनीत पृ ९१). ३ (व्या.) सुचक; दर्शक; विशेष अर्थ-दर्शक; ( शब्द, वाक्यप्रचार ); संज्ञीक. [ शक्-योग्य, समर्थ होणें ]

**शाक्ति**—स्त्री. १ सामर्थ्य; योग्यता; लायकी. २ बळ; ताकद; प्रभाव. समासांत उपयोग. उदा० शरीरशक्ति; इंद्रियशक्ति; नेत्रशक्ति; कर्णशक्ति; वायुशक्ति; ज्ञानशक्ति; योगशक्ति; काल-शक्ति. ' नाम शक्तिबळें जळीं पाषाण तरले । '. २ अर्थकक्षा; मर्यादा; सीमा; व्याप्ति ( शब्द वगैरेची ). ३ स्त्रीदेवता; पार्वती, लक्ष्मी, इ० देवी; ईश्वराची स्त्रीरूप सामर्थ्यप्रतिमा. ' तुका हरि-भक्ती करी । शक्ति पाणी वाहे घरीं । ' -तुगा ४११. ' गणेश शारदा नाना शक्ती ' -दा ४.६.१०. ४ माया; परमेश्वरशक्ति. ' जे महंताची शांती । ...जे ईश्वराची शक्ति । '. ५ प्रेरणा; ( यंत्रास चलन देणारा कर्ता ). ६ एक आयुधविशेष; अस्त्र. उदा० वासवशक्ति. ' चित्रनृपें प्रतिविंध्यप्राण हरायासि सोडिली शक्ति. । ' -मोकर्ण९.२४. ७ कुंडलिनी. ' तैसी वेढियातें सोडिती । कवितकें आंग मोडिती । कंदावरी शक्ति । उठली दिसे । ' -ज्ञा ६.२२७. ८ स्त्रीपुरुष मिळून जें मिथुन त्यांतील जी स्त्री ती. ९ शिवलिंगाला प्रतिरूप म्हणून असलेली योनी; प्रकृति. तंत्र-मताची देवता. हिची उपासना करणारे ते शाक्त. १० अमुक शब्द उच्चारिला असतां अमुक अर्थाचाच बोध व्हावा असा शब्दाच्या ठिकाणीं असलेला संकेत. ११ भाला. [ सं. शक्-सामर्थ्य असणें ]. **०ग्रह**-पु. १ शब्दाचें विशेषअर्थी ग्रहण; अर्थ-ज्ञान. २ शब्द, लक्षण, इ० वरून होणारा बोध, मत; एखाद्याच्या संबंधानें झालेला ग्रह. ' त्याच्या वेषावरून हा साधु असा मला शक्तिग्रह झाला होता. ' ३ अस्तित्वांत असलेल्या वस्तूंचें अस्ति-रूपी ज्ञान, ग्रहण, बोध; वास्तविकज्ञान; यथार्थज्ञान. [ सं. ] **०ग्राहक**-वि. शब्दाच्या अर्थाचा निर्णय करणारा; निर्णायक. उदा० व्याकरण, कोश, रूढी, पद्धति. [ सं. ] **०चक्र**-न. माया-रूप विश्व; मायाचक्र. ' जें शक्तिचक्राशीं वेगळ । '. ' शक्तिचक्र जें अशेष । तें उपसंहरे निःशेष । मूळमायेसिसें । '. [ सं. ] **०त्रय**-न. १ युद्धाच्या तीन शक्ति; प्रभुशक्ति, मंत्रशक्ति, उत्साहशक्ति. २ घटना, रचना, यासंबंधी तीन शक्ति; ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, द्रव्य-शक्ति. या तिन्हींस क्रमानें सत्वगुण, रजोगुण, तमोगुण यांशीं संबद्ध अशीं सात्विकशक्ति, राजसशक्ति, तामसशक्ति अशीं नांवें आहेत. [ सं. ] **शक्तितः**-क्रिवि. शक्तीप्रमाणें. **शक्तिनसार-रूप**-वि. शक्तीप्रमाणें; सामर्थ्याप्रमाणें; योग्यतेप्रमाणें. ' शक्तिनसार दे सर्वदा । तो सत्वगुण । ' -दा २.७.५५. [ सं. शक्ति+अनुसार, शक्ति+अनुरूप ] **०नित्यत्व**-न. (शाप ) शक्ति केव्हांहि नष्ट होत नाहीं, तिचें फक्त रूपांतर होतें हा सिद्धान्त. [ इं. ] कॉन्झर्व्हेशन ऑफ एनर्जी. [ सं. ] **०पात**-पु. १ मंत्राचा उपयोग करण्याचें गुरूनें दिलेलें सामर्थ्य; शिष्यास गुरूनें दिलेलें स्वतःच्या ठिकाणचें मंत्रबल. २ शक्तिक्षय; बलहानि; दुर्बलता; दुबळेपणा. **०पूजा**-स्त्री. शक्तीची, देवीची, दुर्गेची पूजा ( शाक्तांची ). **०मान्-मंत-वंत**-वि. १ सामर्थ्यवान; कार्यक्षम; लायक; योग्य. २ बलवान; जोरदार; प्रबळ. [ सं. ] **०मापक**-न. ( शाप. ) यंत्राचें सामर्थ्य, गति वगैरे मोजण्याचें यंत्र. ( इं. ) डायनामोमीटर. **०वैकल्य**-न. ( कोणत्याहि प्रकारचें ) सामर्थ्यांतील व्यंग; बलांतील उणेपणा, कमताई; कमजोरपणा. **०संग्राहक**-न. एंजिनाची गति स्थिर रहाण्याकरितां, योजिलेलें एक महत्त्वाचें चक्र; यामुळें दट्टयाची गति स्थिर राहून एंजिन सारख्याच वेगानें फिरतें. ( इं. ) फ्लाय-व्हील. [ सं. ] **०सुत**-पु. १ कार्तिकस्वामी. २ पराशर ऋषि **०हीन**-पु. दुर्बळ. **०क्षीण**-वि. शक्तिपात झालेला; अतिशय. अशक्त झालेला; आजारी, उपाशी, वृद्ध, ( मनुष्य ); सामर्थ्यहीन; बळहीन; सत्ताहीन. **शाक्त्युपासना**-स्त्री. शक्तिदेवतेची सेवा, पूजा; शक्तिपूजा. [ सं. ] **शाक्त**-पु. शक्तीचे उपासक; देवीचा उपासक; शक्तिदेवीचा भक्त. ' शक्तितें शाक्तहि आराधिती । ' -घनःश्याम भूपाळी. -वि. शक्तिसंबंधाची ( पूजा, अर्चा, विधी इ० ). [ सं. ] **०पंथ-मार्ग**-पु. शक्त्युपासना; ज्यांत देवतोद्देशानें मद्य प्राशनादि करावें असें सांगितलें आहे त्या तंत्रोक्त मार्गाचें नांव. वाममार्ग पहा. [ सं. ]

**शाक्य**—वि. १ होण्याजोगें; संभवनीय; सामर्थ्याच्या आटो-क्यांतील; साध्य; संभाव्य, करतां येण्याजोगें. ' शक्य असेल तरि रहा ' -धेनुहरण. २ ऐकण्याजोगें; अर्थ, मतलब, उद्देश.

शब्दानें ज्याचा बोध होतो असा (अर्थ, आशय). ०क्रियापद–न. (व्या.) मूळ धातूस वणें अथवा ववणें प्रत्यय लावून जें नवें सामर्थ्यबोधक क्रियापद सिद्ध होतें त्यास म्हणतात. उदा० करवणें, जाववणें, घेववणें, देववणें. –मराठी भाषेचें व्याकरण १५५. ०भेद–पु. (व्य.) क्रियापदाच्या कर्त्यास क्रिया करण्याचें सामर्थ्य आहे असें दर्शविणारा रूपभेद, प्रकार. भेद पहा. **शक्यरूप, शक्यार्थ**–पु. १ संभाव्य अर्थ; ग्राह्य होण्यारखें वाक्य. २ (व्या.) शक्यता दाखविणारें क्रियापदाचें रूप; विधिलिङ्.

**शक्र**—पु. इंद्र. 'शक्रसभा साधेशत योजन दीर्घा तशीच विस्तीर्णा' –मोसभा १.२३. [सं.] ०जित, **शक्रारि**–पु. इंद्रजित; रावणाचा मुलगा. [सं] ०धनु–न. इंद्रधनुष्य. [सं.] ०नंदन–सुत–पु. १ वाली. २ अर्जुन. [सं.]

**शक्रदर्शनी, शक्रदर्शनीं**—क्रिवि. (अप) सकृद्दर्शनीं; देखतांक्षणींच; प्रथम दृष्टीसच; ताबडतोब. [सं. सकृत्+दर्शन]

**शक्स, शख्स**—पु. मनुष्य; माणूस; व्यक्ती. [अर. शख्स्]

**शंख**—पु. १ समुद्रांत रहाणारा एक प्राणी. २ अशा प्राण्याचें घर; त्याचें अस्थिरूप शरीर, कवच. याचा देवावर पाणी घालण्यासाठीं किंवा युद्धांत वाजविण्यासाठीं उपयोग करितात. 'मोत्यें म्हटलीं म्हणजे शिंपांचीं पोरें आणि शंखांचे भाचे.' –प्रेमशोधन १५५. ३ एक प्रकारचें वाद्य. 'शंख शृंगें काहळा भेरी' –सप्र ३२. 'काहळ मृदंग शंखभेरी। दुंदुभी दमामे रणमोहरी।' –जै ६८५. ४ बोटांवर असणाऱ्या शंखाकृति रेघा–रेषा. याच्या उलट चक्र. ५ बोंब; ओरडा; आरडाओरडा; शंखध्वनि. 'शंख करी आक्रोशे' –रावि ३१.१६१. ६ नवनिधींतील एक. ७ एक संख्या; शंकू. ८ कानशिलाजवळचें कपाळावरचें हाड; आंख. 'शंखद्वयीं धरूनि कौकुम कीरवाणी।' –र १७. ९ घोड्याचा विशिष्ट अवयव. –अश्वप १.६२. १० चौदा रत्नांतील एक; पांचजन्य. 'लक्ष्मी जयास भगिनी आणि तात सिंधु। ... इतके असोन परि शंख फिरे भिकारी।'. ११ (ल.) अभाव; शून्य; पूज्य. 'बुद्धीच्या नांवानें शंख.' १२ शंखासुर (राक्षस) पहा. –वि. १ मूर्ख; अडाणी; टोंब्या; निरक्षर. २ रडया; बोंबल्या; अपयश येणारा. ३ स्वच्छ, निर्मळ, पारदर्शक गुण दाखविणाऱ्या विशेषणापुढें आधिक्यार्थी योजतात. उदा० निर्मळशंख, पाणी. ०वाजणें–संपणें; न उरणें; पराभूत होणें. 'लाडवांचा शंख वाजला.' 'परिक्षेंत त्याचा शंख वाजला'. ०करणें–१ बोंब ठोकणें–मारणें; बोंबलणें; बाजा करणें. 'सात्यकि निघे, म्हणे कुरुभट हो हूं शंख करुनि मुख सुजवा।' मोद्रोण ११.३५. –रावि ३१.१६. २ (ल.) मोठमोठ्यानें ओरडणें. 'पैशाच्या कलशावर नजर ठेवून वकील शंख करीत असतो.' –संगीत सत्तेचे गुलाम २१. ०करावयास लावणें–बोंबलत बसविणें; कांहीं न देणें. 'विश्वामित्राला शंख करावयाला लावून इंद्रसभेचा रस्ता धरला.' –नाकु ३.७८. ०तीर्थ–न. १ देवपूजेंत अभिषेकानंतर देवावर शंखांतून शिंपावयाचें पाणी. २ (ल.) फाल्गुनवाद्य; बोंब. [सं.] ०तीर्थ घेणें–शंखध्वनि करणें; बोंब मारणें. 'बापलेकांचें भांडण जाहलें। लेकीं बापास मारिलें। तंव ते मातेनें घेतलें। शंखतीर्थ।' –दा ३.५.१९. ०द्राव–पु. १ शंखापासुन काढलेला द्रव; रस. २ ज्यांत शंख इ० विरघळतात असा द्रावक रस. (क्रि० करणें; पाडणें). ३ (शाप.) लवणजाम्ल. (इं.) म्युरिॲटिक ॲसिड. –पदाव ११. ०धारी–पु. दोन शिंपले एकावर एक बसून झालेली शंखाकार कवचघटना. –प्राणिमो ९२. [सं. शंखधृ] ०ध्मा–पु. १ (शंख वाजविणारा) (ल.) उद्धट, आडदांड माणूस. २ निरक्षर; शंखोबा. [सं. शंख+ध्मा=वाजविणें] ०ध्वनी–पु १ शंखाचा आवाज. २ दुःखोद्रेकामुळें बोंबलणें; बोंब; पांचजन्य. 'पायाला चटका लागतांच त्यानें शंखध्वनि केला' –भरतंभा १७१. ०निवासी–वि. शंखांत रहाणारा (प्राणी). ०पुष्पी–स्त्री. एकप्रकारचें गवत; विष्णुक्रांता [सं.] ०भस्म–न. शंखापासुन केलेलें रसायन; हें शूळनाशक आहे. शंखाचें प्राणिद. –संयोग १.५६. ०मणि–पु १ शंखाचा मणि, मोती. २ (ल.) दिसण्यांत गोरागोमटा परंतु अक्कलशून्य मनुष्य. [सं] ०वटिका–वटीभस्म–स्त्री. शंखापासुन केलेलें एक औषध. हें संग्रहणी व शूल यांवर देतात. [सं.] ०वणी–न. १ शंखांतील पाणी (देवावर घालण्यासाठीं). २ स्वच्छ, निर्मल पाणी. ३ (ल.) पाणी घातलेलें दूध, ताक, दहीं इ०. ताकवणी पहा. ०शिरोमणि–पु. मूर्ख; टोंब्या; अक्कलशून्य मनुष्य. 'सर्व पिढींत शंखशिरोमणि किंवा फार विद्वान एकादाच निपजतो.' ०स्फुरण–न. १ शंखनाद. २ (ल.) बोंब; आरडाओरड. 'ललाट पिटोनि करतळें। शंखस्फुरणें करीतसे।'–मुहरिचंद्राख्यान (नवनीत पृ. १९७). 'हा जेणें करी शंखस्फुरण' –एभा २३.५३५. **शंखावाती**–स्त्री. बोंब. 'न पेरितां जाण शेती। शिमग्यावीण शंखावाती।' –मुरंशु ८०. **शंखासारखें**–वि. स्वच्छ; निर्मळ. 'ह्या टांक्याचें पाणी शंखासारखें आहे!' **शंखासुर**–पु १ एका दैत्याचें नांव. २ एक फुलझाड. ३ त्या फुलझाडाचें फूल; राजतुरा. **शंखाहुली**–स्त्री. एक वेल. हीस 'सांखवेल' म्हणतात. शंखपुष्पी पहा. –वगु ५ ७८. **शंखिनी, शंखीण**–स्त्री. १ स्त्रियांच्या चार जातींपैकीं एक; उंच, सडक केसांची, तामसी व कामुक स्त्री. २ (निंदार्थी) थोडें दूध देणारी गाय. ३ गोगलगाय. **शंखोदक**–न. देवांच्या मूर्तीवर शिंपडण्याचें शंखांतील पाणी. [सं.] **शंखोला**–पु. शंखाचा एक प्रकार. –भूशास्त्र ५३. **शंखोबा**–पु. टोंब्या; मूर्ख मनुष्य, शंखध्मा पहा. **शंख्या**–पु.

१ शंखोबा. २ अक्काबाईचें बाळ; अपयशी माणूस; कमनशिबी माणूस. **शंख्यासोमल**-सोमलांत एक भेद.

**शंखजिरें**—न. संगजिरे पहा.

**शंखपाल-ळ**—पु. १ सापाची एक जात; एक जिवाणु. 'गव्हाळे तैसेचि शंखपाळ।' -गीता १.३६९. २ पुस्त्री. पालीच्या जातीचा एक प्राणी; गणपत; पाल; सरडा. ३ शंकरपाळें नांवाचा खाद्यपदार्थ. [सं. शंखपाल=पाताळांतील सर्प]

**शंखवलय-वळा-ळी, शंखावळी**—न. शंखाची बांगडी. [सं. शंखवलय] **०श्वेत**-पु. घोड्याची एक जात. 'शंखासारखा शुभ्रवर्ण, शंखाप्रमाणें ज्याचा शब्द आहे, सुशील, हंसाप्रमाणें उभा रहाणारा, फार ठेंगणा नाहीं, फार उंच नाहीं, अशा अश्वास शंखश्वेत म्हणतात' -अश्वप १.२३.

**शंखळा**—स्त्री. सांखळी. [सं. शृंखला अप.]

**शखोट**—वि. शाखोट पहा.

**शगूफ**—पु. फूल; कळी. [फा.]

**शचि-ची**—स्त्री. इंद्राणी. इंद्राची पत्नी. [सं.] **०नायक-पति-वर**-पु. इंद्र.

**शट्कर्णी**—क्रिवि. (प्र.) षट्कर्णी; सर्वत्र प्रसिद्ध; जाहीर; उघड. (क्रि० करणें; होणें; जाणें; येणें. याशीं जोडून). तीन मनुष्यांस समजलेली गोष्ट गुप्त राहूं शकत नाहीं यावरून. [सं. षट्=सहा+कर्ण=कान]

**शठ**—वि. १ लबाड; कपटी; लुच्चा; ठक. 'ऋषीश्वरु कोपविलें शठें।' -एभा १.३७३. 'भोजन करा म्हणे शठ, देव म्हणे मज कशास हो करितां।' -मोउद्योग ७.६४. २ तिरस्काराई; अमंगल; अघोरी; कुत्सित; कंजूष; चिक्कू; कदर्यु. ४ दुःशील; दुःस्वभावी. [सं.] **म्ह०** शठंप्रति शाठ्यं=लबाडाशीं लबाड (जशास तसें). **०ता, शाठ्य**-स्त्री. १ धूर्तता. २ कापट्य. [सं] **शठाई**-स्त्री. १ लबाडी; कपटीपणा. २ कवडीचुंबकपणा; कृपणता. ३ दुष्टपणा; खटपणा. शठ पहा.

**शंड**—पु. सांड; अंडीलबैल. [सं.]

**शंड-ढ**—पु. १ नपुंसक; अर्धनारी; हिजडा. २ खच्ची केलेला; खोजा. ३ निर्वीर्य; चेतनारहित, षंढ माणूस. शास्त्रांत सात प्रकारचे शंढ सांगितले आहेत. [सं. शंढ]

**शड्डू**—पु. (क.) डावा हात कोपरापासुन वर करून उजव्या हातानें काढलेला आवाज; दंड थोपटणें. 'तो तुझ्यावर शड्डू मारतो आहे'. **०ठोकणें**-आव्हान करणें; मांडीवर अगर दंडावर हाताच्या खोंग्यानें मारणें. 'त्यानें शड्डू ठोकावा व तूं गप्प बसावें हें लांछनास्पद आहे.' [ध्व.]

**शडावचें**—क्रि. (गो.) (वृक्षाची) अंतस्त्वचा काढणें. [सं. छाल]

**शण**—पु. ताग; सण; वाख; अंबाडी. [सं. हिं; गु.] **०पट्ट-वस्त्र**-न. तागाचें वस्त्र. [सं.] **०सूत्र**-न. तागाची दोरी; सुतळी. [सं.]

**शणपो**—पु. भात मोजण्याची मोठी ओंजळ; पसा. (कों.)

**शणै**—शेणवी पहा. 'विठ्ठल शणै'. 'शणै गोयबाब वालावलकर.'

**शणोपण**—न. शेणवीपण; लेखकाचें काम. -भाअ १८३४.

**शत**—वि. शंभर. 'भारताचें शतें सात। सर्वस्वगीता।' -ज्ञा १८.१६६१. [सं.] **म्ह०** शतं तत्र पंचोत्तर शतं (शंभर तेथें एकशें पांच) ऐशीं तेथें पंचायशी (खर्च करण्यास काय हरकत?). [सं.] **०क**-न. शेंकडा; शंभराचा समुदाय. [सं.] **०कूट**-वि. शेंकडों तुकडे झालेला; शतधा भिन्न. 'तेथ ब्रह्मकटाह शतकूट। हो पाहत असे।' -ज्ञा १.१४७. 'वाटे उर्वी शतकूट। होऊन जाईल क्षणार्धें।' -पांप्र ४१.२२. **०कृत्य**-न. १ (शतक्रतूबद्दल चुकीचा शब्दप्रयोग) शंभर अश्वमेध यज्ञ करण्यासारखें अचाट कृत्य; शंभर यज्ञांचें कार्य. २ (ल.) एखादें अचाट काम; महत्कृत्य. शतक्रतु पहा. ३ विशेष प्रकारची चटणी, रायतें. **०कृत्य करणें**-पुण्य करणें; चांगली गोष्ट करणें. **०क्रतु**-पु. १ इंद्र. २ शंभर अश्वमेध यज्ञ हे केले असतां यजमानाला इंद्रपद मिळतें. ३ (ल.) मोठा विजय; मोठा पराक्रम; मोठें शौर्य; अचाट कृत्य. 'जन्मास आल्यापासुन एक तळें बांधलें एवढा कायतो शतक्रतु केला.' [सं.] **०गुण**-वि. शंभरपट. 'शतगुणें स्नेहो वाढला तिसी।' -एभा ७.६०१. [सं.] **०घृत**-न. शंभर वेळां धूवून स्वच्छ केलेलें तूप (औषधाकरितां). [सं.] **०घ्नी**-स्त्री. (शंभरांची हत्या करणारा) लोखंडी भाले, खिळे बसविलेला एक ठोकळा; एक विशिष्ट हत्यार; कारलें; शेंकडों लोक मारण्याचें जुनें आयुध. 'पट्टिश बाण लोहवृश्चिक उरण। दशघ्नेया आणि शतघ्नया।' -ह २२.३४. २ एक प्रकारची तोफ; उल्हाटयंत्र. 'शतघ्नी नामक अस्त्रें उंच प्रदेशावर नेऊन टेवावीं.' -हिंलई २४. **०चिंध्या**-स्त्री. शंभर जागीं फाटलेलें वस्त्र; नेसतां किंवा वापरतां न येण्याइतकें फाटकें वस्त्र; लक्तऱ्या. **०चूर**-वि. शंभर तुकडे झालेले. शतकूट पहा. 'घट घायें कीजे शतचूर।' -एभा २२.४२७. **०चूर्ण**-न. अगदीं चुरा; तुकडे तुकडे झालेले, पडलेले आहेत अशी स्थिति; पार चुराडा. 'फुटोनि होय शतचूर्ण।' -अमृ ७.६७. 'एकेचि घातें शतचूर्ण।' -एरुस्व ८.४६. -वि. चुरा झालेला; विभिन्न. [सं. शत+चूर्ण] **०छंदी**-वि. (शंभर लुच्चेगिऱ्या, फंद असणारा) फंदी; बेढंगी; वाईट चालीचा. **०छिद्र**-वि. शेंकडों भोकें पडलेला; चाळण झालेला (कागद, वस्त्र इ०). **०जर्जर**-वि. शंभर ठिकाणीं फुटलेली; शेंकडों ठिकाणीं खिळखिळी झालेली. शतचूर्ण पहा. 'यालागीं शतजर्जर नावे।

रिगोनि केविं निश्चित होआवें।' -ज्ञा ९.४९०. [सं.] ०तंत्रीवीणा-स्त्री. एक वाद्य. 'सारमंडळ' पहा. ०तारका-स्त्री. १ सत्तावीस नक्षत्रांपैकीं चोविसावें नक्षत्र (शंभर ताऱ्यांचें मिळून झालेलें). २ (ल.) एखाद्यास अनेक मुली असल्या म्हणजे थट्टेनें म्हणतात. [सं.] ०द्वार-वि. शंभर द्वारें, दरवाजे, भोकें वगैरे असलेलें. [सं.] ०धा-क्रिवि. १ शंभरदां; शंभरवेळां. २ शेकडों प्रकारांनीं. 'कैसा शतधा दुर्वादीं। निस्तेजिलासी।' -ज्ञा ११.१०१. [सं.] ०धृति-पु. १ ब्रह्मदेव. २ इंद्र. ०धौत-वि. शंभरवेळां धुतलेलें (तूप वगैरे). ०पत्र-न. १ एक जातीचें कमळ. २ सेवतीचें फूल. -वि. शंभर पाकळया, पानें असलेलें (कमळ). [सं.] ०पत्रनेत्रा-स्त्री. कमलाक्षी (स्त्री). 'तेथूनि तूं मजसि ने शत-पत्र-नेत्रा।' -नवनीत पृ. ९७. [सं.] ०पत्रिका-स्त्री. एक फुलझाड; शेवंती. [सं.] ०पद-पाद-पदी-स्त्री. घोण; गोम. ०पदी-स्त्री. शतपावली; जेवणानंतर अन्नपचनक्रिया सुलभ होण्यासाठीं फेऱ्या घालणें, थोडें चालणें. [सं.] ०पावली-स्त्री. शतपदी पहा. ०भाग-वि (शाप.) शंभर भाग ज्याचे पाडले आहेत असें. (इं.) सेंटिग्रेड. -रसामू ३०.

**शतंभीष्म**-पु. १ (शंभर भीष्म; भीष्माचार्यासारखे पुष्कळ, एकाहून एक बलवान) आपल्या सामर्थ्याची बढाई मारणाऱ्याबद्दल निंदार्थी शब्दप्रयोग; अनेक वरचढ, अधिकाधिक पराक्रमी पुरुष. 'तूं आपली एवढी प्रतिष्ठा कशास सांगतोस. तुजसारखे असे शतंभीष्म पडले आहेत.' 'ऐसे दाते शतंभीष्म बहुत आहेत.' -शिवाजीचें चरित्र 'तुझ्या सारखे मी पुष्कळ शतंभीष्म लोळविले आहेत.' २ वृध्द; विशेष ज्ञानी पुरुष. ०मख-पु. १ शंभर यज्ञ करणारा; इंद्र. 'जें शतमखा लोक सायासें। तें तो पावें अनायासें। कैवल्यकामु।' -ज्ञा ६.४४१. २ शंभर यज्ञ. 'जें शतमखींहीं आंगवणें। नोहेचि एका।' -ज्ञा ८.२६५. [सं.] ०मखोत्तीर्ण-वि. (शंभर यज्ञ करून पार झालेला) शंभर यज्ञ पूर्ण झाल्यामुळें इंद्रपद मिळालेला; इंद्र. 'जें शतमखोत्तीर्णकरा। आरूढोनि असे।' -ज्ञा १०.२४०. [शत+मख+उत्तीर्ण] ०मान-वि. १ शंभराचें माप, मोज; शंभर संख्या भरणारें. 'शतमान आयुष्य.' २ (सांकेतिक) शंभर रुपये दक्षिणा 'तेथें तुम्हास काय मिळालें? शतमान किंवा एक शतमान मिळालें.' ०मारी-वि. १ शंभर रोगांवर रामबाण उपाय करणारा निष्णात (वैद्य). २ (ल) शंभर रोग्यांना मारक किंवा त्यांची हत्या करणारा (वैद्य). ०मूर्ख-पु. (शंभरपटीनें, शंभरमूर्खा इतका मूर्ख) अत्यंत मूर्ख, अज्ञानी; शुद्ध, केवळ मूर्ख; महामूर्ख. [सं.] ०वर्ष-वार्षिक-वि. १ शंभर वर्षें टिकणारें, चालणारें; शंभर वर्षांच्या मुदतीचें. २ शंभर वर्षांतून एकदां येणारें. ३ शंभर वर्षांचा; शंभर वर्षें जगलेला; शतायुषी. ४ शंभर वर्षांसबंधीं. [सं.] ०वृद्ध-पु. शतायु; शंभर वर्षांचा. 'जे तो शतवृद्ध आहे। नेणों कैचा।' -ज्ञा १३.५८४. ०शः-अक्रिवि. शेंकडों; शेंकड्यानें, शंभर शंभर अशा संख्येनें मोजलें जाणारें. [सं.] ०शाख-वि. (शंभर फांद्या, अंगें, विभाग असलेला) विविध प्रकारचा; बहुविध; नानाविध; असंख्य प्रकारांनीं युक्त. [सं.] **शताधीश, शतायु शतायुषी**-पु. १ शंभरांचा स्वामी-मालक; शंभर लोकांवरील अधिपति. २ (थट्टेनें) ज्याच्या जवळ शंभर रुपये आहेत तो. शंभर वर्षें वयाचा, शंभर वर्षें जगणारा. [सं.] **शताळशी-सी**-वि. अतिशय आळशी; आळशांचा राजा. [सं. शत+आळशी] **शती**-स्त्री. शेंकडा; शे. [सं.] (समासांत उपयोग) द्वि-त्रिशती. **शतं**-न. शतकृत्य पहा. 'रान सुटले...शतं केले.' -ख९७४. -वि. शंभर. [सं.] **शतंजीव**-अ. (शंभर वर्षें जग) एक आशीर्वाद; लहान मुलांस शिंक आली असतां त्याची आई अथवा कोणी प्रौढ स्त्रिया उच्चारतात. शिंक आली असतां आयुष्यहानि होते अशी भावना आहे त्यावरून. 'शतंजीव शिंकतां आलवीसी वो।' -मध्व १५. [सं.]

**शंत**—पु. (गो.) केळीच्या पानाचा सुकलेला तुकडा. -सह्याद्री १३४.

**शतद्रु**—स्त्री. सतलज नदी. 'शतद्रु नदी उतरून अलीकडे आला.' -भाब २२. [सं.]

**शतफळ**—न. (गो.) बेलाचें आतडें.

**शतमी**—स्त्री. जाहिरात; जाहीरनामा; प्रसिद्धीपत्रक. सतमी पहा.

**शतमर्दी**—स्त्री. शतैमर्दी पहा.

**शतरंज-शत्रंज**—स्त्री. बुद्धिबळें; बुद्धिबळांचा खेळ. [अर. शत्रंज्; सं. चतुरंग; हिं. बं.]

**शतरंजी**—स्त्री. एक प्रकारची बैठक; बिछाईत. [फा. शत्रंजी]

**शतवेधी**—स्त्री. चुका (भाजी) पहा.

**शतावरी**—स्त्री. एक औषधी वनस्पती; या वनस्पतीस कोंकणांत 'अस्वली' व देशावर 'दिवसमावळी' म्हणतात. हिचे शतमूली आणि सहस्रमूली असे दोन भेद आहेत. [सं. शतावली]

**शत्रु**—पु १ अरी; दुष्मन्; वैरी; रिपु; अपकार करणारा, नाश करणारा माणूस. २ मारक, मोड करणारा पदार्थ, उदा० पित्तशत्रु, कफशत्रु, वातशत्रु, घृतशत्रु इ० [सं.] ०कात्रु-वि. दुष्ट; डंख धरणारा; गुप्तशत्रु; दीर्घद्वेषी; आकसी. [सं. शत्रु द्विरुक्ति] ०जिणें-न. शत्रूकडून जिंकलें जाणें. 'दुश्चीतपणें शत्रुजिणें।' -दा ८.६.२१. ०ता-स्त्री वैर. ०पाचन-न. अपायकारक पदार्थांतील वाईट, अनिष्ट गुण नाहींसा करणारा पदार्थ, रामबाण औषध; उताऱ्याचें औषध. [सं.]

**शदत**—स्त्री. अंमल; जोर; सक्ती. 'बिलफेल या मुलखांत वारिशेचा शदत फार आहे.' -रा १०.१८२. [अर. शिद्दत्]

**शनघनी**—पु. घोड्याचा एक रंग. –अश्वप १.२८.

**शनि**—पु. १ सूर्यमालेंतील एक ग्रह; नवग्रहांतील सातवा ग्रह. ‘शनि हा खलग्रह आहे अशी सर्व देशांत फार प्राचीन काळापासुन समजूत आहे’ –ज्ञाको श २. २ (ल.) प्रतिस्पर्धी; वैरी. सावकार, तगादेवाला, किंवा सारखा पाठीस लागलेला माणूस यांना हा शब्द योजतात. ३ (ल.) जुलूम; त्रासदायक गोष्ट; पीडाकारक कृत्य. ‘हा शनि शनिवारपासुन मुंबईत धूमाकूळ घालूं लागला’ –के १७.६.३०. ४ मंदबुद्धि; अंगांत कांहीं जोर उद्योग, हुन्नर नाहीं असा पोर इ०. ५ नील नांवाचें रत्न. (इं. सॅटर्न) [सं.] **शनी उदरीं येणें**–(जन्मराशीस शनि असणें) मोठा लाभ होणें; दैव फळफळणें; नशीब उदयाला येणें. ०**द्दष्टीस येणें**–बारावा शनी येणें. ०**लत्तेस येणें**–जन्मराशीच्या पुढील राशीस येणें. **शनीचा फेरा**–पु शनिग्रहाचें अशुभ राशीस येणें; शनीची बारी; साडेसाती. संकटांची उपपत्ति लावतांना योजतात. पीडा (क्रि० येणें, चालणें). ०**प्रदोष**–पु. शनिवारीं प्रदोष (त्रयोदशी) येणें; तत्प्रीत्यर्थ करावयाचा उपवास, शिवपूजा इ०. ०**प्रिय**–पु. नीळरत्न. ०**वार**–पु. मंदवार; रविवारपासुन सातवा वार. म्ह० न देत्याचा (कत्याचा) वार शनिवार. **शनिवाऱ्या, शनिवाऱ्या तेली**–पु. बेनेइस्राअल; यहुदी तेली; (हे तेल्याचा धंदा करितात. शनवारीं तेल विकीत नाहींत, गाळीतहि नाहींत म्हणून त्यांना हा शब्द लावितात). **शनैश्च(श्व)र, शनेश्च(श्व)र**–पु. १ शनिग्रह; शनिदेव. २ (ल.) त्रासदायक माणूस. शनि अर्थ २ पहा. [सं. शनैस्+चर. अप. शनेश्चर, शनेश्वर] म्ह० सूर्यापोटीं शनैश्चर=चांगल्या बापाचा वाईट किंवा खोडकर मुलगा.

**शनिपात, शनिःपात**—पु. (प्र.) सन्निपात; त्रिदोष. [सं. सन्निपात]

**शनिशनि**—क्रिवि. हळूहळू. ‘शनि शनि मग जात होतें।’ –ज्ञानप्रदीप ८४४. [सं. शनैःशनैः] **शनेशनें**–(प्र.) शनैःशनैः पहा. हळूहळू. ‘सुख पडिलें सांठवणें। सत्ता वेचे शनेशनें।’ –तुगा ११४०. **शनैः, शनैःशनैः**–क्रिवि. हळू हळू; मंदगतीनें; मंदतेनें; सुस्तपणें. (क्रि० जाणें; येणें; बोलणें). ‘शनैः शनैः विषयांसी निजाङ्गेसी त्यागवी वेद।’ –एभा ५.२३१. [सं.]

**शनैर्मेह**—पु. मूत्रकृच्छ्र रोग. प्रमेह पहा.

**शपणें**—क्रि. शाप देणें; शापणें. [सं. शप्] **शपित, शप्त**–वि. १ शापित; शापलेलें. २ निर्भर्त्सना केलेलें; निंदित. [सं.] **शपत, शंपत, शफत**–स्त्रीपु. शपथ पहा. **शपूथ–शप्पथ**–(गो.) शपथ. ‘शप्पथ खरें सांगेन.’

**शपथ-थी-थे**—स्त्री. १ प्रतिज्ञेवर सांगणें–बोलणें; आण; भाक; वचन (क्रि० घेणें; वहाणें; खाणें; करणें; देणें). ‘सुगळ म्हणे ‘रामा! म्यां शोधावी जानकी, शपथ करितो।’ –मोवन ११.९९. जर तर हे शब्द पूर्वी घालून जोराचा नकार किंवा दुजोरा देण्यांत येतो. उदा० करील तर शपथ. ‘हालिवल्या अंगावर अगर काडीवर पडेल तर शपथ.’ २ दिव्य. [सं. शप्–शपथ घेणें] म्ह० शपथ केली वहायला, भाकरी केली खायला.’ –मसाप ४.३. ०**वाहायाला, शपथेला मोकळा होणें**–एखादें काम मुळींच केलें नाहीं असा दोष ठेवितां येऊं नये म्हणून कसें तरी (हलगर्जीपणानें किंवा थोडें फार) करणें; शपथ घेण्यास सदसदविवेकबुद्धि आड येणार नाहीं अशा स्थितींत असणें. ०**सोडणें**–(मुलींच्या खेळांत) शपथेंतून मोकळें करणें. खालील वाक्य म्हणत शपथ सोडतात–‘शपथ सुटली; कुंभाराची घागर फुटली; हत्तीवरून साखर वाटली.’ ०**पूर्वक**–क्रिवि. शपथ घेऊन. ०**पत्र**–न. शपथपूर्वक लेखी जबानी; प्रतिज्ञालेख; शपथलेख; क्रियापत्र.

**शंपा**—स्त्री. वीज; विद्युल्लता; विद्युत्. ‘होती उभी द्रुपद–जा जैसी शंपा नवांबु–भृद्वारीं।’ –मोवन ९.२.

**शफ**—पु. १ गाय, म्हैस, घोडा इ० पशूंचा खूर; हा विभागलेला असतो. २ या खुराचा विभाग. (समासांत) एकशफ; द्विशफ इ०. [सं.] ०**बंध**–पु. घोड्याच्या घोट्यास बांधतात तो चामड्याचा पट्टा. –अश्वप १.१२०.

**शफताळू**—पु (प्र.) सप्ताळू पहा.

**शफर-री**—पुस्त्री. एक माशाची जात; सहरी. हा मासा पांढरा असतो. ‘तेथ देखों शफरें येरें। पोहों लाहती।’ –ज्ञा १८.१७१८. [सं.] ०**ध्वज**–पु. कामदेव; मदन.

**शफा**—स्त्री. इलाज; उपाय. [अर. शिफा] ०**खाना**–पु. इस्पितळ; रुग्णालय. [फा.]

**शबखून**—शब्खून पहा.

**शबय**—स्त्री. १ (कु.) धांगडधिंगा. २ शिमग्यांत मागावयाचें पोस्त. ३ शिमग्यांत पोस्त मागण्याकरितां उच्चारलेला शब्द.

**शबर**—पु. एक जात; भिल्ल; कोळी. [सं.] **शबरी**–स्त्री. भिल्लीण.

**शंबर**—पु. सांबराची एक जात. रोही. [सं.]

**शबल-ळ**—वि. १ चित्रविचित्र; निरनिराळया प्रकारचें; रंगीबेरंगी. २ गढूळ; मिश्र; अशुद्ध. ‘उठतां शुद्धासि करी शबळ।’ –एभा १३.४३२. ३ एकांतएक मिसळून गेलेलें; गुंतागुंत झालेलें. ४ (वेदांत) मायोपाधिक; मायीक. –न. मिसळण; संकर; गुंतागुंत. [सं.] ०**त्व**–न. गढूळपणा; मायाउपाधीची लिप्तता. ‘हे बोल सोपाधी शबलत्वाचे।’ –एभा ३.४८७. [सं.]

**शबल, शंबळ**—स्त्रीन. शिदोरी; प्रवासांतील अन्नसामुग्री, भक्ष्यपदार्थ. ‘आणि प्रियु आल्यां स्वभाव। शंबळें उरे वेंचे

ठाउकें नव्हे। तैसें सत्प्रसंगें करावें। पारुषें जरी।' -माज्ञा १८.५९१. [सं. शंबल]

**शंभळ**—पु. एक वाद्य. संबळ पहा. [सं. समेल]

**शबिना**—पु. छबिना पहा. [फा. शबीना]

**शबिना**—पु. (चुकीनें) तंबूच्या मागील किंवा पुढील पडदा; चांदणी. [फा. शामियान]

**शब्खून**—पु रात-छापा; रात्रीचा हल्ला. 'सरकारच्या फौजांवर शब्खून घालावा हा इरादा इंग्रजांनीं करून रात्रौ पोख्त सरंजामानसी चालून आले.' -रा १९.८०. [फा. शब्खून्]

**शब्द**—पु. १ आवाज; उच्चार; कोणत्याहि प्रकारचा ध्वनि; श्रोत्रेंद्रियाचा विषय. २ एखाद्या वस्तूचा, कल्पनेचा, दर्शक किंवा व्यंजक, जो अक्षरसमूह तो. ३ (व्या.) प्रथमादि विभक्ति ज्यावरून होतात अशी वर्णानुपूर्वी (नाम, सर्वनाम इ०). 'तळमळ हा संस्कृत शब्द चालतो तरी कसा?'. -नारुकु ३.४. ४ बोल; वाईटपणा; ठपका. (क्रि० लागणें; येणें; ठेवणें; लावणें; आणणें). 'तें केलें धार्तराष्ट्रीं विफळ सकळहि, आणिला शब्द सार्मी।' -मोकृष्ण ६८.३३. ५ आज्ञा; हुकूम. ६ प्रतिज्ञा; वचन; वाचा. 'एकवेळ गेले शब्द।' -संग्रामगीतें १२०. ७ वेद. 'त्यासि शब्दपर निष्णातु।' -एभा १०.३४९. ८ शास्त्र. 'शब्दाचिया आसकडी। भेद नदीची दोही थडी। आरडते विरह वेडी। बुद्धिबोध।' -माज्ञा १६.५. [सं. शब्द=नाद करणें] (वाप्र.) **०खाणें**-लिहितांना किंवा बोलतांना शब्द गाळणें, न लिहिणें किंवा न उच्चारणें. **०खालीं न पडणें**-दुसऱ्याच्या सांगण्याप्रमाणें करणें; शब्दाला किंमत देणें; शब्द मानणें. **०खालीं पडूं न देणें**-उत्तरास प्रत्युत्तर देणें; वादविवादांत किंवा भांडणांत माघार न घेणें. **०झेलणें**-ज्याची सेवा, चाकरी शुश्रूषा, खुशामत वगैरे करावयाची असेल, त्याच्या तोंडून आज्ञा निघतांच तिच्याप्रमाणें करणें. 'राजकारस्थानी पुरुष आणि सेनापति यांचे शब्द त्यांच्या अमदानींत सगळे लोक झेलीत असतात' -ओक. **०टाकणें**-१ मागणी, विनंति करणें; एखादी गोष्ट सांगून बघणें. २ शिफारस करणें. **०ठेवणें-लावणें-लागणें**-दोष देणें; ठपका ठेवणें; दूषण लावणें. 'माझेनि दोषें पावलों खेद। हा तुज कासया ठेवणें शब्द।' -मुक्तेश्वर. 'त्वत्सम साधु न लागों देती स्वयशासि शब्द ते राजे' -मोवन २.३६; -मोउद्योग ८.१९. **०लागूं देणें-लागू-लावू देणें**-दोष पत्करणें. 'सत्यप्रतिज्ञ पांडव लागूं देती न आपणा शब्द।' -मोविराट ४.६३. सामाशब्द- **०काठिन्य**-न. (अलंकार) शब्दाचा कठोरपणा, कर्कशपणा. [सं.] **०कार्पण्य**-न. अल्पभाषा; कमी बोलणें; मितभाषण. 'शब्दकार्पण्य पंडितास दोष स्त्रीला महाभूषण।' [सं.] **०कोश-ष**-पु. १ शब्दसंग्रह; शब्दसमुच्चय; शब्दांचा साठा-खजिना; शब्दांचा अर्थासह संग्रह. २ शब्दाचे अर्थ, व्युत्पत्ति, व्याकरण वगैरे सांगणारा ग्रंथ. [सं.] **०कौशल्य**-न. शब्दरचनाचातुर्य; भाषाचातुर्य. [सं.] **०खंडन**-न. शब्द, विधान इ० खोडून काढणें; शब्दावरील टिका. **०गुण**-पु. शब्दांचे गुण, लक्षण. हे एकंदर चोवीस आहेत. ते पुढील प्रमाणें:-श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सुकुमारता, अर्थव्यक्ति, उदारत्व, कांति, उदात्तता, ओज, सुशब्दता, और्जित्य, विस्तर, समाधि, सौक्ष्म्य, गांभीर्य, प्रेम, सन्मितत्व, प्रौढी, रीति, उक्ति, गति, भावुक, संक्षेप. इ० **०चातुर्य**-न. शब्दरचनाकौशल्य; वाक्चातुर्य; शब्दपटुता; भाषाशैली; भाषाप्रभुत्व. [सं.] **०चित्र**-न. १ शब्दांनीं केलेलें वर्णन, काढलेलें चित्र. २ (साहित्य) चित्रकाव्याचा एक प्रकार; शब्दचमत्कृति. उदा० 'मागे जी लुगडी, सकाप बुगडी' इ०. [सं.] **०चोर**-पु. दुसऱ्याचा लेख चोरून तो आपलाच म्हणून दडपून देणारा; दुसऱ्याचे शब्द चोरणारा; उष्टा बोल वापरणारा. **०जाल-ळ**-न. १ शब्दांचें जाळें; अनंत शब्दांचा नुसता समूह; शब्दावडंबर; शब्दभारूड. २ वायफळ भाषण; बडबड. 'म्हणती शब्दजाळ टाकून। निश्चल एकाग्र ऐसिजे मनें।' [सं.] **०तः**-क्रिवि. शब्दानें. 'शब्दतः अर्थतः अगाध खोली।' -एभा २१.३६७. [सं.] **०ताडन**-न. एखाद्यास लागेल असें भाषण; शब्दांचा मार; टोचून बोलणें. 'सुज्ञास शब्द ताडन मूर्खास प्रत्यक्ष ताडन.' [सं.] **०तात्पर्य**-न. भाषणाचा सारांश; शब्दार्थ; मतलब. [सं.] **०दोष**-पु. १ शब्दांतील व्यंग, उणेपणा; शब्दापराध; शब्दवैगुण्य. काव्यप्रकाशांत एकंदर शब्ददोष१३सांगितले आहेत. ते पुढीलप्रमाणें: श्रुतिकटु च्युतसंस्कृति, अप्रयुक्त, असमर्थ, निहतार्थ, अनुचितार्थ, निरर्थक, अवाचक, अश्लील (जुगुप्सा, अमंगल, व्रीडा-युक्त), संदिग्ध, अप्रतीत, ग्राम्य, नेयार्थ. 'प्रताप रुद्रांत पुढील सतरा शब्ददोष सांगितले आहेत:-अप्रयुक्त, अपुष्ट-अपुष्टार्थ, असमर्थ, निरर्थक, नेयार्थ, च्युतसंस्कार-च्युतसंस्कृति, संदिग्ध, अप्रयोजक, क्लिष्ट, गूढ-गूढार्थ, ग्राम्य, अन्यार्थ, अप्रतीतिक, अविमृष्टविधेयांश, विरुद्धमतिकृत, अश्लील (जुगुप्सा, व्रीडा, अमंगल-युक्त), परुष-श्रुतिकटु. २ दोषारोप; बोल; ठपका; आळ. (क्रि० ठेवणें; घालणें; लावणें; आणणें; येणें; लागणें). ३ शब्दामुळें, नांवामुळें लागलेला बट्टा; कलंक. उदा० 'प्रतिव्रतेस व्यभिचारिणी म्हटली शब्ददोष तर येतो'. **०ध्वनि**-पु. आवाज; स्वर; बोलणें. 'तिचा हा शब्दध्वनि। ज्यांही श्रवणीं ऐकिला।' [सं.] **०परीक्षा**-स्त्री. (वैद्यक) शब्दाच्या स्पष्टास्पष्टतेवरून किंवा जड हलकेपणावरून व्याधिनिदान करणें. [सं.] **०पांडित्य**-न. १ वक्तृत्व; भाषापांडित्य. २ कृती न करतां उगीच कोरडें व डौलाचें वाक्पाटव करणें; वृथा बडबड; प्रौढी. [सं.] **०पारुष्य**-न. कठोर भाषण; कटु भाषण. [सं.] **०पाल्हाळ**-पु. शब्दावडंबर;

शब्दमारूड. शब्दजाल पहा. (क्रि० लावणें; मांडणें; करणें ). ०प्रमाण-न. शब्दांनीं दिलेला पुरावा; साक्ष (तोंडी). [सं.] ०प्रहार-पु. वाक्ताडन; मनाला लागतील, दुःख देतील असे शब्द बोलणें; रागें भरणें. [सं.] ०बोध-न. शब्दज्ञान. 'शब्दबोधें सदोदित।'-एभा २.१६७. ०ब्रह्म-न. वेद. 'हें शब्दब्रह्म अशेष।' -ज्ञा१.३; -एभा ११.४९८. [सं.] ०भेद-पु. १ शाब्दिक फरक. २ प्रतिशब्द; दुसरे शब्द. [सं.] ०भेदी-वेधी-वि. १ आवाजावरून बाण मारण्यांत पटाईत, निष्णात, तरबेज. २ वस्तूचा नुसता नाद ऐकून त्यावर बिनचूक जाणारा, वेध करणारा (अस्त्र, शक्ति, मंतरलेला बाण इ०). ३ (ल.) थोडक्या शब्दांवरून एखाद्याचें अंतरंग, मतलब, बेत जाणणारा; चांगला तर्कबाज. ४ दशरथ, अर्जुन यांचें विशेषण, अभिधान. [सं.] ५ मंत्रानें दुसऱ्याचा नाश करणारा; केवळ मंत्रोच्चारामुळें शत्रूचा नाश करणारा. ०माधुर्य-न. शब्दांतील गोडी; मधुर भाषण. [सं.] ०योगी-वि. (व्या.) व्याकरणांत नामें आणि नामाप्रमाणें योजलेले इतर शब्द यांना जोडून येणारें (अव्यय). उदा० वर, खालीं, पुढें, मागें इ०. हीं ज्यांना जोडलीं जातात त्यांचें सामान्यरूप होतें. ०योजना-स्त्री. १ शब्दांची निवड, योग, जुळणी. २ शब्दरचना; वाक्यरचना. [सं.] ०योनि-स्त्री धातु; शब्दाचें मूळ. [सं.] ०रचना-स्त्री. शब्दांची रचना, मांडणी; वाक्यरचना; शब्दयोजना. [सं.] ०राशि-पु. वेद. -मनको. ०लालित्य-न. शब्दसौंदर्य; शब्दांची मनोवेधक योजना. लालित्य पहा. [सं.] ०वाहक यंत्र-न. विजेच्या सहाय्यानें दूर अंतरावरून बोलण्याचें यंत्र. (इं.) टेलेफोन. 'सौ. महाराणीसाहेबास वारा घालण्यास एक स्त्री कामगार पाठविण्यास शब्दवाहकद्वारें...हुकूम द्यावा' -ऐरापुप्र ४.२२४. ०विचार-पु. १ शब्दसाधनविचार; प्रत्यय प्रकरण. (इं.) इटिमॉलॉजी. २ (व्या.) वाक्यांतील निरनिराळ्या शब्दांचा परस्परांशीं असणाऱ्या संबंधाचा विचार. ०विता-पु. परमात्मा. -मनको. ०वेध-पु. १ वेदांतील गूढ स्थळें; शब्दांचें कूट; शब्दांचें जाळें; आडंबर. 'कंठीं शब्दवेधांचें साखळें.' -शिशु १११. २ आवाजास अनुसरून बाण, गोळी वगैरे मारणें. ०वेधी-वि. शब्दभेदी पहा. ०वैपरीत्य-न. (बोलणाराच्या हेतूशीं) विरुद्ध, विपरीत शब्दयोजना; भलतीच शब्दयोजना; चुकीची पदयोजना. 'कुंभकर्ण बोलला निद्रापद, कुंभकर्णाच्या मनांत होतें इंद्रपद, तस्मात्-शब्दवैपरीत्य झालें.' [सं.] ०शक्ति-स्त्री. १ शब्दाचा जोर; शब्दाचा वास्तविक, अगदीं बरोबर असा अर्थ. शब्दाचा यौगिक अर्थ. २ (साहित्य) अभिधा, लक्षणा, व्यंजना इ० शब्दार्थ बोधकवृत्ति. [सं] ०शक्तिगम्य-वि. शब्दशः; मूळ अर्थाप्रमाणें. ०शासन-न, शब्दांचा अर्थ, त्यांची योजना वगैरे संबंधी, व्याकरणशास्त्र, शब्दविचार, इ० नियम. [सं.] ०शास्त्र-न. १ शब्दविज्ञान; शब्दांचें संपूर्ण विवरण करणारें शास्त्र; व्युत्पत्तिशास्त्र. २ व्याकरणशास्त्र. [सं.] ०शुद्धि-स्त्री. १ व्याकरणनियमाप्रमाणें निर्दोष अशी शब्दयोजना; अचूक मांडणी. २ शब्दांतील दोष काढून टाकणें; शब्दांची तपासणी; दुरुस्ती. ३ परकीय शब्द न वापरणें; भाषाशुद्धि. ०शूर-पु. केवळ बोलण्यांत शूर, पटाईत. -धनुर्भंग पृ. ७३. ०श्री-स्त्री. शब्दांची शोभा. 'एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक।' -ज्ञा १.३४. ०संग्रह-पु. शब्दसमूह; शब्दसमुच्चय; शब्दकोश-ष. [सं.] ०संचय-पु. शब्दांचा सांठा, समूह; शब्दांची समृद्धि, वैपुल्य. ०संदर्भ-पु. वाक्य रचनेंतील शब्दांचा एकमेकांशीं असलेला संबंध-अन्वय. [सं.] ०सादृश्य-न. (अर्थानें अगदीं निराळे असणाऱ्या) शब्दांतील साम्य, सारखेपणा [सं.] ०साधनिका-स्त्री. १ शब्दविचार; शब्दांची बनावट; व्युत्पत्ति. २ शब्दांची फोड, उकल; व्याकरण चालविणें. [सं.] ०साधित-न. शब्दापासून, नामापासून साधलेला शब्द. -वि. (व्या.) नामापासून बनलेलें. याच्याउलट धातुसाधित. [सं.] ०साम्य-न. शब्दांचा सारखेपणा; सादृश्य. [सं.] ०सूची-स्त्री. शब्दांची सूची. याच्या उलट पदसूची वगैरे. [सं.] ०सृष्टि-स्त्री. १ शब्दांचा संग्रह; शब्दांची रचना. २ (ल.) काव्य; ग्रंथ; प्रबंध. 'आतां वंदूं कवेश्वर। शब्दसृष्टीचे ईश्वर।' -दा १.७. [सं.] ०स्फुरण-न. (शब्दांचें फुरफुरणें, थरथरणें) ज्यांत जोडाक्षरें व ट वर्गातील अक्षरें एकसारखीं पुष्कळ येतात अशा कठोर, कर्णकटु प्रबंधाबद्दल म्हणतात [सं.] ०स्वारस्य-न. शब्दांतील गोडी, लज्जत; शब्दमाधुर्य. [सं.] शब्दविणें-क्रि. बोलविणें. 'मीचि शब्दातें शब्दविता।' -एभा १३ ३४४. शब्दाचा मार-पु. वाक्ताडन; शब्दप्रहार; कानउघाडणी; निर्भर्त्सना. 'वेड्यास टोणप्याचा मार, शहाण्यास शब्दाचा.' शब्दांची कसरत-स्त्री शब्दांची कसरतीप्रमाणें बळेनें केलेली अस्वाभाविक रचना. 'भाषा आणि तपश्चर्या, वचनाचें कष्ट, शब्दांची कसरत, या गोष्टींची जरूर असते.' -नाकु ३.४. शब्दाडंबर-न. शब्दजाल; केवळ शब्दांचें वैपुल्य; अर्थहीन शब्दरचना; पोकळ वक्तृत्व. [सं. शब्द+आडंबर] शब्दातीत-वि. शब्दांच्या किंवा बोलण्याच्या शक्तीबाहेरचें; वर्णन करितां येत नाहीं असें; शब्दांनीं वर्णन करण्यास अशक्य; अनिर्वाच्य. [सं. शब्द+अतीत] शब्दानुप्रास-पु. (साहित्य) शब्दाचा अनुप्रास; एक यमक-रचना; ज्यांत त्याच त्या शब्दाची पुनःपुनः आवृत्ति होते असा अलंकार. याच्या उलट वर्णानुप्रास. [शब्द अनुप्रास] शब्दानुशासन-न. शब्दशासन; शब्दांच्या लिंग, रूपांबद्दल, अर्थाबद्दल वगैरे नियम. [सं.] शब्दानुशब्द-क्रिवि. प्रत्येक शब्द. 'या एकंदर बोलण्यांतील शब्दानुशब्द शांतपणानें शिष्याच्या मुखांतून

निघत होता.' -उषःकाल. [शब्द+न्=आणि+शब्द] **शब्दामृत**-न. (काव्य) शब्दमाधुर्य; वाङ्माधुर्य; अमृताप्रमाणें गोड शब्द. [शब्द+अमृत] **शब्दार्थ**-पु. १ शब्दाचा अर्थ, आशय. २ शब्दाचा मूळ, शब्दशः अर्थ; यौगिकार्थ. [सं.] **शब्दालंकार**-पु. (साहित्य) शब्दाच्या रूपावरून साधलेला अलंकार; काव्यांतील अनुप्रास; यमकादि अलंकार; याच्या उलट अर्थालंकार. या अलंकारांचे पुढील पांच प्रकार आहेतः-वक्रोक्ति, अनुप्रास, यमक, श्लेष, पुनरुक्तवदाभास. ह्यांत पुन्हां प्रत्येकीचे जे निरनिराळे भेद आहेत ते सर्व प्रतापरुद्रग्रंथांत व काव्यप्रकाशांत सांगितले आहेत. [सं.] **शब्दाशब्द**-पु १ चांगले-वाईट शब्द; अविचाराचे व उद्धटपणाचें भाषण; वेळ प्रसंग न पहातां असभ्यपणाचें बोलणें. 'चौघांमध्यें शब्दाशब्द बोलूं नये, चांगले बोलावें' २ अप्रत्यक्ष व आक्षेप न घेतां बोलणें; चांगलें किंवा वाईट (यांपैकीं कोणतेंच नाहीं असें) भाषण. 'मी त्याला शब्दाशब्द कांहीं बोललों नाहीं.' [सं. शब्द+अशब्द] **शब्दित**-न. भाषण; आवाज; बोलण्याचा स्वर; ध्वनि. -वि. १ उच्चारलेलें; बोललेलें; वदलेलें; घोषित केलेलें. २ शब्दानें युक्त केला जो वाद्यादि तो; वाजविलेलें; निनादित. [सं.] **शाब्द, शाब्दिक**-वि. शब्दासंबंधीं, वाग्युक्त; वाणीयुक्त; वाचिक. 'तरी तप जें कां सम्यक्। तेंही त्रिविध आइक। शारीर मानसिक। शाब्द गा।' -ज्ञा १७.२००. २ स्वरासंबंधीं; आवाजासंबंधीं. ३ (व्या.) नामासंबंधीं; नामवाचक (प्रत्यय वगैरे). ४ अनुभवाशिवाय बडबड करणारे; केवळ शब्द जाणणारे; शब्दज्ञानी. 'वृथा शाब्दिकांचें शब्दज्ञान। तेंहीं व्याख्यान दाविलें।' -एभा ११.६४८. -पु. शब्दांचे अर्थ जाणण्यांत व रूपें समजण्यांत, करण्यांत निष्णात, हुषार; तरबेज; वैयाकरण. [सं] **शाब्दबोध**-पु शाब्दिक बोध; अक्षरशः होणारा अर्थ; यौगिक अर्थ. [सं.] **शाब्दिकसृष्टि**-स्त्री. अलंकारिक, कुशल शब्दरचना; काव्यप्रबंधांतील शब्दरचनाचातुर्य. [सं.] **शाब्दी**-स्त्री. शब्दप्रवृत्ति. 'तेवींचि हा अनादि। ऐसी आथी शाब्दी।'-ज्ञा १५.२३०.

**शब्दुली**—स्त्री. (गो.) गुलबाशीचें झाड. [फा. शब्गुल]

**शंभर**—पु. सांबर; हरिणीची एक जात. सांबर पहा. [सं. शंबर]

**शंभर**—वि. शत; १०० संख्या; शें; एक, दोन, तीन अशा-प्रकारची शंभराची पट दाखवितांना 'शें' असें रूप वापरतात. उदा० एकशें, दोनशें, तीनशें इ०. [सं. शतं; इं. सेंटम्] **म्ह०** शंभरांत फूल, हजारांत काणा, सर्वांत आंधळा दाणा. (व.) ज्याच्या डोळ्यांत फूल पडलें आहे, तो शंभर डोळसांत शहाणा, तसेंच एका डोळ्यानें आंधळा (काणा) असलेला हजारांत शहाणा व या सर्वांपेक्षां दोन्हीं डोळ्यांनीं आंधळा अधिक शहाणा असतो. (वाप्र.) **शंभर बुडया मारून अंग कोरडें दाखविणारा**-ज्याची लबाडी किंवा लुच्चेगिरी दुसऱ्यास सिद्ध करतां येत नाहीं असा; अनेक लबाडया करून त्यांत न सांपडणारा. **०रुपये तोळा बोलणें**-मितभाषण, अगदीं थोडें व केवळ अवश्य तेवढेंच भाषण करणें (अबोल माणसाबद्दल वापरतात). **०वर्षें भरणें**-एखाद्याचा मरणकाल, विनाशकाळ जवळ येऊन ठेपणें. 'शतायुर्वै पुरुषः' या न्यायानें मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षें आहे, तें संपणें; मरणें. 'तुला जी काय हकीकत माहीत असेल ती सगळी सांग, नाहींतर तुझीं शंभर वर्षें आतांच भरलीं समज.' -मथुरा. **शंभर हातांत न ठेवणें**-अगदीं दूर राहणें; अलिप्त असणें. **०नंबरी**-वि. उत्कृष्ट प्रतीचें; अत्यंत शुद्ध; ज्यांत बिलकुल भेसळ नाहीं असें (सोनें इ०).

**शंभु**—पु १ शिवाचें नांव; शंकर; महादेव. 'तैसें लक्ष्मीयेचें थोरपण न सरे। जेथ शंभूचेंही तप न पुरे।' --ज्ञा ९.३८०. २ (ल) सरळमार्गी, भोळा माणूस. ३ (ल.) मूर्ख माणूस. [सं.]

**शम्**—अव्यय. १ कल्याण; सुख. २ समाप्ति; शेवट. [सं.]

**शम**—पु. १ शांतता; शांति; स्थिरता; स्तब्धता. २ (राग आणि विकार यासंबंधी) इंद्रियदमन; मनोनिग्रह (वेदांती लोकांवर शम, दम, तप, तितिक्षा, श्रद्धा, आणि समाधान अशी एकंदर सहा कर्तव्यें लादलीं आहेत). 'ऐसा बुद्धीचा उपरमु। तया नाम म्हणिपे शमु।' -ज्ञा १८.८३४. शांति; अक्षुब्धता; अक्षोभ. ३ आत्यंतिक सुख; मोक्ष; निर्वाण. ४ औदासीन्य; संन्यस्तवृत्ति; निवृत्ति. ५ योगसिद्धि. 'कर्म हेंच शमाचें कारण होतें.' -गीर ६९६. [सं. शम्=मनोनिग्रह करणें] **०दम-दमादि**-न. वेदांती लोकांची शम, दम आदिकरून कर्तव्यें; शम पहा. शमदमादि साधनसमुच्चय. **०विषम**-वि. (पाऊस, भाव, रोग वगैरेसंबंधी लोकरूढ) १ हलके व जाड; कमजास्त; कमीअधिक; थोडेंफार; मागेंपुढें होणारें. २ थोडयाबहुत फरकाचें; थोडीफार चूक असलेले (हिशेब, विधान, रीत). ३ किंचित् मतभेद असलेलें; थोडाफार गैरसमज झालेलें. **शमणें**-अक्रि. १ शांत होणें; स्थिर, स्तब्ध, निश्चल होणें; संतुष्ट होणें; समाधान पावणें. 'अत्युग्र भीम काळचि, हें वचन यथार्थ मान रे! शम रे!।' -मोभीष्म १२.२७. ३ ओसरणें; कमी होणें. ४ मरण पावणें; मरणें. 'जो अधिप कोसलांचा भासत नव्हता रणीं शमावासा।'-मोकर्ण ३.२७. ४ दमणें; थकणें. 'शमले मद्बंधु बहु...' -मोभीष्म १०.१३. [सं. शम्] **शमविणें**-क्रि. १ शांत करणें; स्थिर करणें; दमन करणें. २ मारणें; नाहीसें करणें. [शम प्रयोजक] **शमन**-न. १ शांति; शांतता; स्वस्थता; स्तब्धता. २ (वैद्यक) शांतवन; उपशमन; उपशम; तीव्रता कमी करणें; थंडावा आणणें. 'सप्तोपचार' पहा. ३ उपशमक; उपशांतक; उपशमन करणारें

औषध; तीव्रता कमी करणारें, वेदना हलक्या करणारें औषध; दुःखहारक औषध. उदा० 'पित्ताचें शमन सुंठसाखर'. ४ शांत होणें; स्तब्ध होणें; उपशम होणें; स्थिर होणें; निवारण. ५ यम. [सं.] **शमनीय**-वि. शांत होणारें; शांत करण्यासारखें. [सं.] **शमित**-वि. १ शमलेलें; शांत झालेलें. २ कमी झालेलें; दबलेलें. ३ उपशम पावलेलें; संतुष्ट. [सं.] **शमी**-वि. सौम्य; शांत; स्तब्ध, स्थिर; सौम्य स्वभावाचा. 'नमिला शमि-लास्य-प्रद शांति-जल-धि एकनाथ तो भावें।' -मोसन्मणिमाला (नवनीत पृ. ३४७.) [सं.]

**शमनाबीर**—पु. एक क्षुद्र दैवत; एक मुसलमानी समंध. **शमनाबिराची कांडी फिरविणें**-लबाडी, कपट, लुच्चेगिरी करणें; हातचलाखी करणें.

**शमल**—न विष्ठा; घाण; मळ; मैला. [सं.]

**शमला**—पु. डोक्यावरील फेट्याचा किंवा कमरबंदाचा सोडलेला सोगा. समला पहा. [अर. शम्ला]

**शमस-उल्-उलेमा**—पु. मुसलमानांतील शास्त्री, पंडित, महामहोपाध्याय. [अर. शम्स्=सूर्य]

**शमिना**—पु. १ तंबूच्या पुढील भागाचा किंवा मागील भागाचा पडदा; चांदवा. २ शामियाना; डेरा; मोठा तंबू. [फा. शमियाना]

**शमी**—स्त्री. १ एक कांटेरी झाड. (दसऱ्याच्या दिवशीं शमीची पूजा करितात). २ या झाडाचा (देवाला वाहण्यास आणतात तो) पाला. शमीस संवदड म्हणतात. [सं.] **०धान्य**-न. शेंगेंत उत्पन्न होणारें तूर, मूग, वाटाणा वगैरे धान्य. याच्या उलट शूकधान्य. [सं.] **०पूजन-पूजा**-नस्त्री. दसऱ्याच्या दिवशीं शमीच्या झाडाचें केलेलें पूजन, अर्चन.

**शय**—पु हात. 'अर्पीन अर्जुना जो दावील तया न आवरीन शय।' -मोकर्ण २६.१०. [सं.]

**शयन**—न. १ झोंप; नीज; निजणें; निजण्याचा व्यापार. 'कृष्ण तयां ध्यानीं आसनीं शयनीं।' -तुगा २२. २ बिछाना; मंचक; चटई; माचा; खाट; पलंग; आंथरूण; शय्या; शेज. 'नसतां... पयःफेन शुभ्र मृदु शयन।' -मोस्त्री ४.४४. ३ आडवें होणें; जमीन, पलंग इ० वर निजणें; अंग टाकणें; अंगाखालीं घेणें. **शयनी एकादशी**-स्त्री. आषाढ शुद्ध एकादशी, ह्या दिवशीं विष्णु झोंपी जातात व चातुर्मास्य संपेपर्यंत उठत नाहींत. [सं.] **शयनीय**-वि. निजण्यास योग्य. **शय्या**-स्त्री. १ बिछाना; आंथरूण. २ खाट; पलंग. ३ शयन पहा. [सं.] **शय्यादान करणें**-१ मृताची शय्या ब्राह्मणास देणें; उत्तरक्रियेंतील दान. २ सती जाणें. 'शय्यादान करणें मला आणून या शिर।' -पला ४०, १०४. **शायी**-वि. निजणारा; झोंपणारा. (जेथें किंवा ज्याप्रकारें असेल तो शब्द पूर्वी योजतात) उदा० जलशायी; शेषशायी; भूशायी; सुखशायी; उत्तानशायी. [सं]

**शय्याद्री**—पुस्त्री. (प्र.) सह्याद्रि पहा. [सह्याद्रि अप.]

**शर**—पु. १ बाण; तीर. २ मृग नक्षत्रांतील शिवाच्या तीन ताऱ्यांचा आकाशांतील बाण. लुब्धक पहा. -वि. (ज्यो.) पांच संख्या (मदनाचे पंच शर यावरून). [सं.] **०कांड**-पुन. बाणाची काठी, दांडी, कामटी. [सं] **०जन्मा**-पु. कार्तिकस्वामी. [सं.] **०जाल**-न. (काव्य) बाणाची झोड, वर्षाव; सरबत्ती; बाणांचें जाळें. [सं.] **०धार**-पु. बाणांचा पाऊस; वर्षाव. 'मेघ वर्षतां जळ शरधारीं।' -एभा २१.८२. **०धि**-पु. भाता; बाणांची पिशवी. [सं.] **०पंजर**-पु. १ (काव्यांत अतिशयोक्तीनें वर्णन करतांना) एखाद्याच्या अंगांत पुष्कळ बाण शिरले म्हणजे हा शब्द योजतात; देहाला शरांचें पिंजऱ्याप्रमाणें आवरण. २ बाणांचा पिंजरा, पलंग. [सं.] **०पंजरीं पडणें**-१ (ल.) (भीष्माच्या कथेवरून) मृत्यूच्या द्वारीं खितपत पडणें; आजारानें, दुखण्यानें झिजत पडणें. २ ज्यांतून बाहेर पडण्यास कोणताच उपाय नाहीं अशा संकटांत पडणें. **०पात**-पु. १ बाण सोडणें, फेकणें. २ बाणाचें पतन; बाण येऊन पडणें, आदळणें. ३ बाणांचा वर्षाव. [सं.] **०पुंख**-स्त्री. बाणाची पिसें; बाणाचा पिसें लावलेला मागील भाग. [सं.] **०फल**-न. बाणाचें टोंक, अग्र; बाणाचें धातूचें पातें [सं.] **०वर्ष-वर्षाव-वृष्टि**-पुस्त्री. बाणांचा वर्षाव, भडिमार. [सं.] **०शय्या**-स्त्री. बाणांचा बिछाना. [सं.] **०संधान**-न. बाणाचा नेम; बाणानें नेम धरणें, साधणें, मारणें. [सं.]

**शरांटी**—स्त्री. बाणाची कामटी. -क्रिवि. (महानु.) बाणांच्या आंटींत, कैचींत. 'शरांटी पिढौनु। तों हीं खांडेंसुनु।' -शिशु ४४२. (टीपग्रंथ) **शराभ्यास**-पु धनुष्यविद्या; शरसंधान करण्याची संवय; शिक्षण. [सं.] **शरासन**-न. १ धनुष्य; चाप. २ शरसंधान; बाण फेंकणें. [सं.]

**शर**—पु (ज्यो.) १ ताऱ्याचें क्रांतिवृत्तापासून अंतर; याम्योत्तर अंतर; खगोलीय अक्षांश. २ (गणित) व्युत्क्रमज्या. **०पात**-पु. शरवृत्ताचा जो क्रांतिवृत्ताशीं पात होतो तो. -सूर्य १२. [सं.] **०वृत्त**-न. क्रांतिवृत्ताशीं लंब असणारें वृत्त. -सूर्य १२. **०सूत्र**-न. आकाशांतील रेखांशवृत्त [सं.]

**शर**—पु. १ (स्थापत्य) कमानीची चढ, उंची. 'कमानीची जाडी ६ इंच असून शर गाळ्याच्या एक अष्टमांश असावा' -मॅरट १९. २ (गणित) कंसाचीं दोन टोकें सांधणाऱ्या ज्येच्या मध्यापासून तिजवर लंब काढून तो त्या कंसाला मिळे तोंपर्यंत वाढविला असतां, त्या लंबाला त्याच कंसाचा शर म्हणतात. -महमा २९. उंची. [सं.]

**शरग**—पु. (तंजा.) पातेरा; वाळलेलीं पानें; पाचोळा. [ता. शरगु]

**शरट-ठ**—पु. सरड. सरडा; सरट. [सं. शरट]

**शरण**—न. रक्षण; संरक्षण; सांभाळ. (क्रि० जाणें, येणें; असणें). -वि. १ संरक्षक; रक्षक; सांभाळ करणारा इसम; प्रतिकारक; आश्रयदाता; रक्षणकर्ता. २ आश्रय, संरक्षण मागणारा. **०असणें**-रक्षण व्हावें म्हणून विनंति करणारा होणें, असणें; आश्रय मागणें. 'मी तुम्हांस शरण आहें, जीवदान द्या.' **०जाणें-येणें**-रक्षणासाठीं शरणागत होणें; एखाद्याचें वर्चस्व कबूल करून दया, क्षमा भाकणें. 'यालागीं तूं अर्पी सीता । शरण जाई अयोध्यानाथा ।' -एकनाथ-रामायण. **म्ह०** शरण आल्या मरण मोजूं (देऊं, चिंतूं) नये' =शरण आलेल्यास जीवदान द्यावें, त्याचें रक्षण करावें. 'शरण आलिया मरण चिंतूं नये' -भाब ३२. **शरणागत, शरणापन्न**-वि. आश्रय मागण्यास आलेला; शरणार्थी; दयेची याचना करणारा. 'शरण जाय अयोध्यानाथा । तो वज्रपंजर शरणागता । भवव्यथा वारील ।'. 'अहंकार जड पर्वत । शरणागता बाधे यथार्थ ।' [सं. शरण+आगत, आपन्न] **०गतवत्सल**-वि. शरण आलेल्यावर दया करणारा; दीनदयाळु. (राजा, परमेश्वर यांचें अभिधान). [सं. शरण+आगत+वत्सल] **शरणार्थ**-पु. लिंगायत लोकांची एकमेकांची भेट झाली असतां नमनार्थी वापरावयाचा वाक्प्रचार, संज्ञा. तुमचा आश्रयार्थी, नम्र सेवक. **शरणार्थी**-वि. शरणागत पहा. **शरण्य**-वि. १ शरणागतांचा आश्रयदाता; संरक्षक; रक्षणकर्ता. २ आश्रय देण्यास, रक्षण करण्यास योग्य, लायक. इ० [सं.]

**शरण**—न. चिता. (प्र.) सरण पहा. [सरण]

**शरत्-द**—स्त्री. १ सहा ऋतूंपैकीं चौथा ऋतु. वैदिक महिने भाद्रपद व आश्विन पण पुराणाप्रमाणें आश्विन आणि कार्तिक हे महिने या ऋतूचे होत. २ वर्ष. [सं.] **शरत्काल, शरदृतु**-पु. शरदृऋतूचा काल; हिंवाळा. [सं.] **शारदारंभपात**-पु. दक्षिणायनपात. उत्तरायणपात पहा.

**शरपुंखा-खी**—स्त्री. एक औषधी वनस्पति; उन्हाळी; सर्पविषावर औषधी झाड. 'या झाडाची मुळी पाण्यांत उगाळून पिण्यास देतात व डोळ्यांत घालतात.' -बदलापूर ३३८. [सं.]

**शरबत**—न. १ सरबत; लिंबू, डाळिंब, चिंच इ० च्या रसांत पाणी व साखर घालून केलेलें गोड-आंबट पेय. २ सुधा. [फा. शरबत] **०खोरी**-स्त्री. शरबत पान. वाङ्निश्चयाचा फलाहार. 'सैफन्मुलूक यांची कन्या साहेब-जादे यांस देण्याचा निश्चय होऊन शरबत खोरी जाली.' -रा ७.१४८.

**शरभ**—पु. १ हिमालय पर्वताच्या भागांतील आठ पायांचा एक काल्पनिक प्राणी; हा सिंहाहून बलिष्ठ असतो असा समज आहे. २ हत्तीचा छावा. ३ टोळ. ४ एक किडा. [सं.]

**शरम**—स्त्री. लाज; लज्जा. [फा. शर्म्] **शरमणें**-क्रि. लाज, लज्जा वाटणें; लाजणें; वरमणें; ओशाळणें. **शरमिंदा-धा**-वि. १ शरमलेला; लाजलेला; खजील; ओशाळलेला. २ उपकाराच्या भारानें किंवा भिऊन दबलेला; गोगलगाय बनलेला. [फा.]

**शरा**—पु. १ मुसलमानी कायदा; इस्लामधर्म-शास्त्र. 'तेथील शरा-अन्वये फैसले करीत जाणें' -वाड सनदा ७६. २ शास्त्रनिर्णय. 'कागद शराचा करून दिला.' -वाड-शाछ १८३. [अर. शर्अ]

**शरा**—स्त्री. पगाराचा दर. 'स्वारास शरा पंधरापासुन तीस पर्यंत देतात.' -पेद १०.७६. [हिं. शरह]

**शराईत**—वि. निष्णात; तरबेज; निपुण; पटाईत. (प्र.) सराईत पहा. [सराव, सराईत]

**शराकत-दार-नामा-कती**—पु. सरकत, सरकतदार, सराकती पहा. [अर. शिराकत्] **शराकतदार**-वांटेकरी. 'दुसरे कोणास त्याचा हिस्सेदार व शराकतदार न जाणावा.' -वाड-सनदा ७५. [अर.] **शरीक**-पु. १ वांटेकरी; पातीदार; साथीदार. 'तेव्हां एवढे मसलतीस शरीक होऊन तोंड पहात बसावें, कजिया यांत काढावा फल काय?' -ख ८.४३१८. २ दोस्त. तेव्हां जिवानर्सी शरीक आहों.' -रा ८.१६८. [अर. शरीक्]

**शराब**—पुस्त्री. (पिण्याची) दारू; मद्य. [अर. शराब्] **०खाना**-पु. दारू पिण्याचें स्थान; सुरागार. **०पाणी**-न. दारूबाजी; अंमल; निशा. 'नाचरंग आणि शराबपाणी याचीच त्याला विशेष आवड होती.' -स्वप ७३. **शराबी**-वि. मद्यपी; दारूबाज. [फा.]

**शरायणी गज**—पु. जमीन मोजण्याचा गज; एक लांबीचें माप.

**शरायती**—स्त्री. (कारकुनी भाषा) काकपद; ^ अशी खूण लेखांतील ओळीमध्यें किंवा वाक्यामध्यें मागाहून घातलेला शब्द, दाखविण्याकरितां करावयाची खूण. [अर. शराइत]

**शरारत**—स्त्री. (ना.) द्वेष; हेवा; मत्सर. [फा.] **शरारती**-वि. (ना.) हेवेखोर; मत्सरग्रस्त; द्वेषी; मत्सरी. **शरारती मामला**-पु. (ना.) द्वेषबुद्धिनें प्रेरित होऊन एखाद्यावर घेतलेलें बालंट.

**शरारू**—वि. घातुक. 'प्रकटि खरा रूपा, पी जें गगनाला असें शरारू पापी ।' -मोकृष्ण १८.१५. [सं.]

**शराव-वी**—पुस्त्री. वेळणी; जोगली; ताटली; परळ नांवाचें मातीचें भांडें; उथळ भांडें. [सं. शराव]

**शरीयत्-पन्हा**—पु. इस्लामधर्मशास्त्रज्ञ; काजी. 'शरीयत्-पन्हा महम्मद हैदर.' -वाड-सनदा ७४. [फा. शरीअत्पन्हा]

**शरीर**—न. १ देह; काया; वपु. २ गुह्येंद्रियाबद्दल संकेतानें म्हणतात. [सं.] **०कमावणें**-बलवृद्धि करणें; शरीराची निगा राखणें, जोपासना करणें; शरीर सुदृढ करणें. 'शरीर कमावून बसावयाचें पण अक्कल गमावून बसावयाचें.' -राजसंन्यास १५. **०वेचणें**-परोपकाराकडे देह झिजविणें. सामाशब्द- **०कष्ट**-पुअव. शारीरिक श्रम, हाल, अपेष्टा; देहकष्ट. **०कळा-कांति**-स्त्री. शरीराचें तेज, टवटवी, तजेला. [सं.] **०दंड**-पु १ तप आचरून किंवा अन्य रीतीनें देहाला दिलेले श्रम; कष्ट; देहदंड. २ शारीरिक शिक्षा; मारणें इ०. [सं.] **०पाटव**-न. शरीराचा निरोगीपणा; सुस्थिति; आरोग्य; सुदृढता. [सं.] **०प्रकृति**-स्त्री. १ प्रकृतिमान; शरीराची ठेवण; स्वभाव. २ देहाचें आरोग्य; स्वास्थ्य. [सं.] **०भाव**-पु. १ शारीरिक प्रकृति; स्वभाव; शारीरिक अवस्था. 'व्याध करी साष्टांग नमस्कार। मुखे म्हणे जयजयकार। तों शरीरभाव पालटला।' -शिली २. २ अहंभाव. -मनको. [सं.] **०भोग**-पु. १ शारीरिक कष्ट, यातना, रोगपीडा इ०. (सामा.) दुखणें; दुखापत. २ शारीरिक विलास, करमणूक, ऐषआराम. (क्रि० भोगणें). ३ प्रारब्धप्राप्त देहपीडा. ४ शरीराला होणारें सुखदुःख. [सं.] **०यष्टि**-स्त्री. शरीर; अंगकाठी; शरीरठेवण, घडण. [सं.] **०संपत्ति**-स्त्री. १ आरोग्य; स्वास्थ्य; निरोगीपणा. २ शरीरांतील जोम; उत्साह, शक्ति. [सं.] **०संबंध**-पु. १ सोयरिकीमुळें जडणारा संबंध; आप्तपणा; सोयरीक; सोयरगत; नातें. २ विवाहसंबंध; लग्न (लग्नचिठ्ठींत वापरतात). ३ हातघाई; मारामारी; धक्काबुक्की, लगट. **०संबंधावर येणें**-हातघाईवर येणें; मारामारी, धक्काबुक्की करणें; लगट करणें. **०संबंधी**-वि. सोयरीकसंबंधीं; विवाहामुळें नातें जडलें आहे असा. **०सांडोवा**-पु. देहाचें निंबलोण; देह ओवाळून टाकणें. 'यालागीं शरीरसांडोवा कीजे। सकल गुणांचें लोण उतरिजे।' -ज्ञा ९. ३८१. [शरीर+सांडणें] **०स्वास्थ**-न. शरीराची सुस्थिति; आरोग्य; शारीरिक सुख. [सं.] **शरीराची ढगळ**-स्त्री. शरीराची झीज; कृशपणा (हगवण इ० मुळें आलेला); शरीराची खराबी. **शरीराची दामटी**-स्त्री (अजारीपणामुळें) शरीराला आलेली हीन अवस्था; कृषता; खराबी. **शरीराची धलपी-ढळपी**-स्त्री. (रोगानें) शरीर कृश, काठीप्रमाणें होणें. **शरीरी**-वि. १ देहधारी; देही; देह धारण करणारा. २ शरीरासंबंधी; शरीराचें; शारीरिक. -पु. देहधारी सजीव प्राणी. [सं.] **शारीर, शारीरक**-न. १ शरीरविषयक शास्त्र; शारीरशास्त्र. २ गातांना कंप घेण्याचें कौशल्य. -वि. १ दैहिक; देहासंबंधीं; शरीरी पहा. -गीर १४२. **शारीरव्रण**-पु. सहजव्रण; स्वाभाविक व्रण; याच्या उलट आगंतुक व्रण. **शारीरशास्त्र**-न. शरीरविषयक शास्त्र. (इं.) ॲनाटमी. [सं.] **शारीरिक**-वि. शरीराचा; शरीरासंबंधीं. शरीरी पहा. याच्या उलट मानसिक. [सं.]

**शर्करा**—स्त्री. १ साखर. 'शर्करेचिया वाळवंटीं। घृत सरिता धांवती लोटीं।' -मुसभा ९.९८. २ वाळू; रेती. ३ मूतखडा रोग. **०मेह**-पु. लघ्वींतून वाळूसारखा पदार्थ ज्यांत जातो असा रोग. प्रमेह पहा. [सं.] **शर्करावगुंठित**-वि. साखरेंत घोळलेलें; साखरेनें आच्छादिलेलें. (ल) वरून गोड पण आंत कडू. [शर्करा+अवगुंठित] **शर्करिन**-न. साखरेपेक्षां अतिशय गोड पदार्थ; मधुमेहाचे रोगी साखरेऐवजी हें वापरतात. (इं.) सॅकरीन.

**शर्ट**—पु. एक विशेष प्रकारचा सदरा; खमीस. [इं.]

**शर्त-र्त-र्थ**—स्त्री. १ अट; करार; नियम. २ कसोशी; पराकाष्ठा; कमाल; कळस; सीमा. 'आईसाहेबास शपथ दिली ती शर्त करणें ती केली.' -मराचिथोशा २६. 'किल्याचे लोक मुरारबाजी पडला म्हणोन गणना न करितां शर्तीनें भांडूं लागले.' -सभासद ३४. ३ एखाद्या गोष्टीचा बेसुमारपणा; आधिक्य, अतिशयता (आश्चर्य, कौतुक वाटण्याजोगी). ४ पराकाष्टेची समृद्धि; बाहुल्य. उदा० 'गलबतांची शर्त.' 'अंब्यांची शर्त.' 'लाडवांची शर्त.' 'पुष्पांची शर्त.' इ०. ५ पाणी; तेज, पराक्रम. -तुगा. 'एका टांकासरशी त्याचा फाडकन् फडशा पाडण्याची शर्थ झाली.' -नि १२. ६ शिरस्ता; वहिवाट. 'माफी भरल्यावर सलुकशर्ते कमधारा याचा आकार होईल.' [अर. शर्त] **०होणें**-बेसुमार होणें. 'तुझ्या खाण्याची शर्थ झाली'. **शर्तनामा**-पु. तह; करारनामा. [फा.] **शर्त-बेशर्त**-स्त्री. पराकाष्ठा, अतिशय मेहनत. (क्रि० करणें). 'फिरून चालून येण्याची उमेद धरावी तो सदाशिवपंतांची कुतर-तोड करून सर्व शत्रूस आपल्या लष्करांत शर्तबेशर्त करून दामदून घातले.' -पाब २५. **शर्तमर्दी**-स्त्री. अचाट पराक्रम; महनीय कृत्य; प्रयत्न; साहस इत्यादिबद्दल कौतुकानें योजावयाचा शब्द. 'सेवा शर्त-मर्दीनें केली।' -ख ४.१८०८.

**शर्धा**—स्त्री. पाद; अधोवायुनिस्सारण. (क्रि० करणें). 'शर्धा करिती अधोद्वारें। नाकीं तोंडीं भरे दुर्गंध।' -एभा २३. ५५८. [सं.]

**शर्म, शर्मणें, शर्मिंदा, शर्मिंधा**—शरम इ० पहा. **शर्मिन्दगी**-स्त्री. लज्जा; ओशाळगत. 'हल्लीचे शिकस्तेची गैरत आणि शर्मिन्दगी नबाबास फार जाली आहे.' -रा ५.१९. [फा. शर्म] **शर्मिन्दा**-वि. लज्जित; ओशाळा. 'चाकरी करून शर्मिन्दे व्हावे यांत कांहीं लौकिक नाहीं.' -ख ४.१८२१.

**शर्म**—न. सुख; कल्याण. [सं.]

**शर्मा**—अ. १ ब्राह्मणाच्या नांवापुढें लागणारें उपपद. उदा० विष्णुशर्मा ब्राह्मण. क्षत्रियाच्या नांवापुढें वर्मा, वैश्याच्या

नांवापुढें गुप्त, व शूद्राच्या नांवापुढें दास, पालित अशीं उपपदें योजितात. [ सं. ]

**शर्मिष्ठा**—स्त्री. १ नक्षत्रपुंज; उत्तरध्रुवाजवळचा एक सहा ताऱ्यांचा पुंज. ( ई. ) कॅसिओपिआ. २ ययातीच्या एका स्त्रीचें नांव. [ सं. ]

**शर्यत**—स्त्री. १ पैज; पण; होड. २ चुरस; एकमेकांवर ताण. 'शर्यतीनें लोक भांडूं लागले।' –मदरु १.४७. [ अर. शर्त्, शरायत ]

**शर्यत**—स्त्री. इस्लाम धर्मशास्त्र. –शरा पहा. [ अ. शरीअत् ] ०**पन्हा**–पु. इस्लाम धर्मशास्त्र किंवा ईश्वरी कायदा जाणणारा. 'शर्यत्पन्हा काजी मुहंमद' –रा १८.५६.

**शर्व**—पु. श्रीशंकर. 'शक्राऽदि–लोक–पालक कथिले मुनि–वालखिल्य हरिशर्वे।' –मोसभा १.४३. [ सं. ]

**शलक–ख**—स्त्री. भडिमार; ताशेरा; झड; पाऊस; वृष्टी. [ अर. शलक् ]

**शलगम**—पुन. एक प्रकारची फळभाजी; एक फळ; सलगम्. [ तुर्की. फा. शलघम् ]

**शलभ**—पु. १ टोळ. २ दीपपतंग; दिव्यावर झडप घालणारा किडा. [ सं. ]

**शलल**—न. १ साळशिंदर; साळूच्या अंगांवरील कांटा. २ ( ल. ) कंटक; कांटा. 'तें भीमवपु विनाशर, शल्यवपु जसें विनाशलल, नाहीं।' –मोद्रोण १२.४२. [ सं. शल्य ]

**शलाका**—स्त्री. १ सळई; लांब बारीक खिळा; टांचणी; तारेचा तुकडा. २ काड; भात्याण; पेंढा. ३ कामटी; काठी; वेत. [ सं. ] ४ ( सामा. ) लांब, बारीक अणकुचीदार पदार्थ. ( उदा० छत्रीची काडी, गज इ० ) ०**परीक्षा**–स्त्री. एखाद्या विषयाचा अभ्यास केलेल्या इसमाची त्यानें अध्ययन केलेला ग्रंथ एखाद्या सळईनें उघडून कोठेंहि निघालेल्या पानावरील भागाचें त्यास स्पष्टीकरण करावयास सांगणें अशी विशिष्ट परीक्षा–पद्धति. [ सं. ] ०**प्रश्न**–पु हातांत काडी, लेखणी, पेन्सिल वगैरे कांहींतरी घेऊन ती एखाद्या ग्रंथांत घालून जो श्लोक निघेल त्याच्या अर्थावरून प्रश्नाचें उत्तर काढण्याची पद्धति. [ सं. ]

**शल्य**—पु. एक पौराणिक राजा; नकुल–सहदेवाचा मामा. 'शल्य म्हणे रे सुता बडबड करितोसि फार मदपसा।' –मोकर्ण २९.३५. [ सं. ]

**शल्य**—न. १ कांटा; टांचणी; कुसळ; टोंचणारा पदार्थ. शलाका पहा. 'जया जन्ममृत्यूचें। हृदयीं शल्य।' –ज्ञा १३. ५५३. २ न वाढतां पोटांत राहिलेला गर्भ; सल. ३ (ल.) टोंचणारें दुःख; सल; मनाला लागून राहिलेला अपमान; सलणी; तापदायक, दुःखदायक व्यथा; पीडा; मनाला टोंचणारी गोष्ट. ४ बांधीत असलल्या इमारतीखालील जागेंतील प्रेत, केस, हाडें वगैरे अशुभ पदार्थ. हा काढून टाकला नाहीं तर त्याची बाधा होते. ५ बाणाग्र. ६ शरीरांत राहिलेला ( कांटा, सुई, बाण, इ० चा ) अंश. [ सं. ] ०**तंत्र–शास्त्र**–न. वैद्यकीय शस्त्रविद्या; शरीरांत असलेले आगंतुक पदार्थ कसे काढावे या विषयींचें शास्त्र; शरीरव्यवच्छेदन शास्त्र. [ सं. ]

**शव**—न. प्रेत; मृतदेह; मढें. 'गुर्वाशीर्वाद वर्जित जो क्षणहि उभा न तो टिके शवसा।' –मोभीष्म १.६९. [ सं. ] ०**यान**–न. प्रेत नेण्याची ताटी; तिरडी. [ सं. ] ०**वाहक**–पु. प्रेत नेणारा; प्रेतवाहक; प्रेताला खांदा देणारा. [ सं. ] **शाव–शावक**–पु. प्रेतासंबंधीं; मढ्यासंबंधीं. [ सं. ] **शावाशौच**–न. प्रेतवाहनामुळें किंवा कुटुंबांतील कोणी मरण पावल्यामुळें प्राप्त झालेली अशुद्धता; सुतक; अशौच. [ सं. ]

**शवणें**—न. ( कों. ) एक पांखरूं.

**शवाळें**—न. शेवाळें पहा.

**शश, शशक**—पु. ससा. [ सं. ] **शशविखान**–न. सशाचें शिंग; सशाच्या शिंगासारखी मिथ्या कल्पना. [ सं. शशविषाण ] **शशविषाण–शृंग**–न. १ सशाचें शिंग. 'गंधर्वदुर्ग कार्या पाडावे। काय शशविषाण मोडावें।' –ज्ञा १५. २१५. २ ( ल. ) न मिळणारी वस्तु; अप्राप्य पदार्थ. अशक्य कोटींतील गोष्ट. 'खपुष्प' पहा. उदा० 'भगवत् गुणाचा अंत शशविषाणप्राय आहे.' [ सं. ]

**शशधर, शशांक**—पु. चंद्र; चांदोबा. ( प्रायःकाव्यांत ) 'आतां तीख होऊनि मवाळ। जैसें जातीचें मुकुळ। कां तेज परि शीतळ। शशांकाचें।' –ज्ञा १६.११५. चंद्राच्या बिंबावर सशाच्या आकाराचा डाग आहे त्यावरून. [ सं. ]

**शशी**—पु. १ चंद्र. २ इडा या नाडींतून वहाणारा वारा. ३ इडानाडी. ४ कापूर. 'येला कंकोल पुगीफल खदिर शशी जायपत्री लवंगा।' –सारुह ३.४८. **शशिकर**–पु. १ चंद्र. २ चंद्रकिरण. [सं.] **शशिकला**–स्त्री. चंद्रकला. [ सं. ] **शशिनी**–स्त्री. चांदणी रात्र. [सं.] **शशिमौळी, शशिशेखर**–पु. शंकर. [ सं. ] **शशी सिरणें**–हातांत हात धरून वर्तुळ.कृतीनें धरलेल्या हातांतून शिरणें तें; एक खेळ. 'खेळां आदरिलें गोपाळीं। शशी सिरणें चेंडुफळी।' –मसाप १ ८१. –दाव ८५.

**शशोपंज**—पु. संकट; अडचण. 'राजाजीही शशोपंजांत आहेत।' –रा ५.१००. [ फा. शशोपञ्ज् ]

**शष्कुली**—स्त्री. करंजी. 'मांडा साखरपांडा गुळवरी। शष्कुल्या अमृतफळें क्षीरधारी।' –एभा २७.२९. [ सं. ]

**शष्प**—न. १ कोवळें गवत. २ शरीराच्या गुह्य भागांवरील केंस; शेट. शिवी देतांना हा शब्द योजतात. 'तुझ्या हातून

शष्प देखील व्हावयाचें नाहीं.' **शष्पित**-वि. कोंवळ्या गवतानें आच्छादलेली जागा; कोमल तृणानें युक्त. [ सं. ]

**शंसक, शंसा, शंसणें, शंसित, शस्त**—काव्यांत नित्य येणारे हे शब्द, नेहमींच्या प्रचारांत 'प्र' हा उपसर्ग लागून येतात. उदा० प्रशंसक वगैरे पहा. [ सं. शंस्=स्तुती करणें ]

**शस्त**—स्त्री. १ अंगुस्तान; अंगुष्ठत्राण. २ नेम. [ फा. शस्त् ]

**शस्य**—न. धान्य. [ सं. ]

**शस्यक**—न. एक उपरत्न. [ सं. ]

**शस्त्र**—न. १ हत्यार; आयुध. २ (ल.) ज्यांत एखाद्याचें सामर्थ्य सांठविलेलें आहे असें साधन, पदार्थ, गोष्ट इ० जसें-विद्या, सौंदर्य, पावित्र्य, लेखणी इ० ३ (ल.) नाशक, हारक, मारक वस्तु, औषध इ० [ सं. ] **शस्त्र तुळणें-तोलणें**-१ योग्य स्थितींत, बरोबर रीतीनें, हत्यार धरणें. २ शस्त्र चालविण्यास उद्युक्त होणें; शस्त्र परजणें. (वर) **शस्त्र धरणें**-१ त्याचें वाईट करण्याविषयीं कंबर बांधणें. २ त्यावर हत्यार घेऊन उठणें; हल्ला करणें; दांत धरणें. ०**कार**-पु. हत्यारें तयार करणारा. ०**त्राण**-न. शस्त्रसंरक्षक कवच; चिलखत; टोप वगैरे. म्यान; आच्छादन. [ सं. ] ०**पाणि**-वि. शस्त्रधारी; हातांत शस्त्र, आयुध असलेला, धारण केलेला; सशस्त्र. [ सं. ] ०**वैद्य**-पु. जखमेवर किंवा रोगावर शस्त्रक्रिया करणारा निष्णात वैद्य; (इं.) सर्जन. **शस्त्राभ्यास**-पु. लष्करी शिक्षण, विद्या; हत्यारें वापरण्यांत तरबेज होणें. [ सं. ] **शस्त्रास्त्र व्यवहार**-पु. १ हत्यार वापरणें; हत्यारांशीं संबंध असणें, येणें, २ (ल.) लढाई, युद्ध इ० [ सं. शस्त्र+अस्त्र+व्यवहार ] **शस्त्री**-स्त्री. तलवार; कट्यार; सुरी. 'तीस विलोकुनि मानी रामानुज तो मनीं जसी शस्त्री ।' -मोमंत्ररामायण; अरण्य २२.

**शह**—पु. १ बुद्धिबळाच्या खेळांतील एक संज्ञा. विरुद्ध पक्षाच्या सामान्य मोहऱ्यानें केलेली राजाची अडवणूक व हल्ला; राजास येणारा वेध. २ एखाद्याचा पाडाव करण्यासाठीं धरलेला रोख, योजलेला डाव. अशा स्थितींत लागणारा वेध. धाक; दरारा; जोर; दाब. 'जें कर्तव्य तें सलाबतीनें आपली इभ्रत शह यांजवरी पडोन नक्श होय तें करावें.' -ख १.२४०. ३ (ल.) योग्य संधीची वाट पाहून,-अनुकूल काल पाहून मनोगत सिद्धीस नेण्यासाठीं केलेले प्रयत्न. (क्रि० देणें; बसणें; येणें.) ४ (ल.) सूचना; ताकीद; इशारा. 'शहाण्यास शह मूर्खास टोणपा.' (क्रि० देणें) **शहास गुंतणें**-(वचन, लेख इ०नें) बद्ध होणें, बांधले जाणें, सुटका नाहीं अशा संकटांत सांपडणें. [ फा. शह्-राजा ] ०**देणें**-१ दुसऱ्याला हुसकावून लावणें. २ बुद्धिबळाच्या खेळांत प्रतिपक्षाच्या राजावर आपल्या मोहऱ्याची उडी पडेल अशा ठिकाणीं आपलें मोहोरें आणून बसविणें. ३ जेथून प्रतिपक्षावर हावें तेव्हां तुटून पडतां येईल, अशा ठिकाणीं बसून त्याला भीती दाखविणें. ०**राखणें**-दाबांत ठेवणें; जरबेंत धरणें. 'वरकड अवघे एकत्र होऊन गनिमाचा शह राखोन स्वामीस संतोषानें पाववणें.' -शारो ७.

**शहत, शहीत**—अ. तपशील; जवाहिरी-दागिन्याचे पोटचे अवयव लिहावयाचे प्रसंगीं त्या दागिन्याचें नांवापुढें लिहितात. 'जगो, घाट साधा किंमत रुपये ४०२ शहत.' -समारो-१.७१.७२. [ अर. ]

**शह तूश**—स्त्री. अंगठीतून जाण्याजोगी अत्यंत बारीक विणीची शाल. [ फा. ]

**शहनिशह**—पुस्त्री. शहानिशा पहा.

**शहर**—न. मोठें गांव; नगर. 'गांवची हुन्नरी व व्यापारी-वस्ती फुगली आणि काळीपेक्षां पांढरी बळावली कीं त्या गांवाची शहरांत गणना होऊं लागते.' -गांगा २. [ फा. शहर ] ०**गुंडा**-पु. १ (गावगुंडा शब्दाप्रमाणें) निष्णात; अट्टल; लबाड व सोदा. २ सर्व जगाची माहिती असणारा, मोठा धूर्त आणि व्यावहारिक. ३ कोणत्याहि कामांत वाकबगार; हरहुन्नरी; चौरस. [ शहर+गुंडा = गोटा ] ०**पन्हा**-पु. १ शहराची तटबंदी; कोट. 'तो पुढें फौज गेली म्हणोन शहराची बंदोबस्ती न करितां, शहरपन्हा खालींच होता.' -भाव २३. २ शहराचा पहारा; बंदोबस्त. ३ असा बंदोबस्त ज्याकडे आहे असा अधिकारी. [ फा. शहर+पनाह् ] ०**बटाऊ**-पु. शहरांतील गुंड; अट्टल सोदा. याच्या उलट खेड्यांतील भोळा माणूस, गांवढळ. ०**बाजार**-पु. मोठें बाजार गांव; शहर. 'असली वस्तू शहरबाजारांत शोधावी, गांव-खेड्यांत काय?' **शहरी**-वि. १ शहरासंबंधीं; नगरासंबंधीं; नागरिक; नागर. २ (ल.) लबाड; लुच्चा; सोदा.

**शहर-रा-रें**—पुन. १ कांटा; रोमांच; भीतीनें होणारा थरकांप. (क्रि० येणें). 'मऊ सेजेवरती निजतां उठती अंगीं शहर.' -पला १७९. २ हिमज्वर; हिंवताप. [ सं. सीत्कार; प्रा. सीक्कार सिआर; तुल० अर. शअर=रोम ]

**शहरग**—स्त्री. कानाच्या बाजूला गळ्यावर असणाऱ्या मोठ्या शिरा. [ फा. शहरग् = हाताची मोठी शीर ] ०**उलटी**-बॉकमधील एक डाव; आपल्या हातांतील जंबियानें आपल्या डाव्या बाजूच्या अर्थात् जोडीदाराच्या उजव्या बाजूच्या कानाजवळील मोठ्या शिरेवर मारणें. ०**सीधी**-स्त्री. बॉकमधील एक डाव; आपल्या हातांतील जंबियानें आपल्या उजव्या बाजूच्या अर्थात् जोडीदाराच्या डाव्या बाजूच्या कानाजवळील मोठ्या शिरेवर मारणें.

**शहा**—पु. राजा; अधिराज; बादशहा ( मराठींत क्वचित् उपयोग ) **म्ह०** ' नेसेन तर शहाचें नेसेन नाहीं तर नागवी बसेन. ' [ फा. शाह ] **०जंग**-पु. युद्धसम्राट; एक पदवी. [ फा. ] **०जादकी**-स्त्री. यौवराज्य;राजपुत्रपणा. ' ज्या दिवशीं पातशहास शहाजादकी तुटून पातशाही जाली. '-ऐठि ५१. [ फा. शाह्झादगी. ] **०जादा**-पु राजपुत्र; युवराज. [ फा० शाह्झादा ] **०जादी**-स्त्री. राजकन्या. ' चांदबीबी नामें शहाजादी हिनें कमबेन्दीकरून दिलीचे फौजेसी लढाई बारा वर्षे केली. '-इस १ चांदबिबी १०. [ शाह्झादी ] **०जानी-दानी**-वि. शहाजहान बादशहाचा, संबंधाचा, वेळचा ( रुपया, राज्य इ० ) **०जोर**-पु. मोठी सत्ता, सामर्थ्य. -वि. सुरेख; भव्य; बादशाही; उत्कृष्ट; प्रबळ. -क्रिवि. सुरेखपणानें; भव्य रीतीनें; राजशाही पद्धतीनें. [ फा. ] **०न शहा**-पु. राजाधिराज; अधिराज. ' तुम्हास किताब मोठा शहानशहा पादशहा जहाला असता. ' -मदरु १.१११. [ फा. शहन्शह. ] **०नामा**-पु. फिर्दोसीनें फारसींत लिहिलेला काव्यमय इतिहास. [ फा. शाह्नामा ]

**शहा**—वि. कृष्ण; काळें. [ फा. सियाह् ] **०काळे**-काळें कुट.

**शहा**—उद्गा. कान्होबाचें वगैरे वारें अंगांत शिरल्यावर ज्याच्या तोंडांतून निघणारा उद्गारवाचक शब्द. -पु. साक्षात्कार. -सोहि महदनु. [ ध्व. ]

**शहा**—पु. ( साव. ) १ सावकार; शेट. २ सावकाराची पदवी; पत असलेली असामी; पैशाची देवघेव करण्यांत अगदीं विश्वासाचें कूळ. **म्ह०** ' शहा किंवा पादशहा. ' ३ जकातदार; कर वसुली करणारा अधिकारी. ' शहाचा दाखला, ' किंवा ' शहाची टीप, ' जकातदाराकडे भरणा केल्याची पावती. [ साव. ] **०जोग**-वि. १ नांव लौकिकाचा; पतीचा; विश्वासुक ( धंदा किंवा माणूस ); भरंवशाचा. २ एक जातीची हुंडी; ही हुंडी दाखविणारास हुंडीतील रुपये ( सदरहू इसम पतदार आहे असें समजून ) मिळतात; ( दर्शनी हुंडीप्रमाणें ). ३ बिन दिक्कत द्यावयाचें ( रुपये, इ० ); बिनभानगडीची ( गोष्ट ). ' तुमचें शहाजोग रुपये देणें, त्याचा कोण तंटा सांगेल. ' ४ अगदीं खरें, बरोबर चालणारें ( नाणें ). [ हिं. ]

**शहानवीस**—पु. ( व. ) तहसिलींतील खजिन्याचा हिशेबनीस. ' शहानवीस तहसीलदाराच्या हाताखालीं काम करतो. ' [ फा. ]

**शहागडी**—वि. शहागड म्हणून एक पेठ आहे, त्यासंबंधीं. ( पागोटें, शेला इ० ).

**शहांगी-ग्या**—वि. किरकोळ अंगाची; सडपातळ; वेहयष्टी बारीक असलेला-ली. [ सं. सिंहांगी ]

**शहाजण-ग्यादानें-शादियानें**—पुन. मोठा नगारा; मंगल वाद्यें. शादियान पहा. [ फा. शाद्याना ]

**शहाजिरें**—न. जिऱ्यांतला एक भेद, प्रकार; तिखटाच्या मसाल्यांतील एक जिन्नस. [ फा. शाहजीरह् ; गु. शाजिरु ]

**शहाडा**—पु. १ डोंगरमाथा; कडा; कणा. २ कड्यावरील अरुंद वाट. [ सं. संहृत; प्रा. साहट्ट ? ]

**शहाडा**—पु. १ एक होलारांचें वाद्य; मोठा डफ. २ होलारांची हें वाद्य वाजविण्याची पद्धत.

**शहाडा**—पु. मोठा वृक्ष; सिंह.

**शहाडें**—न. शहाळें; कोंवळा नारळ.

**शहाणपण, शहाणीव, शाहणीव**—न. स्त्री. हुषारी; धूर्तता; अक्कल; चातुर्य; चांगली समजूत. ' हृदयीं सांवरिती शहाणीव । ' -मुभा ४१.५७. ' दावोत कोणी शाहणीव लाघव । ' -दावि ३१२. [ शहाणा ]

**शहाणा**—वि. धूर्त; हुषार; बुद्धिवान् ; अक्कलवंत; समजूतदार; चतुर. ' जो बहुतांस मानला । तो जाणावा शाहणा जाला । ' -दा १५.३.२६. [ हिं-शियाणा-ना. कुण. शाणा; सं. सज्ञानी, सज्ञान ] **म्ह०** १ शहाण्याचें व्हावें चाकर, पण वेड्याचें होऊं नये धनी. २ शहाण्याची एक बात, मूर्खाची सारी रात. ३ शहाणा नाडतो, पोहणारा बुडतो. शहाणाच मनुष्य एखाद्यावेळीं फसतो व पोहतां येणाराच मनुष्य अनेकदां अपघातानें बुडतो. ४ अति शहाणा त्याचा बैल रिकामा-आपल्या बैलास काम करावयास लाविलें तर त्याला भूक लागून जास्त दाणावैरण आणावी लागेल, या भीतीनें बैलास रिकामें ठेवून त्याचें काम स्वतः करणारा; स्वतःस शहाणा म्हणविणाऱ्याचें कृत्य. ५ शाण्यांक तीन ठय, पिशांक एक ठय-( गो. ) शहाणा मनुष्य एखाद्यावेळीं पुष्कळ फसतो. **०सुरता**-वि. १ हुषार व देखणा; बुद्धिमान व सुरेख. २ ( सामा. ) चांगला हुषार. [ शहाणा+सुरत ] **साडेतीन शहाणे**-पेशवाईतील सुप्रसिद्ध व्यक्ती. यांत, एक विठ्ठल सुंदर परशरामी ( निजामाचा दिवाण ), दुसरा दिवाकर पुरुषोत्तम ऊर्फ देवाजीपंत चोरघोडे, ( नागपूरकर भोसले यांचे दिवाण ), तिसरा सखाराम बापू बोकील ( पेशव्यांचे दिवाण ) व अर्धा नाना फडणवीस. ( चटकन् ध्यानांत यावींत म्हणून संक्षेपानें ) ' सख्या, देवा, विठ्ला ' असेंहि म्हणतात. **शहाण्याची खरबड**-स्त्री. मद्दड; मट्ट माणूस. **शहाणी होणें**-क्रि. ( व. ना. ) न्हातीधुती; ऋतुमति होणं. ' कांहो तुमची पोरगी शहाणी झाली कां नाहीं अजून ? '.

**शहाणा**—पु. गायनशास्त्रांतील एक राग. या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. आरोहांत धैवत, वज, अवरोह

संपूर्ण. गायनसमय मध्यरात्र. जाति षाडव संपूर्ण. वादी स्वर पंचम, संवादी षड्ज.

**शहाण्णव**—वि. एक संख्या; ९६. [ सं. षण्णवति ]

**शहातूत**—स्त्री. १ एक फळझाड; तुती. २ त्या झाडाचें फळ. [ फा. शहतूत् ]

**शहात्तर-शाहत्तर**—वि. ७६ ही संख्या. [ सं षट्सप्तति-प्रा. छहत्तर ]

**शहानिशा**—पु.स्त्री. १ निश्चित मत; निकाल; संशय-निरास. ( एखाद्या बाबीसंबंधीं ). २ चांगल्या वाईटाचा, खऱ्या-खोट्याचा निर्णय, निकाल, दोहोंपैकीं एक मार्ग ठरविणें. ३ सोक्षमोक्ष; निश्चित स्थिति ४ चौकशी; तपास. ( क्रि० करणें ). [ फा. शह, न शह ]

**शहापुरी**—वि. शहापूर गांवचा, गांवासंबंधी ( धोतरजोडा, वस्त्र इ० )

**शहाबादी ( फरशी )**—स्त्री. निजामच्या राज्यांतील शहाबाद येथील पातळ सपाट दगड.

**शहामत**—स्त्री. १ धाडस; साहस; पराक्रम. २ चातुर्य; करामत ( एखादें काम करण्यांत ). **०करणें**–बहादुरी करणें. [ फा. शहामत् ]

**शहामुसळी**—स्त्री. काळ्या जातीची मुसळी (एक औषधी). [ फा. सियाह्+मुसली ]

**शहामृग**—पु. एक मोठा उंच पक्षी; हा आफ्रिका व अरबस्तानांत असतो. 'शहामृगाचा आवाज सिंहाच्या गर्जनेसारखा असतो.' –ज्ञाको २०.श १५. [ फा. शाहेमृग ]

**शहांयशी**—वि. ८६ संख्या. [ सं. षट्+अशीति; प्रा. छासी इ० ]

**शहारत**—स्त्री. प्रसिद्धी; आवई. 'तेव्हांपासुन कलमजारीची शहारत पडून स्वारांच्या चुंगी येऊं लागल्या! –होके ७८. [ फा. शुहरत् ]

**शहारा-रे-शारें**—पुन. १ रोमांच; कंप. 'तया पुस्तावाच्या अंगीं शारें भरे सुमनाचें' –मुरंशु ४४०. २ हींव; हिमज्वर. [ सं. सोत्कार ]

**शहारणे**—क्रि. शहारे येणें. 'महादूच्या बायकापोरांना घराबाहेर काढीत असल्याचा देखावा अंतश्चक्षूसमोर उभा राहून राधाबाईना शहारल्यासारखें झालें.' –हांच कां धर्म ५७. नाशिककर. **शहारा करणें**–पाठीवरून हात फिरविला असतां, जनावरानें अंग चोरणें, भोंवरा करणें. –गोस्तनीप्रयोग चन्द्रिका ८४.

**शहाळू**—पु. रबीचा जोंधळा. शाळू पहा.

**शहाळें**—न. कोंवळा नारळ; खोबरें घट्ट बनण्यापूर्वीचा नारळ.

**शहीद**—पु. हुतात्मा; युद्धांत पतन पावलेला मुसलमान; स्वधर्मार्थ किंवा स्वमतार्थ मेलेला वीर. [ फा. ]

**शळी**—स्त्री. १ सळई. २ साळपीस; साळिंदर. [ सळई ]

**शाइणें**—क्रि. उभारणें; आच्छादणें. 'मंडप शाइले केतकी-तळीं। स्तंभीं लाविल्या कर्पूरकदळी।' –मुरंशु १८८. [ सं. छाद् ]

**शाइदी**—स्त्री. पुरावा; साक्ष. [ अर. शाहिदी ]

**शाहिद-दी, शाहिदीदार**—पु. साक्षीदार. [ अर. शाहिद् ]

**शाई**—स्त्री. १ मषी; लिहिण्यासाठीं बनविलेला रंगित द्रव पदार्थ. 'शाईचा उपयोग लिहिण्याची सुरवात झाल्यानंतर बऱ्याच काळानें झाला' –ज्ञाको २०.१५. २ लोखंडाच्या किसापासुन तयार केलेलें मृदंग, पखवाज इ० स लावण्याचें लुकण, रोगण. [ फा. सियाही ] **०घालणें**–नाश करणें. 'त्या सुंदर चित्रावर त्या दुष्टानें शाई घातली'. **०देणें**–कराराप्रमाणें वागण्याची निश्चितता दाखविण्याकरितां आगाऊ कांहीं पैसे देणें, इसार, बयाणा देणें. **०दान-नी**–न.स्त्री. ( क. ) दौत; शाई ठेवण्याचें साधन; पात्र. **०शिरें**–न. शिऱ्याची शाई. –रा ८.२१. **०शोक-सोक**–पु. ( व. ना. न. ) टिपकागद. ( इं. ) ब्लॉटिंगपेपर. [ शाई+शोक (ष)णें ] **शाईचा पुडा-शाईपुडी**–पुडी शाई किंवा लुकण लावलेली मृदंगाची बाजू.

**शाई-ही**—वि. १ ताबा, अंमल यासंबंधीं; गुण, स्वभाव, नांव धारण करणारा; मालकीचा. उदा० पुणेंशाई, मुंबईशाई, सुरतशाई. २ कडून प्रस्थापित; संबद्ध; वाच्य-वाचक. उदा० शिंदेशाई; होळकरशाई, अप्पाशाई, बाबाशाई. ३ नाणीं, चाली, रीतरिवाज, पद्धती, कायदे वगैरे. उदा० शिवशाई, आदिलशाई, इ० ४ विशिष्ट जातिगुणादिवाचक. उदा० ब्राह्मणशाई, शूद्रशाई, मोंगलशाई, सोदेशाई, शिनळशाई, लबाडशाई. –स्त्री. १ अंमल; सत्ता; अधिकार; आमदानी; कारकीर्द. 'शिंदेशाई पुण्यामध्यें झाली.' २ ( राज्य, गांव, लष्कर, इ० मध्यें राहणारा विवक्षित ) जनसमूह, समाज. उ० 'सगळ्या शाईंत यासारखा शूर दुसरा कोणी नाहीं.' 'होळकरशाईमधें मल्हारबा होता एकच पूत.' –ऐपो ९०,११०,१२७, इ०. ३ राजमंडळ; राज्य. ४ आणखीं निरनिराळे संकीर्ण उपयोगाचे प्रकार. उदा० ढपळशाई, फुकटशाई, बागशाई, लंगडशाई. [ फा. शाही ] **०शिरस्ता**–पु. १ सार्वजनिक किंवा सर्वसाधारण चालरीत, पद्धत; रिवाज, रूढी; जनरीति. २ राजशिरस्ता; राजरीत. 'चांगलें माणूस मिळऊन शाई शिरस्त्याचें मर्द माणूस पाहून' –समारो १.१३.

**शाई पैसा**—पु. एक तांब्याचें नाणें. हा बिनशिक्याचा तांब्याचा तुकडा असतो. [ हिं. ]

**शाईन**—पु. श्येन; ससाणा पक्षी. [ सं. श्येन ]

**शाऊ दिवस**—पु. (व.) लहान दिवस. –वशाप ५१. ११.४२२. शाळू पहा.

**शाऐंशी**—वि. ८६ संख्या. [सं. षडशीति; प्रा. छासीइ; हिं. छियासी]

**शाक**—पु. १ सात द्वीपांपैकीं सहावें द्वीप; जगाच्या सात भागांपैकीं एक (सहावा) भाग. २ शक लोकांचा प्रदेश. [सं.]

**शाक**—पु. शक; वर्षगणना; एखाद्या पराक्रमी राजाच्या नांवावरून चालू झालेला काल. [सं.]

**शाक-ख**—स्त्री. १ फळें, बिया, मुळें इ० कोणतींहि भाजी करण्याजोगीं पानें, भाजीपाला; भाजी. २ (व.बा.) मांस; शिजलेलें मांस. 'ब्रह्मसभाचि गुरुसभा, तन्न्यूना वर्णिल्या सुरस ज्यां ज्या। देव्युत्थ शाकभाज्या किंवा हे शाक या सुरस भाज्या।' –मोसभा १.३७. ३ (देशावर) फळभाजी; पालेभाजीस भाजी म्हणतात. (वाई) आमटी; तोंडीं लावणें. 'वाढावया शाक आणा.' **०पाला-भाजी**-पु. (व्यापकपणें) भाजीपाला. **०व्रत**-न. चातुर्मासांत चार पदार्थ सोडण्याचें व्रत. यांपैकीं प्रत्येक महिन्यास ओळीनें एक एक पदार्थ वर्ज्य करितात. (भाज्या, दही, दूध, डाळी) [सं.]

**शाकंबरी**—स्त्री. १ दुर्गा; एक देवी. २ पौष पौर्णिमेस दुर्गादेवीस अनेकविध भाजांचा नैवेद्य करण्याचें व्रत. **शाकान्न**-न. शाकमिश्रित अन्न. 'क्षुधेते शाकान्नें अवचट सदन्नें निवटितो।' –नवनीत १३४. **शाकाव्रत**-(अप.) शाकव्रत पहा. **शाकाहार**-पु. वानसपत्याहार; भाजीपाला; फळें वगैरे खाणें; याच्या उलट मांसाहार. [सं.]

**शाक बेशाक-शक-बे-शक**—स्त्री.न. १ अनिश्चितपणा; शंका कुशंका; डळमळीतपणा; अनियमितपणा; चुका; दोष. २ विलक्षणपणा; अद्भुतता; अलौकिकता (एखादी गोष्ट, विधान, दस्तऐवज या संबंधीं). ३ शंका निरसन; खात्री; निश्चय; निकाल. ४ उहापोह; चर्चा. 'से याद तुम्हाकडे येणार; त्याजवर शाक-बे-शाक होय नव्हे होऊन सलाह जाणार.' –राज ७.८२. 'जें कांहीं लिहिलें त्याची पारख होऊन–शाकबेशाक वेळचेवेळेस होऊन सत्य काय–तें निघत जाईल' –इनाम १२६. –वि. क्रिवि. १ डळमळीत; अनिश्चित. २ निश्चित; निःसंशय. [अर. शाक द्वि.]

**शाकलद्वीप**—न. एक भूप्रदेश; शाकल ऋषीचें बेट, हें सप्तद्वीपांत समाविष्ट नाहीं. [सं.]

**शाका**—स्त्री. कत्तल; जिवें मारणें; तुकडे करणें. 'आतां गनीम मागतील ते रुपये द्यावे–किंवा बायकामुलें यांची शाका करून चाल्रून–घेऊन मरावें.' –भाब ४. [अर. सक्का=चाकू, सुऱ्या करणारा]

**शाकार**—पु. १ (कु.) वृक्षाच्या लहान–डहाळयांचा विस्तार; शाकारण्यासाठीं गवत; झांप, इ० २ पर्जन्यादि निवारणार्थ–घरांवर घातलेलें आच्छादन. –शेकार पहा. [सं. छाया+आकार] **शाकारणी-शेकारणें-शेकारणी**-छपरांची आच्छादणी; गवतानें शिवणें; कवलें घालणें, चाळणें.

**शाकिनी**—स्त्री. गौण स्त्रीदेवतांचा वर्ग; दुर्गा व शिव यांच्या सेविका; एक पिशाच जाति. [सं.]

**शाक्त**—पु. १ शक्तिदेवतेचा उपासक. २ शक्ति–उपासना पंथ. ३ वाममार्ग. शक्ति पहा. –वि. शक्तिसंबंधी (पूजाविधी, पंथ, इ०). शक्ति पहा. [सं.]

**शाख**—स्त्री. शाक पहा.

**शांखळा**—स्त्री. साखळी. 'शांखळां खांडोनिआं। एकें वेळें केलियांति राणियां।' –शिशु ६८०. [सं. शृंखला]

**शाखा**—स्त्री. १ फांदी; डहाळी; खांदी. २ भाग; प्रकरण; विभाग; अवयव; वर्ग (पुस्तक, विषय इ० चा). ३ खातें. ३ पंथ; संप्रदाय; पक्ष; गण. ४ वेदांचे पोटविभाग प्रत्येकीं. ऋग्वेदाच्या शाकल व बाष्कल शाखा. इ० [सं. शाख्–व्यापणें; पसरणें] **०चक्रमण**-न. (माकड या खांदी वरून त्या खांदीवर उड्या मारतें त्याप्रमाणें,) १ उडत उडत केलेलें वाचन, अध्ययन, अभ्यास; अप्रस्तुत, अर्धवट अभ्यास. २ विषयांतर, अवांतर भारूड; अप्रस्तुत विषयाचें प्रतिपादन. [सं.] **०चंद्रन्याय**-पु. एक न्याय, (खूण म्हणून शाखेशीं चंद्राचा संबंध जोडणें). ज्या प्रमाणें चंद्र झाडाच्या फांदीवर बसलेला दिसतो पण तो प्रत्यक्ष तीपासून फार दूर असतो त्याप्रमाणें समोर दिसणाऱ्या गोष्टीमध्यें व वास्तविक परिस्थितिमध्यें जेव्हां फार अंतर असतें तेव्हां ही उपमा अथवा दृष्टांत योजितात. दूरस्थ वस्तूची ओळख त्याच्या जवळच्या वस्तूवरून करून देतांना हा न्याय योजतात उदा० समुद्रांत सूर्य बुडतो ही शाखा चंद्रन्यायें करून उक्ति आहे' [सं.] **०नगर**-न. उपनगर; शहराचा बाहेरचा, वाढलेला भाग; परिकर. [सं.] **०पाठी**-वि. वेदाच्या विवक्षित शाखेचा अभ्यास केलेला; वेदाभ्यासी लोकांतील आणखी भेद असे: क्रमपाठी, घनपाठी, जटापाठी, इ० [सं.] **०मृग**-पु. (झाडावरचें जनावर) वानर, खार इ० 'शाखामृगराज महाप्रताप विख्यात जो अनेकबळ।' –मोरा १.५६. **०रंड-ढी**-पु. स्वशाखेचा त्याग करून परकीय शाखेचें अध्ययन करणारा ब्राह्मण. **शाखी**-वि. १ शाखेचा; पंथाचा; पक्षाचा. २ शाखा, फांद्या असलेला (वृक्ष). ३ एक कान मोठा असून तो घट्ट उभा असतो, असा (घोडा) [सं. शाखा] **शाखोपशाखा**-स्त्री. लहानमोठ्या डहाळ्या, फांद्या, भेद, पंथ. [शाखा+उपशाखा]

**शाखोट**—वि. (प्रां.) पतीचा; विश्वासुक, खरा. [ साख ]

**शागिर्त-र्द, शागीर्द-शाग्रीत**-पु. १ उमेदवार; छात्र; विद्यार्थी; शिष्य; (विशेषतः कला शिकण्यासाठीं राहिलेला). २ देवपुजेचें साहित्य मांडणें, धोतर धुणें, पाणी भरणें इ. कामें करणारा ब्राह्मण नोकर. [ फा. शागीर्द ] ०पेशा-पु. १ उमेदवार विद्यार्थी; शागिर्द पहा. २ (सामा.) नोकर चाकर. 'खर्चाची बेगमी व शागीर्दपेशा व दरमहा यथायोग्य नेमून'-संभाजी चरित्र. ३ राजघराण्यासंबंधाचीं घरगुतीं कामें करणारें खातें. [फा.] ४ शागिर्दी पहा. **शागिर्ती-र्दी-शाग्रिती**-स्त्री. शागिर्दाची वृत्ति, धंदा. सेवा चाकरी 'सखारामपंन्त बोलिले होते की, विठ्ठलसुंदर याची शागिर्दी करीन परंन्तु आपले मनोरथ सिद्धीस नेईन'-खरे १.२९४. [ फा. शागिर्दी ]

**शाट-शाटणें-शाटाशाट**—(अप.) छाट, छाटणें—छाटा छाट पहा.

**शाटी**—स्त्री. १ छाटी; संन्याशाचें भगव्या रंगाचें वस्त्र विशेष; छाटी पहा. 'शाटी बंधन, वल्कलाजिन पटा, त्या पादुका बाजटा ।'-आर्सी १०. २ (सामा) पांघरावयाचें किंवा नेसावयाचें वस्त्र [ सं. ]

**शाठिका**—स्त्री. पैठणी; साडी. 'भरजर अवघी हे शाठिका नेसविली ।'-सारुह ८.७४. [ सं. शाटी, शाटिका ]

**शाठ्य**—न. १ लबाडी; लुच्चेगिरी; शठपणा. २ दुष्टपणा; नीचता. [ सं. ]

**शाडवळ**—वि. खेडवळ; गांवढळ; ओंगळ; घाणेरडा; साधा; अज्ञानी; अडाणी. [ सं. शाद्वल ] **शाडवल-ळ-शाड्वळ**-वि. १ हिरवागार; कोमल; कोंवळा (धान्यांकुर); ताजे; लुसलुशीत; (गवत इ०). 'हा ऊर्ध्वमूल आहे। परी उन्मूळिला नोहे। येणेचि हा होये। शाड्वळुगा।'-ज्ञा १५. ५६. २ खेडवळ; गांवढळ. ३ अडाणी; अकुशल. [ सं. शाद्वल ]

**शांडिल्य**—पु. १ एका ऋषीचें नांव. २ एका गोत्राचें नांव; शांडिल्य ऋषीच्या कुळाचें नांव. -वि. शांडिल्य गोत्रांतील. [ सं. ]

**शाडू**—स्त्री. पांढऱ्या रंगाची चिकणमाती; खडू. **शाडवट**-वि. १ शाडू असलेली (जमीन). २ शाडूची केलेली (मूर्ति वगैरे). [ शाडू+वत्-वट प्रत्यय ]

**शाण**—पु. १ सहाण पहा. २ धार लावण्याचा दगड; निसणा. [ सं. ] **शाणे धरणें**-(तंजा) धार लावणें.

**शाणा**—वि. (प्र.) शहाणा पहा.

**शाणव-शाण्णौ**—वि. ९६ संख्या पहा. शहाणव पहा. 'शाण्णव कुळींचे भूपाळ। आप्त सोयरे द्रुपदादि सकळ।'-हरि ३३.१०२. [ सं. षण्णवति ] **शाण्णवी**-(गो.) शाण्णव गांवचे अधिकारी.

**शांत**—पु. १ नवरसांपैकीं एक रस. संसाराची निःसारता, उपरति, सत्समागम इ० वर्णनांत हा योजतात. 'देशियेचेनि नागरपणें। शांतु शृंगारातें जिणें।'-ज्ञा १०.४२. २ (नृत्य) डोळ्याच्या पापण्या अर्धवट मिटणें, हा शांतरसाचा अभिनय आहे. -स्त्री. शांति (७, १२) पहा. -वि. १ शांतियुक्त; क्षुब्ध नसलेला; निर्विकार; निर्द्वेषी. २ संतुष्ट; समाधानी. ३ सत्त्वगुणी; सुशील. (माणूस, स्वभाव, वागणूकसंबंधीं). ४ थंड; गार; शमलेला; विझलेला (अग्नि, दिवा, इ०). [ सं. शम्-शांत होणें ] ०दांत-वि. १ अगदीं शांत; थंड; सौम्य. २ संयमी; मनावर ताबा असणारा. **शांतवन**-न. १ शांति; उपशमन. २ सांत्वन. 'करी पुत्रांचें समाधान। शांतवन कुंतीचें।'-मुआ २८.१०३. **शांतता**-स्त्री. १ शांति; संतोष; समाधान. २ स्थिरस्थावर; राग, क्षोभ, इ०चें प्रदर्शन नसणें. ३ निवांतपणा; गडबड नसणें. शांति पहा. **शांतविणें**-क्रि. शांत करणें; सांत्वन करणें. **शांति**-स्त्री. १ थांबणें; शमन; उपशमन. 'रोग-क्रोध-ज्वर-शांति'. २ शांतता; स्थिरता; थंडपणा. ३ स्थिर; स्तब्ध अशी स्थिति; निस्तब्धता; स्थिरता; स्वस्थता. ४ मंदता; सौम्यत्व; मृदुता. ५ वैराग्य; विरागीपणा; निर्विकारता. ६ समाधान; संतुष्टपणा. ७ दुष्ट पिशाच्च, ग्रह वगैरेची पीडा दूर व्हावी म्हणून करावयाचीं जप, पूजा, मंत्रपठण वगैरे कर्में. 'अरिष्ट शांति'. ८ धार्मिक समारंभांतील आकस्मिक उद्भवणारीं संकटें व अशुभ गोष्टी टळाव्यात म्हणून आगाऊ केलेलें कर्म. ९ (ल.) संसारापासून मुक्तता; जीवितकष्टापासुन सोडवणूक; मृत्यु. १० शांत रस. 'जेथ साहित्य आणि शांति। हे रेखा दिसे बोलती।'-ज्ञा ४.२१८. ११ मोक्ष; ब्रह्म; अंतिम साध्य. 'तयातेंचि गिंवसित। तें ज्ञान पावे निश्चित। जयामाजी अचुंबित। शांति असे।'-ज्ञा ४.१८९. १२ पीडा त्रास वगैरेपासुन सुटका; एखाद्या पीडाकारक मनुष्याची केलेली समजूत; तृप्ति; पीडेचें निवारण; शांत. (क्रि० करणें, होणें). [ सं. ] **शांतिक, शांतिकर्म**-न. १ अरिष्ट; त्रास; पीडा; यांच्या निवारणासाठीं शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें करावयाचा विधि; शांति; अरिष्ट-निवारक-कर्म. २ (व. गो.) ऋतुशांतीचा विधि; गर्भाधान. -वि. १ शांतिकारक; शांतता प्रस्थापक; प्रशमन, उपशमन करणारे. २ आराधणारा; आळवणारा; आराधक; प्रसन्नकारक; शांतिकर-प्रद-कारक-दायक. [ सं. ] **शांतिक पौष्टिक**-न. अनिष्ट निरसनार्थ केलेलीं कर्में. [ सं. ] (अप.) **शांतिपुष्टिक, शांतिपाठ**-पु. १ बाळ बाळंतिणीला कसलीहि बाधा होऊं नये म्हणोन किंवा एरव्हींहि

मांगल्यासाठीं करतात तो वेदमंत्रांचा पाठ; मंत्रांचें पठण. २ (ल.) संकटें, अडचणी किंवा त्रास दूर करण्याची युक्ति, कला. ३ (ल.) एकसारखें जोरजोरानें रागें भरणें; शिव्या देणें. [सं.] **शांतिब्रह्म-मैंद**-न. १ अतिशय शांतवृत्तीचा मनुष्य, धीर, गंभीर आणि शांत असा माणूस. २ वरून शांतवृत्ती दाखवून आंतून द्वेष मत्सरानें जळणारा. [सं.] **शांतिरस**-पु. (साहित्य) नऊ रसांपैकीं एक रस. नवरस, शांत पहा. [सं.] **शांतिहोम**-पु. अनिष्ट गोष्टी टाळण्याबद्दल केलेलें हवन. [सं.] **शांतोदक**-पुन. और्ध्व देहिकांत तेराव्या दिवशीं ज्या जाग्यावर मृत्यु घडला असेल त्या जागेच्या शुध्यर्थ व मृत्युशमनार्थ केलेली शांति, विधि. [सं.]

**शातकुंभ**—न. सोनें. 'जैसा दीप आणि ज्योति। कीं शातकुंभ आणि कांति।' -ह २०.१०३. [सं.]

**शाद**—पु.न. शेवाळें.

**शाद**—वि. आनंदी; आनंदित. 'हमेशा खैर्-आफियतचें खत पाटवून दील शाद करीत जावा।' -रा १९.९५. [फा. शाद्] ०**मानी**-स्त्री. १ कुशलवृत्त; खुशाली. २ आनंद. [फा. शाद्मानी]

**शादियान, श्यादान**—न. शहाजण; मोठा नगारा. 'शादियानें वाजवावयाची परवानगी झाली।' -दिमरा २. ९४. 'श्यादानें वाजवून द्वाही फिरविली।' -रा २.६.५९. [फा. शाद्याना]

**शादी**—स्त्री. मुसलमानाचें लग्न; लग्नसमारंभ; विवाह; निका. [फा. शादी]

**शाद्वळ**—न. कोवळें; नाजुक गवत. -शाडवळ पहा. [सं. शाद्वल]

**शान**—स्त्री. १ प्रतिष्ठा; डौल; छानदारपणा; थाटमाट; सुरेखपणा; शोभा; उत्कृष्टता; भव्यपणा (माणूस, चेहेरा, व्यवस्था, समारंभ-विषयीं). 'त्यांत मजा नाहीं व मैत्रीची शान रहात नाहीं।' -राज ३.३७२. २ नटवेपणा; छानछोकी. ३ तजेला; पाणी; जिल्हई. -वि. छानदार; शोभिवंत. छान पहा. [अर. शअन्] ०**गुमान**-वि. नष्ट; शून्यवत्; बेपत्ता. (क्रि० करणें). [अर. शान्+फा. गुमान्] ०**करणें**-नाहींसा करणें. ०**दार-दारी**-वि. सुंदर; उत्कृष्ट; तजेलदार; छानदार; छानदारी पहा. 'कांहीं ठिकाणीं वर्णनेंही शानदार आली आहेत।' -नि ५४४. ०**शुकी-शोकी**-स्त्री. १ छानछुकी-छोकी; नट्टापट्टा; नखरा. २ ऐट; नखरेबाजपणा; डौल. [अर.] ०**शूक-शोक**-वि. फाकडा; कुर्रेबाज; नखरेबाज. ०**शौकत**-स्त्री. १ प्रतिष्ठा; थोरवी. 'राज्यावर कायम करून शान-शौकतीकरितां वसुली बारा लक्ष रुपये आकाराचा मुलख नेमून देऊन।' -मदरु १.१५४. २ डामडौल; भपका. [फा. शान्-उ-शौकत्]

**शानभोग**—पु. (कर्ना.) १ कुलकर्णी. २ (क.) ब्राह्मण शणै पहा. -थर्स्टन.

**शानां**—न. (कु.) लोखंड तोडण्याचें एक पोलादी हत्यार; छिनी.

**शानिशा**—शहानिशा पहा.

**शाने—शान-शानी**-अ. धातुसाधितांना ऊन व क्रि. विशेषणांना ऊन, हून प्रत्यय लावल्यावर होणाऱ्या अव्ययार्थी खेडवळ लोकांच्या प्रचारांतील प्रत्यय. 'तिथूनशाने कशाला दाखवितोस; इकडे कां घेऊनशाने येईनास.' [सं. सत्]

**शाप**—पु. एखाद्याचें वाईट व्हावें म्हणून केलेला वाक्प्रयोग; अभिशाप; अनिष्टचिंतन; तळतळाट. (क्रि० देणें; होणें; जडणें; लागू होणें) [सं] ०**वठणें**-एखाद्याचा कार्यनाश होणें;हानि होणें. ०**गुण**-पु. शापाचा परिणाम; शापफल. (जाति, कुल, समुदाय इ०तील व्यक्तीमध्यें जे कांहीं स्वभावसिद्ध दोष असतात ते पुरातन ऋषींच्या शापामुळें असतात अशी समजूत). 'वाघुळांनीं उलटें टांगून घ्यावें असा त्यास शापगुण आहे.' ०**ग्रस्त**-वि. शापयुक्त; शापानें पीडिलेला, बाधित. [सं.] ०**दग्ध**-वि. शापानें नाश दुर्दशा पावलेला, पीडलेला. [सं.] ०**बद्ध**-वि. शापानें बांधला गेलेला. [सं.] ०**मुक्त**-वि. शापाच्या पीडेंतून मुक्त झालेला; सुटलेला. [सं.] ०**मोचन**-न. शापापासून सुटका, सोडवणूक. [सं.] **शापणें**-क्रि. शाप देणें; अनिष्ट चिंतणें. 'अन्यायाविण शापिले ऋषि मला.' [सं. शाप्] **शापादपि-शरादपि**-वि. १ शाप देण्यास व युद्ध करण्यासहि समर्थ; (ऋषि आणि योद्धा.) (शाप देऊन भस्म करण्याची शक्ति व त्याचप्रमाणें बाणांनीं ठार करण्याची शक्ति या दोनहि द्रोणाचार्याचा अंगीं होत्या; म्हणून हें विशेषण प्रथम त्यास लावलेलें आढळतें. २ (ल.) व्यवहारांत आणि त्याचप्रमाणें शास्त्रांत, विद्येंत पारंगत; धर्म आणि कर्म यांत सारखा निपुण; गृहस्थाई व भिक्षुकी या दोन्हींत निपुण. समानार्थी शब्द शापानुग्रहसमर्थ; निग्रहानुग्रहसमर्थ; मुत्सद्दी असून शिपाई इ० -क्रिवि. १ धर्मश्रेष्ठता आणि सामर्थ्य यांच्या जोरावर; कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारें. [सं. शापात्+अपि, शरात्+अपि.] **शापित**-वि. १ शापलेला; तळतळाट घेतलेला. २ शपथ घ्यावयास लावलेला, भाग पाडलेला; शपथ घेतलेला. [सं.] **शापोद्धार**-पु. शापापासून मुक्तता; शापमोचन. [सं.] **शापी**-स्त्री. (कु.) चिलमीचा फडका छापी.

**शाबर**—न. जादू; चेटूक; टाणाटोणा; मंत्रतंत्र. [सं. शबर] **शाबरी**-वि. शाबरसंबंधी; ऐंद्रजालिक; जादूसंबंधीं. (मंत्रतंत्र, विद्या, अनुष्ठान इ०) स्त्री. एक हलकी प्राकृत भाषा. ०**विद्या**-स्त्री. जादुटोणा; चेटूक; इंद्रजाल.

**शांबरी**—स्त्री. चेटकीण; जादुगारीण. [सं.]

**शाबान**—पु. मुसलमानी ( अरबी ) वर्षाचा आठवा महिना. [ अर. शअबान् ]

**शाबास**—उद्गा. १ वाहवा; भलेभले; फार चांगलें; भले बहाद्दर; धन्य! 'कांहीं शाक-भाजी मागतों ते देतां तुम्ही कष्टी होतां, शाबास तुझा धीर!'-ब्रप ३०२. -स्त्री. धन्यता; प्रशंसनीयता; स्तुत्यता. (एखादें वर्तन, कृत्य यासंबंधीं योजतात). 'शाबास तुमचे खानदानाची असे'-रा १२.१२३. [फा. शाबाश्; शाद्बाश्; शाहअब्बास] **शाबासकी, शाबाशी-सी**-स्त्री. प्रशंसा; स्तुति; वाहवा; पाठ थोपटणें; धन्यवाद. 'तेव्हां शायसिंगानें शाबासी दिली.'-जोरा ८५. [फा. शाबाश्, शाबाशी]

**शाबिती**—स्त्री. १ सिद्धता; प्रस्थापना. २ समर्थन. **शाबीत**-वि. सिद्ध; प्रस्थापित. [ अर साबित् ]

**शाबुडी**—स्त्री. ( कों. ) एक प्रकारची मिठाई; साबणी.

**शाबुदाणा**—पु उपवासास उपयुक्त पदार्थ; सागो झाडाच्या सत्त्वाच्या गोळया. साबूदाणा पहा. [ मलायी सागो-सागू ]

**शाबूत-द**—वि. १ मजबूत; टिकाऊ; बळकट; दुरुस्त. २ न मोडलेलें; न तुटलेलें; व्यवस्थित; अभंग ३ खरा; प्रस्थापित; सिद्ध; शाबीत पहा. 'याजकडे तीन खून शाबूत जाहले.' -वाडबा २.५५. [अर. सुबूत्] **शाबुती**-स्त्री. सुरक्षितपणा; व्यवस्थितपणा; नीटपणा; आढळपणा. 'चिरंजीव शाबुतीनें आला हाच लाभ जाणोन'-ख १.१६६. [फा.]

**शांभव**—वि. शंभूसंबंधी; शंकराचें; शंकरापासुन प्राप्त झालेलें. 'मग तिर्‍हीं तें शांभव। अद्वयानंद वैभव। संपादिलें सप्रभव। श्रीगहिनीनाथा।'-ज्ञा १८.१७५६. [सं. शंभु] **०सुख**-न. ( महानु. ) ब्रह्मानंद. 'तया प्रेमाचा महुरु। शांभव सुखापसि मधुरु।'-शिशु ७९५. **शांभवी**-स्त्री. १ पार्वती. २ शंकराचें आवडतें पेय म्हणून संकेतानें भांग; घोटा. [सं.]

**शाम**—पु. एक देश; सियाम-सयाम. [सं. सुम्ह]

**शाम**—वि. (अप.) श्याम पहा. **०कर्ण**-( अप. ) श्यामकर्ण. 'रासभ धुतला महातीर्थामाजी। नव्हे जैसा तेजी शामकर्ण।' -तुगा ३१११. **०शाखा**-स्त्री ( महानु. ) तरवडयाची भाजी. -ऋ ८४.

**शामक**—वि. (वैद्यक) शमविणारें; थंड करणारें; तीव्रता कमी करणारें. उदा० पित्तशामक; वायुशामक इ०. [सं.]

**शामत, शाम्मत**—स्त्री. हिंमत; धैर्य. शहामत पहा.

**शामदान**—न. उभट दिवा; मेणबत्तीची ठाणवी; ठाणवाई; वालशीट; चिराखदान. [फा. शमादान्]

**शामल**—पु. १ श्यामल (सांवळा) पहा. २ हबशी; शिद्दी; जंजीरेकर. (काळया रंगावरून सांकेतिक). 'राजश्री कानोजी आंग्रे यांस पत्र जे। शामलाचा जमाव पालगडाखालीं येऊन राहिला आहे।'-शारो ७; -मराआ ३. [सं. श्यामल]

**शामळू**—वि. (कों.) नेभळट. [गु. सांभळो]

**शामाटें**—न. कसें तरी भांडण मिटविणें; कशीबशी तडजोड. [गु. शा माटे=कशाकरितां] **शामाठया**-वि. अगदीं मद्र; ठोंब्या; निर्बुद्ध.

**शामाना-णा, शामीना, शामियाना**—पु. १ तंबूच्या पुढील किंवा मागील बाजूस लावलेलें कापड, पडदा. २ सायवान. ३ मोठा डेरा, तंबू. [फा. शाम्याना, शामियाना]

**शामिल, शामील**—वि. प्रविष्ट; समाविष्ट; सामील पहा. 'ज्यांणीं बलबा केला, त्यांत शामील जाले असतील त्यांचेंही पारिपत्य करणें.'-रा ७.४१. [अर. शामिल्]

**शाम्युला**—पु. (खा.) एक सरळ, उंच वाढणारें, व मोठें झाड.

**शायद**—क्रिवि. कदाचित्. 'शायद गरजूगो मनुष्याचे सांगण्यावर शुबाह व वस्वास राजे साहेबांचे अंतःकर्णात प्राप्त होईल.' -रा १०.२५१. [फा. शायद्]

**शायदी**—स्त्री. साक्षी; साक्ष. (प्र.) शाहिदी [फा. शाहिदी] **०दार**-पु. साक्षीदार. (प्र.) शाहिदीदार.

**शायशी-र्शी**—वि. ८६ संख्या. [सं. षडशीति]

**शायस्ता**—वि. योग्य. 'जमियत शायस्ता पैदा करून...' -रा १७१६. [फा. शाइस्ता]

**शायी**—स्त्री. १ शाई; लिहिण्याच्या उपयोगाचें रंगीत पाणी; २ मृदंगाला लावण्याचें लुकण. शाई पहा.

**शायी**—वि. निजणारा, आडवा होणारा, टेंकणारा. शाई पहा. (समासांत) भू-शेष-सुख-जल-वृक्ष-शायी इ० [सं.शी-शय्]

**शार**—पु. (व.) शेराचें झाड; हुरा. 'शाराचें कुंपण आवाराला आहे!'

**शार**—न. शहर (अप.) 'आली शार पुण्याला शोभा दाटली पागा मिळेना जागा पुण्याभोवतेला।'-ऐपो ४३२.

**शार**—न. (व. खा.) भोंक पाडण्याचें हत्यार; सामता. **शारणें**-क्रि. लांकडांस भोंक पाडणें. **शारी**-स्त्री. १ छोटा लहान सामता.

**शारंग**—न. शार्ङ्ग पहा.

**शारंगी**—स्त्री. एक तंतुवाद्य; सारंगी.

**शारद, शारदीय**—वि. शरदृतुसंबंधी.

**शारदा**—स्त्री. सरस्वती. वाणीची अधिष्ठात्री देवता. 'नमो शारदा मूळ चत्वारिवाचा।' [सं.]

**शारा, शारी, शारें**—पु.स्त्री.न. १ भय; कंप. (प्र.) शहरा पहा. 'तया प्रस्तावाच्या अंगीं। शारें भरे सुमनाचें।' —मुरंशु ४४०. २ हींव; थंडीताप. 'दूत सांगती श्रीहरी। वन्हाडणीसी लागली शारी।'—एरुस्व १४.६८. 'जेवीं कां शारियाचें शीत। घामज्वरासमवेत।' —एभा १७.५५. 'ज्वर पाचाव आणि शारें।' —दा ३.६.२६.

**शारी**—स्त्री. (व) मंत्रतंत्राच्या साहाय्यानें दुसऱ्याच्या घरांतील अन्न किंवा इतर वस्तू आणविणारी स्त्री.

**शार्ङ्ग**—न. १ विष्णूच्या धनुष्याचें नांव. २ शृंगाचें धनुष्य. [सं. शृंग. अप. शारंग] ०**धर-पाणी**—पु. विष्णु. 'तयापरी तो पांडुकुमरु। महामोहें अति जर्जरु। देखोनी श्रीशार्ङ्गधरु। काय बोले।' —ज्ञा २.५. 'पायां लागोनि बुझावणी। तुझ्या ठायीं शार्ङ्गपाणी।' —ज्ञा ११.५४६. **शार्ङ्गी**—पु. विष्णु; कृष्ण. 'हेंच समर्थावयालागीं। एक दोन चांगी। उपपत्ती शार्ङ्गी। दाविता जाहला।' —ज्ञा ११.७०४.

**शार्दूल**—पु. एक झाड; चित्रक. [सं.]

**शार्दूल**—पु. १ वाघ; व्याघ्र. २ राक्षस. —वि. (समासांत उत्तरपदीं) श्रेष्ठ. उदा० नरशार्दूल. [सं.] ०**विक्रीडीत**—न. एका वृत्ताचें नांव. याच्या चरणांत १९ अक्षरें; म, स, ज, स, त, त, ग हे गण येतात. उदा० 'वंशी नाद नटी तिला कटितटीं खोवोनि पोटीं पटीं।' [सं.]

**शार्मण्य**—वि. जर्मनदेशीय. 'सर्व जगतांत शास्त्रीय प्रगतीचें अग्रेसरत्व शार्मण्यदेशीयांना परमेश्वरानें दिलेलें आहे.' —सासं २.१३२. [जर्मन]

**शाल**—स्त्री. लोकरीचें पांघरण्याचें उंची वस्त्र. [फा. शाल्] ०**जोडी**—स्त्री. १ दुहेरी शाल; शालीचे दोन फर्दे मिळून झालेलें जोडवस्त्र; दुशाल पहा. २ शाल. **शालजोडींतून मारणें-देणें, शालजोडीतला देणें-मारणें**-एखाद्याची व्यंगोक्तीनें निंदा, कुचाळकी करणें; उपरोधिक शब्दांत टोचणें; टोमणा देणें. 'जुलमी अम्मलदाराचा अगर राजाचा स्वभावच असा असतो कीं, ते आपल्याजवळ जीं माणसें बाळगतात तीं अशीं असावीं कीं त्यांस कोणी शालजोडींतील मारले तरी त्यांनीं शालजोडीच्या मऊपणाचीच तारीफ करीत रहावें.' —टिले २.१२८. ०**नामा**—पु. अंगावर नकशी, वेलबुट्टया असलेली शाल. [फा.]

**शाल**—पु. एक झाड; साल. [सं.] ०**निर्यास**—पु. शालझाडाचा चीक, डिंक. [सं.]

**शालक**—पु. मेहुणा; बायकोचा भाऊ किंवा बहिणीचा नवरा. साला. 'शालक लक्ष्मी बघती केवळ नच त्या जरि गुणबिंदु।' —सौभद्र. [सं. श्यालक]

**शालग्राम, शाळग्राम**—पु. (अप.) शालिग्राम शालिग्राम पहा.

**शालमुद्री**—स्त्री. (ना. व.) लग्नाचे अगोदर दोन महिने नवरदेवाला नवरीच्या बापानें अहेर करतांना केला जाणारा विधी. [शाल+मुद्रिका]

**शाला-ळा**—पु. १ घर; दालन; सर्वसामान्य जागा; गृह. सामाशब्द-होमशाला, गोशाला, पाटशाला, नृत्यशाला, रत्नशाला, अश्वशाला, टंकशाला, वित्तशाला इ० 'प्रभु रामकृष्ण दोघे गेले शाळेसि त्या कुलालाच्या।' —मोआदि ३६.१. २ शास्त्र, विद्या, कला, व्यायाम इ० शिकविण्याची जागा; शिक्षणमंदिर; विद्यागृह; आखाडा. ३ विवक्षित आचार्यानें प्रतिपादिलेली तत्त्वपद्धति; विवक्षित शिक्षणाची रीत, पद्धति; विशिष्ट विचारपद्धति, प्रणाली, शास्त्र. ४ एका तत्त्वानें, धोरणानें किंवा विचारानें एकत्र जमलेली मंडळी; संप्रदाय; मंडळ; गट. ५ एखादें वैशिष्ट्य; एकसारखी चालरीत इ० असलेला पक्ष, कुल, समाज. उदा० 'त्या कुळाची शाला अशीच कीं, सर्व मनुष्य गरीब' ६ व्यवसायाची जागा; लोहाराचें दुकान [सं.] ०**बंधु**—पु. शाळेंतील सहाध्यायी; शाळासोबती. [सं.] ०**शुद्ध**—वि. जेथें शिक्षण, कलाकौशल्य, रीतभात उत्कृष्ट शिकविली जाते अशा चांगल्या शाळेंत असलेला (विद्यार्थी, गवई इ०) किंवा अशा शाळेंत शिकविलेलें (गायन, शिक्षण, इ०). ०**सुटणें**-१ शाळा बंद होणें (विशिष्ट कालपर्यंत) शिक्षण थांबणें; शिकण्याचें बंद होणें. **शाळेंतील-शाळेचें-शिंगरूं-लेंकरूं**—न. परंपरेप्रमाणें; बापाप्रमाणें वाईट मार्गाला लागलेला मुलगा.

**शालि**—स्त्री. साळ; भात; व्रीहि जातीचें धान्य. [सं.] ०**वन-क्षेत्र**—न. भाताचें शेत; साळीचें शेत. [सं.] **शाल्योदन**—पु. १ शिजविलेला भात. २ (ल.) भोजन; उत्तम चमचमीत जेवण. [सं. शालि+ओदन]

**शालिका**—स्त्री. स्थान; भूमि. 'जे महदादि विश्राम। शालिका हे।' —ज्ञा १४६७. [सं. शाला]

**शालिग्राम**—पु. (अप. शाळग्राम, शाळिग्राम). १ गंडकी नदींतील विष्णुस्वरूप मानिलेला काळा गुळगुळीत व वाटोळा गोटा. २ (ल. उप.) कांदा; कंदर्प. —वि. अगदीं काळा कुळकुळीत. [सं. शालग्राम. शाल=नदीचें नांव. ग्रावा=दगड] **म्ह**० काळा काळा शाळिग्राम, गोरा गोरा मुसलमान.

**शालिनी**—स्त्री. एक वृत्त. याच्या एकेका चरणांत ११ अक्षरें आणि म, त, त, ग, ग हे गण असतात. उदा० काया वाचा इंद्रियेंबुद्धि चित्त। यांनीं किंवा दुःस्वभावें प्रमत्त। [स.]

**शालिनी**—वि. १ शोभणारी; शाली पहा. २ सुगृहिणी. ३ विनयशील. [सं.]

**शालिवाहन**—पु. एक शककर्ता; दक्षिण हिंदुस्थानांतील सार्वभौम राजा. याचा शक अद्यापि चालू आहे. [ सं. ] **०शक**–पु. एक कालगणना; संवत्सरक्रम. हा नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रांतांत चालतो. याचा आरंभ ख्रिस्ती शकाच्या ७८ व्या वर्षी झाला. आरंभ चैत्र शुद्ध १. [ सं. ]

**शालिहोत्र**—पु. अश्वशास्त्रकर्ता; कपिलमुनीचा पुत्र. यानें अश्वशास्त्रविषयक 'शाल्यहोत्र' नामक ग्रंथ लिहिला. 'तो शालिहोत्र, कीं हा तुल्यचि अश्वांसि जाण ताराया।' –मोविराट १.२३. **०शास्त्र, शाल्यहोत्र**–न. घोडयांच्या रोगांचें निदान व चिकित्सा सांगणारें शास्त्र; पशुवैद्यक. [ सं. ]

**शाली**—वि. १ चमकणारा; चकाकणारा; तेजस्वी. २ नांवाजलेला; कीर्ति असलेला. ३ समृद्ध; संपन्न; परिपूर्ण. समासांत अभिमानशाली, मानशाली (पुरुष); उर्मिशाली, तरंगशाली, (समुद्र); गंधशाली, (वायु); ज्वालाशाली, (अग्नि); आणखी सामाशब्द–कृपा–कौशल्य–गुण–तप–दान–दैव–धर्म–पराक्रम–पल्लव–पुण्य–पुष्प–बल–भाग्य–भोग–विद्या–वीर्य–वैराग्य–शौर्य–ज्ञान–शाली. [ सं. ]

**शालीन**—वि. लाजाळू; नम्र; विनीत. शालिनी पहा. [ सं. ] **०ता**–स्त्री. सभ्यता; विनय; लाजाळूपणा. [ सं. ]

**शालू–लु**—पु. १ उत्तम; उंची, रेशमी, जरीचें लुगडें. 'शेले शालू साडया। क्षीरोदक लांबरुंद पाटावें।'–मोसभा ५. ८३. २ बैलावरील झूल. [ हिं. सालू ]

**शालुक–की**—स्त्री. एक बायकी खेळ. या खेळास चार अगर त्याहून अधिक मुली असल्या तरी चालतात. चौघींत खेळावयाचें असेल तर दोघींनीं एकमेकींचे पाठीस पाठ लावून उभे रहावें व दोघींनीं त्यांचे समोर टाळी देण्यास असावें. ह्याप्रमाणें तयार होऊन मग 'शालुक शालकी। तुझी माझी पालखी।' हें गाणें म्हणत समोरील गडयास टाळी देत वाटोळें फिरावें –मखे २३७.

**शाल्मल–ली–शाल्मलीद्वीप**—पु.स्त्री.न. पृथ्वीच्या सप्तद्वीपांपैकीं एक. हें युक्झीनपासून बाल्टिक–आड्रियाटिक समुद्रापर्यंत पसरलेलें आहे. सप्तद्वीप पहा. [ सं. ]

**शाल्मल–लि–ली**—पु.स्त्री. सांवरी; शेवरीचें झाड. [ सं. ]

**शाव–शावक**—वि. शवासंबंधीं. शव पहा.

**शाव, शावक**—पु. छावा; बच्चा; बालक; (मृग, सिंह इ० चा). [ सं. ]

**शावक**—पु. (प्र.) श्रावक पहा. जैनयतींचा एक वर्ग. (सामा.) पाखंडी. 'मग त्या दैत्यीं सांडिलें हवन। सांप्रदाई जाहले नानावर्ण। ते हे जी शावक जन। बोलिले भारता।' –कथा २.१७.९८. [ सं. श्रावक ]

**शाश्वत**—स्त्री. शाश्वती; टिकाऊपणा; कायमपणा. 'ह्या देहाची शाश्वत नाहीं म्हणून पहिल्यापासुन ईश्वरभजनीं लागावें.' –वि. १ अनश्वर; चिर; अखंड. २ कायम टिकून रहाणारें; कायमचें. [ सं. ] **शाश्वती**–स्त्री. टिकाऊपणा; चिरंतनता; शाश्वत पहा. **शाश्वतिक**–वि. शाश्वत पहा. [ सं. ]

**शासणें**—क्रि. १ शासन, दंड, शिक्षा करणें. २ अधिकार चालविणें; व्यवस्था पाहणें. [ सं. शासन ] **शासक**–वि. १ शासन करणारा; दंड करणारा. २ राज्य चालविणारा, हांकणारा; राज्यकर्ता. ३ व्यवस्था पहाणारा अधिकारी. [ सं. ] **शासन**–न. १ शिक्षा; दंड; सजा. २ राज्यकारभार; सत्ता चालविणें. ३ हुकुम; आज्ञा. 'आले शरण तुज......शासनांत राहुनी।' –मोगदा ८.१७. ४ आज्ञापत्र; निर्णयपत्र. ५ राजाज्ञा; सनद; शासनपत्र. उदा० 'अशोकाचीं शिलाशासनें'. ६ सत्ता; अंमल; कारकीर्द. [ सं. ] **०पत्र**–न. अधिकारपत्र; सनद; हुकूम (कागद, ताम्रपट, शिला वगैरेवर लिहिलेलें). [ सं. ] **०पद्धति**–स्त्री. राज्यव्यवस्था; राज्यपद्धति; राजनीति; कायदेकानू. [ सं. ] **०शास्त्र**–न. राजकीय व्यवहारांचा विचार करणारें शास्त्र; राजनीतिशास्त्र. (इं.) पॉलिटिक्स. [ सं. ] **शासनीय**–वि. १ शिक्षा करण्याजोगें, योग्य; दंड्य (प्रजा, सेवक, इ०). २ अधिकार, सत्ता चालविण्याजोगें, लायक. [ सं. ] **शासित**–वि. १ सजा दिलेलें; शिक्षा केलेलें. २ अधिकार, अंमल, सत्ता गाजविलेलें; हुकमत, आज्ञा केलेलें; आज्ञापित. [ सं. ] **शास्ता**–पु. १ दंड, शिक्षा करणारा; शासक; शासन करणारा (न्यायाधीश, गुरु, इ०). २ अधिकार, अंमल चालविणारा; अधिपति; राज्यकर्ता. [ सं. शास् ] **शास्ति**–स्त्री. (महानु.) शासन; शिक्षा; दंड. शास्त पहा. 'लागलिअें तरी शास्ति कर्ती।' –शिशु १९४. [ सं. ] **शास्तृत्व**–न. १ चुकीच्या मार्गावरून सरळ मार्गावर आणणें; शिक्षा, सजा करणें. २ सत्ता; अधिकार; अंमल. [ सं. ] **शास्य**–वि. १ शासन करण्यास, शिक्षा करण्यास युक्त, योग्य, शक्य, जरूर; सरळ मार्गावर आणण्यास योग्य, जोगतें, सारखें, जरूर. २ अधिकार, हुकमत, आज्ञा करण्याजोगें, युक्त, सारखें, जरूर, शक्य.

**शास्त**—स्त्री. शासन; शिक्षा दंड. 'साहेब जे शास्त अथवा गुन्हेगारी घेतील ते आपण कबूल असे.' –रा १६.४७. 'शास्ताखानास शास्त केली.' –सभासद २९. [ अर. सियासत्; सं. शास् ]

**शास्त्र**—न. १ (दैवी) धर्म, विधि, नियम, विद्या यासंबंधीं वचन, आज्ञा. हें ईश्वरी किंवा अपौरुषेय मानण्यांत येतें. बहुधा समासांत उपयोग. समाशब्द–शास्त्रमर्यादा, शास्त्ररीती, शास्त्रमार्ग,

शास्त्रप्रतिपादित, शास्त्राभ्यास, शास्त्रज्ञ, शास्त्रज्ञान, शास्त्रतत्त्व. २ (समास नसतांना) धर्म, वाङ्मय, विज्ञान, कला इ० संबंधीं नियम. हा अर्थ अभिप्रेत असतां बहुधा मर्यादा घालणाऱ्या दुसऱ्या शब्दांस जोडून येतात. उदा० वेदांतशास्त्र, शिल्पशास्त्र, कामशास्त्र, न्यायशास्त्र, व्याकरणशास्त्र, ३ (सामा.) प्रबंध; ग्रंथ. ४ नियमबद्ध, सिद्धांतमय रचना असलेला विषय. [सं.] (वाप्र.) **शास्त्रास, शास्त्राचा, शास्त्रापुरता, शास्त्रार्थास असणें-नसणें**–केवळ नांवाला असणें–नसणें. 'हा आपला उगीच शास्त्रास चाकू आहे. त्यानें बोट देखील कापणार नाहीं.' 'आज घरांत शास्त्राला साखर नाहीं, मग शेरभर वेऊं कुठली?' 'शास्त्रास स्नान झालें खरें, मलशुद्धी ती निराळी' **शास्त्रांत**–वि. शास्त्राप्रमाणें; शास्त्र धरून, अनुसरून. [सं.] **०दर्शि-वेत्ता-विद ०प्रविण-ज्ञ-अभिज्ञ-संपन्न**–वि. शास्त्रांत निपुण, कुशल; चांगला शास्त्री. [सं.] **०निंदा**–स्त्री. शास्त्राची धिक्कारणी, अवमानणी, शास्त्राचा अपमान. [सं.] **०पाखंड**–न. शास्त्राचा भलता अर्थ; अशास्त्रीय विधान. 'पोट भरावया भांड। सैरा वाजविती तोंड। तैसे विषयालागीं। वितंड। शास्त्रपाखंड बोलती।'–एभा ९.३५५. **०पारंगत-सकलशास्त्रपारंगत**–वि. सर्व शास्त्रविशारद; सर्व शास्त्रांत निपुण. [सं.] **०बाह्रे**–वि. शास्त्रबाह्य; निषिद्ध. 'आशंकेचा उपक्रम। दिवसा नाहीं लाजाहोम। शास्त्रबाह्र विषम। कां पा कवि बोलिला।' –सीख १०.१०८. [सं. शास्त्रबाह्य] **०मर्यादा**–स्त्री. शास्त्रानें घालून दिलेली, आंखून दिलेली, मर्यादा, सीमा. (क्रि० राखणें पाळणें, धरणें, पाळणें) [सं.] **०वत्**–वि. शास्त्राप्रमाणें; शास्त्रानुसार; सशास्त्र [सं.] **०व्युत्पत्ति**–स्त्री. न्यायादि शास्त्रांत गति; शास्त्र ग्रंथांतील निपुणता. 'पुराण सांगण्यास केवळ शास्त्रव्युत्पत्ति नको, काव्यव्युत्पत्ति असली म्हणजे झालें. [सं.] **०संख्याक**–वि. सहा. षट्शास्त्रें यावरून सांकेतिक. 'खदिर वृक्षांचे शास्त्रसंख्याक। पळसांचे ऋषि संख्याक। ऐसियापरी सम्यक। यज्ञक्रिया अवलंबिली।' –जैअ ९२.४९. **शास्त्रार्थ**–पु. शास्त्रांतील किंवा विधिनिषेधरूप वचन, अभिप्राय, शास्त्राची सांगणी. शास्त्रांतलें वचन; शास्त्राज्ञा. विशिष्ट बाबतींत शास्त्रानें घालून दिलेला नियम, वा दाखविलेला मार्ग. **शास्त्रार्थ करणें**–१ (एखादी गोष्ट) किंचित् नांवाला करणें; केली न केली याप्रमाणें वागणें. **शास्त्रार्थास असणें**–शास्त्रास असणें पहा. **शास्त्री**–पु १ शास्त्रांचा अभ्यास केलेला गृहस्थ; शास्त्रवेत्ता; पंडित २ ज्या शास्त्राचें अध्ययन ज्यानें केलें आहे तो तच्छास्त्री. उदा० न्यायशास्त्री, धर्मशास्त्री. ३ कोणत्याहि एखाद्या शास्त्रविषयांत निपुण असलेल्या ब्राह्मणाच्या नांवापुढील बहुमानार्थी पदवी. उदा० बाळशास्त्री, गंगाधरशास्त्री, वासुदेवशास्त्री. **०बाणा**–पु. विशिष्ट धंदा किंवा व्यासंग म्हणून केल्या जाणाऱ्या पुढील सहा शास्त्रीय विद्यांना योजला जाणारा शब्द, आलंकारिक, ज्योतिषी, धर्मशास्त्री, नैय्यायिक, वैद्यकी, वैय्याकरणी–बाणा. **शास्त्रीय**–वि. १ शास्त्रासंबंधीं (विषय, परिभाषा, व्यवहार, ज्ञान, इ०). २ यथाशास्त्र; शास्त्रोक्त; [सं.]

**शाह, शाहंगी, शाहांगी, शाहजादा, शाहाजादा, शाहजानी, शाहाजानी, शाहदानी, शाहाजिरे शाहजिरे, शाहजोग, शाहडा-डे, शाहणपण, शाहाणा, शाहाणासुरता, शाहाण्णव, शाहत्तर, शाहनिशा, शाहमत, शाहामृग, शाहरा, शाहरे, शाहळू, शाहळे. शाहा, शहांगी** याप्रमाणें श खालीं पहा.

**शाह-गोश, शाहगोश**–पु. रानमांजर, [फा. सियाह्‌गोश]

**शाहदी, शाहीदी**–स्त्री. साक्ष; गव्हा. "कोणी जमीनदार महादजी देसमूख मसूरकर याची शाहदी याल म्हणजे मारिले जाल.'–रा ४. [फा. शाहिदी] **शाहिदी, शाहिदीदार, शाहीद्**–पु. साक्षीदार, साक्षदेणारा; गवाह. 'आम्हीं ईश्वरास शाहीद देऊन कर्तव्यार्थ तो करितो'–रा ६.६१९. [फा. शाहीद्] **शाहीदी नामा**–पु. साक्षीपत्र; साक्षीदाराची जबानी, लेख. 'हल्लीं सरकारांत शाहिदीनामा तुमचे पडोशीचे...' –समारो ८.६९,२९.

**शाही**–स्त्री. राज्य; सत्ता; अंमल; कारकीर्द; शाई पहा. 'सारे शाहींत अस्कारियाचा'–चित्रगुप्त २०. [फा.]

**शाहीर**–पु १ पोवाडे, लावण्या व ह्या धर्तीचीं कवनें करणारा कवी; २ कवनें रचून तीं म्हणून दाखविणें यांवर चरितार्थ चालविणारा कवि. भाट; चारण. ३ तमाशा करून उपजीविका करणारा माणूस. ४ (सामा.) राष्ट्रीय किंवा वीरवृत्तीची कविता करणारा कवि. [अर. शाइर] **०की-गिरी**–१ कवित्व 'रामकृष्ण गुणीरामा कासार; शाहीरकीमधिं सदा मगन.'–पला १०७१. २ शाहीराची वृत्ति, पेशा. **शाहीरी**–वि. शाहिरासंबधानें. –स्त्री. कवित्व. [फा. शाइरी]

**शाहीरु**–पु. वेतनव्यय–राव्य ८.५. **०खर्च**–पु. सरकारी हिशोबापैकीं एक खातें, यांत बदलमुशारा व खेरीजमुशारा हीं सदरें येतात, व शाहिरू खर्च आणि तैनातखर्च मिळून एकबेरजी या मोठ्या सदराखालीं मोडतात.

**शाळ-शाळा**–शाला, पहा. 'चला मुलांनो शाळ धरूं विद्या असते शाळेंत।'

**शाळ**–पु. साल (वृक्ष). पहा. 'शाळ ताळ निबिडबन.' –वेसीस्व २.१८.

**शाळक**–शालक पहा.

**शाळंका-खा, शाळुंका-खा, शाळोंका-खा**—स्त्री. महादेवाचें लिंग बसविण्यासाठीं केलेली पाषाणादिकांची बैठक; लिंगाची अडणी; योनि.

**शाळंकृत**—वि. (अप.) सालंकृत सालंकृत पहा.

**शाळग्राम-शाळिग्राम**—शाळिग्राम पहा.

**शाळसूद**—वि. साळसूद पहा.

**शाळुंकी-स्त्री**—स्त्री. एक पक्षी; साळुंकी.

**शाळू**—पु. १ जोंधळयाची एक जात, हा हिंवाळयाच्या दिवसांत पिकतो. २ हिंवाळयांतील लहान दिवस. -वि. (ल.) क्षणिक; नश्वर; थोडा वेळ रहाणारा. [सं. शीतकाल; प्रा. सियाल] ०**गवत**-न. १ गुराढोरांचें खाण्याचें उत्तम चवदार गवत. २ पावसाळयांत उगवणारें व नंतर थोडक्याच अवधींत नाश पावणारें एक बारीक जातीचें गवत. ०**आयुष्य**-न. क्षणभंगुर आयुष्य. ०**ऐश्वर्य**-न. क्षणभंगुर ऐश्वर्य. ०**मित्र**-पु. शाळू सोबती पहा. ०**मैत्री**-स्त्री. थोडा वेळ टिकणारें मित्रत्व. ०**संपत्ति**-स्त्री. अल्पकाल टिकणारें द्रव्य. ०**सोबत**-स्त्री. शाळु सोबत्याची मैत्री, सोबत. ०**सोबती**-पु. ज्याचा सहवास थोडे दिवसच आपणांस लाभावयाचा आहे असा माणूस; शेवटपर्यंत सोबत न ठेवतां, मध्येंच सोडून जाणारा माणूस, शाळू असेल तोंवर, लभ्यांश असेल तोंवर टिकणारा मित्र.

**शाळू**—स्त्री. अन्याय झालेल्या इसमानें आगळीक करणाऱ्याला धाक दाखविण्यासाठीं व न्याय्य गोष्ट करण्याला भाग पाडण्यासाठीं रात्रीं निर्जन स्थळीं उच्चारलेले तळतळाटाचे शब्द, शाप. (क्रि० पुकारणें).

**शाळें**—न. शहाळें पहा.

**शाळोत्र, त्री**—नपु. शालिहोत्र पहा.

**शिऊळ**—स्त्री. जोखडाची खुंटी; शिवळ पहा.

**शिऊळ**—स्त्री. शीळ; शीट. शीळ पहा. (क्रि० घालणें, वाजविणें).

**शिक**—स्त्री. शिक्षा; शिकवण. 'शिक लावुनियां घालिती बाहेरी।' -तुगा १६. [सं. शिक्ष्; प्रा. सिव-ख]

**शिंक**—स्त्री. शैत्यामुळें नाकांतून वायूचें जोराचें सशब्द निःसरण. (क्रि० जाणें, येणें). [हिं. शींक फ्रें. जि. चिक. तुल० सं. छिक्का] **शिंकणें, शिंकर्णे**-क्रि. शिंक येणें; शिंकेनें युक्त होणें. **शिंकणी**-स्त्री. १ हुंगली असतां शिंका आणणारी एक औषधी वनस्पति; नाकशिंकणी. २ शिंकणें. **शिंकेचा शकून**-विशिष्ट वेळीं किंवा दिशेस शिंक आली असतां तीवरून पाहण्याचा शकून. 'रोज तुला शिंकेचा शकून पटतो।' -तोबंड १६.

**शिककाई-शिकिकै**—शिकेकाई पहा.

**शिकजी, शिकंजी**—स्त्री. एक प्रकारचें सरबत, थंडाई. लिंबू आणि साखर किंवा मध घालून त्याला गुलाबाचा वास लावतात. [फा. सकंजबीन्]

**शिकंजा**—पु एखादी वस्तु दोन्हीकडून दाबांत धरण्याचें सुतार, बुकबाइंडर वगैरेचें हत्यार. [फा. शिकंजा]

**शिंकण**—न. गवत; दोरी वगैरेचे भांडयाखालीं ठेवण्याचें वेटोळें; चुंबळ; निवणें. [सं. शिक्य]

**शिकणें**—क्रि. १ विद्या-कला-शास्त्र यासंबंधीं धडे घेणें; विद्या मिळविणें. २ अभ्यास करणें. [सं. शिक्ष्. प्रा. पं. सिखणा. सिं. सिखणु. हिं. सीखना. गु. शिखवुं. बं. शिखिवा. फ्रें. जि. सिक] **म्ह० शिकविलेली बुद्धि आणि बांधलेली शिदोरी (फार वेळ पुरत नाहीं). शिकणाऊ**-वि. १ शिकणारा; शिकाऊ; विद्यार्थी; अभ्यासक; नवशिक्या; उमेदवार. 'लिहिणें पुष्कळ पडलें आहे, कोणी शिकणाऊ कारकून असेल तर लिहावयास आणून बसवा, म्हणजे दोघांचींहि कामें होतील'. २ उपजत नव्हे परंतु अभ्यासानें संपादन केलेलें; गुरूपासुन शिकून साध्य केलेलें (गाणें, बोलणें इ०). **शिकवण-णी**-स्त्री. १ शिकविण्याची पद्धत; रीत. २ वाईट अर्थानें सुचविणें; फूस देणें; प्रवृत्त करणें. (क्रि० लावणें, देणें). ३ उपदेश; शिक्षण; बोध देणें; शिकविणें. ४ शिक्षणाचें वेतन. 'पुष्कळ वर्षे त्याचा चरितार्थ शिकवणीवर चालला होता।' -नि ६१४. [शिकविणें] **शिकवाशिकव**-स्त्री. दोन्हीं पक्षांना चिथावणी देऊन त्यांच्यामधील कलह चेतविणें; फूस देऊन भांडण वाढविणें. [शिकविणें द्वि.] **शिकविणें**-क्रि. १ शिक्षण देणें; आध्यापिणें. २ उपदेश, बोध करणें; पटविणें. ३ (वाईट अर्थानें) उत्तेजन देणें व मनांत भरविणें; चेतविणें; प्रवृत्त करणें. [शिकणें] **शिकाऊ**-वि. शिकणाऊ पहा.

**शिकत्रा**—पु. एक पक्षी.

**शिकंदर**—पु. १ मॅसिडोनियाचा जगज्जेता राजा अलेक्झँडर. हा मोठा पराक्रमी, धूर्त व भाग्यशाली असे. (याच्यावरून लक्षणेनें किंवा औपरोधिक गुणविशेषणें लावतात). -वि. १ (ल.) धूर्त; शहाणा व भाग्यशाली पुरुष; महा बलाढ्य व पराक्रमी मनुष्य. २ (उप.) पुंड; गुंड; पक्का हरामी; सोदा माणस. [अर. इस्कंदर; फा. सिकन्दर; इं. अलेक्झँडर] ०**नशीब असणें**-दैव अतिशय अनुकूल असणें. नशीब पहा. **शिकंदर ताले**-शिकंदराप्रमाणें उच्चीचे ग्रह. **शिकंदराची दिवाल**-स्त्री. १ याजूज व माजूज नांवाच्या रानटी लोकांपासून संरक्षण व्हावें म्हणून शिकंदरानें बांधलेली एक अत्यंत भक्कम अशी भिंत. कदाचित् ही चिनी भिंत असावी. २ (ल.) अढळ;

अभेद्य गोष्ट. 'व स्नेहही (नबाबाचा) कायम राहील जैशी शिकंदराची दिवाल।' -खरे ८७७.

**शिकम**—न. पोट; मर्यादित जागा; पोटविभाग; हद्द; क्षेत्र. '...भोंसले स्वराज्याचे शिकमांत तेव्हां मिलाफी सलूख करून घेतील हें कयासांत येत नाहीं।' -पया ४७७. 'फुलवरीचे मकान फरासिसांचे सिकमांत आहे तें घेऊन बंदोबस्त करावा।' -रा ७. खलप १.३०. [फा. शिकम्] **शिकमीदार**-पोटहिस्सेदार.

**शिकर**—पु. बहिरीससाणा; ससाणा; श्येन. [फा.]

**शिकरण, शिक्रण, शिखरण**—स्त्री. केळीं, खरबूज इ० दुधांत कुसकरून व गूळ किंवा साखर घालून तयार केलेला खाद्य पदार्थ. 'एक मधुर शिखरणी। श्वेतभक्ष्य पंचवरान्नी।' -मुक्तेआदि २९.८३.८[सं. शिखरिणी]

**शिकरणी**—स्त्री. शिंकाळी. [सं. शिक्य]

**शिंकरणें**—क्रि. नाक धरून जोरानें हवा सोडून शेंबूड काढून टाकणें; नाक शब्दासह किंवा त्याशिवाय उपयोग करितात. उदा० तो शिंकरला, तो नाक शिंकरला. 'त्यानें नाक शिंकरलें।' असाहि प्रयोग करतात.

**शिकरी**—स्त्री. (का. कों. राजा). रहाटाचे माळेस लोटा बांधावयाच्या उपयोगी असा दोरीचा तुकडा.

**शिकल, शिकील, शिक्कल**—स्त्री. १ (घासुन, पुसुन) साफसूफी; उजाळा, जिल्हई देणें (हत्यारें, शस्त्रें इ० ना). 'मेण शिकल केली, गडी घरचा पाठिवला जलदी गेला जिनकराला ताकीद केली।' -ऐपो ४३०. 'जंग लागला न लागला हें पाहून, वरचेवर शिकल करवून...-भोंकु ११. २ तेज; शोभा; चकाकी; जिल्हई. ३ मान; अब्रू. (क्रि० चढणें; उतरणें; जाणें; गमावणें) 'पूर्व क्रमास शिकल राहील. -होकै ७३. [अर. सैकल्] ०उडणें-उ. (ल.) लज्जित होणें; अवमान, अवहेलना होणें. ०उतरणें-१ तेज कमी होणें; २ मानहानि करणें, होणें. ०कर-गार-पु. शिकल करण्याचें कसब करणारा; हत्यारें उजळणारा; हत्यारें साफसूफ करून धार लावणारा. -भोंकु ४०. [फा. सैकल्गर]

**शिकला**--पु. लहान नथ; चुंकलें.

**शिकली**—स्त्री. (गो.) सोन्यावर पडलेले चरे घांसून साफ करण्याचें हत्यार. [शिकल]

**शिकस्त**—वि. १ पराजित; पराभूत, 'गनिमांनीं कधीं मोंगलाशीं युद्ध करून मोंगल शिकस्त केला नव्हता.' -भाब ८१. २ मोडकें; तुटकें; मोडकें तोडकें; भग्न; मोडकळीस आलेलें. (घर, विहीर, इ०) 'सर्कारचे कारखान्यांतील थोरल्या तोफांची मारगिरी आज रात्रौ सुरू करून दिवाळ शिकस्त जाल्यावर उपगन्तिक हल्याचा बेत ठरेल.' -ख १२.६२९०. ३ निरुपयोगी; कुचकामाचें; -स्त्री. १ पराभव. 'मीरफैजल्लास त्यांणीं शिकस्त दिल्ही.-ख ७८५. २ मोड; दुर्दशा; भग्नदशा; नष्ट स्थिति; 'राजश्री सुभेदारांकडील लोकाची शिकस्त जाली'. -दिमरा २१६५. 'परंतु सिबाड जाया न जाहली व शिकस्तही न जाहली. -वाडबाबा ४.१४४. [फा.] ०करणें-१ (कागद, तांब, तक्ता वगैरे घडी घालून चार रकाने पाडणें. ०खाणें-हार खाणें 'शिकस्त खाऊन तोही फिरला।' -ऐपो २१०.

**शिकस्त**—स्त्री. कमाल; पराकाष्ठा; अत्युच्चता (कृत्य, इ० ची) वर पहा. [फा.]

**शिकळ**—स्त्री. (कु.) पानें किंवा फळें दोऱ्यांत ओवून केलेली माळ.

**शिका**—पु. शिक्का पहा.

**शिकायत**—स्त्री. (व.) तक्रार; फिर्याद; कागाळी. 'मुलाची पोट दुखण्याबद्दल शिकायत आहे. [अर. शिकायत्]

**शिकार**—स्त्री. १ पारध; मृगया; (सावजाचा) पाठलाग; शोध. २ सावज; मृग; पारध करावयाचा प्राणी. ४ (ल.) लग्गा; संधान (बहुधा निंदार्थी) (क्रि० साधणें). ५ अचानक मोठा लाभ; टावकें. म्ह० साधली तर शिकार नाहीं तर भिकार [फा. शिकार] ०खाना-पु. पारधी पशुपक्ष्यांचा भरणा; रानटी पशुपक्षी ठेवण्याची जागा; प्राणिसंग्रहालय. तत्संबंधींचा कारखाना. [फा.] ०गाह-पु. १ शिकारीची जागा; २ शिकार. 'कमठाणें येथें शिकारगाहाकरितां नबाब जाऊन राहणार' -रा ७.८५. ०दार-पु. (ना.) शिकारी; पारधी. ०बंद-पु. शिकारी स्वाराच्या खोगिराला मागेंपुढें लावलेले बंद प्रत्येकीं [फा] ०बाज- पु. पारधी; शिकारी. **शिकारी**-पु. शिकार करणारा; -वि. पारध करण्यासंबंधीं; मृगयेसंबंधीं; पारधीच्या, शिकारीच्या उपयोगी. [फा. शिकारी] ०चित्ता-पु. शिकार करावयास शिकविलेला चित्ता.

**शिकारणी, शिंकारणी**—स्त्री. १ टांगण्यासाठीं टोपली, भांडें इ०ला बांधलेली दोरी. २ शिंक्याची, टांगलेली टोपली. **शिकारणें**-शिंकाळणें पहा. **शिकारी**-शिकरी पहा. [सं. शिक्य]

**शिकारी**—स्त्री. १ शिकरी; रहाटाच्या माळेला लोटा बांधावयाचा दोर, दोरी; २ भांडें, टोपली इ० च्या गळयाला शिंकाळें करण्यासाठीं बांधलेली दोरी. ३ आंबे किंवा नारळ उतरावयाची टोपली. ४ नारळाच्या झाडावर चढण्यासाठीं केलेला दोरीचा पायंडा. [सं. शिक्य]

**शिकारोखा**—पु. वर्चस्व; अधिकार; स्वामित्व (क्रि० करणें; दाखविणें; मिरविणें; लावणें)..[शिक्का+रोखा]

**शिंकाळ-ळी, शिंकाळी**—स्त्री. १ भांडयाला शिंक्याप्रमाणें बांधावयाची दोरी. २ भांडें सर्व बाजूंनीं सारखें उचललें जाऊन नेण्यास सोयीवार पडावें म्हणून त्याच्या गळयाभोंवतीं दोरीचा फास घालून वर हाताला धरतां येईल अशी योजना. ३ नीट उचलतां यावें म्हणून ज्याच्या गळयाभोंवतीं दोरी बांधलेली असते असें पात्र. ४ (व.) पाणी ओढण्याची दोरी. **शिकाळणें, शिंकाळणें**-उक्रि. १ शिंकें करणें, शिंक्याला लावणें (भांडें, टोपली इ०). २ लोंबत असणें, राहाणें (एखाद्याचा धंदा, वृत्ति सोडून). **शिंकाळणें**-न. शिंकाळें असलेलें भांडें.

**शिकी**—स्त्री. (नाविक) १ गलबताचें शीड गुंडाळून काठीस बांधावयाचें उपयोगी असा शिडास संबद्ध केलेला दोरीचा तुकडा. २ शिडाची गुंडाळी, घडी.

**शिकील**—शिकल पहा.

**शिकीळें**—न. (कों.) चिमणी.

**शिकें, शिंकें**—न. १ वस्तु टांगून ठेवण्यासाठीं दोरी विणून करतात तें जाळें, पाश; अधांत्री सांखळीसारखी केलेली विशेष प्रकारची योजना. २ जड वस्तु उचलून नेण्याकरितां वाशास टांगावयाकरितां केलेली दोऱ्यांची योजना, जाळी. ३ तराजूच्या दोऱ्या. [सं. शिक्य, शिक्या, शिक्यिका; प्रा. सिक्कग, सिक्किअ] म्ह० शिक्याचें तुटलें, बोक्याचें पटलें-फिटलें= आयताच फायदा; अकल्पित रीतीनें एखादयास पाहिजे तें मिळणें. **शिक्याला हांत पुरणें**-(व.) मुलगी ऋतुस्नात होणें, वयांत येणें.

**शिकेकई, शिकेकाई**—स्त्री. एक प्रकारचें झाड व त्याच्या शेंगा; या शेंगांची पूड न्हातांना केंस स्वच्छ करण्यासाठीं वापरतात. साबणाप्रमाणेंहि उपयोग करतात. [ते. शिगा=बुचडा; ते. का. काई=शेंग. सं. शिखा.]

**शिकोरा**—पु. खापराचें झांकण. **शिकोरी**-स्त्री. (व.) खापराची पणती; खापरी. 'शिकोरीमध्यें कढी घ्या'.

**शिकल**—स्त्री. १ सूरत; तोंड. २ बिशाद; हिकमत. ३ आकार; स्वरूप. [अर. शक्ल्]

**शिक्का**—पु. १ नाण्यावरील छाप, चिन्ह, मुद्रा; ठसा. 'बादशहाची चाल अशी आहे कीं...शिक्क्यांत नांव भरावयाचें तें' —वाडसनदा २३. २ राजघराण्यांतील राजकर्त्याचा छाप; राजमुद्रा; सरकारी मुद्रा, मोहोर. ३ शिक्क्याचा ठसा, उठाव. ४ कापडावरील, फळावरील, शरीरावरील, खूण चिन्ह, डाग, छाप. ५ अंगावर (देवी इ०) टोंचलेल्याची खूण, व्रण. ६ नांवाचा, अक्षरांचा छाप; सील. **शिक्का-मोहोर**-पु. (व.) बायकांच्या बोटांत घालण्याची आंगठी. [फा. शिक्का]

**शिक्य**—न. मेण; मधमाशांच्या घरटयाचें मेण. [सं.]

**शिक्केकटार**—स्त्री. १ (शिक्का आणि कटयार या) राजचिन्हांबद्दलचा व्यापकार्थी शब्दप्रयोग; अधिकारचिन्हें; राज्याधिकाराचीं चिन्हें २ (ग्राम्य) प्रेतापुढें तिकटयावर विस्तव घातलेलें मडकें नेतात तें. **शिक्केकरी**-शिक्केनीस पहा. **शिक्केदाणी**-स्त्री. सरकारी शिक्के ठेवण्याची डबी. हिला पुढें असून ही बहुधां चांदीची असते. **शिक्केदौत**-स्त्री. शिक्क्याची शाई ठेवण्याची दौत. **शिक्केनवीस-नीस**-पु. राजाचा शिक्का संभाळणारा, शिक्का मारणारा अधिकारी; राजमुद्राधारी; मुद्राधिकारी. [फा.] **शिक्केनविशी-निशी**-स्त्री. शिक्केनिसाचा धंदा, हुद्दा [फा.] **शिक्केबरदार** पु. राजचिन्हें (शिक्केकटार) बाळगण्याकरितां नेमलेला अधिकारी. [फा.] **शिक्केशाही लोखंड**-न. उंची लोखंड. वरिष्ठ प्रकारच्या लोखंडाची जात. **शिक्की, शिक्केचीं**-पु. शिक्का लावणारा. —भासवृत्त ६.८५.

**शिक्की**—स्त्री. (व.) १ हौस; उत्सुकता. 'कामाची शिक्की'. २ दहशत; धाक. 'मुलाची शिक्की फिटली'.

**शिक्वा**—पु. तक्रार; कागाळी. 'न जाणों, पूर्वी खोजीमकुलीखानांहीं गिल्लाशिक्वाही आमचा काय लिहिला असेल' —रा ६.६०२. [अर. शक्वा]

**शिखंड**—पु. १ मोराचें शेपूट; मयूरपुच्छ. २ मोराच्या डोक्यावरील तुरा. ३ लहान मुलाच्या डोक्यावरचे जावळाच्या वेळीं राखलेले दोन्ही बाजूंचे केस; झुलपें. [सं.]

**शिखंडी**—पु. मोर. 'वीरा! तुवां करावें भीष्मीं, नागीं करी शिखंडी तें।' —मोभीष्म ८.४७. १ द्रुपदाचा पुत्र. हा मूळचा स्त्री असून पुढें याला पुरुषत्व प्राप्त झालें होतें. 'अद्‌भुत झालें, वधिला त्वत्तात शिखंडिनें, गजें हरिसा।' —मोभीष्म १.९. २ (ल.) नपुंसक; तृतीयप्रकृतीचा; हिजडा; अर्धनारी; उभयलिंगक. [सं.]

**शिखणें, शिखणाऊ, शिखविणें, शिखवणी**—शिकणें, शिकणाऊ, शिकविणें, शिकवणी इ० पहा.

**शिखर**—न. १ डोंगराचा किंवा पर्वताचा माथा, शिरोभाग; झाडाचा शेंडा; देवालय, घर इत्यादींचा शिरोभाग; (सामा.) वरचें अग्र; टोंक; कळस. २ सुळका; मनोरा. ३ (मोठेपणा, सद्‌गुण किंवा दुर्गुण यांचा) कळस; पराकाष्ठा; कमाली. 'त्यांतून कवींचे विचार तर्कशास्त्राच्या तराजूंत जोखून पाहणें हें तर अरसिकतेचें केवळ शिखर होय।'. —नि. ४ (व्यवहाराचा) शेवट; अखेरी. ५ (संगीत) एका तालाचें नांव. ह्यांत मात्रा सतरा व विभाग चार असतात. **शिखरास जाणें**-(त्या त्या गोष्टीचा) कळस, पराकाष्ठा होणें. **शिखरास हात पोचणें**-कृतकृत्य होणें; मनोरथ पुरतेपणीं सफळ

होणें; महत्त्वाकांक्षा तृप्त होणें. **शिखरापुरीस-शिकरापुरीस जाणें**-(विनोदानें) 'ग'ची, अतिशय गर्वाची बाधा होणें. **शिखरीं काठ्या लागणें**-(जेजुरी किंवा मढी या गांवीं खंडोबाचे भक्तगण उंच काठ्यांना पताका लावून वाजत गाजत जाऊन खंडोबाच्या देवळाच्या शिखराला सदर काठ्या लावतात यावरून ल.) हातीं घेतलेलें काम शेवटास नेणें; ध्येय, उद्देश गांठणें; कृतकृत्य होणें. **शिखरीं पोट लागणें**-(आकंठ भोजन, पान, रोग किंवा गर्भारपण यांमुळें) पोट वाढणें; फुगणें. (सामा.) वाढणें; मोठें होणें. **०मणि, शिखरामणि**-पु. शिरोमणी पहा. **शिखरी**-वि. कळसाचा; शिखर असलेला (पर्वत, डोंगर). [सं.]

**शिखरण**—शिकरण पहा. केळीं, खरबुजें इ० दुधा-दह्यांत कुसकरून केलेलें पक्वान्न. 'एक मधुर शिखरणी। श्वेत भक्ष्य पंचवरान्नी।' –मुआदि २९.८३.

**शिखरिणी**—स्त्री. एक वृत्त. यांत १७ अक्षरें आणि य, म, न, स, भ, ल, ग हे गण असतात. उदा० अहो येतां जातां उठत बसतां कार्य करितां। [सं.]

**शिखा**—पु. (व. ना.) पावसाची लहान सर. [सं. सिच्–सेच]

**शिखा**—स्त्री. १ शेंडी. २ केंसांचा झुबका; डोक्यावरचे केंस (कोंबडा, मोर इ० च्या); (सामा.) तुरा; शेंडी. ३ घोड्याच्या डोक्यावरचा तुरा; कलगी. ४ अग्नीची ज्वाळा; दिव्याची ज्योत. 'दीपू तोचि तो हा म्हणती। परी शिखा क्षणाक्षणा जाती।' –एभा ७.५२९; –ज्ञा १४.५५. 'नातरी दीपमूळकीं। दीपशिखा अनेकीं।' –ज्ञा १४.५५. ५ पीडा; छळ. दर्भशिखा पहा. [सं.] **०मागें लागणें**-कांहीं तरी त्रास, आपत्ति यांनीं सदोदित एखाद्याचा पिच्छा न सोडणें. **०नष्ट**-वि. १ शेंडी नसलेला. २ (ल.) मुसलमान; यवन. [सं.] **०मणि**-पु. १ मुगुटांतील मणी. २ उत्तम जातीचा मणि; उत्कृष्ट रत्न. [सं.] **०सूत्र**-न. शेंडी व जानवें (हीं ब्राह्मणत्वाचीं दोन मुख्य बाह्य चिन्हें आहेत.) [सं.] **०सूत्रावर येणें**-(शिखा व यज्ञोपवीत तोडून टाकण्याची तयारी करणें) अत्यंत क्रोधाविष्ट होणें; वैतागणें. **शिखी**-वि. शेंडी, तुरा असलेला (पक्षी इ०); शिखर असलेला (डोंगर इ०); शिखरी. -पु. १ मोर. २ अग्नि. 'शिखी स्थापिला दाटला धूम्र व्योमीं। जपे रावणू मंत्र व्हाया अरामी' –मुरायुद्ध २८७. [सं.] **शिखिनी**-स्त्री. लांडोर.

**शिग**—स्त्री. सळई (लोखंड, तांबें, पितळ इ० ची).

**शिंग**—न. १ शृंग; विषाण; जनावराच्या डोक्यावरील एक अणकुचीदार गात्र. २ या आकाराचें एक वाद्य; कर्णा. [सं. शृंग; प्रा. सिङ्ग; गु. हिं. सींग; बं. उरिया शिंग; फ्रेंजि. शिंग] **म्ह०** १ आलें अंगावर घेतलें शिंगावर. २ म्हशीचीं शिंगें म्हशीस जड नसतात. स्वतःच्या गोष्टीचें किंवा स्वकीयांचें कोणास ओझें वाटत नसतें. ३ शिंग्यांक तारूं गाबत्याक गोरूं. (गो.) शिंग वाजविणाऱ्याला जर तारूं दिलें व गाबत्याला जनावर (गुरूं) दिलें तर त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. (वाप्र.) **शिंगें असणें**-भेद असणें. (मनुष्य आणि पशु यांत ठळक भेद शिंग म्हणून). 'दहा वाजण्याला कांहीं शिंगें आहेत काय?'. **शिंगें फुटणें**-वेडेपणा, अति शहाणपणा करणें. **शिंगें मोडून वासरांत शिरणें**-१ जाणत्या माणसानें पोरकटपणा करूं लागणें. २ अज्ञपणाचें ढोंग करणें; शहाणपण दडवून मुलांप्रमाणें मूढ बनणें. **शिंगावर घेणें**-टक्कर घेणें; चांगलें तोंड देणें; लढणें. **शिंगटें**-न. १ (तिरस्कारार्थी) शिंग; शिंगाचा तुकडा; मेलेल्या जनावराचें शिंग. 'मणी होता शिंगटाचा। लोभ धरूनिया तयाचा। मूर्खपणें राज्याचा। अन्हेर केला।' –दा ५.६.६२. २ बंदुकीच्या दारूनें भरलेलें शिंग. (दारू उडविण्याकरितां). **शिंगटणें, शिंगाटणें**-क्रि. १ शिंगानें मारणें; शिंगावर घेऊन फेकणें. २ (ल) अतिशय रागें भरणें; खरडपट्टी काढणें. ३ (ल.) ठकविणें; फसविणें. **शिंगडा, शिंगाडा**-पु. १ पाण्यांतील एक वेल, व तिचें फळ. २ गोड्या पाण्यांतील एक मासा. ३ बंदुकीची दारू भरून ठेवण्याचें शिंग; दारू ठेवण्याचें पात्र. 'मुलानें कंबरेस दारूचा शिंगाडा बांधला होता त्यास आग लागली'. –तीप्र १३६. ४ एक प्रकारची ऐरण, साधी आणि संदान ह्याहून जरा निराळी. खिळे व भांडीं घडावयाची. ५ खणाची त्रिकोणी घडी. ६ शिंगांच्या आकाराचें खुंटाळें. [सं. शृंगाटक, संघाटिका] **शिंगडें**-न. बैलाच्या शिंगावरील एक दागिना. **शिंगदोरी**-स्त्री. मध्यें घुंगुर घालून शिंगाभोंवतीं बांधलेली दोरी. **शिंगशिंगोटी**-स्त्री. १ जनावरांचीं शिंगें, हाडें इ० (मेलेलीं जनावरें टाकतात त्या जागेवरचीं); गुराढोरांचीं पडलेलीं शिंगें, हाडें इ०. २ (व्यापकपणें) शिंगें असलेलें जनावर, पशु. ३ शिंगाड्या जनावरांच्या विक्रीवरची सरकारी पट्टी; शृंगादाय. –राव्यको. **शिंगाटणें**-न. बैलाच्या शिंगदोरीला बांधलेला हस्तीदंताचा तुकडा. **शिंगाडा-डी-ड्या**-पु. शिंग फुंकणारा, वाजविणारा. –वि. मोठ्या व लांबलचक शिंगाचा. **शिंगाडा वेल**-पु. शिंगाच्या आकाराची वेलबुट्टी. **शिंगाडी**-स्त्री. १ शिंगाड्याचा वेल. २ गाडीच्या पुढें असणारे उभे दांडे. ३ जोडा सैल करण्याकरितां चांभार वापरतात तें शिंगासारखें हत्यार. **शिंगाडें**-न. पोळ्याच्या दिवशीं बैलाला तेल पाजण्यासाठीं, भोंक पाडलेलें शिंग वापरतात तें. **शिंगाळ**-वि. १ लांब शिंगें असलेलें. २ मारकट; शिंगें मारणारा (बैल). ३ (ल.) आसपासच्या सर्व माणसांना त्रास देणारा किंवा त्यांच्या खोड्या करणारा उपद्रवी इसम. **शिंगाळणें**-क्रि. शिंगानें मारणें;

शिंगाटणें. **शिंगाळू**-वि. १ शिंगें फुटूं लागलेला ( बकरा, मेंढा, काळवीट इ० ). २ मारकट; शिंगांवर घेणारा. ३ मोठ्या व लांबट शिंगांचा. **शिंगाळें**-न. (जनावराला धरण्यासाठीं त्याच्या) शिंगांच्याभोंवतीं बांधलेली दोरी. **शिंगाळें केळें शिंगाळी केळ**-न. एक जातीचें केळें. **शिंगाळ्या**-वि मोठ्या किंवा लांबलचक शिंगांचा. **शिंगी**-स्त्री. १ वाजवण्याचें लहान शिंग ( कानफाट्या गोसाव्याचें ). २ लहान शिंगरूं ( मादी ) अल्पवयस्क घोडी. **शिंगोटी**-स्त्री. १ जनावराच्या शिंगाबद्दल अल्पार्थक शब्द. शिंगट. २ ( समुच्चयार्थी ) शिंगांचीं जनावरें. ३ ( सामा. ) शिंगाचें जनावर. 'दोन शिंगोट्या होत्या त्याही सरकारांत नेल्या.' ४ शिंगांचें जनावर विकणाऱ्यापासुन घ्यावयाचा कर. ५ बैलाच्या शिंगाला बांधलेली दोरी; शिंगाळें. म्ह० शिंग, तिकडे शिंगोटी-शिंगाचें जनावर म्हटले कीं सरकारी कर आलाच. [ हिं ]

**शिंगटापाग**—पु. ( कों. ) एका जाळयाचें नांव. [ शिंग+पाग=जाळें ]

**शिंगटी-डी**—स्त्री. एक जातीचा मासा.

**शिंगट्या**—पु. बिन खवल्याचा मासा. –बदलापूर १३२.

**शिगडी-री**—स्त्री. ( कों. ) नारळाच्या झांपाचें टोक किंवा पातीचें टोंक; शिगा [ शीग ]

**शिंगडी-डें**—स्त्री.न. ( कों. ) वाळलेल्या शेंगांची रास ( पावटा, तूर इ० द्विदल जातीच्या धान्याच्या ). [ शेंग ]

**शिगर, शिगार**—न. चोई; पत्रावळ लावण्याच्या बारीक काड्या प्रत्येकी. [ शीग ]

**शिगरी**—स्त्री. कोंवळा मोड, अंकुर; मिटलेल्या पानाची सुरळी. [ शीग ]

**शिगरी**—स्त्री. ( प्रां. ) भांडें ठेवण्याचें, नेण्याचें दोरीचें शिंकाळें. [ शिंकें+दोरी ? ]

**शिंगरू**—न. घोडें, खेचर, गाढव इ०चें लहान पोर, बच्चा; बछडें. [शिंगा] **शिंगरूप**-वि बच्चा; छोटा ( घोडा ) **शिंगरट**-न. शिंगरू शब्दाचें प्रेमळ किंवा तिरस्कारयुक्त रूप. **शिंगरवट**-वि. वयांत न आलेलें ( शिंगरू, शिंगा ). [ शिंगरू+वत् ] **शिंगा**-पु. शिंगरू; गाढव किंवा घोडा यांचें पिल्लू ( नर ). **शिंगी**-स्त्री. १ शिंगरूं; घोड्याचें पिल्लू. मादी. २ ( ल. ) छबेली; छोकरी.

**शिंगरुप-ब**—पु. हिंगूळ; रससिंदूर. [ फा. शंगर्फ ]

**शिंगऱ्या-डिंगऱ्या**—स्त्री. अव. ( खा. ) मुळयाच्या शेंगा.

**शिंगस्त**—न. ( ना. ) सिंहस्थ ( अप. )

**शिंगळद्वी(द्वी)प**—न. ( प्र. ) सिंहलद्वीप; सिलोन. [ सं. सिंहलद्वीप ]



**शिगा**—पु. ( को. ) माडाचे झावळीचा किंवा पातीचा अग्रभाग. शिगडी पहा.

**शिंगाडो**—पु. ( कु. ) सांबर. [ शिंग ]

**शिंगाळ-ळा**—( कों. ) एक मासा; समुद्रांतील एक काळा मासा.

**शिंगाळी, शिंगेळी केळ**—स्त्री. एका जातीची केळ. **शिंगळें-शिंगाळें केळें, शिंगेळी केळें**-न. शिंगाळी केळीचें फळ.

**शिगूफ, शिगूफा**—स्त्री.पु. फूट; बखेडा; मसेला. 'दर्म्यान असे सिगुफेमुळें मोठें मसलतींत कमती येते.' –रा १०.१६५. [ फा. शिगाफ् ]

**शिंगोटी**—पु. ( व. ) भुंगा; भोंगुळ.

**शिग्राम**—पु. धमणी; बैलांची गाडी. एक विशिष्ट आकाराची घोड्यांची गाडी.

**शिग्रु**—पु. शेगवा; शेवगा. [ सं. ]

**शिघ्रळ, शेघ्रळ**—स्त्री. मुंडावळ; बाशिंग. [ सं. शीर्ष्+गल् ? ]

**शिंचा**—पु. ( संक्षेप ) शिंदळीचा; एक शिवी; शिनळ स्त्रीचा मुलगा ( यांतला वाईट अर्थ निघून गेला आहे ). 'शिंच्यानें ( दक्षणा ) विनाकारण बुडविली.' –नमना ४७.

**शिजणें**—क्रि. १ पाण्यांत उकळून मऊ होणें; उकळत असणें; रांधलें जाणें. २ पक्व होणें; तयार होणें. ३ त्रासणें; संताप होणें. 'भाग्यें माजे दरिद्रें शिजे.' ४ (ल.) विचारांत असणें; घाटत असणें; तयार होत असणें. 'तुमचेकडे मुलगी यावी असें शिजतें आहे. निश्चय होईल तेव्हां खरें' ५ चालणें; घडून येणें. –मूल २६. 'त्याचें त्या ठिकाणीं कांहींहि शिजतें' –अकर्तृक. उष्मा, उकाडा होणें. [ सं. सिध्, स्विद्; प्रा. सिज्ज; पं. सिज्जणा; सिं. सिझणु; हिं. सिझाना सिजाना; गु. सिजवुं; ओ. सिजिबा ] **शिजवक**-न. ( राजा. ) भात, भाकरी इ० उरलेलें शिजलेलें अन्न. **शिजवण**-स्त्री. न. शिजलेला पदार्थ. **शिजविणें**-क्रि. पाण्यांत उकळून तयार करणें; रांधणें; उकडणें. **शिजाळू**-वि. लवकर शिजणारें ( डाळ, अळू, इ० पदार्थ ). **शिझणें, शिझाळू**-शिजणें, शिजाळू पहा.

**शिजदा**—पु. नमन; वंदन; जमिनीवर डोकें टेंकून वंदन; [ अर. सिज्दा ]

**शिट**—स्त्री. शितोडा; सडा; पाण्याचे उडणारे बारीक थेंब; पर्जन्यतुषार. ( क्रि० उडणें; उडवणें; मारणें ) 'पावसाची शिट लागूं नये म्हणून पागोळीला झडी बांधली पाहिजे. [ सं. सिच् ]

**शिट, शिट**—स्त्री.पक्ष्यांचा मल, विष्टा. शीट पहा. **शिटवा**-पु. (राजा.) वाघळाची, पाखराची विष्टा; शीट, **शिटणें**-क्रि. विष्टा

टाकणें. (पक्ष्यादिकांनीं); मळ थोडा पडत असेल तेव्हां लहान मुलांसंबंधींही उपयोग करितात. २ घोडीनें उनाड सुटून हलक्या प्रतीच्या घोड्यांपासून मैथुन करून घेणें. **शिटवा**-पु. (राजा.) वटवाघूळ, पक्षी इ० ची विष्टा, शिट पहा. **शिटाऊ, शिटाव, शिटवा**-वि. (ग्राम्य) १ एखाद्या मरतुकड्या घोड्यापासुन झालेलें (शिंगरूं), शिटलेल्या घोडीपासून झालेला वाईटसाईट (घोडा इ०). २ (ल.) क्षुद्र, अकुलीन हरामी इसमाबद्दल वाप रावयाचा अपशब्द; छाकटा; हलकट; पाजी; हीन; नीच. ३ (अशिष्ट) धूर्त; हुषार; लबाड; बिलंदर, सोदा अशा अर्थानें लहान मुलाबद्दल योजतात. ०**बंदर**-न. लबाड, सोदे, भामटे वगैरे तऱ्हेच्या लोकांनीं भरलेलें बंदर. 'गुरुजी ह्यापरिचे। शिष्य शिटाऊ बंदरीचे.' ०**बंदरी**-वि. धूर्त; ठक; लबाड; सोदा. **शिटाचें शिंगरूं**-न. शिटलेल्या घोडीपासुन झालेलें शिंगरूं; हीन अवलादीचें शिंगरूं. **शिटावणें**-क्रि. लबाड, लुच्चा बनणें, होणें; खोड्या करण्यास प्रवृत्त होणें; बिघडणें (मुलांसंबंधीं प्रयोग). [शिटाव]

**शिटकळ**—स्त्री. शिसारी. 'ज्याणें एकदां एरंडेल घेतलें असेल त्यास पुन्हां त्याचें स्मरण झालें तर शिटकळ येते.'

**शिटा**—पु. शिंतोडा. शिट पहा.

**शिटी**—वि. छिटी; चिटाचें केलेलें. [छीट]

**शिटी**—स्त्री. शीळ. (क्रि० वाजविणें; वाजणें). [ध्व]

**शिंटी**—स्त्री. एक लहान झाड.

**शिटुक**—वि. (कों.) चलाख; हुषार; चपळ; टिकाऊ.

**शिट्टो-ट्टो**—स्त्रीपु. (गो.) एक प्रकारचें भात.

**शिडकणें**—क्रि. (प्रा.) सडकणें; काठीनें, छडीनें बडवणें; मारणें.

**शिडकणें-कावणें**—उक्रि. शिडका टाकणें; शिंपडणें; शिंपणें. [हिं छिडकना] **शिडकाव-वा**-पु. शिडका; छिडकाव; शिंपडणें. [हिं. छिडकाव]

**शिडका**—वि. (तंजा.) चिडणारा; चिडका. [द्रा. सिडुकु]

**शिडंब**—पु. एक जंगली झाड.

**शिडशिड, शिडशीड, शिडशिडी**—क्रिवि. १ द्वाहां म्हणतां येऊन, पडून (पावसानें). २ तिरसटपणानें; चिडीनें; (बोलणें, वागणें, हडहड, छिटफिट, हिडिसफिडिस करणें). [ध्व.] **शिडशिडणें**-अक्रि. शिडशिड पडणें (पावसानें); जोराची पण अल्पकालीन पावसाची सर येणें. **शिडशिडी**-स्त्री. (कों.) पावसाची जोराची अल्पकालीन सर; थोडासाच पण जोरानें पडून जाणारा पाऊस.

**शिडशिडा**—वि. (व.) १ थकलेला. २ खिळखिळा.

**शिडशिडीत**—वि. (राजा) (प्र.) सडसडीत. १ सडपातळ; कृश; पातळ शरीराचा. २ फडफडीत; मोकळा व रुक्ष (शिजलेला भात वगैरे). [सडा, सडसडीत]

**शिडा, शिडासांटा**—वि. (राजा.) सडा. सडासांटा पहा.

**शिडाईत**—न. कलम; पैवंद. **शिडाइती**-वि. कलम लावून झालेलें; कलम केलेलें (आंबा, इ० झाड).

**शिडी-ढी**—स्त्री. १ दोन लांब उभ्या लाकडांना आडवीं लहान लांकडें जोडून उंच चढण्यासाठीं करतात तें साधन; पायऱ्या; निसण. २ सोपान; जिना; दादर. [सं. श्रेढी; देप्रा. सिड्ढी; हिं. सीढी]

**शिणक, शिणीक**—स्त्री. चमक; ठणका; तिडीक; कळ; वेदना. (हात, पाय इ० अवयवांतून निघणारी). (क्रि० उठणें; निघणें). **शिणकणें**-क्रि. ठणकणें; ठणका लागणें; शिणकांनीं व्यथित होणें.

**शिणगार**—पु (प्र.) शृंगार पहा. [सं. शृंगार] **शिणगारणें-शिणारणें** क्रि. (प्र.) शृंगारणें पहा. 'शिणगारांत अठरा मण तूप जळालं.' (व) नेसण्या सवरण्यांत, दागिने घालण्यांत बराच वेळ लागला म्हणजे सुनेला सासू म्हणते.

**शिणणें**—अक्रि. १ थकवा, शीण येणें; दमणें; थकणें; भागणें; श्रमणें. २ त्रास घेणें; श्रम करणें; कष्टणें. 'सर्वस्वें शिणोनि एथें। अर्जेवावीं संपत्तिजातें।' -ज्ञा ३.२०७. 'म्हणे परम कृपाळु रघुवीर। मजकारणें शिणतो।'. **शिणत शिणत**-क्रिवि. अतिशय काकुळतीनें. 'शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तूझी।' -राकरुणा. **शिणवटा, शिणोटा**-पु. अतिशय शीण; थकवा; ग्लानि; भागवटा; अशक्तपणा. (क्रि० येणें; होणें). **शिणारणें**-अक्रि. शीण येणें. [शीण]

**शिणशिणणें**—शिवशिवणें पहा.

**शिणा**—पु. छातीच्या हाडांना लपेटलेला मांसल भाग; छातीचें मांस.

**शिणारणें**—उक्रि. १ शीण, चीण, चीर भरणें; फटी बुजविणें. २ चिणणें; दरांत दगड वगैरे घालून पक्कें करणें; खांब वगैरे जमीनींत चिपा घालून घट्ट बसविणें. [चीण, शीण]

**शितडणें**—सक्रि (कों.) शिंपडणें; सडा टाकणें. -अक्रि. थेंब थेंब पडणें; उगीच भुरभुरणें (पावसानें). **शितडा**-पु. शिंतोडा; सडा; उडालेला थेंब. (क्रि० उडणें; उडवणें; मारणें).

**शितम**—पु. खाडींतील एक जातीचा लहान पांढरा मासा.

**शितर-री**—नस्त्री. लहान झोपडें; छायेकरितां केलेलें छप्पर.

**शितरणें**—उक्रि. चितरणें पहा.

**शितरणें, शिंतरणें**—क्रि. छिनाविणें; फसवून नागविणें. 'पाश तस्कर वाटपाडा। वेष दाऊनि शितरी मूढा।' –मुआदि २५.११. **शिंतरू, सिंतरू**–वि. फसविणारा. 'शठ शुंभ कातरु। लंड तर्मुड सितरू।' –दा २.३.२९.

**शितरपाड**—वि. चपळ; चलाख; तीक्ष्ण; हुषार; तडफदार. **शितरपाडी**—स्त्री. चपळता; चलाखपणा; हुषारी.

**शितरें**—न. (खा.) बांबूचा तट्टया; चटई (गाडींतील सामान बाहेर पडूं नये म्हणून बाजूंना लावतात).

**शितळ, शीतळ**—वि. शीतळ पहा. १ थंड; गार. २ सौम्य; सुलभ; सोपा; खर नव्हे असा (उतार वगैरे) [सं. शीतल] ०**चंद**-पु. मद्दड; मठ्ठ; रेंगाळणारा; सुस्त मनुष्य. ०**शिमगा**-पु. १ शिमगी पौर्णिमेच्या पुढील दिवस; धुळवडीचा दिवस; होळी थंड करण्याचा दिवस. २ शिमग्यामध्यें (वसंतपंचमीस) गांठया, बसंती रंगाचीं आंगडींटोपडीं मुलांस द्यावयाचा सण. **शितळाई**-स्त्री. १ थंडपणा; थंडावा. २ शितळता; थंडाई. [सं. शीतळ]

**शितळचिनी**—स्त्री. एक झाड; कंकोळ.

**शितळपाटी**—स्त्री. शीतला झाडापासून केलेली मऊ, गार चटई.

**शितळादेवी**—स्त्री. शीतलादेवी. देवी रोगाची अधिष्ठात्री देवता. [सं. शीतलादेवी]

**शितळान**—स्त्री. (ना.) सूर्य उतरूं लागणें; ऊन कमी होणें; शीतळाई. [सं. शीतळ]

**शिता**—पु. (कों.) स्त्रियांचा केसांचा भांग; भांगांतील उभी रेघ. [सं. सीता=नांगराचे तास.]

**शितागौरी-चंवरी**—स्त्री. एक झाड. [सं. सीता+गौरी]

**शिताप, शितापी, शिताफ, फी**—शिताब, शिताबी, सिताफी पहा.

**शिताफळ-ळी**— स्त्री. एक फळ झाड. –न. त्याचें फळ. [सं. शीतफल]

**शिताब**—वि. १ चपळ; चलाख; तडफदार. २ उत्साही; हौशी; कळकळीचा. [फा. शिताब्]

**शिताब-बी**—स्त्री. १ चलाखी; चपळाई; तडफ; हुषारी; कुशाग्रता. सिताफी पहा.

**शितारणें**—क्रि. म. शितरणें, चितरणें पहा.

**शितिकंठ**—पु. १ शंकर; शिव. २ मोर. [सं.]

**शिती**—स्त्री. एकविटी भिंत; पडभिंत; पडदी.

**शितें**—न. १ (विणकाम) शीत पहा. २ बायकांच्या केसांतील भांग; रेषा. शिता पहा.

**शिनेचा कानवला**—पु. एका जंगली झाडाचें पान. याचा आकार कानवल्याप्रमाणें असतो. [सीता+कानवला.]

**शितैन, शित्तैन**—वि. साठ; ६० संख्या. [अर. सित्तीन्]

**शिंतोडा**—पु. १ पडलेला, उडालेला थेंब; पाण्याचा कण. (क्रि. उडणें; उडवणें; मारणें) २ सिंचन; प्रोक्षण; शिडका. ३ सेक; सडा. [सं. सिच् हिं. छीटा] ०**टाकणें-उडविणें**-(ल.) थोडासा कलंक लावणें; थोडासा दोष देणें; जातांजातां एखाद्याविषयीं लहानसें कुत्सित विधान करणें. **शिंतोडणें**-सक्रि. शिंपणें; शिंपडणें; सिंचन करणें. –अक्रि. थेंबथेंब पडणें (पावसानें).

**शिंतोडा**—पु. (कों) कळकाची फांदी; बांबूस बाजूला फुटलेलें शिरें, छडी.

**शित्ता**—वि. सहा; ६ संख्या. [अर. सित्त.]

**शिथकण, शिथवड**—पु. (कों.) शीतकण पहा.

**शिथड**—स्त्री. (विणकाम) हातमागाचा एक भाग; शीत; ओंवीच्या बाहेर साधेच्या शेवटीं असणारीं आडवीं दोन लांकडें.

**शिथिल**—वि. १ सैल; ढिलें; मजबूत, बळकट नसलेलें. २ नेभळट; मंद; मठ्ठ; निरुत्साही; निर्बल. [सं.] ०**गात्र**-वि. नि:शक्त व निर्बल अवयवांचा. कमजोर अवयव असलेला. (सामां.) दुर्बल. [सं.]

**शिंद**—स्त्री. खजूरीच्या जातीचें एक जंगली झाड. [हिं. सेंध.]

**शिंद-ध**—स्त्री. १ कुडाची भिंत; बांबूच्या चिपा, कारवी वगैरेची गिलावा केलेली भिंत. (क्रि० भरणें; घालणें). २ असल्या प्रकारची भिंत रचण्याचें सामान. [हिं. सं. संध्]

**शिदड, शिदींड**—पु. १ गोंधळ; काह्. 'श्रावणमासा शिदड मातले शेषाघरीं नेऊं लग्न।' –पला ३.

**शिंदणें**—क्रि. (कु. कों.) सेंदणें; विहिरींतून पाणी वर काढणें. (यांत्रिक साहाय्यानें किंवा नुसत्या हातांनीं). [हिं. सेंदना.].

**शिंदपास देणें**—क्रि. माडी काढण्यास नारळाचें झाड देणें. 'माड शिंदपास दिला.' –कृषि ७५८.

**शिदलाडू, शिरंलाडू**—पुअव. (व.) कणकेंत गूळ घालून त्याचे उकडून केलेले लाडू; सिद्धलाडू पहा.

**शिंदळ**—वि. जारकर्मी; बाहेरख्याली; बदफैली; छिनाल; दुराचरणी; व्यभिचारी (स्त्री, पुरुष). [देशी प्रा. छिण्णो, छिण्णाल; हिं. छिनाल; सं. छिद्–छिन्न; क्षुण्ण?] ०**की**-स्त्री. (विशेषत: स्त्रियांना हा शब्द लावतात) जारकर्म; व्यभिचार; दुराचरण; छिनाली; बदफैली. ०**चार-चाळ-टेव**-पुअव. बदफैली कर्में; छिनाल नखरे; नटणें, मुरडणें, चट्टीपट्टी करणें इ० शिंदळकीच्या चेष्टा; दुराचार. ०**तीट**-स्त्रीपु. शिंदळ माणसानें कपाळावर लाव-

लेली तीट; विशिष्ट प्रकारची नखरेबाज तीट; टिळा. **०नखरा**-पु. शिंदळचार; व्यभिचारिणीचें नटणें, मुरडणें व हावभाव, बोलणें, चालणें इ० **०वडा-वाडा**-पु. जारकर्मी व व्यभिचारी लोकांच्या वस्तीची जागा, घर, गांव; (सामा.) व्यभिचारबाहुल्याचें ठिकाण. **०सोव**-पुअव. (राजा.) व्यभिचारिणीप्रमाणें ढोंगी वर्तन, लाडिकपणा, चेष्टा इ०. सोव पहा.

**शिंदळवान-नी**—स्त्री. एक झाड.

**शिंदा**—पु. एक खेळणें.

**शिंदा**—पु. अनौरस संततीची एक जात किंवा त्यांतील व्यक्ति. २ लेकवळा; दासीपुत्र. **०पोरगा**-पु. कडू; दासीपुत्र; दास्यत्व करणाऱ्या स्त्रीपासुन झालेला मुलगा. [ शिंदळ ]

**शिंदाड**—न. कवळ; भातशेतीची जमीन भाजण्यासाठीं लागणाऱ्या तृणकाष्ठादिकांचा ढीग. [ शिंद+फाड ]

**शिदी, शिद्दी**—पु. अबिसीनियांतील रहिवासी; हबशी; हबसाण देशचा; सिद्दी.

**शिंदी-धी**—पुस्त्री. १ जंगली खजुरीचें झाड. २ या झाडाचा मादक रस; शिंदीपासून तयार केलेली दारू. 'खंडयायान महार शिंदी पिऊन पडला।' -ऐपो ६८. **शिंदोली**-स्त्री. (ना.) शिंदीचें फळ. **शिंद्रो**-पु. (कों.) नारळ पाडणारा.

**शिदोड, शिदोड**—पु. गांडूळ; शिदड पहा. **शिदोडासारखें फुगणें**-(व.) व्यर्थ रुसून बसणें.

**शिंदेशाई-ही**—वि. १ कापड, दागिने इत्यादिसंबंधीं विशिष्ट तऱ्हा, घडण असणारें. 'शिंदेशाई पागोटें, तोरड्या, तोडा इ०' २ शिंद्यांचें राज्य, दरबार इ०संबंधीं; शिंद्यांच्या अमलांतील. -स्त्री. शिंद्यांचें राज्य, अंमल, सत्ता. [ शिंदे+शाई ]

**शिदोरी, शिधोरी**—स्त्री. १ रान, शेत मार्ग इ० ठिकाणीं खाण्यासाठीं गाठोड्यांत बांधून घेतलेलें अन्न; प्रवासांत बरोबर घेतलेले खाद्यपदार्थ; 'कथिली विदुरें सन्मति जाणों दिधली तयां शिदोरी ती।' -मोसभा ७.३८. २ चातुर्मासांत बायकांनीं ब्राह्मणांना दान दिलेला शिधा, अन्नपाणी. ३ पुण्य संपादण्यासाठीं परक्या मुलांना दिलेलें अन्नपाणी. ४ गुराखी, मजूर शेतांत किंवा कामावर बांधून नेतात तें अन्न. 'काखेसि घेवोनि शिदोरी। गोपाळा सहित श्रीहरि।' -कथा ४.५.३. [ सं. सिद्ध +दोरी ] **म्ह०** शिकविलेली बुद्धि आणि बांधलेली शिधोरी (सर्वदा पुरत नाहीं).

**शिद्धाई**—स्त्री. सिद्धाई पहा.

**शिधा**—पु. १ स्वयंपाकासाठीं लागणारें सामान (तांदूळ, डाळ, पीठ, तूप, इ०); पाकसाहित्य. २ (सामा.) न शिजविलेले तांदूळ, धान्य इ० ३ एक दिवसाच्या भोजनास लागणारें सामान. [ सं. सिद्ध ] **०पाणी-सामान-सामग्री**-न स्त्री. (व्यापकार्थी) अन्न तयार करण्याला आवश्यक असें सर्व सामान (धान्य, लाकडें, भांडींकुंडीं इ०).

**शिंधी**—स्त्री. शिंदी पहा.

**शिधोट**—वि. (प्रां.) १ सरळ व लांब जाणार (नदी, पर्वताची रांग इ०). २ (ल.) प्रांजळ; प्रामाणिक. 'गुणी राजाचे शब्द शिधोटे।' -ऐपो २२७. [ हि. सीधा ]

**शिनक, शिनीक**—स्त्री. चमक; कळ. शिणक पहा. (क्रि० निघणें; येणें; होणें; भरणें; मारणें).

**शिनगार, शिनगारणें**—पु.न. १ शिणगार, शृंगार पहा. २ (व.) एकदाणी; गळसरी. [ सं. शृंगार ]

**शिनसाल-ळ**—स्त्री. जुनी साल. 'भंवईचीं पडळें। वोमथती शिनसाळें।' -ज्ञा १३.५६०. [ सं. शीर्ण+छाल ]

**शिनळ, शिंनळ, शिनळकी, शिंनळकी, शिनळचार, शिनळचाळे, शिनळटेव, शिनळतीट, शिनळ नखरा, शिनळवडा-वाडा, शिनळवान, शिनळसोव**, शिंदळ इ० पहा. 'हो का शहाणी शिनळी नारी।' -एभा १३.१३३; 'त्याचा तो नित्य शिनळपणा पवित्र मानून रंगभूमीवर तरुण मुलांचे व मुलींचे पुढें आम्ही त्याचे प्रयोग करून दाखवावे?' -आगर ३.१७.

**शिना**—वि. निराळा, 'आत्मा देहाहून शिना।' -ज्ञा [ सं. शीर्ण ]

**शिनाजोरी**—स्त्री. धैर्य; सामर्थ्य; धाडस; ताकत. [ फा. सीना-झोरी. ]

**शिनारणें**—अक्रि. (व.) शीण येणें; शिणारणें.

**शिनारणें**—उक्रि. (व.) शिणारणें पहा. (खांब इ०) ठोकून पक्का करणें.

**शिनीसाफ**—वि. (व) निर्दोष; निष्कलंक.

**शिनुटलें**—न. शिपतर. -शर.

**शिने**—अ. शाने पहा.

**शिनेल**—न. (कु.) चिरा.

**शिंप-पी**—स्त्री. १ जलचर प्राण्याच्या अस्थीचें सुपलीच्या आकृतीचें आवरण; याचीं दोन पुडें असतात; त्यांपैकीं प्रत्येक शुक्ति २ पोकळ काठी, नळी इ० चा तासतांना होणारा वरील सारखा आकार (लेखणी, अलगूज, पावा वगैरेच्या टोंकास करतात त्या सारखा). (क्रि० मारणें; तोडणें; घेणें; पाडणें.) ३ शिंपेच्या आकाराची छातीची खळगी. इ० [ सं. शुक्ति; प्रा. सिप्पि; हिं. सीप ] **०मारणें-उतरणें**-तिरकस काप छेद घेणें. **शिंपेला पोट लागेस्तूर खाणारा**-वि. अत्यंत अधाशी इसम. **शिपला, शिंपला, शिंपुला**-पु. १ मोठी शिंप; हिच्यामध्यें मोत्यें उत्पन्न होतात; पाठीवर रेषा असणारी शिंप

२ शिंपेच्या आकाराची लाकडांत घेतलेली खांच ( क्रि० (वर) पाडणें; घेणें; मारणें ) ३ उगाळलेलें गंध ठेवण्याकरितां शिंपेच्या आकाराची धातूची तबकडी; पात्र. -वि. उतरता; उतरट; ढाळता. **शिपली, शिंपली**-स्त्री. १ लहान शिंप. २ सुपली. **शिंपा**-पु. मोठी शिंप; कालव. **शिपोटी**-स्त्री. (व.) पोटाचा वरचा शिंपेसारखा भाग; शिंपा.

**शिपका, शिबका**—पु. १ हपका; तडाखा; हबका; पाण्याचा पातळ पदार्थाचा जोरानें मारा. ( क्रि० मारणें, टाकणें देणें ) २ शिंपणी; सडा ( बागेंतील झाडांवर, धुराळी रस्त्यावर पाण्याचा ). [सं. सिच्]

**शिपट, शिंपट, शिपटी, शिंपटी, शिपटें, शिंपटें, शिपूट-शिंपूट**—न. (कों.) १ पोफळांचा तुरा; लोंगर. २ पोफळांचा घड.

**शिपटी**—स्त्री. (कों.) फोकाटी; शिरटी; फोक; छडी; बारीक काठी. ' हातीं घेवोनिया शिपटी । माता लागली पाठोपाठीं । ' -कथा ४.३१००. ' मारूं जातां शिपटी । भेणें पळतो जगजेठी । ' -ह ७.२४६. **शिपटणें**-क्रि. छडीनें, काठीनें, फोकाटीनें मारणें.

**शिंपडणें**—क्रि. १ सिंचणें; शिंपणें; प्रोक्षणें; सेक, सिंचन करणें. **शिंपडणी**-स्त्री. शिंपण; सिंचन; सेक; सडा.

**शिंपण, शिंपणी**—स्त्री. सेक; सिंचन; प्रोक्षण; सडा; शिंपणें. ( क्रि० करणें; टाकणें; शिंपणें ). **शिंपणें, शिपणें**-क्रि. १ सिंचणें; वर उडविणें; सडा टाकणें; प्रोक्षण करणें; सिंचन करून ओलें करणें; अभिषिक्त करणें. ' इयें वड शिंपीजे । ' -वसा ६०. **शि(-शिं)पणें**-न. १ रंगपंचमीस किंवा शिमग्याच्या समाप्तीस अंगावर रंग उडवितात तें; रंग उडविण्याचा खेळ. २ रंगपंचमी. ' शिंपण्या दिवशीं हल्ला नेमिली कुंप झाले तयार । '-ऐपो ३५२ ३ (कों.) दांडयांतून पाणी वाहून नेऊन तें झाडांस देण्याची रीत. **शिंपणपंचमी-शिंपणेंपंचमी**-स्त्री. रंगपंचमी. **शिपणीचा ऊस**-पु. पाटाच्या पाण्यावर होणारा ऊस. याच्या उलट-पुरणीचा ऊस.

**शिपतर, शिंपतर**—न. कळकाच्या चिपटांची केलेली पसरट परडी; उथळ टोपली ( लग्नांत साहित्य ठेवण्यासाठीं, किंवा गुऱ्हाळघरांत रस गाळण्यासाठीं वापरतात ).

**शिपर**—स्त्री. ढाल. [ फा. सिपर् ]

**शिपा**—पु. मोठया माशांचें तेल.

**शिंपा**—पु. नारळाच्या पोगींतून बाहेर येणारा अवयव; कणीस; शिंपट.

**शिपाई**—पु. १ सैन्यांतील सैनिक; योद्धा. २ पट्टेवाला; चपराशी; हरकारा; जासूद; चाकर. ३ (ल.) वाद, तंटा, अडचणीचे प्रसंग इ० वेळीं धीटपणें पुढें होऊन तोंड देणारा माणूस [ फा. सिपाही. ] ०की-स्त्री. शिपाईगिरी, शिपायाचें काम ०गडी-पु. १ शूर शिपाई; मर्द. २ ( सामा. ) शिपाई ०गिरी-स्त्री. १ शिपाइकी; शिपायाचा धंदा. ' केवळ शिपाईगिरीच करीत नाहीं, हिक्मतीनेंच लढाई करूं ' -ऐटि २.२७ २ (ल.) क्षात्रधर्म; शौर्य; मर्दुमकी. ' शिपाईगिरीची व मन्सुबेबाजपणाची शर्त करून यशास पात्र व्हावें ऐसेच आहां. ' -पया ३३३१. -वि शिपायासंबंधीं; लष्करी; सैनिकासंबंधीं; [ फा. सिपाहूगरी ] ०खोर-पु. एक मुलींचा खेळ. -मखेपु ३०९. ०प्यादा-राणा-पु. ( व्यापकार्थी सिपाई; चपराशी; ) सैनिक; जासूद. ०बाणा-पु. १ लष्करी धंदा, व्यवसाय; लष्करी पेषा; २ लष्करी गणवेष, पोषाख ०शाई-स्त्री. लढवय्यांचें मंडळ; शूर लोक. ' अपाजि बळवंतराव शिपाईशाईमध्यें एक दाणा । '-ऐपो ४३९. **शिपाय**-यी-शिपाई पहा. **शिपायडा-डें**-पु. न. शिपायास निंदेनें म्हणतात. **शिपुरडा**-पु. शिपायडा पहा.

**शिपाई**—पु. पालखी, डोली, इ०ची दांडी; गाडी, दिवटी इ०कांस आधारभूत कैचीसारखी उभी करण्याची लांकडी घोडी; ( फुलीप्रमाणें दोन लांकडें एकत्र बांधून करतात ).

**शिपाई**—पु. एक पक्षी.

**शिपार, शिफार**—स्त्री. १ गलबतास खालून पाण्याचा उपद्रव होऊं नये म्हणून केलेला डांबर, रोगण इत्यादींचा लेप. २ सदर लुकण, लेप लावावयाची क्रिया. ( क्रि० करणें ).

**शिपारशी, शिपारस**—प्र. शिफारशी, शिफारस पहा.

**शिपिला**—वि. पोटाखालीं पुढीलभागीं तंगापाशीं भोंवरा असलेला. ( घोडा ).

**शिपिस्ता**—पु. बाळआंबा पहा. -मुंव्या १६८.

**शिपी, शिंपी**—स्त्री. एक प्रकारचें गवत. [ सं. शिल्पिका; प्रा. दे. शिप्प ]

**शिंपी**—पु. एक जातीचा मासा, यास तिसऱ्या असेंही म्हणतात. -मसाप ३.३.

**शिंपी**—पु. एक पक्षी. हा कुंपणाच्या कडेनें हिंडून किडे खातो.

**शिंपी**—स्त्री. शिंप पहा.

**शिंपी**—पु. शिवणकाम करणारी एक जात आणि तींतील व्यक्ति, दर्जी. [ सं. षिव्=शिवणें. तुल० सं. शिल्पिक; प्रा. शिप्पिअ. दे. प्रा. सिप्पी=सुई ] **शिंपुरडा**-पु. शिंप्यास निंदेनें म्हणतात.

**शिप्पा**—पु. (ना.) संधान. [ हिं. सिप्पा ]

**शिफर्टें**—न. (कु.) सुपारीचा घड; शिंपट पहा.

**शिफार**— शिपार पहा.

**शिफारस**—स्त्री. १ (दुसऱ्याजवळ केलेली) तारीफ; प्रशंसा; गुणगौरव. 'तेधवां पादशाहापाशीं बहुत शिफारस चंद्ररायाची जाहली कीं बडे मर्द आदमी आहेत आणि जोरावर.' –ऐस्फुले २३. २ वशिला; तारीफपत्र; हिमाईत. ३ प्रशंसा करण्यालायक कृत्य (उपरोधिक अर्थानें उपयोग). 'त्वां काय ह्यांत मोठी शिफारस केलीस'. [फा. सिफारिश्] ०पत्र–न. वशिला; काम होण्यासाठीं आणिलेली ओळख; भलावणपत्र. 'थोरामोठ्याची चुगली म्हणजे केव्हांही सही होणारें शिफारसपत्र आहे।'. –रणदुंदुभी ९४. **शिफारशी**–वि. आश्रय दिलेलें; वशिल्याचें; हात दिलेलें; उचलून धरलेलें; हिमाइती. ०तट्टू–पु. स्वतःच्या गुणावरून नव्हे तर केवळ वशिल्यामुळें पुढें आलेला मनुष्य; वशिल्याचें तट्टू.

**शिफ्ला**—वि. नीच; हलकट. [अर. सिफ्ला]

**शिबका**—पु. शिपका पहा.

**शिबंदी**—स्त्री. कागदाचें एक पान (विशेषतः दौलताबादी); हाफशीट.

**शिबंदी**—स्त्री. अनियमित शिपाई; वसुलीच्या कामासाठीं; किल्ले, शहरें, परगणे इत्यादींच्या रक्षणाकरितां व बंदोबस्ताकरितां ठेवलेली फौज; हंगामी, विशिष्ट कामासाठीं ठेवलेली फौज. 'ठाणेयांत शिबंदी आहेत'. [फा.]

**शिबरा**—शिमरा पहा.

**शिबरी**—वि. (कु.) स्त्रीलंपट; कामी पुरुष. ०**करणें**–(बैलानें) गाईचें मलमूत्र हुंगून विकारयुक्त होणें; तोंड वर करणें.

**शिबला**—पु. (चांभारी) खापराचें आडवें लांबट व मोठें कुंड.

**शिबाड**—स्त्रीन. गलबतांतील एक प्रकार; मोठा मचवा; सुबाल्यापेक्षां मोठी होडी.

**शिबाळी-ळें**—स्त्रीन. १ उकळत्या रसावरील मळी काढण्यासाठीं कळकाच्या दांडीला लावलेला शिपतरवजा झारा; गुऱ्हाळांत कढत रस गाळण्याची गाळणी. २ (कु.) आंबे वगैरे फळें झाडावरून उतरण्यासाठीं टोंकाला जाळीची टोपली बांधलेली लांब काठी; झेला. [शिबें]

**शिबिका**—स्त्री. यानविशेष; पालखी. [सं.]

**शिबिर**—न. १ रणांगणावर असतांना लष्करी तळावरील राजा, सेनापति इ०कांचे निरनिराळे गोट, प्रत्येकी. २ सैन्याची छावणी; तळ. 'मग म्लेंच्छांचे वसौटे। दांगाणे हन कैकटे। का शिबिरें चोहटे। नगरींचे ते।' –ज्ञा १७.२९४. ३ (सामा.) तंबू. ४ 'कँप' याचा प्रतिशब्द म्हणून योजतात. [सं.]

**शिंबी**—स्त्री. १ एक वनस्पति. २ शेंग. [सं. शिंबा, शिंबी]

**शिबुटलें**—न. (कों.) टोपलें; परडें; शिपतर पहा. शिबें]

**शिबें**—न. जाळें; घोसाळें किंवा दोडका निबर झाला असतां, त्यांत होणारें तंतुमय जाळें.

**शिबें**—न. १ एक सौम्य कुष्ठरोग; त्वचारोग. २ याचे डाग, ठिपके इ०.

**शिबें**—न. १ मध्यें खोलगट असणारें वेळणी, तसराळें इ० भांडें. २ चाळणी; रोवळी. ३ शिबाळें; शिबाळी. ४ (हेट.) भाताची पेज गाळण्याचा बांबूचा झारा.

**शिबेमांड**—स्त्री. (कु.) भात वेळतेवेळीं मडक्याच्या तोंडावर धरावयाची लांकडी फळी.

**शिबोळी, शिबोळें**—शिबाळी, शिबाळें पहा.

**शिबोळी**—स्त्री. (कु.) लहान पाटी; शिपतर.

**शिमटणें**—उक्रि. (प्र.) चिमटणें पहा.

**शिमगा**—पु १ होळीचा सण; होळीचे दिवस. २ फाल्गुन महिना. ३ (ल.) अश्लील, अचकटविचकट भाषण. [सं. शृंगार] म्ह० शिमगा जाई आणि कवित्व राही–शिमग्याचे दिवसांत अचकटविचकट केलेलीं कवनें तदनंतर सुद्धां आठवणींत रहातात. **शिमग्याचा मंत्र**–पु. बोंब; शंख; पांचजन्य. (क्रि० जपणें; म्हणणें; वाचणें). **आहे (असेल) ते दिवस दिवाळी, नाहीं (नसेल) ते दिवस शिमगा**–मिळेल तेव्हां उधळपट्टीनें खर्च करणें व न मिळेल तेव्हां उपास करणें. 'जो मनुष्य आहे ते दिवस दिवाळी नाहीं ते दिवस शिमगा या नात्यानें वागणारा आहे त्याच्या घरादारावरून नांगर फिरून त्याच्या हातांत लवकरच नारळाची आई येण्याचा संभव आहे।' –निचं. **शिमगा करणें**–१ बोंबलणें; बोंब मारणें. २ (ल.) निंदा करणें; एखाद्याच्या नांवानें खडे फोडणें; शिव्या देणें. ०**सण**–पु १ वधुपक्षानें वरास बोलावून शिमग्याचा सण साजरा करणें. २ या सणांत विशेषतः रंग पंचमीस दिलेला अहेर, बहुमान.

**शिमटी**—स्त्री. १ शिपटी; फोक; झाडाची फांदी; छडी २ एक लहान झाड.

**शिमरा**—वि. (कों.) १ बसकट; विशोभित (नाक). २ अशा नाकाचा; नकटा (मनुष्य). 'नागवी माथां मोत्याची जाळी। शिमरी सुपाणी दाणा ल्याली।' –एभा ३.३९३. (गो.) शिंमरो; शिमुरा.

**शिमा**—स्त्री. मर्यादा; (प्र.) सीमा पहा. [सं. सीमा] **शिमधडो**–पु. (कु.) सीमेची हद्द. **शिमधड्या, शिमशेजारी**–पु. (राजा.) शींवशेजारी; शिवेवरचा शेजारी.

**शिमाल**—पु. उत्तर. [ अर. ]

**शिया**—पु. एक मुसलमानी धर्मपंथ याच्या उलट सुनी.

**शियारी**—स्त्री. शहारे; कांपरें. ' परी येतुलियाही वेगळा । जो केवळ आनंदैक कळा । तया अंतरात्मयाही निश्चळा । शियारी आली । '-ज्ञा ११.३६९. [ सं. सीत्कार किंवा सं. शिशिर; गो. शीं. थंडी+आरी ? ]

**शियाळें**—न. ( गो ) कोंवळा नारळ; शहाळें.

**शिर**—न. १ डोकें; माथा; मस्तक; शीर्ष. ' तीन शिरें, सहा हात । तया माझें दंडवत । ' २ झाडाचा माथा, शेंडा; टोंक. ३ सैन्याची आघाडी; बिनी. ४ डोई; व्यक्ति; घोडयांची संख्या मोजतांना वापरतात. उदा० घोडा शिर चार=चार घोडे [ सं. शिरस्; फा. सर ] **म्ह०** १ शिरसलामत तो पगडया पंचवीस-जोंपर्यंत शरीरांत प्राण आहे, तोंपर्यंत बाह्य शृंगार वाटेल तसा करता येईल (ल.) मूळ कायम असलें म्हणजे बाकीच्या गोष्टी मिळतात. २ शिर सुरी तुझ्या हातीं=तुझ्या हातीं माझा प्राण दिला आहे मारणें तारणें सर्व तुझ्या इच्छेवर. **०हातावर घेणें**-१ धाडसाचें काम करावयास सिद्ध असणें; अत्यंत शूर असणें. २ जिवावर उदार होऊन एखादें कार्य करण्यास उद्युक्त होणें; जिवाकडे न पहाणें. **शिरावर जागे राहणें, शिरावर-शिरीं असणें**-एखाद्याच्या संरक्षणासाठीं, कल्याणासाठीं तत्पर असणें; पाठ राखणें. ' श्रीरामा तूं स्वामी असली माझ्या शिरावरी जागा । '-मो केकाआर्या. ' शिरीं आहे रामराज । औषधाचें कोण काज । ' -रामदास. **शिरावर घेणें**-( एखादें कार्य ) पत्करणें. पेशवाईच्या रक्षणाची जोखीम आम्हीं आमच्या शिरावर घेतली आहे. -अस्तंभा १७. **शिरीं भार वहाणें**-जबाबदारी पतकरणें; हमी घेणें-पतकर घेणें; सोसणें. ' शिरीं भार वाहेन बोले पुराणीं । '-राम ३४. **शिरःकंप-कंपन**-पुन. डोकें लटलट हालणें; थरकापणें. **०कमलळ**-न. ( काव्य ) ( कमलासारखें शिर ). शिर; डोकें. [ शिर+कमल ] **०गीर**-स्त्री. कोंबडयाच्या डोक्यावरील तुरा. **०गोम**-वि. कपाळावर गोमेच्या आकाराचे, केस असलेला (घोडा). -स्त्री. घोडयाचें एक अशुभ चिन्ह. [ शिर+गोम ] **०च्छेद**-पु. डोकें उडविणें; वध. [ सं. शिरच्छेद ] **०टोप**-पु. १ कानटोपी; माकड टोपी; घरांत घाल ण्याची टोपी; टकोचें; टोपडें. २ शिरस्त्राण. **०ताज, शिर्ताज**-पु. डोक्यावरचा एक दागिना; शिरोलंकार; मुकुट. ' शिरीं शिरताज रे शिरीं शिरताज गातो भरून । '-ऐपो २३७. [फा. शिर्ताज्] **०दीदे, शिर्दीदे**-क्रिवि. डोक्यावर; मस्तकीं; डोकीवर. [ फा. सर-इ-दीदा ] **०पाव, शिर्पाव, शिरोपाव**-पु. १ राजा किंवा सरदार यांनीं कृपावंत होऊन दिलेलें पागोटें, वस्त्रें इ० बहुमानाचा पोशाख. ' मान पान, टिळा विडा व सिरपाव '-वाडबाबा ३ ४.१५. ' जवाहीर, सिरोपाव वगैरे जिन्साना पाठविला । '-जोरा ८. २ जमाबंदीचे कतबे होण्याच्या वेळचा देशपांडे इ० चा हक्क. [ फा. सरोफा ] **शिरपीडा**-स्त्री. डोकेंदुखी. [ सं. ] **०पेंच, शिर्पेंच**-पु पागोट्यांत खोंवण्याचा जडावाचा मोत्यांचा तुरा; एक अलंकार. [ फा. सर्पेच ] **०फोड्या**-वि. भिक्षा मिळण्यासाठीं डोक्यावर हाणून घेणारा डोकें फोडून घेणारा ( भिकारी ); भिकाऱ्यांची एक जात व तींतील व्यक्ति, **०बंद, शिर्बन्द, शिर्बस्ता**-पु. पागोटें; पगडी. [ फा. सर्बन्द् ] **०भारी**-स्त्री. डोक्यावर वाहून न्यावयाजोगें ओझें. [ शिर+भार ] **शिरयाळें, शिरियाळें**-न. डोक्याचा आधार; डोक्याची बैठक. ' उभऊनि करतळें । पडिघाये कपोळें । पायाचे शिरियाळे । मांडूं लागे । '-ज्ञा १४.१८५. [शिरस्+आलय; म. शिर+आळें ] **०वपन**-न. हजामत; विशेषतः विधवा बायकांचे केस काढणें; विकेशा करणें. ' कैकयीचें शिरवपन करून । छत्र धरोत कोण्हीतरीं । ' **शिरसा**-क्रिवि. १ डोक्यानें. २ शिर वाकवून; नम्रपणानें; आदरयुक्त; आज्ञाबरहुकुम. ' तुम्ही आमचे वडील, त्यापेक्षां तुम्ही सांगाल तें आम्हास शिरसा मान्य आहे. ' **शिरसावंद्य-धार्य-मान्य**-वि. अतिशय पूज्य; आदरणीय; माननीय. [ सं ] **०साष्टांग नमस्कार-दंडवत**-पु. ( डोक्यासहित आठ गात्रें जमिनीवर टेकून) अत्यंत नम्रतापूर्वक प्रणाम ( वडील माणसें, थोर किंवा श्रेष्ठ व्यक्ति यांस लिहावयाचा पत्रांतील मायना).[शिरस्+अष्ट+अंग+नमस्कार, दंडवत ]**०स्त्राण**-न. डोक्याचें रक्षण, आच्छादन करणारें टोपी, पागोटें इ०. टोप; जिरेटोप. [सं.] **०स्नात**-वि. डोक्यावरून स्नान केलेला. **०स्नान**-न. डोक्यावरून केलेली आंघोळ; सबंध स्नान. **शिरातोरा-असणें**-एखाद्याच्या वरचढ असणें;-चा अधिकारी असणें. ' गणितांत तो माझा शिरातोरा आहे. ' **०लावणें-दाखविणें-मिरविणें**-शेखी मिरविणें; वरचढपणा गाजविणें. ' खंडयाला पाटिलकी मिळाल्यापासुन तो भारी शिरातोरा दाखवूं लागला आहे. ' **शिरी**-स्त्री. डोक्यावरील नक्षीचें, शोभिवंत कापड ( हत्ती, घोडा इत्यादींच्या). **शिरीं**-क्रिवि. डोक्यावर; ऐनवेळीं. उदा० लग्नाच्या शिरीं, प्रसंगाच्या शिरीं, कामाच्या शिरीं. **०असणें**-अग्रभागीं असणें; संभाळणारा होणें. ' शिरीं असतां पंढरिनाथ । चिंता किमपि न करावी । ' **शिरोग्रह**-पु. डोकें धरणें; शिरोवेदना होणें ( रोग, विकृति इ० नें ). डोकें धरणारा, डोक्यावर परिणाम करणारा ( रोग इ० ). [ सं. ] **शिरोबस्ती**-पु. डोकेंदुखी बंद करण्याचा एक उपाय. **शिरोबिंदु**-पु. ( भूमिति ) अक्षाच्या समोरचें टोक, कोण बिंदू. -महमा १२,२०. **शिरोभाग**-पु. १ मानेपासुन वरचा भाग; डोक्याचा भाग. २ ( एखाद्या समाजाचा, संघाचा ) नायक, गुणांत योग्यतेनें उत्तम. **शिरोभूषण**-न. डोक्याला शोभा देणारी वस्तु; अलंकार, इ०. मुकुट पागोटें; टोपी. **शिरोमणी**-पु. १ डोक्यावरील दागिना; मुगुटमणि. २

मुख्य, श्रेष्ठ इसम; प्रमुख नायक. उदा० पंडित शिरोमणि, मूर्ख शिरोमणि, सोदाशिरोमणि. इ० 'बाप बळिया शिरोमणी। उतावीळ या वचनीं। -तुगा १६४. [सं.] **शिरोरोग**-पु. डोक्यांतील बिघाड, रोग. त्याचे प्रकार-वातिक, पैत्तिक, श्लेष्मिक, सन्निपातिक, रक्तक्षयज, कृमिज. **शिरोलेख**-पु. (वृत्त.) मथळा; मायना; शीर्षक; लेखारंभीं लिहिलेलें वाक्य. (इं.) हेडिंग. 'शिरोलेखांत लिहिल्याप्रमाणें अद्याप ८।१० दिवसांचा अवकाश आहे. -टि २७२. **शिरोवेदना**-स्त्री. डोकेंदुखी; शिरपीडा. 'मोठी शिरोवेदना होत आहे.' -कमं ४. **शिरोवेष्टन**-न. कोणतेंहि डोक्याला गुंडाळावयाचें वस्त्र; (रुमाल, पागोटें वगैरे). [सं.]

**शिर**—स्त्री. (कु.) फांस; पेंच.

**शिर**—उद्गा. शुकशुक; मांजरास हांकून लावण्यासाठीं करावयाचा आवाज. [ध्व.]

**शिरकणें**—क्रि. (राजा) लोकर किंवा कापूस साफ करणें, निवडणें; कचरा व सरक्या काढून स्वच्छ करणें. [शिरकी] **शिरकी**-स्त्री. (राजा.) (प्र.) सरकी पहा.

**शिरकणें**—अक्रि. १ घुसणें; शिरणें; प्रवेश करणें. (विरोध, अडथळा इ० दूर करून) वाट करून घेणें. 'त्या दाटीमध्यें माझें एक बोट शिरकतें म्हणजे मग वाट केली असती'. २ हातीं लागणें; सांपडणें. 'देव उठावले झुंजारी। परी अमृत शिरकलें असुरकरीं।' -मुआदि ४.१२५. **शिरकवणी, शिरकावणी**-स्त्री. (बळेनें. प्रयत्नानें आंत) शिरकाव; प्रवेश; घुसणें; घुसडणी. **शिरकविणें, शिरकाविणें**-उक्रि. (शिरकणेंचें प्रयोजक रूप) घुसविणें; घुसडविणें; शिरविणें; प्रवेश करणें. **शिरकाव**-पु. रिघाव; प्रवेश; वाट.

**शिरकंवा**—पु. (ना.) १ पडसें. २ पडशामुळें डोकें दुखणें.

**शिरका, शिर्का**—पु. आसव; अम्लासव. [फा. शिर्का]

**शिरकाटणें**—क्रि. (व.) प्रवीण होणें; गति होणें; प्रवेश होणें. [शिरणें; शिरकणें]

**शिरकाण**—न. १ शिरके आडनांवाच्या लोकांचा प्रवेश, मुलूख. -शर. २ शिर्क्यांचें निर्मूलन; सत्यानाश; नायनाट; समूल उच्छेद. 'शिर्के जेथें असतील तितके मारावे ऐशी आज्ञा करून शिरकाण करविलें' -मराचिसं २१. 'परंतु संभाजी महाराज यांणीं शिरकाण केलें त्या दहशतेनें' -मराचिथोरा ६९. [शिरके, किंवा सं. शीर्ष+खंड]

**शिरकी**—स्त्री. सरकी; कापसांतील बी.

**शिरकुटी**—स्त्री. शिमटी; शिपटी पहा.

**शिरकें**—न. शिंकाळीचा हातांत धरण्याचा भाग, मूठ, कडी.

**शिरकंड, शिरखंड**—न. (अप. श्रीखंड) १ श्रीखंड पहा. २ गंध; कपाळाला लावलेला चंदनी टिळा. (क्रि० लावणें; वठणें; उमटणें). 'आज तुम्ही शिरखंड लावून मोठें नटलांत!' [सं. श्रीखंड]

**शिरगोळा**—पु. रांगोळीचा दगड.

**शिरघोसाळी-ळें**—स्त्री.न. दोडक्याचा वेल व फळ. दोडकी, दोडका. शिराळी-ळें पहा.

**शिरचष्मा, शिर्चष्मा**—पु. (डोकें व डोळा) लावण्यांतील प्रियजनांविषयींची संज्ञा; प्रियजन; प्रियकर. [फा. सचेश्मा. शिर+चष्मा=डोळा]

**शिरजोर शिर्जोर**—वि. १ हेकड; हेकेखोर; तिरसट; हट्टी. टोंग. २ खलेल; उमेट; अवखळ. ३ डोईजड; वरचढ. 'शिरजोर बायकोचा शीण जसा शांत दादला वाही?'. 'शिरजोर बायकोचें शेण जसें साधु दादला वाही। धी वर्तवित्ये जीवा सतहो देवाशी दाद लावा ही।' [फा. सर्झोर्] म्ह० 'चोर तो चोर घरधन्याहून शिरजोर.'=स्वतः मालक नसुन मालकी हक्क गाजवूं पहाणारा. ०पणा, **शिरजोरी**-पु स्त्री. १ हेकडपणा; हेकेखोरपणा; तिरसटपणा. २ दांडगेपणा; वरचढपणा; बंडखोरी.

**शिरट-टी**—न. १ (गों. कों) बारीक छडी; फोक; शिरें; डाहळी; फांदी. २ पोफळीचें शिंपूट. **शिरटांवचें**-क्रि. (गो.) छडी मारणें.

**शिरड-डें**—स्त्री.न. (राजा कु.) पाला झडलेल्या शिऱ्यांचा समुदाय; काटयाकुटयांचा भारा; झाडाची छाट. शिरें पहा. [शिरें]

**शिरड**—स्त्री. चिरड; चीड. चिरड पहा. [चिरड] **शिरडी**-वि. चिडखोर. 'भीम विवेकी भला, न तो शिरडी।' -मोविराट १.१५७. ०**खोर**-प्र. चिरडखोर.

**शिरडी**—स्त्री. (राजा.) फोकाटी; छडी; लहान सरळ फांदी. शिपटी. **शिरडाविणें**-क्रि. (राजा.) फोकाटीनें, छडीनें बडविणें, मारणें.

**शिरडी**—स्त्री. एक जातीचे तांदूळ.

**शिरडी**—स्त्री. चिरडी; लहान मुलींचें नेसावयाचें वस्त्र. [सं. चीर]

**शिरणी**—स्त्री. (ना.) एक त्वचारोग.

**शिरणी**—स्त्री. खिरापत; प्रसाद; शेरणी पहा. **शिरणीगार**-पु. शेरणीगार; हलवाई.

**शिरणें**—अक्रि. १ आंत जाणें; शिरकणें; प्रवेश करणें; घुसणें; जोरानें आंत जाणें. [सं. श्रि] **शिरविणें**-उक्रि. घुसविणें; खुपसणें; शिरकाव, प्रवेश करविणें (वस्तु, पदार्थ इ० चा). [शिरणें]

सावा ओढतात-ताणतात-तुटतात इ०. ' घडिघडि बहु बाई वोढती सर्व सांवा ।' -सारुह ३.७५. २ बकरा, इ० कांच्या आंतड्याचा लांब तंतू, तांत. शिरा, नाडी पहा. [ सं. स्नायु ]

**सावकार**—पु. १ ज्यापासून लोक पैसे कर्जाऊ घेतात असा श्रीमंत माणूस; पेढीवाला. २ जो ज्यास कर्जाऊ पैसा देतो तो त्याचा सावकार. ३ व्यापारी; धंदेवाला. साव पहा. [ सं. साधुकार; प्रा. साहुकार. थंट्टेनें पुढील व्युत्पत्ति देतात. सा ( सह )+ वकार ( वस्त्र, वपु, विद्या, विनय, वाणी, वित्त ) ज्याच्या जवळ आहेत किंवा पाहिजेत असा ] ' धरजाव, मरजाव, विसरजाव ' हा मंत्र सावकार ठेव घेतांना उच्चारतो असें थट्टेनें मानतात व त्यास **सावकारी मंत्र** म्हणतात. **सावकारकी**-स्त्री. १ सावकारी पहा. २ ( ल. ना. ) चोंबडेपणा; लुडबूड. **सावकारा**-पु. १ सावकारांचा समुदाय; अनेक श्रीमान् पेढीवाले. ' त्या शहरांत सावकारा मोठा आहे. ' -तीप्र १०४. २ ( राजा. ) मोठी सावकारी, व्यापार उदीम. ' तमाम सावकारा बंद झाला. ' -रा ३. १६४. ०**उठणें**-पेठ बसणें; व्यापारी उठून जाणें. **सावकाराचा नातू**-पु. जवळ पैसा नसून श्रीमंताप्रमाणें राहाणाऱ्यास म्हणतात. **सावकारी**-स्त्री. १ पैशाचा व्यवहार, देवघेव. २ सावकाराचा धंदा; सावकारकी. ' ऋण तरि मुष्टी पोहे त्याच्या व्याजांत हेमनगरी ती । मुदलांत मुक्ति देणें ही कोण्या सावकारिची रीती । ' -वि. १ सावकारासंबंधी. २ व्यापारी; धंदेवाईक. ०**बातमी**-स्त्री. पेशवाईत सावकार लोक आपली जी डाक स्वतंत्र ठेवीत, तिच्या द्वारें आलेली बातमी. ही अगदीं निश्चित अशी मानली जात नसे. -रा १०.२६२.

**सावकाश**—पुन. आराम; स्वस्थता. ' कीं ऐकतां परिणाम घोष । भूतप्रेतांस न वाटे सावकाश । ' -ह २३.२१४. ' महाराज श्रीस्वामीस सावकाश वाटलें. ' -वाडशा ३७. -क्रिवि. घाई, गोंधळ न करतां; स्वस्थपणें; शांतपणें ( क्रि० जाणें, येणें, चालणें इ० ). [ स+अवकाश ] **सावकाशी**-स्त्री. संथपणा; मंदपणा; घाई नसणें. ०**वर येणें**-सावकाश चालू देणें; संथपणें करणें. **सावकाशें**-क्रिवि. आरामशीर; स्वस्थपणें. ' तंववरी तुम्ही सावकाशें । शाश्वत लोकीं सुखवस्ती । ' -मुआदि २०.१४२.

**सावकें-सेवकें**—क्रिवि. ( बायकी ) घालूनपाडून; टोमणे मारून; लावून ( बोलणें ).

**सावघड**—वि. सोपी; सुलभ. ' या गोष्टी आवघडा । जाल्यावर सावघडा । नांवाचा चौघडा झडल झडल झडल । ' -होला १२२. [ सं. सुघट ]

**सावचित-त्त**—वि. १ दक्ष; सावधान. ' नव्हतो सावचित्त । तेणें अंतरलें हित । ' -तुगा २०२६. २ एकचित्त; लक्षपूर्वक. ' तुकारामरूप प्रत्यक्ष बोलत । होई सावचित्त सावधान । ' -ब ५०५. ३ जागा; हुशार. ' निजोन उठतां दुश्चित्त । कदा नाहीं सावचित्त । ' -दा ८.६.३९. ४ जिवंत; शुद्धीवर आलेलें. ' प्रेत झालें सावचित्त । नवें वस्त्र नेसत । ' -गुच ३२.१५५. [ सावध+चित्त ] **सावचित-तीं, सावचित्तपणें**-क्रिवि. सावधान चित्तानें; स्वस्थपणें. सावचित्त पहा.

**सावज**—न. १ श्वापद; रानटी पशु ( माणसाळलेला नव्हे असा ). -एभा २.९३. २ शिकारीचें जनावर (ससा, हरण, इ०). ' विचाराचेनि फरसे । जिव्हेचें सावज उसासे । ' -भाए १९८. ३ मगर. ' पाईं पां सावजें हातिरूं धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें ' -ज्ञा ९.४४२ [ सं. श्वापद. प्रा. सावज; हिं. सौजा ]

**सावजिरा**—पु. संगजिरें पहा.

**सावट**—न. १ सावलीची जागा, विशेषतः जेथें नेहमीं झाडझुडपांचें आच्छादन असल्यानें जित्रब होत नाहीं अशी. ' शेतामध्यें झाडांचें सावट फार झालें आहे. तें काढल्याशिवाय पीक चांगलें येणार नाहीं. ' २ ( सामा. ) सावली; छाया. ३ सावलीची स्थिति; आतपशून्यता. [ सं. छाया ] ०**पहाणें**-( माण. ) आरसा पाणी इ०त आपलें प्रतिबिंब पाहणें. **सावटी**-वि. सावटाची; सावलीची ( जागा, शेत, )

**सावट**—क्रिवि. ( खा. ) एकदम. -भात्रै ७.१.४ [ स+अवचित ]

**सावड**—स्त्री. शेतकामांत एकमेकांना जनावरें इ० ची मदत करणें; सांपड, इरजीक पहा. ( क्रि० करणें ).

**सावड**—स्त्रीन. ( गो. ) १ रानांतील फांद्यावगैरे राबासाठीं तोडणें. २ राब जाळून धान्य पेरणें ( डोंगरावर कडधान्य ) ०**मारप**-क्रि. रानांतील झाडी तोडून शेतजमीन तयार करणें.

**सा(सां)वडणें**—उक्रि. १ गोळा करणें; एकत्र करणें ( अस्ताव्यस्त वस्तू ) २ एकदम नेण्यासाठीं, एकजागीं करणें; ढीग करणें. ' करिन ब्राह्मण पादप्रक्षालन सांवडीन मी उष्टीं । ' -मोसभा २. ११. ' राख सावडणें. ' असा प्रयोग रूढ आहे. ३ सांचविणें; जमविणें ( पैसा ). ' तुज होता व्यथा टकमका पहाती । परी सावडीती द्रव्य आधी । ' ४ चिवडणें. ' येक दिव्यान्नें भक्षिती । येक विष्टा सावडिती । ' -दा ६.९.९ ५ ( कांहीं अर्थी ) सावरणें पहा. [ सावरणें ]

**सावण**—न. ( बे. ) सावा मळल्यानंतर उरणारें गवत, पेंढा. [ सावा ]

**सावंत**—( प्र. ) सामंत पहा ' तुं सावंत राओ वाचोनि आणिक । कवण राखेल । ' -भाए १०३. २ एक आडनांव.

**सावतें**—वि. सारखें. -शर [ सं. सम ]

**सावतोल**—पु. ( ब. ) दागिन्याचें रेशमी गोंडे वगैरेसकट वजन. -जनि १५. [ सं. सर्व; प्रा. साव+तोलणें ]

**सावत्र**—वि. (समासांत प्रथमपदीं उपयोग) सापत्न पहा. [सं. सापत्न्य; प्रा सावत्त] सावत्र-आई-भाऊ-मामा-चुलता-सासरा इ० सामाशब्द आहेत. **०भाव**-पु. १ सवतीमत्सर; सापत्नभाव. २ परकेपणा; दुजेपण.

**सावत्राई**—वि. दोन सावत्र बंधूंना राहण्यास सोईस्कर होईल असा एक घराच्या बांधणीचा प्रकार. दुघई, तिघई, चौसोपी, शृंगारी याप्रमाणें सावत्राई हाहि एक प्रकार आहे.

**सांवत्सर, सांवत्सरिक**—वि. प्रतिवर्षी येणारें, नियमानें करावयाचें (श्राद्धादिक); वार्षिक. [सं. संवत्सर] **सांवत्सरिक-श्राद्ध**-न. १ वार्षिक श्राद्ध; दरसाल मृततिथीला करावयाचें श्राद्ध. २ पक्ष; महालय (भाद्रपद महिन्यांतील).

**सावद**—न. (राजा. गो.) सावज; शिकार. (प्र.) सावज पहा.

**सावध**—वि. १ भानावर, शुद्धीवर असलेला; जागृत. -ज्ञा ६.२२५. 'सावध होऊनि साष्टांग लागली पाया।' -वसा १८. २ दक्ष; हुशार; सावधान. ३ (ल.) दुखण्यांतून, विपन्न दशेंतून, अज्ञानावस्थेंतून बाहेर पडलेला; उर्जितदशापन्न. [सं सावधान] **०गिरी**-स्त्री. १ शुद्धि; जागृतावस्था. २ दक्षता; सावधगिरी. 'भित्रेपणांत शहाणपणाची भर पडली म्हणजे त्याला सावधानता म्हणतात.' -टिव्या.

**सावधान**—वि. दक्ष; सावध; जागृत. 'उदईक आहे तुझें लग्न। तुवां असावें सावधान। पाणिग्रहण मी करीन।' -एरुस्व ५.७८; -तुगा १३१. -न. १ लग्न, मुंज लावतेवेळीं मंगलाष्टकें म्हणून 'सुमुहूर्त सावधान' असा या शब्दाचा करावयाचा प्रयोग. (याचा उपयोग मुंज्या मुलाला, वधूवराला 'सावध असा' असा इशारा देण्याचा असतो). २ (ल.) लग्न; विवाह. 'सावध असल्या-शिवाय सावधान झालें तर कुणालाही पश्चात्तापच होत असतो.' -संन्याशाचा संसार ८९. [सं] **०ता**-स्त्री. १ एकाग्रचित्त. २ दक्षता; हुशारी.

**सावधि, सावधिक**—वि. १ मर्यादित; ठराविक; परि-मित. 'ईश्वराचे गुण सावधि, नाहींत. 'भोजन भाषण सावधिक करावें.' २ अवकाश, अवधि असलेलें; वेळ, योग्य संधी अद्याप न आलेलें; ज्याची वेळ, मुदत संपली नाहीं असें. 'अजून तुमचें लग्न सावधिक आहे एव्हांपासून कशाला खटपट करितां?' ३ मध्यें अंतर तुटावयाचें, काटावयाचें राहिलें आहे असें (दूरस्थ वस्तूसंबंधी उपयोग). (सामा). सांतर. ४ विशिष्ट; सामान्य, सर्व साधारण नव्हे असें, मर्यादित अर्थकक्षा असलेलें. उदा० जमिनी संबंधांत बोलतांना शेत हें विशिष्ट झालें; झाडासंबंधांत फुलझाड हें विशिष्ट. ५ सापेक्ष; संबद्ध.

**सावन**—वि. सौर; सूर्यासंबंधीं (कालमान) उदा० सावन दिन-वर्ष इ० [सं] -पु सावनमास पहा. **०दिन**-न. ग्रह क्षितिजावर एकाच ठिकाणीं लागोपाठ येण्याचा काळ, किंवा एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काळ. **०मास**-पु सौरमास; सूर्याचें तीस वेळां उगवणें व मावळणें याला लाग-णारा काळ. **०वर्ष**-न. ३६० दिवसांचा काळ.

**सावनी कल्याण**—पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र गांधार, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति षाडव षाडव. वादी षड्ज, संवादी पंचम. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर.

**सावपा**—वि. (कों) सावध झालेला; शुद्धीवर आलेला.

**सावयव**—वि १ अंग, अवयव यांसहित; भाग, साधनें, परिवार असलेला. २ साक्षात्; मूर्तिमंत; साकार. 'सावएव अविद्येची मूर्ति। जन्म माझें।' -ऋ ४८; -ज्ञा १३.२९५. 'जैसी विद्युल्लता सावयव। उतरली पृथ्वीवरी।' ३ समग्र; अखंड. [सं. स+अवयव] **०अंक**-पु. (गणित) अपूर्णांका-सहित पूर्णांक असलेली संख्या.

**सावर**—स्त्री. न. स्नायु; साव पहा. बहुधां अनेक वचनांत उपयोग. उदा० सावरें धरतात-ओढतात, ताणतात-तुटतात-वळतात. [सं. स्नायु; प्रा. साव]

**सा(सां)वर**—पु. १ पुन्हां शक्ति, जोम, उत्साह परत येणें (दुखणें, संकट इ. नंतर) २ सत्ता, संपत्ति; मान इ० पुन्हां प्राप्त होणें 'अलीकडे राजाचा आश्रय लागल्यापासुन त्यानें सावर घेतला.' ३ वळकटी; दाब. -पेद ५.३३. ४ स्थिरस्थावर. [स+आवरणें किंवा सं. सम+व्याहर] **सा-सांवरणें**- १ गोळा करणें; एकत्रित आणणें; आवरून ठेवणें. २ सांभाळून धरणें; पडूं न देणें. (घसरलेला माणूस, वस्तू) उचलून धरणें. 'हा पडत होता म्यां त्यास सावरून धरलें.' ३ पुन्हां पूर्व स्थितीवर येणें (दुखणें, विपत्ति, नुकसान इ० नंतर सशक्त होणें). ४ दुरुस्त करणें; सुधारणें (चुकी, खोटें वर्तन इ०) ५ शाबूत राखणें; धक्का लागूं न देणें; जसाचा तसा ठेवणें. 'वेद मर्यादा सावरी। प्रीति ज्याची देवावरी।' ६ काळजीपूर्वक, निगा, आदर ठेवून सांभाळणें, रक्षिणें. 'मृत्तिका घेऊनि घाली वदनीं। कोण वनीं सावरी तीतें।' 'तशी प्रकट हे निजाश्रित जना सांवरी।' -केका १२०. ७ आदर, विनय इ० भाव दिसतील असें वागणें. 'तो धांवला सावरोन। चरणीं मिठी घातली।' -जै ८५.२२; -नव १२.१९८. ८ अंग धरणें; लठ्ठ होणें. ९ पार पाडणें; तडीस नेणें. 'स्वयंवरीं कृष्ण कसा वरी ते। केलें कसें साहस सावरीतें।' -सारुह १.४२.

**सांवर-री**—स्त्री. शेवरी; एक प्रकारच्या कापसाचें झाड. [सं. शाल्मली] **सावऱ्या**-पु. सावरीची काठी.

**सावरचिर्ने**—न. (बे.) एक प्रकारचें रताळें.

**सावरणी**—स्त्री. (गु.) केरसुणी; झाडू.

**सावरणें-णा**—न.पु. (सोनारी, कासारी) एक प्रकारची हातोडी [स+आवरण]

**सावेंर**—न. अंगण. -शर ?

**सावर्ण्य**—न. १ रंगाचा सारखेपणा; एकवर्णीपणा. २ वर्ग किंवा जाति हीं समान असणें. सजातीयत्व. [सं. स+वर्ण]

**सांवर्तिक**—वि. प्रलयकालीन, 'सांवर्तिक मेघांच्या लाजाव्या द्रौणिसायकां धारा।' -मोविराट (नवनीत ३०४) [सं. संवर्त]

**सावली**—स्त्री. १ छाया; प्रतिबिंब. २ प्रतिमा. ३ अनुसरणारी वस्तु, व्यक्ति. [सं. छाया, प्रा. छाआ; हिं. छाव; म. सांव (ली).] ०**पडणें**-१ आगामी गोष्टीचा प्रभाव दिसूं लागणे, चिन्हें दृग्गोचर होणें. २ आगामी गोष्टीचा परिणाम होण्याइतका त्याच्या आटोक्यांत असणें. 'नवव्या मासाची सावली पडल्यावर बाळंत झाली तर पोरास भय नाहीं.' ३ परिणाम होणें (विशेषतः अनिष्ट); अनुकरण करणें (निंदार्थी उपयोग). ०**पायाखालीं येणें-असणें**-माध्यान्ह होणें. **सावलीस उभा न राहणें**-अजीबात टाळणें, संबंध येऊं न देणें. **सावल्या गेल्या**-संध्याकाळ झाली. **सावली करणारा**-दिव्य करणाऱ्याचा प्रतिस्पर्धी.

**सावॅल-ळें**—न. १ एक प्रकारचें लुगडें; वस्त्र; नेसणें; वसन. 'स्तेन भले न स्त्रीचा नग्न करिती हरुनि सावलें काय।' -मोउद्योग ३.६०. २ (सामा.) स्त्रीवस्त्र; स्त्रीचा कपडा, पेहराव. 'परंतु मराठे मनुष्य पळूं लागिल्यावर कोणाची ईर कोणास नाहींशी होते. रांडेनें सावळें हुसकटलें तर झाडांस बांधिलें असतां झाड घेऊन बारा कोस पळतील.' -भाब ६८. [देप्रा. साउली=वस्त्र]

**सावव**—वि. प्र. सावयव पहा. -मनको

**सावशेष**—वि. अवशेषयुक्त; कांहीं शिल्लक असलेलें. [स+अवशेष]

**सावळ**—स्त्री. पाश; फांस. [क्रि० घालणे] 'यमकिंकर पाठविले। सांवळा हातीं।' -वसा ६४, -ख्रिपु २.४९.५१.

**सावळ**—स्त्रीन. (कों.) माड, ताड; सुरमाड, पोफळ इ० ची मोठी फांदी; झावळी. [सं. श्यामल किंवा छायावलि ?] **सावळी**-स्त्री. (कों.) लहान सावळ.

**सावळणें**—अक्रि. १ मावळणें; वाळणें; नाहींसा होत जाणें (गोंवर, कांजिण्या; देवी इ०). २ काळया होणे-पडणें (मावळतांना, देवी इ०). ३ काळवंडणें; करपणें. ४ उजळणें (काळाकुट्ट वर्ण, चेहरा). [सांवळा]

**सावळगोंदा**—वि. १ मलीन; घाणेरडा. २ अनाचारी; दुर्वर्तनी. 'सावळ गोंदा करीना परमार्थ कदा।' -दा २०.३.१८. **सावळगोंदें**-न. सांवळें गोंधळें पहा.

**सा(सां)वळा**—वि. १ निमगोरा; साधारण गोरा. 'सांवळी तनु सुकुमार।' 'सांवळी मी षोडशवर्षा।' -अमृत २६. २ जांभळया रंगाचा; श्यामल; काळा आणि तांबडा यामधील रंगाचा (बैल, जनावर). ३ (सामा.) काळसर. 'सावळा वर बरा गौर वधुला' ४ मेघयुक्त. -एभा २१. -पु कृष्ण. 'सांवळा, नंदाचा मुल खोटा गे।' [सं. श्यामल ना. सामल; हिं. सांवल]

**सांवळा गोंधळ**-पु. १ हलक्या प्रकारचा गोंधळ; तमाशा. (सं. शांभलिकः गौन्दलः-राजवाडे). २ सावपणाच्या पांघरुणाखालीं चाललेला अनिष्ट प्रकार; गुप्त अनाचार; व्यभिचार. ३ सावळें गोंधळें पहा. **सांवळेंगोंधळें**-न. १ कांहीं निकाल न होतां गोंधळांत अधांतरीं राहणें; अशी त्रिशंकु अवस्था (देणें, घेणें, वाद इ० ची). २ तात्पुरती सारवासारव, तडजोड करणें. ३ सोंवळें ओंवळें; आचार; पंक्तिविचार इ० विषयीं परंपरागत व्यवस्था न राखणें; संकर; धर्मबाह्य वर्तन.

**सांवळी**—स्त्री. (गो.) वेडसरपणा.

**सा(सां)वा**—पु. कांग; एक तृणधान्य. याचा भात होतो. [सं. श्यामाक; हिं. सांवा] ०**बीवड**-स्त्री. जमीन खतावण्याकरितां सावा, तीळ यांचा बिवड घेण्यासाठीं जमीनीची नांगरणी करणें. पावसाळ्यापूर्वी दोन महिने माळ जमिनीची अशी मशागत करतात. **साव्याण**-न. साव्याचा पेंढा. [सावा+तृण]

**सा-सांवा**—पु. साग, सागवान; साया.

**सा-सांवा**—वि १ बिनकांटेरी. २ (कु.) गोड. 'सावें पाणी'=गोडें पाणी. साव पहा.

**सावाइकें**—न १ इतिकर्तव्यता (मृत्युलोकीची). -माज्ञा १८.१७२५. २ अडचण. -बंज्ञा १८.१७२४. [सं. सार्व-ऐहिक ?]

**सावाई**—स्त्री. सांगता; संपूर्णता. [सं. सर्व; प्रा. सव्व-साव]

**सावाइणें**—सावायणें पहा.

**सावाद**—न. (कु.) शिकार; सावज पहा. [सं. श्वापद; प्रा. सावय]

**सावाधावा**—पु. १ साहाय्यासाठीं धांवून येणें. 'तुजवीण कोण सावाधांवा करी। येई वो क्षडकरी पांडुरंगे।' -तुगा ८६०. २ धांवाधांव; धांवपळ. 'करितां संसारीं सांवाधांवा।' -दावि २४१. [धांवा द्वि.]

**सावान**—सायवान पहा.

**सावाय-व**—पु. सहाय्य; मदत. 'ऐसा स्वयंभु जो जीवें लाहु। सावायेंवीण उद्भटु।' –ज्ञा १८.८५७. 'तें इंधन जैसी आगी। सावावो होय।' –ज्ञा ३.२६५. २ साह्यकर्ता. –स्वानु ९.४.३७. [सं. सहाय] **सावायणें-यिणें, सावावणें**—अक्रि. १ संयुक्त होणें; संग लाभला जाणें. 'तें नित्यकर्म भलें। होय नैमत्तिकीं सावाइलें। सोनयासि जोडलें। सौरम्य जैसें।' –ज्ञा १८.५८८; –अमृ १०.२२. २ साहाय करणें. –ज्ञा १७.३६७.

**सावारे**—पुअव. स्नायु; सांव, सावर पहा. (क्रि० ओढणें, वळणें, तुटणें). सावारा असा एकवचनी प्रयोग क्वचितच होतो.

**सावास**—पु. १ सहवास; संग. 'तिअें लाजेचां सावासीं भकलिलीं। फुन धरितीचि ना।' –शिशु ६०७. २ सहवासी; हितकर्ता. 'मज तुंचि एकु सावासु। श्रीचक्रधरा पैं।' –भाए १३४. [सं. सहवास] **सावासिनी**–स्त्री. सखी; दासी. 'तंव वैदर्भी आभाइली। सावासिनीतें।' –शिशु १९०.

**साविया**—वि. सरळ. –ज्ञा ८.२३७. –क्रिवि. १ सहज; अकस्मात् 'जे अमृतही परि नावडे। ऐसें सावियाचि आरोचकु जै पडे।' –ज्ञा ४.१९७. २ सर्वथा. 'घेईल हें साविया। विरुद्धचि।' –अमृ ६.७५. [सं. सव्य; प्रा. सव्व; किंवा सं. स्वाभाव्य; प्रा. साहव्व]

**सावित्री**—स्त्री. १ ब्रह्मदेवाची पत्नी व त्रैवर्णिकांची मंत्ररूप माता. २ गायत्रीमंत्र. ३ सत्यवानाची पत्नी. [सं.] ०**व्रत**–न. वटपूर्णिमेचें व्रत. ज्येष्ठ शु॥ १५ स पाळतात. ०**सूत्र**–न. यज्ञोपवीत; जानवें.

**सावी-व्वी, सांव्वी**—स्त्री षष्ठीपूजनाचा विधि; सट्टावी. [सं. षष्ठि]

**सावीज-द**—न. (राजा.) सावज पहा.

**सावुली**—वि. (भि.) सहावी. 'गोठ सावुली.' –भि १७.

**सावेरी**—पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. आरोहांत गांधार निषाद वर्ज्य. जाति औडुव-संपूर्ण; वादी पंचम, संवादी षड्ज. गानसमय प्रातःकाल.

**सावेव**—वि १ साकार; सावयव. 'माया हे सावेव किंवा निरावेव। नकळे याचा ठाव कोणे परी।' –ब १६२. २ सांग; संपूर्ण; सर्व. –अमृ ५.३. ३ मूर्तिमंत. 'मज पाहतां सावेव। शांतिचि ते।' –ज्ञा ६.२५५.

**सावेसा**—स्त्री. स्वेच्छा; अभिलाष. –शर. [सं. स्वेच्छा]

**सावो**—पु. (गो) गोड्या पाण्यांतील मासा. [साव=गोड; सावें पाणी=गोडें पाणी]

**सावोत्रा**—साहोत्रा पहा. 'सावोत्रा देखील इनामतिजाईसुद्धां दरोबस्त अमलाचा करार.' –वाडसभा १.६४.

**सॉव्हरिन**—पु. इंग्लंड देशांतील सोन्याचें नाणें. किंमत १ पौंड=सुमारें तेराचौदा रुपये. [इं.]

**साशंक**—वि. १ भित्रा; बुजणारा; शंकेखोर. २ खात्री, विश्वास नसलेला; कचरणारा. [स+आशंका]

**सांशयिक**—वि. १ संशयास्पद; संदिग्ध; अनिश्चित. २ शंकेखोर; साशंक. [सं. संशय]

**साशिवटा**—पु. (मुंबई) साक्षात्कार.

**साष्टकोष्ट**—न. (ना.) साटेंलोटें.

**साष्टांग**—वि. १ अष्टांगासहित (नमस्कार, प्रणाम). २ संपूर्ण; सपशेल (लोटांगण, शरण) –पु साष्टांग नमस्कार (क्रि० घालणें). [स+अष्ट+अंग] ०**नमस्कार**–पु. जमिनीवर पडून (आठ अंगें टेंकून) केलेला नमस्कार; लोटांगण. 'साष्टांग नमस्कारास अधिकारू। नाना प्रतिमा देवगुरु।' –दा ४.६.४.

**सास**—वि. सत्य; खरें. 'सप्रीचे सुष सास करील.' –उषा १२. [सं. सत्य, प्रा. सच्च; म. साच]

**सासट**—वि. (प्र.) सहासष्ट पहा.

**सासणाय**—पु. (गो.) साक्षात्कार.

**सांसणें**—क्रि. सांचविणें. 'मधु मेळवूनी माशी। आणिकां सासी पारधिया।' –तुगा ३६३१.

**सासन**—न. साधन; उपकरण.

**सासन(ण)णें, सांसि(सी)नणें, सासिन्नणें**—क्रि. १ तयार होणें; पिकणें. –ज्ञा ६.२५७. २ बहरणें; फोफावणें. 'नातरी शांतरसें सींपतां। सासीनली ज्ञानलता।' –शिशु ३२.

**सासवडी कागद**—पु. सासवडचा हातानें केलेला कागद. (पूर्वी जुन्नर, सासवड, दौलताबाद इ० ठिकाणीं कागदाचे कारखाने असत); जाड जमाखर्ची वह्याचे कागद. 'कंदी पागोटीं, खादीचीं धोतरें, बरूच्या लेखण्या, काजळाची शाई, सासवडी कागद वगैरे वस्तूंस उदार आश्रय देणें.' –आगर ३.९६.

**सा(सां)सपणें**—उक्रि. १ चाचपणें; हातानें दाबून, हात फिरवून पाहाणें. 'सांसपी... तयाच्या... आंगातें.' –मोविराट १.१२८. २ हुडकणें; शोधणें (अनेक वस्तूंतुन एकाला). ३ कुरवाळणें; अंगावरून हात फिरविणें (लहानमूल, दुःखित इ० स समाधानाकरितां). –अक्रि. १ (अंधारांत) चांचपडत जाणें. २ रेंगाळणें. [सं. संस्पृश्]

**सासबहु**—स्त्री. (सासु-सून) दोन सारख्या दिसणाऱ्या पण लहानमोठ्या गोष्टी. (ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर सासबहु या नांवाचीं दोन लहानमोठीं देवळें आहेत तसेंच सांचीस दोन लहानमोठे स्तूप आहेत त्यांस म्हणतात). [हिं. सास=सासु+बहु=सून]

**सासर-रें**—न. सासरा-सासूचें घर; पतिगृह. ' कन्या सासऱ्यासी जाये । मागें परतोनी पाहे । ' ' म्हणे इकडे सासेंर तिकडे माहेर । दोहींकडे आप्तचि समग्र । ' -ह २४.३८ [ सासरा ] म्ह० १ वेडीला सासर काय माहेर काय !. २ सासरीं एकादशी माहेरीं शिवरात्र ( दोन्ही घरीं दारिद्र्य ). ०माहेर-१ सासरीं पाठविणें व माहेरीं आणणें; विचारपूस करणें ( मुलीची ) २ संक्रांतीच्या वेळीं दोन विवाहित मुली-एक माहेरवाशीण व दुसरी सासुरवाशीण म्हणून-दोनतीन दिवस राहावयास आणून त्यांना चोळीबांगडी करून किंक्रांतीनंतर त्यांची पाठवणी करणें. ३ (नवीन लग्न झालेल्या मुलींमध्यें ) भांगाचा एक प्रकार. ०वास-( प्र. ) सासुरवास पहा.

**सासरा**—पु १ नवऱ्याचा किंवा बायकोचा बाप. २ सासऱ्याच्या स्थानीं मानला गेलेला नवऱ्याचा किंवा बायकोचा नातेवाईक. उदा० आजेसासरा, चुलतसासरा, इ०. [ सं. श्वशुर; प्रा. स( सा )सुर; हिं. ससुर. तुल० फ्रें.जि. सस्त्रो ] म्ह० सासऱ्या गेली म्हणून काय शिंदळ झाली ? **सासुरें, सासूर**-सासर पहा. **सासुरवाट**-स्त्री. स्त्रियांचा डावीकडचा भांग. उजवीकडच्यास माहेरवाट म्हणतात. **सासुरवड-वाडी**-स्त्री. १ बायकोच्या बापाचें घर; बायकोचें माहेर. २ सासरें. ' कीं भवाब्धिसम सासुरवाडा । ' -मंराधा ५२. **सासुरवाशी-सी, सासुरवाशीण**-स्त्री. १ सासरीं राहणारी ( परतंत्र ) मुलगी; सून. ' सासुरवाशी । सुन रुसून बसली कैशी । ' -भोंडला. २ (ल.) एखाद्याच्या धाकामुळें स्वतंत्रपणें वागतां न येणारी व्यक्ति; ताटाखालचें मांजर. **सासुरवास**-१ सुनेचें सासरीं राहणें. २ ( ल. ) सासरीं सासू, सासरा, नणंद, दीर इ० करतात तो जाच, छळ. ३ (ल ) एखाद्याचा होणारा जाच, छळ, परतंत्रपणा. **सासू, सासूस**-स्त्री. नवऱ्याची किंवा बायकोची आई; सासऱ्याची बायको. [ सं. श्वश्रू; प्रा. सासु; हिं. सास; गु. सासु; सिं. ससु ] म्ह० १ सासूचा पाय सुनेस लागला तर सुनेनेंच पायां पडावें, सुनेचा पाय सासूस लागला तरी तेंच. २ चार दिवस सासूचे चार दिवस सुनेचे. **सासुडी**-स्त्री. ( निंदाव्यं. ) सासू. **सासूपण**-न. सासुरवास; सासरचा छळ. ' सासूबाई सासू हिनं सासूपण केलं । कपाळीचं कुंकू मला जन्मवरी दिलं । ' -जात्यावरील गाणें. **सासूसून**-सासबहू पहा. **सास्वासुना**-मुलींचा एक खेळ. -मखेपु २६४.

**सांसर्गिक**—वि. स्पर्शजन्य; संसर्गापासून उत्पन्न होणारा; एकापासून दुसऱ्याला लागणारा, बाधणारा, ( रोग ). ( इं. ) इन्फेक्शिअस.

**सा( सां )सव, सांसू**—स्त्री. ( गो. ) मोहरी. [ सं. सर्षप; प्रा. सासव ] **सांसवेल, सांसेल**-न. ( गो. ) मोहरीचें तेल. **सांसोव**-स्त्री. ( गो. ) मोहरीचें कालवण; रायतें.

**सासष्ट**—वि. ६६; सहासष्ट पहा.

**सासान**—न. अंदण. -शर.

**सासाय**—पु. ( गो. ) साक्षात्कार; प्रचीति.

**सांसारिक**—वि संसारासंबंधीं; ऐहिक; प्रापंचिक. [ सं. संसार ]

**सांसिद्धिक**—वि. स्वाभाविक; स्वयंभू; मूळची. [ सं. ]

**सांसी**—पु. एक गुन्हेगार जात व तींतील व्यक्ति; कंजार.

**सासु**—वि. जिवंत; सप्राण. ' पावुनि भवत्प्रसादें निजपद बहुकाळ सासु राहो तो । ' -मोवन १३.६८. [ सं+असु ]

**सासु**—स्त्री. ( ना. ) शेकोटीसाठीं लागणारें जळण.

**सांस्थानिक**—वि. १ संस्थानासंबंधीं; संस्थानी. ( कारभार, नोकरी, भांडण इ० ). २ निर्वाहासाठीं संस्थान, किंवा गांव स्वाधीन असलेला; संस्थानिक. [ सं. संस्थान ]

**सास्ना**—स्त्री. गाय, बैल इ० जनावराच्या मानेखालची पोळी.

**साहकार-री**—पु. ( प्र. ) सहकार-री पहा.

**साहंकार**—वि. अहंकारी; अभिमानी; गर्विष्ठ ' तैसेनि साहंकारें । फळाभिलाषियें नरें । कीजे गा आदरें । जें जें कांहीं । ' -ज्ञा १८.६०५. [ स+अहंकार ]

**साहचर्य**—न. १ बरोबर असणें, जाणें; जोड; गट्टी; संबंध. ' दारिद्र्य व विद्याव्यासंग यांचें आज हजारों वर्षांपासून ब्राह्मणांशीं साहचर्य आहे. ' -टि ४.१६६. २ सहवास; मैत्री; संगत. [ सं. ]

**साहजिक**—वि १ सुलभ; सोपें; सहज साधणारें. २ सहज, तात्काल, एकदम घडून येणारें; स्वाभाविक. ३ आगंतुक; आकस्मिक. -क्रिवि. स्वाभाविकरीत्या; सहज. [ सहज ]

**साहटें, साहटणें**—न. ( प्र. ) सायटें पहा.

**साहणें**—उक्रि. सहन करणें; सोसणें. ' साहा रे साहा भणौनि हाणती । परतौनियां । ' -शिशु ९५९; -ज्ञा १.१८६. [ सं. सह् ] **साहत साहत**-क्रिवि. कसें तरी सहन करीत, कष्ट सोशीत, अळेंबळें ( खाणें, पिणें, शिकणें इ० ). **साहता**-वि. सहन करणारा. ' आतां सर्वेही साहातिया गरिमा । गर्वा न ये तेचि क्षमा । ' -ज्ञा १६.१९१. **साहून पाहून**-क्रिवि. नुकसान सोसून व पडतें घेऊन; कष्टत पण आदरपूर्वक वागून ( तडजोड करणारे, व्यापारी उदीम इ० च्या तोंडीचा वाक्प्रचार ).

**साहणें**—न. ( कों. ) पाख्यास किंवा भिंतीस प्रकाश येण्यासाठीं, धूर जाण्यासाठीं ठेवतात तें भोंक; गवाक्ष; झरोका; साणें पहा. ' डोळे उघडितां त्वरित । पेंधा अडकला साहण्यांत । ' -ह ९.१५७.

**साहन**—साहान पहा.

**साहन**—वि. लहान; सान. लहान शब्दाबरोबर उपयोग. उदा० लाहन साहन.

**साहनक**—सानक पहा.

**साहनट, साहनवट**—स्त्री. (प्रां.) रिकामी, मोकळी जागा (गांवांतील); वर इमारत नसलेली जागा. [अर. साहत्= मैदान?]

**साहरा**—पु. साह्य; मदत. (क्रि० देणें). [सं. सहकार]

**साहरा**—पु. (कों.) थर; पापुद्रा. सायरा पहा.

**साहरी, साहरेल, साहऱ्येल**—सायरी, सायरेल पहा.

**साहस**—न. १ धाडस; धैर्य; अचाटपणा; मोठा झपाटा. योद्ध्याला आवश्यक अशा उद्यम, साहस, धैर्य, बल, शक्ति, पराक्रम या सहा गुणांपैकीं एक. २ अविचार. 'झाला तिणें उपजतां बाळपणीं करुनि साहस त्यजिला।' -मोकर्ण २२. ३३. ३ धाडसाचें, अविचाराचें कृत्य; कोणतेंहि झपाट्याचें, धडाक्याचें काम. म्ह० साहस केल्यावांचून लक्ष्मी मिळत नाहीं. **साहसिक, साहसी**-वि. धाडसी; अविचारी; साहस-कर्म करणारा. 'हें नेणुनि मज साहसी म्हणो नीच।' -मोकर्ण २७.१९.

**साहस्र**—न. हजारांचा समूह. 'एकांगुष्ठींहि तपिजे। तप साहस्रीं।' -ज्ञा १७.४१५. -वि. हजारासंबंधीं-विषयीं. [सं. सहस्र]

**साहा**—वि. १ ६; सहा ही संख्या. सहा पहा. 'बसेत साहा कट दाट पाही। पिपीलिकेला परि मार्ग नाहीं।' -सारुह ८.५३. २ (सांकेतिक) सहा शास्त्रें. 'कळा वाढविती शब्द। साही जणांशीं विशाद।' -एरुस्व ६.७७; -होला १५. **साही**-अ. साहानें गुणून. 'एके साही साहा.' -वि. साहा पहा. 'साही चक्रें ओलांडुनि। मग स्थिरावला स्थानीं।' -सिसं ४.१२९. [सं. षट्] **साहा महिन्याची जांभई**-स्त्री. फार काळ लांबलेला, अंत पाहणारा खटला, व्यवहार इ० स लावतात.

**साहाकार**—पु. साह्य; मदत. 'ते सत्त्वशुद्धी साहाकारें। गुरुकृपामृततुषारें।' -ज्ञा १८.२५९. [सं. सहकार] **साहाकारी**-वि. सहाय्यकारी; मदतगार. 'साहाकारी तूं भक्तास। म्हणऊन तुज विनवितसे।' -देवसंत ११.

**साहाजक**—वि. निरंतर; शाश्वत. -वाडबाबा १.५५. [साहानकबद्दल चुकीनें] (पहा).

**साहाजण-न**—न. शहाजण; मोठा डंका, नगारा. [फा. शाद्याना. शहाजण पहा.]

**साहाण**—स्त्री. गंध उगाळण्याचा दगड. सहाण पहा.

**साहान**—न. साधन; सामुग्री; परिवार. 'काय कामधेनू-सवें सर्वे साहान। चालत असे।' -ज्ञा १०.३०९.

**साहान**—न. (महानु.) (घोड्यांचें) सैन्य; (घोड) दळ. 'ते आं घोडेआंचें साहान।' -शिशु ५०६ [सैन्य]

**साहानक-नुक**—वि. शाश्वत; अक्षय. 'कीं श्रीकृष्णाचें उसिटें सेविती। ते ब्रह्मादिकां वंद्य होती। साहानुक सत्यलोकु भोगिती। सेखीं कैवल्यपदा।' -दाव २६८. [अर. सहनक-सानक पहा]

**साहाय्य**—न. १ पाठिंबा; मदत; साह्य; जोड. २ स्नेह; संगत. [सं.] **०कारी**-वि. सहकारी; सहकार्य करणारी. (इं.) कोऑपरेटिव्ह. 'शेतकऱ्यांनीं आपापसांत परस्पर साहाय्यकारी बँका काढाव्या.' -टि २.४६३.

**साहित्य**—न. १ सामुग्री; साधनें; उपकरणें (एखाद्या वस्तूच्या, कार्याच्या उत्पादन-निर्मिति-उभारणी इ० ला लागणारीं). उदा० लग्नाचें-मुंजीचें साहित्य. -मोकर्ण २०.३९. २ सहवास; संगत; स्नेह. 'साहित्य भंगलें येणें बोलें। म्हणती एक।' -दा ८.२.३९. ३ संबंध; ऐक्य; संघ. ४ साहाय्य; मदत. 'संसक्त मथुन जय हि साहित्य करी जपोनि धर्माचें।' -मोशल्य २.१४. 'अडल्याचें साहित्य करावें' -सिंब ५१. ४ (सांकेतिक) तेल (विशेष प्रसंगीं, प्रभातसमयीं इ०). ५ अलंकारशास्त्र; अलंकार. ज्ञा १.६. ६ काव्य, नाट्य, कथा, लालित्य यांचा समावेश असलेली वाङ्मयशाखा. 'साहित्याचिया खेडकुलिया।' -शिशु २६. -एभा १.१०१. ७ (व्यापक) वाङ्मय; सारस्वत. [सं.] **०पत्र**-न. मदतीची शिफारस करणारें पत्र, दाखला. नव्या अंमलदाराच्या मदतीसाठीं अशीं पत्रें देत. -भाअ १८२२. 'मारवाडी भीमसिंग आणखी बहुत छोटे मोठे सरदार यांस साहित्य पत्रें दिलीं.' -भाव १४. **०शास्त्र**-न. काव्य, नाट्य इ०तील अलंकारलक्षणें, गुण, दोष, पद्धति, वगैरे विवेचिणारें शास्त्र; अलंकारशास्त्र; भाषासौंदर्यशास्त्र. **०संमेलन**-न. साहित्यिक चर्चा, ठराव इ० साठीं भरणारा साहित्यिकांचा मेळावा; वाङ्मयसभा; वाङ्मयपरिषद्. **०सहित्य**-न. साहित्य समुच्चयार्थी. [साहित्यद्वि.]

**साहुकार, साहू**—सावकार पहा.

**साहें**—न. साह्य; मदत. 'एक म्हणती उच्छिष्ट चांडाळी। साहें करवी।' -दा ८.१०.३५ [सं. साहाय्य] **साहेकरी**-वि. मदत करणारा. 'भक्त साहेकरी पांडुरंग।' -रामदासी २.६७. **साहेभूत**-साह्यभूत; उपयोगी. 'साहेभूत सर्वोपरी। साक्षपें होये।' -दा १४.१४.५.४०.

**साहेब**—पु. १ स्वामी; धनी; मालक. २ अधिकारी; वरिष्ठ. 'जैसा साहेब नमस्कारिजे। ओळखिल्या उपरि।' -दा ११.९.७. २ टोपीवाला; इंग्रज; युरोपियन. 'साहेबांचे तैं काळ।' -संग्रामगीतें १३०. ३ प्रतिष्ठाबोधक संज्ञा. महाराज, श्रीमंत या अर्थी. ४

(समासांत गौरवार्थी) नांव, हुद्दा, टोपणनांव इ० पुढें योजतात. उदा० पाटीलसाहेब, नानासाहेब, रावसाहेब इ० ५ स्त्रियांच्या प्रतिष्ठानामापुढें उपयोग. केव्हां केव्हां हा नपुंसक बहुवचनी होतो. उदा० 'बाईसाहेब आलीं, ताईसाहेब गेलीं.' ६ देवासहि भक्तिपूर्वक लावतात. उदा० जगदंबेस 'आईसाहेब' असें म्हणण्याची वहिवाट आहे. 'बंदे हुशार रहनाबे। साहेब राजी रखनाबे।' [अर. साहिब्] ०काम-चाकरी-न. वरिष्ठाचें काम; स्वामिसेवा; सरकारी काम. 'साहेबकामांस नाहीं गेला। गृहींच सुखाडोनि बैसला।' -दा १२.१.५. ०किराण-न-नपु. सुयोगाचा स्वामी; शुभग्रहांच्या युतीमुळें वैभवशाली. 'शहाजान साहेब किरान यांणीं बत्तीस वर्षे बादशहात करून उपरांत राहिले.' -वाडसनदा १४९. [अर. साहिब् किरान्] ०जादा-पु. १ राजपुत्र. २ उमराव.' इकडे प्रभु बाजिराय तिकडे फत्तेसिंग साहेबजादा।' -अफला ४६. [फा. साहिब्+झादा] ०नौबत-स्त्री. राजादिकांच्या स्वारींत पुढें हत्तीवर घालून चालविलेली नौबद, मोठा डंका. 'साहेबनौबत तुडुम् तुडुम् झडे।' अमृत -६४. ०मवसूफ-फ-साहेबमजकूर. 'येविशींचा सिद्धांत करुन सरकारास साहेब मवसुफ यांणीं दाखवला.' -इनाम १०९. [फा. साहिब+मौसुफ] ०मुलूख-क-पु. खुश्कीवरील मालक, राजा. 'आम्हांसी जो साहेब-मुलूख असेल तो दुश्मनी करूं शकत नाहीं.' -ऐटि १.६०. ०यख्तियार-पु. अधिकारी. ०रियासत-पु. राजा; राज्यकर्ता. 'दक्षणचे सर्व साहेबरियासत यांचा एक जाला.' -पया ४७३; -रा १९.१६. ०लोक-पु.अव. इंग्रज; युरोपियन. ०सुभा-पु. प्रांताधिप; सरसुभा. 'एकेक पदरचा सेवक साहेब सुभा।' -ऐपो ३०४. ०सेवा-साहेबकाम पहा. 'ते साहेब सेवेंत घसरले।' -ऐपो २५०. ०हिम्मत-वि. धैर्यवान्; साहसी. 'फत्ते-नसीब व साहेब-हिम्मत आहेत; करितां हरएक प्रकारें फिरंगियाचे फौजेस तंग करितील.' -चिरा १९. साहेबी-स्त्री. १ सत्ता; स्वामित्व. 'मुलुखांत साहेबी कारकुनाखेरीज कोणाची नाहीं.' -सभासद २४. २ मोठेपणा; सर्वांनीं साहेब म्हणावें असा प्राप्त झालेला अधिकार, दर्जा. -वि. १ साहेब, युरोपियन यासंबंधी (वेष, रीत, अधिकार इ०). २ द्राक्षाची एक जात ही लांबट व पांढरी असुन फळ फार मधुर असतें. साहेबीण-स्त्री. १ साहेबाची बायको; युरोपियन स्त्री; मडम. २ प्रतिष्ठित स्त्री; थोर कुलांतील स्त्री.

**साहोत्रा**—पु. १ दरमहा किंवा दरसाल शेंकडा सहा असा व्याजाचा दर. २ शंभरांत सहावा हिस्सा घेण्याचा मालकी हक्क (मालक, सरकारी नोकर इ०चा एखाद्या ठिकाणीं). ३ उत्पन्नाचा एकषष्ठांश. हा राजाचा असे. -गांगा ८. ४ चौथाईपैकीं पंतसचिवाचा हिस्सा. चौथ पहा. [सं. षष्ठ; -म. साहा+उत्तर]

**साह्य**—न. १ पाठिंबा; मदत; साहाय्य. २ संगत; मैत्री; ऐक्य; मिलाफ. [सं.] ०करणें-(कायदा) उत्तेजन देणें; मदत करणें; संगनमत करून कांहीं एक गोष्ट करणें. (इं.) अबेटमेंट. ०भूत-वि. मदतगार; उपयोगी पडणारा.

**साह्यटें, साह्यरा-री-रेल**—सायटें, सायरा इ० पहा.

**साह्या**—पु. साग; साया. [सं. शाखा; प्रा. साहा]

**साळ**—स्त्री. भात. देशावर साळ म्हणतात. 'कांडीतसे लंकेशाचें दळ। साळी ऐसें तेधवां।' -रावि २०.१८८.-ज्ञा १८.९५. [सं. शालि; प्रा. सालि] साळवण-न. भाताचा पेंढा. [सं. शालितृण] साळीडाळी-स्त्री. अव. मंगळागौर, महालक्ष्मी इ०च्या पूजेमध्यें सोळा मुगाच्या डाळिंब्या व सोळा तांदूळ हीं जीं वाहावीं लागतात तीं. [साळ+डाळ]

**साळ**—स्त्री. १ (प्र.) शाळा पहा. 'न जाय तो पुत्र कदापि साळे।' -सारुह २.९. २ सुतार, लोहार, कासार इ०च्या कामाचा कारखाना, ठिकाण; धंद्याचें स्थळ. 'मग कालिका झाली प्रसन्न। पुत्रासी देती झाली वरदान। तें आदि सांगेन। साळसूत्र।' -कालिकापुराण २८.५. ३ (समासांत) जागा; ठिकाण. उदा० घोडसाळ, टांकसाळ, इ०. 'गीतसाळ करी कुडी किन्नराची।' -भाए २२. [सं. शाला; प्रा. साल] ०घालणें-मांडणें-शाळा काढणें.

**साळ**—साळी (विणकर) पहा. ०घालणें-(रेशीम, सूत इ० कांची) जितकें लांब सणंग विणावयाचें असेल तितक्या अंतरावर खुंट्या मारून त्यांच्याभोंवतीं सूत गुंडाळून तितका लांब ताणा होई असें करणें. ०वट-टी,साळवी, साळाऊ-वि. साळ्यांनीं विणलेलें. याच्या उलट कोष्टी, कोष्टाऊ. ०वाडा-पु. विणकर लोक राहतात तो भाग.

**साळ, साळई**—स्त्री. साळू; सायाळ. अंगावर लांब कांटेरी पिसें असणारें जनावर. [सं. शल्य] साळजिवाद-न. साळ पहा. साळपीस-न. साळू जनावराचें पीस. साळशीट-त-द-न. १ साळपीस. २ साळू. साळशी-स्त्री. साळू. साळिंद्र, साळिंद्र-द्री-द्रें-साळशीट पहा. साळी-ळू-स्त्री. सायाळ जनावर.

**साळई**—स्त्री. साळवणी (झाड) पहा. 'जेवीं साळईच्या रुखा। साळईच बीज येखा।' -एभा ३.१२७. [सं. शाल; प्रा. साल]

**साळकाई-माळकाई**—स्त्री. (बहुधा अनेकवचनी प्रयोग) कोणी तरी फालतूक, सटरफटर बाई. निंदार्थी वापरतात. 'सगळा थाट त्या माईसाहेबांचा आणि त्यांनीं जमविलेल्या साळकाया माळकायांचा.' -पकोधे. [सं. श्यालिका+मालिका. म. साळी (का)+माळका] साळकेगोळके-पुअव. कोणी तरी माणसें; फालतू, अलबतेगलबते. [सं. श्यालक द्वि.] साळकोजी

**माळकोजी**-पु. १ वरील प्रमाणेंच अर्थ. २ गोमागणेश; कोणी बडा माणूस (निंदार्थी उपयोग). ' तूं मोठा साळकोजीमाळकोजी लागून गेलास, मला ठाऊक आहे. ' [ सं. श्यालक+मालिका; म. साळकमाळका ]

**साळकें**—न. ( गो. सोनारी ) कमळाच्या आकाराचा फुलासारखा दागिना. [ सं. शालुक; गो. साळीक=कमळ ]

**साळखादें**—न. एक प्रकारची गांधिल माशी.

**साळढाळ**—वि. १ साधा; सरळ; निगर्वी; मनमिळाऊ. २ प्रांजळ; मोकळा; खुल्या दिलाचा. ' सगळया आपल्या सरळ न साळढाळ. ' –खरादे ३८. ३ सौम्य प्रकृतीचा; विचारी. ४ कपट, कारस्थान न करणारा; सालस. ५ दुसऱ्याच्या दोषांकडे दुर्लक्ष करणारा; उदार मनाचा. ' या बरोबरच बारिकसारिक मतभेदाचें कांहीं कानेकोपरे असले तर त्यांकडे कानाडोळा करण्याला मनाची जी एक साळढाळ वृत्ति असावी लागते तीहि त्यांजपाशीं मोठीच आहे. ' –अस्पृ ३. ६ वरील वृत्तीच्या माणसाच्या वर्तन-व्यवहार-भाषण इ० ला लावतात. [ सढळ ? धवल–ढाळ द्वि. ]

**साळढोकपणा**—पु. दुर्लक्ष; उपेक्षा; चालढकल; ढिलाई. –केसरी १५.१.३७.

**साळणी**—स्त्री. छाटणी; कापणी; तासणी. –कृषि ७०२. [ साल ] **साळणें**-उक्रि. १ तासणें. २ साफ करणें; मऊ, गुळगुळीत करणें. ३ छाटणें; काटणें ( फांद्या, झाडें ). ४ सोलणें; साल काढणें. ' सेवावया आनंदनव्हाळी । प्रथम उसांची पानें साळीं । ' –एभा २८.२२२. [ साल; हिं. छौल, छालना ] **साळींव**-वि. तासलेलें; छाटलेलें; सोललेलें.

**साळमाळ**—वि. अतिशय, विलक्षण लांब ( इमारत, खोली, रस्ता इ० ); लांबच्यालांब. [ माळ द्वि. ]

**साळवणी**—स्त्री. एक झाड. [ सं. शालपर्णी ]

**साळसुद-ध**—वि. १ साधा; निष्कपटी; प्रामाणिक. २ छक्केपंजे माहित नसलेला; सरळमार्गी. [ सं. शालाशुद्ध ] **साळसुदकी**-स्त्री. प्रामाणिकपणा; सरळपणा.

**साळत्री**—पु. पशुवैद्य; घोडाडाक्टर. साळोत्तरी पहा. [ सं. शालिहोत्री ]

**साळा**—पु. ( प्र. ) साला. बायकोचा भाऊ; श्यालक. [ सं. श्यालक; प्रा. साल ] **साळी**-स्त्री. बायकोची बहीण; मेहुणी. [ सं. श्याली; प्रा. साली ]

**साळांक**—वि. सालंकृत; अलंकारांनीं युक्त. ' तेथ कैवल्य साळांक झालें । नावेक वेऱ्ही । ' –शिशु ७०७. [ स+अलंकृत ]

**साळावळीस येणें**—( गो. ) हितकर होणें.

**साळाभोळा**—वि. सरळ; साधा; प्रामाणिक; छक्केपंजे माहीत नसलेला. साळसूद पहा. ' साळेभोळे जाले ते भक्तिस्तव ' –दावि ४१६. [ भोळा द्वि. शाला+भोळा ? ]

**साळी**—पु. विणकरजात व तींतील व्यक्ति. **म्ह**० साळयाची गाय माळयाचें वांसरूं=निरनिराळया ठिकाणांहून आणलेली सामुग्री **०माळी**-पुअ. समाजांतील खालच्या वर्गांना लावतात; सामान्य, उच्च दर्जाचे नसलेले लोक.

**साळीक, साळुक**—न. ( गो. कु. ) १ कमळ. २ कमळासारखा डोक्यांतील दागिना. [ सं शालुक=कमलकंद ]

**साळुंकी-खी, साळोंकी-खी**—स्त्री. मैनेप्रमाणें एक गाणारा पक्षी; साळू. [ दे. प्रा. सालंकी ] **साळू**-१ साळुंकीचें अल्प रूप. ' रावे साळया हंस मयूर । ' –ह १७.१६. २ (लावण्यांतून रूढ ) प्रियकरीण; छबेली. ' खाशाची मी प्यार साळु भीतें तुझ्या काय बाला । ' –राला ७८.

**साळू**—स्त्री. सायाळ; साळ पहा.

**साळेगोंधें-दें**—न. सावळेंगोंधळें पहा.

**साळोंका-खा**—स्त्री. शंकराच्या पिंडीखालचा दगड.शाळुंका पहा. 'स्वर्ग ज्याची साळोंका । समुद्रपाळी पिंड देखा ।'–ज्ञागा ४७.

**साळोता, साळुती**—पुस्त्री. ( क. बे. ) केरसुणी; झाडणी. सळाथी पहा. **साळोतणें**–( क. ) झाडणें; केर लोटणें.

**साळोत्तर, साळोत्र**—न. ( प्र. ) शालिहोत्र; अश्ववैद्यक; घोडयाच्या रोग गुणदोषासंबंधीचें शास्त्र [सं.शालिहोत्र] **साळोत्तरी, साळोत्री**–पु. घोडाडाक्टर; पशुवैद्य. [ सं. शालिहोत्री ]

**साळोरी**—स्त्री. ( गो. ) साळुंकी पहा.

**साळ्या**—वि. तिळांचा एक प्रकार. हे साळेतील रबीच्या वेळीं होतात. याच्या उलट गोडेतीळ हें पावसाळी पीक आहे. [ सं. शीतल ]

**साक्ष**—पु. प्रत्यक्ष गोष्ट घडलेली पाहिली आहे असा इसम; साक्षीदार. –स्त्री. १ साक्षीदाराची जबानी; पुरावा. २ साक्षा पहा. **म्ह**० १ मनोमय साक्ष. २ उंदराला मांजर साक्ष. [ स+अक्षि] **०घालणें**–( एखाद्या कागदाची ) समक्ष पाहिल्याची हमी पटविणें; त्यासाठीं सही करणें. **०भोजन**–न. पंक्तीस इतर मंडळी आहेत असें भोजन; पंगत. ' साक्षभोजन पाहिजे वनांतरीं । ' –सप्र १५. **०मोज्या( झ्या )नें**–पुराव्यासह. **साक्षी**–पु. १ एखादा व्यवहार प्रत्यक्ष पाहणारा माणूस. ' होतो तयासि सुरनामक गुप्त साक्षी । ' –र ४४. २ ( कायदा ) साक्षीदार. एखादी गोष्ट पाहिली आहे, माहिती आहे असें सांगणारा; पुरावा देणारा; गवाह. ' वादी आपण होऊन त्यास साक्षी करीत नाहीं. ' –टि ४.१३०. –स्त्री. १ पुरावा; साक्ष ( दस्तऐवज, व्यवहार, घडलेल्या गोष्टी इ० च्या खरेपणासंबंधी ). कायद्यांत साक्षीचे दोन प्रकार सांगितले आहेत; कृतसाक्षी व अकृतसाक्षी. २ अनुभव; प्रत्यय. ' सर्वज्ञ म्हणोनि । वानितीं पुराणीं । माझें अंतःकरणीं नये साक्षी । ' –गुच १.९७.

०घालणें–साक्ष घालणें. ०येणें–अनुभवास येणें. 'तुका म्हणे साक्षी आले। तरी केलें प्रगट।' –तुगा ३६८७. **साक्षीदार**–पु. साक्ष; पुरावा देणारी व्यक्ति; गवाह; ग्वाही देणारा. **साक्षीभूत**–वि. साक्षीरूप; प्रत्ययास आणून देणारा. 'आणि गगना ऐसा साक्षिभूतु। तोही मीचि।' –ज्ञा ९.२८५. **साक्ष्य**–न. १ साक्ष, ग्वाही; पुरावा. २ साक्षीचें काम; साक्ष घालणें.

**साक्षप-पी**—साक्षेप-पी पहा. 'आळसी तेचि साक्षपी होती।' –दा १.१.३३.

**साक्षर**—वि. १ अक्षरओळख असलेला; लिहितां वाचतां येत असलेला; साधारण शिकलेला. २ (हिं.) सुशिक्षित; विद्वान्. ३ (थट्टेनें) ज्याला (सा) साहा अक्षरें–कांहीं येत नाहीं–फक्त माहिती आहेत असा; निरक्षर; अक्षरशून्य. [सं. स+अक्षर]

**साक्षा**—स्त्री. १ अनुभव; प्रचीति. २ प्रत्यक्ष प्रमाण. ३ साक्षात्कार (देव, मंत्र, प्रश्न, शकुन इ० चा) ४ साक्ष पहा. [साक्ष] **साक्षात्कार**–पु. १ प्रत्यक्षज्ञान; प्रतीति; अनुभव. –गीर ४०९. २ ब्रह्मात्मैक्य. ३ ईश्वराचें प्रत्यक्ष दर्शन (क्रि० होणें; दाखविणें). 'श्रवण मनन निजध्यास। धरितां साक्षात्कार होय सरस।' –शिली १.७०. ४ स्वतः प्रचीति घेणें, खरेपणा पाहणें, घेणें, दाखविणें (क्रि० करणें, करून पाहणें). [सं.] **साक्षात्कारी**–वि. ईश्वरदर्शनाचा लाभ होत असलेला; साक्षात्कार अनुभवणारा.

**साक्षात्**—शअ. समोर, पुढें; प्रत्यक्ष. क्रिवि. १ धडधडीत; उघडपणें; स्पष्टपणें. २ स्वतः; स्वांगें; जातीनिशीं. 'दुसऱ्या कोणास पाठवूं नका. तुम्ही साक्षात् जाऊन पहा.' –वि.क्रिवि. १ मूर्तिमंत; प्रत्यक्ष. 'ब्राह्मण साक्षात् सूर्य आहे.' २ (शाप.) अपरोक्ष; प्रत्यक्ष; सरळ. 'क्लोरिनचें आल्डिहाइडावर साक्षात कार्य घडलें म्हणजे...' –सेंपू २.१२. [सं.] **०कृत**–वि. १ स्वतः अनुभवलेलें, पाहिलेलें. २ स्वतः जातिनिशीं केलेला (ग्रंथ इ०). 'हा ग्रंथ त्याचा साक्षात्कृत आहे.' **०द्रष्टा**–वि. समक्ष पाहिलेला. **०संबंध**–पु. १ प्रत्यक्ष, वैयक्तिक संबंध. २ शरीरसंबंधाचें किंवा आप्तपणाचें नातें. ३ प्रत्यक्ष संयोग, भेट, दळणवळण.

**साक्षिणी एकादशी**—स्त्री. कार्तिक वद्य एकादशी. ही केली असतां वर्षातील सर्व एकादशा केल्याचें पुण्य मिळतें.

**साक्षेप**—पु. १ नेट; चिकाटीचा उद्योग; निष्ठापूर्वक कार्य. (क्रि० करणें; धरणें) 'नित्य नवा हव्यास धरावा। साक्षेप अत्यंतच करावा।' –दा ४.२.५. २ आस्था; अगत्य; अतिशय आवड, व्यासंग, तुला पुस्तकांचा साक्षेप आहे.' 'तुझ्या भावाला पैक्याचा सा० आहे.' ३ मनाचा तीव्र कल; बळकट निष्ठा; मनाचा निश्चय, निर्धार. 'हा साक्षेपानें संध्याकाळचे वेळेस निजतो.' 'कोणाला चोरी करण्याचा साक्षेप तर कोणाला शिंदळकीचा साक्षेप फळसारखेंच.' ४ आग्रह; अगत्य. 'कथेसि साक्षेपें पाचारिलें जरी। म्हणे माझ्या घरीं कोणी नाहीं।' –तुग २४५४. ५ दीर्घोद्योग; मोठी खटपट. –एभा ९.३७५; –दा ५.९.५४. 'साक्षेपेंविण केवळ। वृथा पुष्ट।' –दा ११.१०. २०. [सं. स+आक्षेप] **साक्षेपी**–वि. १ काम, अभ्यास, शोध यांत सारखा गढलेला; तन्मय. २ निश्चयानें चिकाटीनें मागें लागलेला, लक्ष घालणारा. ३ आग्रही, निर्धाराचा स्वभाव असणारा. ४ दीर्घोद्योगी; प्रयत्नवादी. **साक्षेप, साक्षेपानें साक्षेपें**–क्रि.वि. १ मुद्दाम; जाणुन बुजून. –ज्ञा १८.१६५३. 'कीं कल्पतरू शोधित आला घर। दरिद्रियाचें साक्षेपें।' –राधि. २ यत्नानें; कष्टानें. –ज्ञा १७.२४९. 'श्रीकृष्णमूर्तीच्या साक्षेपें भार उतरेल धरेचा।' –मुसभा १७.३०. **साक्षोप-पी**–साक्षेप-पी पहा.

**साज्ञ**—वि. शास्त्रोक्त; वेदोक्त. 'अर्जुना एवं यज्ञु। सर्वत्र जाण साज्ञु।' –माज्ञा १६.९९. [स+आज्ञा]

**सिआरें**—न. (प्र.) शहारें पहा. 'तंव भेडां आलीं सिआरीं।' –शिशु ९५१.

**सिक**—स्त्री. १ शिक्षण; शिकवण. २ शिक्षा. –एभा २४. २४३. 'आतां तुज सिक लाविन.' –पंच ३०. [सं. शिक्ष्; प्रा. सिक्ख]

**सिंक**—स्त्री. (प्रा.) शिंक पहा. (क्रि० येणें; जाणें).

**सिकंजा**—पु. १ दाबाचें यंत्र; चाप; सुतार सांधा जोडतांना लांकडें आंवळून धरतात तें यंत्र. २ (ल.) पेंच; संकट. 'लढाईचे सिकंजात संकटांत पडावें हें मुतसीब नाहीं.' –पैअ ६५. [फा. शिकन्जा]

**सिकंजी**—स्त्री. लिंबू मध किंवा गुलकंद यांपासुन तयार केलेलें थंडाईचें पेय. [अर. सिकंजबी]

**सिकता**—स्त्री. १ वाळू; रेती. –एभा २७.१०१. 'फुटतां सागर सिकता–सेतूचें काय त्यापुढें चाले।' –मोसंशय. २ मुतखडा. [सं.] **०तेल**–न. (वाळूचें तेल) (ल.) अशक्य गोष्ट; खपुष्प पहा. **०मेह**–पु. १ लघवींतून रेती जाणें. २ अशा तऱ्हेची लघवी. एक प्रकारचा रोग.

**सिकंदर**—पु. (प्र.) शिकंदर पहा. [अर. अस्कंदर; फा. सिकंदर; इं. अलेक्झांडर]

**सिकंदा**—वि. हैराण; त्रस्त; उध्वस्त. 'ऐसे चार घटिका युद्ध बहुत उत्तम होऊन रजपूत सिकंदे करून थंडे केले.' –रा ६.६४८. [फा. सिकज्जा]

**सिकम**—न. पोट (प्र.) शिकम पहा. [फा. शिकम्]

**सिकरण-णी, सिंकारणें**—शिकरण, शिंकरणें पहा.

**सिकल**—वि. पुढील उजवा पाय व मागील डावा पाय पांढरा असलेला ( घोडा ). असा घोडा वाईट समजतात. –अश्वप १.१०४.

**सिकल**—स्त्री. साफ, स्वच्छ करणें; झिलई देणें; पाजळणें ( हत्यारें, शस्त्रें ). [ अर. सैकल् ] ०**कर-गर-गार**-पु हत्यारें साफसूफ करणारा; त्यांना उजळून धार लावणारा; शिकलगार.

**सिकवण-वणी-विणें, सिकवासिकव, सिकस्त, सिका, सिकाऊ, सिकार, सिकारणी-णें, सिकाळी, सिकील सिंके, सिकेकाई**—इ. शब्द 'शि' नें आरंभ होणाऱ्या शब्दांत पहा.

**सिकस्त**—वि. पराभूत. शिकस्त पहा. 'त्यास सिकस्त करून बरेवजेन गोटांत घातला.' –इमं २७३.

**सिका**—पु. शिक्का पहा. **सिकाबंद**-पु. शिक्का केलेलें. 'ऐसें खत रायें सिकाबंद दिधलें.' –मब ३६.

**सिकायत**—स्त्री. ( माळवी ) तक्रार; फिर्याद. 'त्यांना घालवून या, नाहींतर बडेसाहेबांकडे सिकायत करूं.' –विक्षिप्त ३.१७०. [ अर. शिकायत् ]

**सिकारा**—पु. एक मडकें. –मसाप २.२.६३. [ फा. सुकार ]

**सिकाल**—वि. कपाळावर दोन अंगुळाएवढा रुंद व लांबट पट्टा असलेला ( घोडा ). हें शुभ लक्षण आहे. –अश्वप १. १०५.

**सिकेकाई**—स्त्री. ( प्र. ) शिकेकाई पहा.

**सिक्कल-कर-गर-गार**—सिकल, सिकलकर पहा.

**सिक्का, सिक्केकटार-दौत-बरदार**—शिक्का इ० पहा.

**सिक्त**—वि. शिंपडलेलें; सेचन केलेलें. [ सं. ]

**सिक्थ**—न. ( शाप. ) मेण. ( इं. ) सेअर, सेरीन. [ सं. ] **सिक्थिक-न**-वि. मेणाचा; सेरीनचा. उदा० सिक्थिकाम्ल, सिक्थिनाम्ल.

**सिखर, सिखरमणी, सिखवणी-विणें, सिंगरट, सिंगरवट, सिंगरूं, सिंगा, सिंगाडा, सिंगी**—शि नें आरंभ होणाऱ्या शब्दांत पहा.

**सिग**—स्त्री. शीग पहा. १ टोंक; अग्रभाग. 'वाफेचिया सिगे। वाती ही लाविल्या लागे।' –ज्ञा १७.१४२. २ मर्यादा; अवधि. 'तुझे आयुष्याची भरली सिग।' –रावि २५.५४. ३ कळस; शिखर. 'सकळ साधनांचें फळ। ज्ञानाची सिगचि केवळ।' –दा ५.६.३०. **( माप ) सिगेला येणें-लागणें**-( ल. ) शेवटची मर्यादा गांठणें; कळस होणें. 'तुका म्हणे सिगे भरूं आलें माप। वियोग संताप झाला तुझा।' –तुगा १५४५. 'त्रिभुवनीचें तेज एकवटलें। बरवेपण सिगेसि आलें।' –व्यं ६६.



**सिंगन**—पु. घोड्याच्या अंगावरील एक भोंवरा. हे दोन्ही कानांच्या आंत असल्यास वाईट. –अश्वप १.१०२.

**सिंगरो**—पु. ( गो. कु. ) कारवारच्या बाजूला रानांत आढळणारी पिंगट रंगाची मोठी खार.

**सिंगसिंगोटी**—( प्र. ) शिंगशिंगोटी पहा. –वाडबाबा १.३.

**सिंगळद्वीप**—न. सिंहलद्वीप ( अप. ); लंका.

**सिंगा**—स्त्री. ( गो. ) मांस भाजण्याची काठी.

**सिंगाडा**—पु. बंदुकीची दारू ठेवण्याचें शिंगासारखें भांडें; शिंगाडा पहा. –वाडबाबा १.१६७.

**सिंग्रुर**—न. (गो.) पदार्थ भाजण्याचें चाळणीसारखें भांडें.

**सिंघ-ग**—पु सिंह. शक ८१० मधील एका राष्ट्रकूट-ताम्रपटांत हें रूप आढळतें. शीख, रजपूत यांसारख्या लोकांत नांवापुढें सिंग जोडण्याचा प्रघात आहे. उदा० गोविंदसिंग, जयसिंग इ०. [ सं. सिंह; प्रा. सिंघ ]

**सिंचक**—न. सिंचन; शिंपडणें. 'चंदनोदकाच्या सिंचका। मार्गं धूळीतें शमविलें।' –जै ९१ ६९. [ सं. ] **सिंचणें**-उक्रि. शिंपडणें; लहान थेंबांनीं भिजविणें; शिंपणें पहा. 'दया-सिंधु तुम्हां भांडवल दया। सिंचावें आतां या कृपामृतें।' –तुगा १०९४. [ सं. सिंचन ] **सिंचन**-न. शिंपण्याची क्रिया; वर्षाव. 'जैसें मूळ सिंचनें सहजें। शाखा पल्लव संतोषती।' –ज्ञा १.२५. [ सं. ] **सिंचवणी**-न. शिंपडण्याचें पाणी, पदार्थ. 'घालूनी लोळणी पडलों अंगणीं। सिंचा सिंचवणी तीर्थं वरी।' –तुगा २०१८. [ सिंचणें+पाणी ] **सिंचित**-वि. शिंपलेलें; सिंचनयुक्त.

**सिज( झ )णें**—शिजणें पहा. 'एऱ्हवीं तोचि अग्नि संगें सिजे। तरी वेगळा होय।' –ज्ञा ७.६५.

**सिंजा**—स्त्री. तोरड्या, पैंजण इ० चा ध्वनि; नूपुरांचा आवाज. 'सिंजारवें व्याकुळ सौध झालें।' –सारुह ७.५९. [ सं. सिंजा ]

**सिजील**—स्त्री. दाखला; ( दप्तरीं ) नोंद. 'तेच मुदतीचे विजापूरचे काजीची सिजील आहे.' –गोहसा २३. [ अर. शिजिल्ल् ]

**सिडी-ढी**—स्त्री. १ ( प्र. ) शिडी पहा. २ ( खडकांत केलेल्या ) पायऱ्या. 'सिडी दारीं आडसे।' –दावि २४४.

**सिण**—पु. ( प्र. ) शीण पहा. 'हें असो सिणु तुसधा। दृष्टादृष्टीं तो।' –ज्ञा १७.४२२.

**सिणगार, सिणगा( घा )रणें**—शृंगार, शृंगारणें पहा. 'जेवि विधवेचा सिणगार।' –दावि ४६७. 'शिणघारुनि गौरी-हरें।' –वेसीस्व ८.९४.

**सित-त्त**-वि. ६; सहा. [अर. सित्त] **सितैन**-वि. साठ. [अर.]

**सित**—न. प्रत्यंचा; धनुष्याची दोरी; शीत. सीत पहा. -अमृ ६.२५. 'सित चढऊनि ते क्षणीं। शर लाविला तत्काळ।' -वेसीस्व १४.१३४. [दे. प्रा. सित्थ]

**सित**—वि. शुभ्र; पांढरें; श्वेत. 'सित-कृष्ण तोय भासे अद्यापी पावली जिथें गंगा।' -नरहरिकृत गंगारत्नमाला. [सं.] ०**धातु**-पु. खडू **सितोपल**-पु. १ स्फटिक. २ खडीसाखर. [सं. सित+उपल] **सितोपलादि चूर्ण**-न. खडीसाखर (१६ तोळे), वंशलोचन (८), वेलची (२), दालचिनी (१), यांचें केलेलें चूर्ण. हें हाडीताप, अरुचि इ०वर उपयोगी आहे.

**सितकण**—पु.न. (प्र.) शितकण पहा.

**सितडणें, सितंडा, सितडी, सितवड**—शितडणें इ० पहा.

**सितणें**—क्रि. (व.) शिवणें; स्पर्श करणें.

**सितर**—पु. ठक; भूल. 'पडिला शाहाणिया सितर।' -मुआदि ७.८१. **सितरणें**-अक्रि. फसविणें; ठकविणें. सीतरणें पहा. 'दुर्वासा ऐसा जाण। त्यासी क्षणाक्षणा सितरी मन।' -एभा ११.९७८; -ज्ञा १४.३४२. **सितरू**-वि. फसव्या; ठक. 'शठ शुंभ कातरु। लंड तुर्मुंड सितरू।' -दा २.३.२९.

**सिताड**—न. (विणकाम) फणींत असलेल्या वशारण्याचे फिरके धरणारी कामटी.

**सिताफळ-ळी**—(प्र.) सीताफळ पहा.

**सिताब-बी**—शिताब-बी पहा.

**सितार**—स्त्री. (हिं.) सतार पहा. [फा.]

**सितारा**—पु. १ तारा. -ऐटि १.४४. २ दैव; नशीब. [फा.]

**सितासवाती**—स्त्री. (व.) चित्रा आणि स्वाती नक्षत्रें. (शेतकरी लोकांत रूढ). 'सितासवातीच्या पाण्यानें बहार केली.' [चित्रा+स्वाती अप.]

**सिती**—स्त्री. (एकविटी) अरुंद भिंत, पडदी.

• **सितोडा**—पु. १ थेंब; कण (पाणी, पाऊस, वर्षाव इ० चा). (क्रि० उडणें). २ वृष्टि; शिंपणी. [सिंचणें+सडा] **सितोडणें**-अक्रि. सितोडे पडणें; तुषार येणें (पावसाचे).

**सिद, सिंदळ, सिंदा**—शिंद, शिंदळ, शिंदा इ० पहा.

**सिदणें**—उक्रि. छेदणें; कापणें. 'वेदही सिदतां तया। काय खेदु होईल।' -ज्ञा १८.६४३. [सं. छिद्]

**सिंदूर, सिंधूर**—पु.न. शेंदूर पहा. 'झळकत सिंदुराचा टिळक।' -भूपाळी. 'विस्तीर्ण मस्तकीं उदंड। सिंधूर चर्चिला।' -दा १.२.१०. [सं.]

**सिंदुवारु**—न. (प्र.) सिंधुवार; निर्गुंडी. 'मोतियांचे आकारू। तैसे फुललें सिंदुवारू।' -शिशु २९५.

**सिंदेशाई**—शिंदेशाई पहा. **सिदोरी**-स्त्री. शिदोरी पहा. 'जैसी पंथीची सिदोरी।' -विपू ७ ६८. -सारुह १.८०.

**सिद्दी-द्दी**—पु. हबशी; शामल. आफ्रिकेंतील एक जात. [अबिसीनियन]

**सिद्ध**—पु. १ ईश्वरप्रेरित ग्रंथकार, लेखक. उदा० व्यास. २ भूत-भविष्य-वर्तमानाचें ज्ञान असलेला; द्रष्टा; साधु. ३ अणिमादि सिद्धी प्राप्त झालेला; योगी. ४ मुक्त पुरुष. -दा ५.१०.१०. ५ एक उपदेवांचा वर्ग व त्यांतील व्यक्ति. 'येर सुरसिद्ध किन्नर।' -ज्ञा ११.५०.६. ६ (ज्यो.) एकविसावा योग. [सं.] -वि. १ संपविलेलें; पुरें केलेलें. २ स्थापित केलेलें; सत्य म्हणून दाखवून दिलेलें; पुराव्यानें खरें केलेलें; प्रस्थापित. ३ निकाल केलेलें; तोडलेलें (भांडण, खटला). ४ बनविलेला; तयार केलेला; रचलेला (नियम, घटना, कायदा). ५ पकविलेलें; शिजविलेलें. (अन्न). 'जैसी सिद्धसाध्य भोजनीं। तृप्ती एकी।' -ज्ञा ३.३८. ६ घेण्याजोगें; तयार केलेलें (घोटून, द्रव्यें मिसळून-औषध). ७ तयार ठेवलेला, असलेला (कामास योजावयाचा माणूस, जनावर इ०); मुद्दाम खोळंबलेला, वाट पहात असलेला; राखून ठेवलेला; सज्ज; तयार. ८ कुशल; निष्णात. ९ शाबूत; धडधाकट 'जंव हें सकळ सिद्ध आहे। हात चालावया पाय।' -तुगा ७२९. १० प्रत्यक्ष; मूर्तिमंत 'जरी प्रकटे सिद्ध सरस्वती। तरी मुका आथी भारती।' -ज्ञा १.७८. ११ अकृत्रिम; सहज असणारा. 'नित्यसिद्ध परमशुद्ध माझें स्वरुप शुद्ध जाणती।' -एभा ११.११२७. १२ पूर्णावस्था प्राप्त झालेले. 'वांचोनि कर्मारंभ उचित। न करितांचि कां सिद्धवत।' -ज्ञा ३.४५. १३ (व्या.) गुणधर्मयुक्त; मूर्त. याच्या उलट साधित=अमूर्त. १४ (भाषा.) मूळ; अव्युत्पन्न (शब्द). याच्या उलट साधित शब्द. (समासांत) (सिद्ध शब्द उत्तरपदीं असतांना)-अनुभव-उपाधि- ओषधी - क्रिया - न्याय - लोक-व्याकरण-स्वभाव-सिद्ध. ऊन प्रत्ययांत धातुसाधितांपुढें नेहेमीं हा शब्द येतो. उदा० करून-भोगून-शिकून सिद्ध. (वाप्र.) **सर्वसिद्ध आणि चुलीस पोतेरें**--तयारी होण्याच्या फार आधीं तयारी झाल्याचें सांगणाराबद्दल वापरतात. ०**सख**-न. ब्रह्म. ०**ता**-स्त्री. तयारी; सर्व सिद्ध असणें. ०**पादुका**-स्त्रीअव. ज्या पायांत घातल्यानें वाटेल तिकडे जाण्याची शक्ति प्राप्त होते अशा पादुका. 'करवीर क्षेत्रीं दत्तात्रयें सिद्धपादुका।' -सप्र ३.२०. ०**पुरुष**-पु. १ अणिमादि सिद्धी प्राप्त झालेला; योगी; मांत्रिक. २ ब्रह्मस्वरूपीं विलीन झालेला. ०**प्रज्ञा**-स्त्री. पूर्वजन्मांतली या जन्मीं मिळणारी बुद्धि. 'तिये सिद्धप्रज्ञेचेनि

लाभे। मनचि सारस्वतातें दुभे।' -ज्ञा ६.४५४. ०मौळी-वि. श्रेष्ठ सिद्ध पुरुष. 'जयजयाजी सिद्धमौळी।' -गुच २०.२. [सिद्ध+मौलि] ०योग-पु. बाळहिरडे आणि जिरें यांचें चूर्ण. हें अतिसारांत तांदुळाच्या धुवणांतून घेतात. -योर १.४१५. ०रस-पु. १ अमृत. 'कुंकुमाचें भरींव। सिद्धरसाचें वोतींव।' -ज्ञा ६.२५५. २ पारा. ०लाडू-पु. संकष्टी चतुर्थीस कणकेच्या उकडीचे केलेले लाडू; मुटकुळीं. -ह ८.१६. ०वट-पु. कामना पूर्ण करणारा वड. 'त्या सिद्धवटा सावित्री संपूर्ण। सीता देखून नवस करी।' ०वत्-क्रिवि. सिद्ध झाल्याप्रमाणें; गृहीत धरून. 'एका विषयाचा वाद पडल्यास इतर विषय सिद्धवत् ध्यावे लागतात.' -वि. (शाप.) गृहीत; खरें मानून चाललेलें. 'सिद्धवत् पदें.' (इं.) पॉस्चुलेट्स. [सं.] ०साधक-पु.अव. एकाच कपटकारस्थानांतील मंडळी. आपलें ऐक्य बाहेर समजूं न देतां, संगनमतानें दुसऱ्याला फसविण्यासाठी एकमेकांचा पुरस्कार करणारे (एकानें सिद्ध पुरुष बनवायाचें व दुसऱ्यानें त्याचें स्तोम माजवावयाचें) [सिद्ध+साधक] ०साधन-न. १ सिद्धीचे अद्‌भुत चमत्कार दाखविणें; जादू; किमया. २ सिद्ध असलेली वस्तु पुन्हां सिद्ध करण्यास लागणें. तर्कशास्त्रांत हा एक दोष मानला जातो. 'तूं चोर आहेस असें चोरालाच म्हटलें असतां सिद्धसाधन दोष होतो.' ०स्थाली-स्त्री. पाहिजे तें अन्न पाहिजे तेव्हां विपुल निघावें अशी (कोणी सिद्ध पुरुषानें दिलेली) थाळी, पात्र. **सिद्धणें**-क्रि. १ सिद्ध करणें. 'तुलदाइयां बैलां सिद्धवै।' -पाटणशिलालेख शके ११२८. २ सिद्धीस जाणें 'मोक्षमूल कृपाजीवन। जेणें सिद्धे।' -ज्ञाप्र ६१. **सिध्दाई**-स्त्री. १ चमत्कार; सिद्धसाधन. २ दैवी शक्ति प्राप्त होणें. सिद्धि पहा. **सिद्धानुवाद**-पु. सिद्ध गोष्टीचें वर्णन 'तरी सिद्धानुवाद लाहों। आवडी करुं।' -अमृ १०.१२. [सिद्ध+अनुवाद] **सिद्धान्न**-न शिजणें, इ० संस्कारानें सिद्ध झालेलें अन्न; तयार, खाण्यालायक अन्न [सिद्ध+अन्न] **सिद्धार्थ** -वि. १ ज्याचा उद्देश, मनोरथ सिद्धीस गेला आहे असा. २ गौतमबुद्ध [सिद्ध+अर्थ] **सिध्दार्थी**-पु. त्रेपन्नावा संवत्सर. **सिध्दावस्था**-स्त्री. जीवन्मुक्तावस्था; ब्राह्मीस्थिति. -गीर ३६७. [सिद्ध+अवस्था] **सिध्दाश्रम**-पु. १ सिद्धावस्थेस पोंचलेल्या मुनीचा आश्रम. 'जावें सिद्धाश्रमातें।' -रावि ७.१०. २ हिमालयांतील नरनारायणाश्रम. 'सिद्धाश्रमासि पावे विश्व जया सिद्ध सादना गाते।' -मो उद्योग ८.२७. [सिद्ध+आश्रम] **सिध्दासन**-न योगासनाचा एक प्रकार. कामवासना नाहींशी करण्याला याचा उपयोग होतो. -संयोग ३२३. [सिद्ध+आसन] **सिद्धि**-स्त्री. १ दैवी शक्ति; अणिमा इ० अष्टमहासिद्धी. 'देखें विषय हे तैसे। पावती सिद्धिचेनि मिषें।' -ज्ञा २.३१३. २ आश्चर्यकारक, अपूर्व सामर्थ्य, कौशल्य ३ तपश्चर्येचें किंवा देवता भक्तीचें फल. ४ परिपूर्णता; समाप्ति; संपादन; उद्दिष्ट साध्य होणें. 'तें मनोरथ संगें नव्हे। एऱ्हवीं सिद्धि गेलेचि आहे।' -ज्ञा १३.१३३. ५ पुराव्यानें स्थापना, संस्थिति; प्रस्थापित होणें (मुद्दा, बाजू, आरोप इ०). शाबिती. 'अंतःकरणही अनादि। प्रवाहरूपें त्याची सिद्धी।' -एभा १३.२४५. ६ निर्णय; निकाल; तडजोड (भांडण, खटलें इ० ची). ७ घटना; बनावणी; मांडणी (कायदा, नियम, इ० ची). ८ सिद्धता; तयारी; (अन्न, औषध इ०ची) ९ सज्ज असणें (बदली किंवा इतर काम करण्यास माणूस, जनावर इ०). १० कौशल्य; नैपुण्य; वाकबकारी (योगसामर्थ्य, किमया इ०त). ११ मुक्ति; ब्रह्मस्थिति; निर्वाण. 'तैसें न होणें निपजे। तें नैष्कर्म्य सिद्ध जाणिजे। सर्व सिद्धींत सहजें। परम हेंचि।' -ज्ञा १८.९८०. १२ यश; विजय, उत्कर्ष. १३ सामग्री; साहित्य. 'घरीं त्याच्या आहे सर्व सिद्धी।' -रामदासी २.११८.१२ [सं.] **सिद्धीस-आणणें-नेणें**-पुरें करणें; तडीस नेणें; यशस्वी रीतीनें पुरें होणें, तडीस जाणें. ०स्थान-न. मूळ ठिकाण.

**सिध्दांत**—पु. १ प्रमाणानुरोधानें ठरलेला निर्णय; विचार-संशोधनादिकांचें फल २ प्रतिपादित तत्त्व; प्रस्थापित सत्य. ३ तत्त्वाचें कथन; परमतत्त्व. 'जे वदे शास्त्राचें सार। सिद्धांत धादांत विचार।' -दा ५.६.२७. ४ निश्चय; निर्णय. 'अखेरीस त्याच्या मनांत सिद्धांत होऊन तो म्हणाला...' -मराठी ६ वें पु.(१८७५) १८६. ५ नियम; प्रमेय; सारणी. (इं.) थिअरम्. ६ ज्योतिषग्रंथ. उदा० सूर्यसिद्धांत. ७ (ल) पक्की, वज्रलेप, गोष्ट. [सं.] ०मार्ग-पु. गुरुभक्तिमार्ग. -दा ४.१.९. **सिध्दांतित**-वि. सिद्धांत म्हणून निश्चित केलेला, प्रस्थापित. **सिध्दांती**-वि. १ सिद्धांत ग्रंथ पढलेला. २ प्रयोग करून पाहणारा; सिद्धांत ठरविणारा. ३ कोणतेंहि सत्य, तत्त्व वगैरे प्रस्थापित करणारा.

**सिद्रक**—पु. (रसायन) ज्यापासुन साखर तयार होते असा एक रासायनिक पदार्थ. (इं.) डेक्स्ट्रिन. -राको ५१७.

**सिंध**—सिंधु पहा. ०भैरवी-स्त्री. (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी मध्यम, संवादी षड्ज. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर, सार्वकालिकहि आहे. अवरोहांत कोमल ऋषभ घेतात.

**सिधा, सिधापाणी-सामुग्री इ०**—शिधा इ० पहा.

**सिधावा**—पु. सिद्धता; तयारी. 'भक्तांचा करिसी सिधावा।' -मुआदि ४८.३९. [सं. सिद्ध]

**सिंधु**—पु. समुद्र; उदधि. 'पै सरितेचेनि ओघें। सिंधुजळा मीनलें घोघें।' -ज्ञा ८.८४. २ एक मोठी नदी. ही पंजाबांतून वाहात येऊन अरबीसमुद्राला मिळते. ३ या नदीकांठचा एक

द्रष्टा-वि. तीव्र नजरेचा; बारकाईनें पाहणारा; मर्मज्ञ. ०देह-शरीर-पु न. लिंगदेह पहा; वासनात्मक शरीर. ०बुद्धि-वि. अतिशय बुद्धिमान; मर्मज्ञ; मार्मिक. ०मान-न. १ अगदीं बरोबर व सूक्ष्म माप; बिनचूक मोजमाप. २ सविस्तर व तंतोतंत अंदाज. ३ ( विपल, पल, विकला, कला इ० निमेषापासून संवत्सरापर्यंत ) काल-विभागाचें मोजमाप; याचे उलट स्थूलमान. ०वाद-पु. परमाणुवाद (एका परमाणूपासून आत्मा झाला हा). याचे उलट स्थूलवाद. ०वादी-पु. सूक्ष्म वादाचें समर्थन करणारा. ०संचयन गणित-न. अति सूक्ष्म संख्यांची किंवा परिमाणांची बेरीज करणारें गणितशास्त्र. इंटीग्रल कॅल्क्युलस या इंग्रजी शब्दास प्रतिशब्द.

**सृजणें**—उक्रि. उत्पन्न होणें; करणें; बनणें, बनविणें. 'ते ते जीव सृजिले तैसे ।' [ सं. सृज् ] **सृजन**-न. १ उत्पत्ति. २ सृष्टि.

**सृति**—स्त्री. मार्ग. [ सं. ]

**सृष्टि**—स्त्री. १ निर्माण करणें; उत्पन्न करणें; जोडणें; लागणें; संलग्न होणें. म्ह० प्रतिजीवीं सृष्टि भिन्न. २ विश्वांतील ब्रह्माचा सर्वव्यापीपणा. ३ जगाची उत्पत्ति. ४ जग; विश्व. (समासांत). मनोरथ सृष्टि=मनोराज्य; त्यांत निर्माण केलेले अनेक प्रकार इ०. स्वप्नसृष्टि=स्वप्नांतील भ्रामक देखावे. जीवसृष्टि=जीवानें निर्माण केलेली सृष्टि; प्रत्येक जीवाचे नानाविध व्यापार. मायिक सृष्टि=अशाश्वत जग; ब्रह्मापासून निर्माण झालेल्या मायेनें वाढविलेला सर्व प्रपंच; विश्व. याप्रमाणें कल्पना-मानसी-आसुरी-भूत-ब्रह्म-विश्वामित्र-सृष्टि इ०. [ सं. सृज्=उत्पन्न करणें ] ०कर्म-मार्ग-पु १ सृष्टीची रहाटी; रीतभात; रीत; क्रम; मानवी जीविताची परिपाठी, गुणधर्म. 'सृष्टिक्रमच आहे, कोणी रडतो कोणी हंसतो, कोणी मरतो, कोणी जन्मतो.' २ ऐहिक जीवन; जीवित. **सृष्टि नव्यानें-नवी सृष्टी करणें**-बदललेल्या जीवनक्रमास: आयुष्यक्रमास प्रारंभ करणें. **सृष्ट**-वि. १ उत्पन्न केलेलें; निर्माण केलेलें. २ जोडलेलें; संलग्न; बनविलेलें.

**से**--स्त्री. १ स्मृति; सय; आठवण. 'देखें ऋद्धिसिद्धि तयापरी आली गेली से न करी ।'-ज्ञा २.३६३. २त्यावरून छंद, स्फुर्ति. 'म्हणोनि यया वाखाणा-। पासीं से आली चौगुणा ।'-ज्ञा १३. ६४५. ३ अनुमान, हेतु. 'ऐसी पुढील से घेतु ।'-ज्ञा १.१७१. ४ (ल.) रोष; असंतोष; क्रोधयुक्त स्मृति; दंश. 'परि तें तैसें कैसेनि होईल । जात्यंधा कैसें पाहेल । तेवींचि येरू से घेईल । म्हणोनि बिहे ।'-ज्ञा ६.७. [ सं. स्मृति-सई, सय=आठवण ? ]

**सेइर्णे**--अक्रि. ( घर ) शाकारणें; ( घर गवतानें ) शिवणें. [ सं. च्छादन ]

**सेक, सेकट, सेंकडा-डों-डोश:, सेकणें, सेकसेगडी**--शमध्यें पहा.

**सेक-ख**--पु. शेवट, अखेर; शेवटीं. **सेखीं**-क्रिवि. अखेरीस. 'सेखीं अडविसी'-तुगा १२३८. [ सं. शेष ]

**सेक**--पु. शिंपडणी; सिंचन; सडा. [ सं. सिच्=शिंपडणें ] ०ता-वि. सडा टाकणारा; सिंचन करणारा.

**सेकंद**--न. मिनिटाचा ६० वा भाग. [ इं. ]

**सेकाटा-टी, सेकार-रणी-रणें, सेकावणें, सेकाटी, सेखविलो, सेखदार-री, सेखी, सेंग, सेंगट-वगी, सेगडी, सेगवा सेगोळे**--शेकाटा, शेकार, शेकविणें इ० पहा.

**सेक्रेटरी**--पु. चिटणीस [ इं. ]

**सेचन**--न. शिंपडणी. [ सं. ] **सेचक**-वि. शिंपडणारा.

**सेवाळ-ळीस, सेज-आरती, सेजार-धर्म, सेजारी-पाजारी, सेजो, सेजुटणें, सेजार-री, सेठ(ट)जी-सेठाई-णी, सेठी-ट्या(ठ्या), सेंडा-डी, सेण, सेत, सेताळ-ळीस**--शेवाळ, शेज इ० पहा.

**सेज**--स्त्री. १ बिछाना; शय्या. शेज पहा. २ क्रम; रांग; ओळ. ०साळ-स्त्री. शयनघर. 'शून्य सेजसाळिये । सुलीनतेचिये तुळिये ।'-ज्ञा १३.४२ [ सं. शय्याशाला ] **सेजे येणें**-निजणें.

**सेजरें**--न. कणसें ठेवण्यासाठीं केलेलें कडब्याच्या पेंढयांचें वर्तुळ. [ शेज=रांग ]

**सेजा**--पु. ( गो. ) सज्जा; ग्यालरी. [ हिं. छज्जा ]

**सेंट**--न. विशिष्ट प्रकारें काढलेलें अत्तर; सुगंधी अर्क. [ इं. ]

**सेंटर**--पु. मध्यबिंदु; गाभा. [ इं. ]

**सेत, सईत**--पु. ( गो. ) शेंबूड.

**सेतु**--पु पूल; बांध; धरण. [ सं. ] ०बंध-पु. १ वानरसैन्य लंकेत नेण्यासाठीं रामाच्या आज्ञेवरून नलानें समुद्रावर बांधलेला पूल. २ (सामा.) पूल.

**सेंद, सेंदाडशिपाई, सेंदणो, सेंदणें, सेंदरा-री, सेंदव सेंदाडवलि, सेंदवले, सेंदाड, सेंदाडें, सेंधूर, सेंधेलोण**—शेंद, शेंदाड शिपाई इ० पहा.

**सेंद**—स्त्री. कापूर ठेवण्याची हस्तिदंती डबी.

**सेंद्रिय**--वि. इंद्रियविशिष्ट. [ सं. ] ०रसायनशास्त्र-न. इंद्रियविशिष्ट प्राणी व वनस्पति आणि त्यांचीं द्रव्यावर रसायन कार्ये घडून बनलेले संयुक्त पदार्थ यांचें विवरण ज्यांत केलेलें असतें असा रसायनशास्त्राचा भाग.

**सेन**—पु. ससाणा. [ सं. श्येन ]

**सेनगांठ**--पु. घोडयाच्या फऱ्याजवळील भोंवरा.

**सेना**—स्त्री. सैन्य; फौज. [ सं. ] ०**खासखेल**-पु. बडोदेकर गायकवाड घराण्याची पेशव्यांनीं दिलेली पदवी. **सेनांग**-न. गज-अश्व रथ-पदाती असे सैन्याचे चार भाग, त्यापैकीं प्रत्येक. [ सं. ] **सेनांगचतुष्टय**-न. वरील चार भागांचें एकत्रित सैन्य. **सेनाचर**-वि. सैन्याबरोबर जाणारा. ०**नाथ** ०**पति**-पु. सैन्याचा मुख्य नायक. ०**निवेश**-पु. सैन्याचा तळ; छावणी; शिबिर. ०**भार**-पु सर्व सैन्य; दळभार; फौज. ०**मुख**-न. तीन पत्ती इतकें सैन्य. ०**सरखेल**-पु एक फौजबंद सरदाराची पदवी.

**सेप, सेपकिडा, सेपू, सेपूट, सेवई**—शेप, शेपकिडा इ० पहा.

**सेंपाक-घर-सेंपाकीण**—सैपाक, सैपाकघर पहा.

**सेंबी**—स्त्री. शेंबी पहा.

**सेंभ**—वि. स्वयंभू. [ सं. स्वयंभू ]

**सेयारी**—स्त्री. चेटकी; डाकीण, पिशाची. [ अर. साहिर= जादुगार, मांत्रिक ]

**सेर, सेरणी; सेरी**—शेर, शेरणी इ० पहा.

**सेरि**—स्त्री. तृप्ति; समाधान. -शर.

**सेरीक**—पु. सरकारी शेरी जमीनीवरील अधिकारी. [ शेरी ]

**सेरू**—पु लाकडी पळी. [सं. स्रुवा ]

**सेल**—पु. १ बैलगाडीच्या जुवाचा समतोलपणा. २ एकाच उंचीची बैलजोडी. [ सं. शैल ]

**सेल**—पु. १ खाण्याचा पदार्थ. -शर. २ शेवट; टोंक. 'बैसला गुरुत्वाचे सेले।'-अमृ २.२०. -वि. शेलका, निवडक, उत्तम (वांटा); 'तो दुष्कृताचा कीर सेल वाटा।'-ज्ञा ९.४१६. [ सं. शैल=टोंक ]

**सेलडी-डो(दो)रा, सेलूदोरा**—पु. मुलांचा एक खेळ. -शर.

**सेलणें**—सक्रि. १ ( पाणी ) तोडणें; कापणें; टोंचणें. 'ते उपरतीच्या वावी सेलत।'-ज्ञा ७.१०१. २ दुष्ट शब्द बोलणें. -ज्ञा ३.४९६. ३ आकाशांत भरारी मारणें. 'कीं म्हणिजे गरुड हा सेलत। पतंगासारिखा।'-स्वादि १.२.१६.

**सेलतणें**—अक्रि. भासणें. -शास्त्रीको.

**सेला**—पु. गर्दी; जमाव; लोंढा. 'दत्ताजी शिंदे इकडे तोंड करीत तों इकडील फौजेचे सेले तोंडसन्मुख येत.'-भ.ब ६३. [ फा. सैलाव ]

**सेलाटक**—न. भोंकरीचें झाड.

**सेलार-रा**—पु बाण तयार करणारा कारागीर. 'सेलारा फणिमौळी। उर्णनाभि ज्ञीलि। या चोविसा गुरूंची वोळि। सांघितली तुज।'-भाए २६८. [ अर. सिलह्=शस्त्र ]

**सेली**—स्त्री. हार; दोऱ्याची कंठी. [ सं. ]

**सेलू**—वि (व्यापारी सांकेतिक) सहा (संख्या). 'सेलू पोंकू आणि ढकार। आवारू खूण सांगती सत्वर।'-भवि ४२.४६.

**सेव**—पु. (व.) बायकांचा डोकीवरील पदर. [ सं. शेवट ] -वि. (व.) थोडा ढाळ, उतार असलेलें.

**सेव**—पु. सफरचंद फळ. 'विलायती मेवा सेव दाणे पंधरा...'-दिमरा १.२२. शेव पहा. [ फा. ]

**सेवक**—पु. १ चाकर; नोकर; कामीं येणारा, हाताखालचें हलकें काम करणारा माणूस. २ सेवन पहा. [ सं. ] **सेवकिनी**-स्त्री. दासी; मोलकरीण. **सेवकै**-स्त्री. चाकरी; सेवाधर्म. **सेवणें**-सक्रि. १ उपयोग करणें; कामावर योजणें; सेवा-चाकरी करणें; पूजा करणें; आदर दाखविणें. २ उपभोग घेणें; भक्षण करणें; खाणें सेवन करणें; [ सं. सेवन ] **सेवन**-न. १ चाकरी; चाकरी करणें. २ उपयोग; उपभोग; स्वीकार; अनुभव घेणें; कामी लावून पहाणें (वस्तु, उपाय, योजना, औषध, अन्न इ०) 'हें औषध सेवन कर.' ३ शिवणें; दोरा घालणें. ४ पूजा, उपासना, करणें. **सेवनीय**-वि. पूजा करण्यास, आज्ञा पाळण्यास, सेवा करण्यास, उपयोगांत आणण्यास, उपभोगण्यास योग्य. **सेवा**-स्त्री. १चाकरी; नौकरी; दास्य. २ पूजा; मान; आदर. ३ देवाची चाकरी; उपासना. ४ उपयोग. [ सं. ] ०**चोर**-वि. सेवेंत अंतर पाडणारा. ०**दल**-न. स्वयंसेवकांचें पथक. ०**धर्म**-पु. चाकरीचें काम. ०**धार**-पु. सेवेकरी. **सेविका**-स्त्री. १ स्त्रीस्वयंसेविका. २ इस्पितळांत रोग्याची शुश्रूषा करणारी स्त्री. (इं.) नर्स. **सेवित**-वि. सेवन केलेलें; चाकरी झालेलें. **सेवी**-वि. सेवा, चाकरी, उपयोग करणारा, उपभोग घेणारा. (समासांत) तीर्थ-औषध-सेवी. **सेवेकरी**-पु. चाकर; विशेषतः देवांची सेवा करणारा; पुजारी; उपासक. **सेव्य**-वि. सेवनीय. **सेव्याठाय**-पु. (संकेतानें) ब्रह्म. -शर.

**सेवखंड, सेवगा, सेवट, सेवटणें, सेवटला, सेवतें**—शेवखंड, शेवगा इ० पहा.

**सेवडी**—स्त्री. कातडें; चामडें. 'वरी चोखट मृगसेवडी।'-ज्ञा ६.१८२. [ सं. छाल+डी ]

**सेवय-या, सेंवरा-री-ऱ्या**—'शे' खालीं पहा.

**सेवसवजी**—स्त्री. भाजीपाल्यावरची पट्टी, कर. [ फा. सेव=फळ+सब्जी=भाजी ]

**सेवाळ-ळी-ळ, सेवाळणें**—शेवाळ इ० पहा.

**सेशनकोर्ट**—न. प्रत्येक जिल्ह्यांत असलेलें सर्वांत वरिष्ठ फौजदारी कोर्ट [ इं. ]

**से(सें)स**—स्त्री. शेज पहा.

**सैस-पाट-फूल, सैसगांठ, सेहत्तर**—शेसपाट, शेसफूल इ० पहा.

**सेहत**—स्त्री. प्रकृतिस्वास्थ्य. 'आपल्यास सेहत जालियाचे खुशीचे पार्चे...' –पया ४६७. [ अर. सिह्‌त् ]

**सेळक्या, सेळडूं, सेळी**—शेळक्या इ० पहा.

**सै**—स्त्री. सई पहा.

**सैंग**—स्त्री. ( महानु. ) सोपा; पडवी. –ऋ ११६.

**सैंग-घ**—पु. समूह. [ सं. संघ ] –वि. १ पुष्कळ; सर्व. 'घापे पटामार्जी तंतूची सैंघ सृष्टी।' –ज्ञा ६.१००. २ स्वतःसिद्ध. –क्रिवि. १ केवळ. २ एकदम. 'तयाधर्गी सैंघ पळिपे। क्रोधाग्नि तो।' –ज्ञा १६.३९४.

**सैंचळ**—न. संचळ पहा.

**सैताडला, सैताडल्या वाणाचा**—वि. ( व. ) लहरी, पिसाट.

**सैतान**—पु. १ झोटिंग; वेताळ; पिशाचांचा राजा. २ ( ल. ) घोर कर्म आचरणारा पुरुष; पापमूर्ती माणूस [ अर. शैतान् ]

**सैति**—स्त्री. दोरी जोडलेली लांब बर्ची [ सं. शित=तीक्ष्ण ? ]

**सैदोन**—पु. एक प्रकारचा नगारा. [ फा. ]

**सैंधव**—न.पु. १ शेंदेलोण. २ घोडा. [ सं. सिंधु ] **०ता**–स्त्री. खारेपणा. –वि. समुद्रसंबंधीं, सिंधुनद अगर सिंध देश यासंबंधीं [ सं. ] **सैंधवी**–स्त्री. गाण्यांतील एक राग.

**सैन्य**—न. फौज; लष्कर; फौजेची तुकडी. [ सं. ] **सैना ( न्या )धिपति, सैना( न्या )ध्यक्ष**–पु. सेनापति. **सैनापत्य-सैनाधिपत्य**–न. सेनापतीचें काम; त्याची सैन्यावरील हुकमत; त्याची पदवी. **सैनिक**–पु. शिपाई –वि. सैन्यासंबंधीं.

**सै(सैं)पाक, सैंपाकघर, सैंपाकी, सैंपाकीण**—स्वयंपाक इ० पहा.

**सैफ**—स्त्री. एक जातीची तरवार. [ अर. सैफ् ]

**सैयद**—पु. सय्यद पहा.

**सैया**—पु. भैय्या; उत्तर हिंदुस्थानांतील इसम. 'घरांत, एकदा परवेशी सैया होऊन येईन' –भावबंधन. [ सं. सखिन् ]

**सैर**—पु. चोरांची एक जात व तींतील व्यक्ति. –वि. स्वैर; स्वच्छंदी. [ सं. स्वैर ] **०ट, सैराट**–वि. स्वच्छंदी; हट्टी; हेकेखोर; दांडगा; वेडेंवाकडें; आडदांड; कठोर; कर्कश. **म्ह०** वांई वैराट बोली सैराट.

**सैर, सैरणी**—स्त्री. सहल; निसर्गनिरीक्षण. 'आग्रयाची सैर करावयास या प्रांतीं आले आहेत' –दिमरा १.३०१. [ अर. सैर ]

**सैरंध्री**—स्त्री. १ अंतःपुरांतील दासी, ही गरती असून श्रीमंताच्या घरीं वेणीफणी, वस्त्रालंकारादि रचना इ०कामें करण्यासाठीं वेतन घेऊन राहते. २ द्रौपदी. [ सं. ]

**सैरफाजील**—न. कोरडवाहू व बागायत यांच्या उत्पन्नांची नोंद व उत्पन्न; याच्या उलट ऐन फाजील. [ अर. सायर=इतर ]

**सैरा, सैरावैरा**—क्रिवि. ज्याला जिकडे वाट फुटेल तिकडे; दाही दिशांनीं; स्वैरपणें ( भीतीनें धांवणें, पळणें ); अफाट; मोकाटपणें; स्वच्छंदानें [ सं. स्वैर द्वि. ]

**सैरा**—वि. ( व. ) नीट; चांगलें; सरळ. 'सैरा घरीं जा.' **म्ह०** एक कान सैरा, एक कान बहिरा.

**सैराण**—पु. ( कु. ) भान; आठवण.

**सैरिक-सैर**—वि. नांगरासंबंधी, नांगरटी–शेतकीविषयक. [ सं. सीर=नांगर ]

**सैरिय**—पु. रेडा; हेला.

**सैल**—स्त्री. कंगणी इ० दागिने घडविण्याचा दांडा.

**सैल**—वि. ढिला; लटपटीत; मजबूत नव्हे असा; पोकळ. [ सं. शिथिल ] **०सोडणें**–ढिलें सोडणें; लटपटित ठेवणें, दाबांत न ठेवणें. **०दोरी**–स्त्री. लटपटीत दाब, वचक, अंमल. ( क्रि० देणें; सोडणें ). **०णें, सैलावणें**–उक्रि. ढिलें, लटपटित होणें, सोडणें, करणें. **सैलावणी**–स्त्री. मोकळीक; ढिलेपणा.

**सैली**—स्त्री. १ फकीराच्या गळ्यांतील सुताची माळ. २ ( तंजा. ) फुलांची माळ. ३ मोत्यांची माळ; कंठी. 'मोत्यांची एक सैली आहे त्याची किंमत नऊ लाख रुपये आहे.' –नानासाहेब शिंदे यांचें आत्मवृत्त ३३८. [ हिं. ]

**सैंवर**—न. स्वयंवर पहा.

**सैसद**—क्रिवि. ( राजा. ) सारखा; ओळीनें. सतसय पहा.

**सोइरगत, सोइरा, सोइराधायरा, सोइरी, सोइरीक**—सोयरगत, सोयरा इ० पहा.

**सोई, सोय**—स्त्री. १ परिस्थितीची अनुकूलता; कामधंदा, व्यापार, उदीम इ०चा फायदा, फुरसत, समाधान, ज्यांत लाभेल अशी परिस्थिति. २ अनुक्रम, व्यवस्था, रचना इ० लावणें, करणें 'पोथ्या सोईनें लाव.' ३ अनुकूलतेचें, व्यवस्थेचें इ० साधन; उपजीविकेचें; धंद्याचे ( चाकरी, वतन, शेत ) इ० सुखदायक साधन, मार्ग. ४ आश्रय, आधार; विश्रांतिस्थान. –ज्ञा १७.२२९. [ सं. सु=चांगलें+ईर=जाणें ] **०करणें**–१ व्यवस्था लावणें. २ ( व. ) टोकणें. **०बसविणें**–( ना. ) खोडकी, नांगी मोडणें. **०वार-सार-स्कर**–वि. असावी तशी सोय, फायदा असणारा; लाभदायक; सुखकर ( उद्योग, धंदा इ० ). **०सुमार**–पु. प्रसंगाचें औचित्य किंवा अनुकूलता; योग्यपणा; व्यवस्थितपणा; मेळ; योग्य काळ वेळ, संधि; मागचें पुढचें धोरण; समंजसपणा. 'त्याचे खर्चाला आणि तुझ्या करण्याला सोई सुमार नाहीं.' **०सोईनें**–क्रिवि. बेताबेतानें; हळू हळू; सौम्यपणें; परिस्थितीस अनुसरून ( पैसा देणें, घेणें इ० ).

**सोपर-वेर-हेर, सोपरतुला, सोयेर, सोपरणें**— सुवेर इ० पहा.

**सोकट**—न. वाळलेला मासा; झिंग्या; सुकलेलें बोंबिल. सुकट पहा. [ सुकणें ]

**सोकट**—पु. कोष्टयाचा कापड विणण्याचा माग.

**सो( सों )कटी-टें-ठी**—स्त्री.न. सोंगटयाच्या खेळांतला पटावर मांडण्याचा लहानसा लांबट लाकडी किंवा हस्तिदंती ठोकळा; नरद पहा. मेजवानीचे वेळीं यांत उदबत्त्या खोचतात. [ सं. सारी+काष्ठ ] **सोकट्या**-स्त्री. अव. सोंगटीचा खेळ. **सोकटीकांठी, सोकटेकांठी**-वि. कांटाकांठामध्यें सोंगटयां सारखी नक्शी असलेलें ( वस्त्र ). ०**घाट**-पु. मोती, रत्न इ०कांचा सोंगटीसारखा असलेला घाट. ०**बाज**-वि. सोंगटया खेळणारा.

**सो(सों)कणें, सो( सों )कावणें**—अक्रि. संवकणें; नाद लागणें; गोडावणें; आवड, चट, लज्जत, शोक, आसक्ति लागणें; लाचावणें; चटावणें. [ संवय ? ] **म्ह**० १ सोकली मेंढी तेंच रान. २ सोकल्या भुता चल जाऊं मागल्या शेता. **सोकील, सोंकेल-सोकीव**-वि. चटक लागलेला; संवकलेला.

**सोंकरणें**—सक्रि. राखणें; रक्षण करणें. -शर. **२** ( महानु. ) हांकणें; हुसकून लावणें. 'सोंकरितातिं तुरुंग्विआंवरी। पूंसेंयातें।' -शिशु २५५. [ सं. संरक्षण ? ] **सोक(का)र-री**-पु. जागल्या; राखणदार; रक्षक. **सोकरा धरणें**-( व. ) काळजी वाहणें.

**सोकरा-री-रें**— छोकरा इ० पहा.

**सोकळ**—वि. ढिसूळ ( दगड इ० ).

**सोकाजी**—वि. छाकटा. [ अर. शौक=नाद, छंद ]

**सोकाटणां-णें**—न. ( कु. ) लाकूड फोडतानां त्याखालीं आधारासाठीं ठेवावयाचा ओंडका.

**सोक, सोख्त**—वि. १ ( गंजिफांचा खेळ ) कोणत्याहि एका रंगाच्या बारा पानांतून एकहि पान दुसऱ्याचे हातांत राहिलें नाहीं असा जो रंग होतो तो. २ दग्ध. 'सरंजाम सर्व सोख्त जाला.' -दिमरा २.४. [ फा. सोख्त ]

**सोख-सोखणें**—शोष इ० पहा.

**सोखी**—स्त्री. उन्मत्तपणा. शोखी पहा. 'शामलांनीं सोखी करून बाणकोटास अपाय केला.' -वाडशाछ २६.

**सोंग**—न. १ नाटकांत घेतलेली भूमिका; वेष; पार्ट. ( क्रि० आणणें; घेणें; येणें ). २ ढोंग; मिष; बनावट वेष; नक्कल; आविर्भाव. ३ पोकळ देखावा, थाटमाट; निरुपयोगी व व्यर्थ अडचण करणारी गोष्ट. ४ लोकविलक्षण माणूस; चमत्कारिक वस्तु, प्राणी. [ सं. स्वांग; का. सोगु ] **म्ह**० १ रात्र थोडी सोंगें फार. २ सारी सोंगें येतात, पैशाचें सोंग येत नाहीं. ०**करणें**-हुबेहुब नक्कल, अनुकरण करणें. ०**ढोंग**-पु. १ सामान्यपणें सोंग. २ खोडसाळपणा. ३ बतावणी. ( क्रि० करणें; मांडणें; लावणें; माजवणें ). ०**संपादणी**-स्त्री. घेतलेल्या भूमिकेची तंतोतंत बतावणी. **सोंगाडी-ड्या, सोंगाळ्या, सोंगी-ग्या**-वि. १ सोंग घेणारा; बहुरूपी. २ ढोंगी. **म्ह**० ( व. ) सोंग्या ढोंग्या पांडुरंगा.

**सोगई**—स्त्री. (माण.) विवाहसंबंध; सोयरीक. [ गु. सगई ]

**सोंगटी-डी, सोंगटें-डें**—सोकटी इ० पहा.

**सोगण, सोगंद**—स्त्री. शपथ ( क्रि० खाणें; घेणें; वाहणें ). [ फा. सोगंद ]

**सोंगणी**—स्त्री. १ पिकाची कापणी, लाणी. 'बाजरी सोंगणीस आली.' २ कापलेल्या पिकाची पेंढी बांधणें, वेटाळणी. **सोंगणें**-अक्रि. ( व. ) शेताची कापणी करणें; पीक गोळा करणें. **सोंगन**-स्त्री. शेताची कापणी; हंगाम. [ सं. संग्रह् ]

**सोगल**—न. ( बे. ) हिंवाळयांतील शेतांतील तण.

**सोंगळ**—वि. १ नाजुक; कोमल; सुबक; कांटेखोरपणाची जाणीव असलेला. २ मृदु, सुकुमार. ३ मलीनपणाची खंत असलेला; चोखंदळ. याचे उलट ओंगळ. [ सं. सुमंगल ]

**सोगळा**—वि. (कर.) ढिला; सैल. 'कोट सोगळा ठेवा.'

**सोगा**—पु. नेसलेल्या वस्त्राचा लोंबता भाग, पदर. [ का. सोगे ]

**सोगा**—पु. डोळयांत घालावयाचा सुरमा. 'नयनीं सोगयाचें अंजन।' -एभा १.३४८. **सोगयाचें अंजन**-न. सुरमा. 'आकर्णपर्यंत विशाल नयन। माजीं विलसे सोगयाचें अंजन।' -सवि ८.४६.

**सोगी**—पु. ( गो. ) एक लहान मासा.

**सोच्यपण**—न. गरीबी; रंकपण; शोचनीय अवस्था. 'जिए साउलिए वीणे । आमुचे सोच्यपणें।' -ऋ ७७. [ सं. शुच्= शोक करणें ]

**सोजी**—स्त्री. १ कोरडें भांडें चुलीवर ठेवून त्यांत तूप घालून, त्यांत जिरें, हळद घालून मग तांदूळ परतणें, नंतर आधणाचें पाणी घालून केलेला भात. २ सपीट, मैदा; गव्हाचा रवा. ३ ( कों. ) गव्हाची किंवा तांदूळाची खीर. [ सं. शुचि ]

**सोजीर**—पु. पलटणींतील गोरा शिपाई. [ इं. सोल्जर ]

**सोज्वल(ळ), सोज्वलित**—वि. १ चकचकीत; चमकणारा. २ तुळतुळीत; निर्मळ. ३ पापरहित; निष्पाप. [ सं. ]

**सोट**—पु. पीक खाणारा एक किडा; याचा रंग हिरवा व शरीर लांबट असतें.

**सोट**—पु. १ लांब, सरळ व जाड लांकूड ( तुळई, कडी, खांब इ० साठीं ); उंच; सरळ झाड; उंच केळीचा कोका. २ उंच मनोरा; उभट जिना, दादर; पर्वताची सरळ सोंड; सरळ रस्ता. ३ सुमारें २० पायली धान्य भरलेलें व तोंड शिवलेलें

पोतें. ४ (ल.) आडदांड; धश्चोट; राकट माणूस; फटिंग; मूलबाळ किंवा परिवारविरहित पुरुष किंवा स्त्री. ५ (ल.) उंच व धिप्पाड माणूस. [सं. शौंड ? हिं. सोंटा] **०गा-गें**-पु न. दांडकें; सोटा; दंडुका; बडगा. **०बहिरी-भैरव**-पु. गलेलठ्ठ व आडदांड माणूस; फटिंग; सडेसोट पुरुष. **०वाव**-पु. फोंक (झाडाचा इ०). **०शिंग**-पु. सडेसोट; अविवाहित पुरुष. **०ळणें, सोटाळणें**-अक्रि. गाय, म्हैस यांच्या जननेंद्रियातून शेंबडाचे लोळीसारखा स्राव होणें. **सो(सों)टा**-पु. १ लांबट लाकूड (खांब, शिडाची काठी यांच्या उपयोगी). सोटगा, सोट पहा. २ गाय; म्हैस इ० च्या योनींतून शेंबडाचे लोळीसारखा गळणारा स्राव. (क्रि० गळणें, गाळणें). **सोटा-दुपट्टा**-पु. प्रवासांतील वस्त्रपात्र, काठी दांडकें इ० थोडेसें जरूरीचें सामान. **सोटे पान्हवण**-न. सोटा इ० मारून गाय इ० पशु पान्हवण्याची क्रिया; त्यासाठीं सोडग्याचा काढलेला आवाज. **सोटे दरबार**-सोटा बाळगणारा मनुष्य. **सोटे-पीर-बारगीर-भैरव-सुंभ-सुलतान**-सोट बहिरी पहा; सडाफटिंग; सडेसोट. **सोटे बरदार**-पु. भालदार; चोपदार. **सोटेबाजी-शाई**-स्त्री. काठ्यांची मारामारी; दंडुकेशाई. -वि. आडदांड; आडदांडपणें हल्ला करणारा.

**सोट्ट**—वि. (कर.) १ वांझ. 'म्हैस सोट्ट आहे.' २ (बे.) पोकळ.

**सोड**—स्त्री. १ कर्ज इ० ची सूट; अशी सूट दिलेली रकम. २ मोकळीक देणें; अटकाव न करतां जाऊं देणें; उपेक्षेची मोकळीक; सवलत; मुक्तता. ३ परवानगी. ४ काडीमोड; सोडचिठ्ठी (लग्नाची). [सोडणें] **०खत-चिठ्ठी-पत्र**-स्त्री. १ सोडणुकीचें पत्र; सांडखत; आपल्या मालकीतून सोडलेल्या (गांव, शेत, किल्ला इ० च्या) वस्तूच्या मोकळिकेविषयींचें आज्ञापत्र; सांडपत्र; सूटपत्र. २ ज्यावरून कोणी मनुष्य आपला विवाहित संबंध तोडतो असा लेख. **०धांव**-स्त्री. (उद्योग धंदा) सोडून, निघून जाणें; टाकून, पळून जाणें; धरसोड करणें. **०पेंढी**-स्त्री. मोठ्या (गवत इ० च्या) भाऱ्यांतून विक्रीसाठीं बांधलेली लहान पेंढी. **०बांध**-स्त्री. १ वरचेवर मोकळें करणें व बांधणें. २ असल्या प्रकारचा धंदा, नोकरी. 'घोड्यांची सोडबांध मजकडे होती, आतां निराळा घोडक्या ठेवला.' **०मुंज**-स्त्री. मुलाच्या उपनयनाचे वेळीं त्याचे कमरेस जी मुंज (गवताची दोरी) बांधलेली असते ती सोडण्याचा विधि, गृहस्थाश्रमांत प्रवेश करण्याची मोकळीक; समावर्तन संस्कार. **०मोकळ**-स्त्री. १ सोडून मोकळें करणें (गवताचा भारा इ०). २ काम इ०ची साधारण मोकळीक; सोडवणूक; पशु, नोकर इ० वर फारसा दाब न ठेवणें. (क्रि० करणें; देणें). ३ कर्ज; सारा इ० पैकीं कांहीं रकम सोडून देणें. ४ सोडमोकळीक; विसकटलेली; मोकळीक दिलेली, विसाव्याची, फुरसतीची स्थिति. **०वण-वणी-वणूक**-स्त्री. १ मुक्तता; मुक्त होणें; मुक्ततेची स्थिति; मोकळीक; स्वतंत्रता; सुटका. २ मुक्ततेचा कोणताहि उपाय. ३ पळवाट; छिद्र; अपवाद. ४ सोडवणी; मळ्यांतील पाटांतून वहाणारें पाणी (शेलण्यानें शिंपडलेलें नव्हे). **०व(वि)णें-१** जाऊं देणें; सुटे असें करणें; मोकळें करणें; बंधमुक्त करणें. २ कांहीं प्रसंगीं भिंतीवर चित्रें, रांगोळी, आकृति; प्रतिमा इ० काढणें; रेघोट्या ओढणें. ३ मालकाकडून काढून घेणें. ४ गूढ, उखाणा इ० उकलणें. ५ (गणित) प्रश्नाचें बरोबर उत्तर देणें. **०वून ठेवणें**-हातचा राखून ठेवणें; पळवाट काढून ठेवणें; सुटण्याच्या उपायाची तरतूद पूर्वींच करून ठेवणें. **०सांड**-स्त्री. कर्ज इ० ची सूट; या सुटीची रकम. **सोडण**-न. १ (कों.) नारळाचें चोड; नारळावरील तंतुमय आवरण. २ (ल.) हट्टी; चिकट माणूस. **सोडणी**-स्त्री. १ सोडवणूक. २ (ल.) मोक्ष. -ज्ञा १८.४४. **सोडणूक**-स्त्री. १ मुक्तता. २ ताटातूट; वियोग; संबंध सोडणें. ३ जाऊं देणें. ४ पळवाट; सुटण्याचा मार्ग. **सोडणें**-उक्रि. १ मोकळें करणें; खुलें करणें; बंधन, करार यांतून मुक्त करणें; वचक, घोटाळा, त्रास; संकट यांतून वांचविणें. २ वेगळें, विभक्त होणें; ताटातूट करणें; गांठ, बंधन इ० खुलें करणें; उलगडणें; संबंध, जोडणी, मांडणी इ० विजोड करणें. ३ सामान्यतः जाऊं देणें; असूं देणें; राहूं देणें; सूट (कर्ज, दोष) देणें; सोडून देणें; हात काढून घेणें; मुक्त, सहन, माफ, क्षमा करणें; शरण येणें; टाकणें; फेकणें; ओतणें; गाळणें; निथळणें (घाम, इ०); शिलगाविणें (तोफ, बंदूक इ०); सुटणें पहा. ४ धावविणें; पळविणें; दमविणें (घोडा, इ०). ५ कोणत्याहि धातूच्या ऊन प्रत्ययांत रूपापुढें हें क्रियापद योजल्यास ती क्रिया पूर्णपणें करणें असा अर्थ होतो. टाकणें पहा. उदा० करून सोडणें; देऊन सोडणें इ० ६ प्रगट करणें. 'विश्वविकासित मुद्रा । जया सोडी तुझी योगनिद्रा।' -ज्ञा १७.१. **म्ह०** (व.) सोडला तर पळतो, धरला तर चावतो (साप). दुष्टाशीं निकट संबंध ठेवल्यास आपली इज्जत घेतो, न ठेवल्यास तो शेफारतो. [सं. छोरणम्]

**सोड्याळा**—पु. (गो.) चणा; हरभरा. **सोडीया**-वि. (काव्य) सोडणारा. **सोड्याळ**-वि. १ चोखंदळ; खोडी काढणारा. २ ज्याचा लवकर कंटाळा येतो असें.

**सोंड**—स्त्री. १ हत्तीचा नाकासारखा लांब अवयव. २ पर्वत, दगड, अभ्रें यांचा सोंडेच्या आकाराचा भाग, नदीचा घाट; जोतें इ०च्या पायऱ्यांच्या बाजूच्या उतरत्या बंदिस्त वरवंड्या प्रत्येकीं. ३ (कों.) देवालयाच्या बाहेरचा, द्वारपालांच्या दोन्ही बाजूंचा ओटा; अलंग. -आडिवऱ्याची महालक्ष्मी ४७. ४ मोटेचा

पुढील चिंचोळा भाग. [सं. शुंडा] ०का-पु ओझ्याच्या जनावराचे पाठीवरील ओझ्याखालील पोतडी; गादी. ०गादी-स्त्री. पालखीच्या (खांद्यावर ठेवावयाच्या जागीं) दांडयाला जोडलेली लहानशी गादी; खोगीरावरील सोंडेसारखें चार कोपऱ्यांचें एक जीन. ०दोर-रा-सोल-पु. मोटेच्या सोंडेचा दोर, नाडा; सौंदर. ०वादी-स्त्री. मोटेची सौंदर व सोंड यांस जोडणारी वादी. सोंडा-सोंडाळ-सोंडया-वि. सोंड असलेला (हत्ती, पोरकिडा, मुरकुट, टोळ); मोठें व कुरूप नाक असलेला. सोंडी-स्त्री. १ (महानु.) घराचे मुख्य दरवाजाचे दोहों बाजूंच्या पडव्या प्रत्येकीं; देवडी. ' उत्तम दक्षिण सोंडिया दोन्ही। '-ऋ १०६ २ (ना.) मुख्य दरवाजाला लागून दोन हात लांब दरवाज्याइतकी उंच बांधलेली मातीची जागा, ओटा.

**सोडगा-गें**—सोटगा-गें पहा.

**सोडत**—स्त्री. शर्यत; लॉटरी; जुगार; एखाद्या पदार्थाची किंमत अनेकांनीं मिळून भरावी व पूर्वसंकेताप्रमाणें ज्याच्या नांवानें तो पदार्थ निघेल त्यानें तो घ्यावा असा व्यवहार [अर. शर्त; पोर्तु. सोर्टे]

**सोडा**—पु (कु.) एक जातीचा मासा; त्याच्या सुकविलेल्या मांसास सोडे म्हणतात.

**सोडा**—पु. (कों.) सुपारी वाळत घालण्यापूर्वी तिच्या दोनतीन ठिकाणीं काढलेल्या पातळ साली प्रत्येकीं. [सोलणें]

**सोडा**—पु. एक क्षार. [इं.] ०वॉटर-न. १ सोडयाचें पाणी. २ कॅर्बानिक असिड वायु दाबून घालून तयार केलेलें पाणी.

**सोत, सोती**—स्त्री. (कों.) गाय. म्हैस इ० चें जननेंद्रिय. [सं. सु=प्रसवणें]

**सोत**—स्त्री. (गो.) छडी. सोतरणें-सोताड(र)णें-उक्रि. (कों.) छडीनें, फोंकानें झोडपणें, मारणें.

**सोत्कंठ**--वि. अत्यंत उत्सुक. [सं.] सोत्कंठा-स्त्री. कळकळ.

**सोदखार**--पु. विलायती मीठ; सोडा खार. -मुंव्या १७२.

**सोदणें**—सक्रि. (बे.) गाळणें. [सं. शोधन]

**सोद(ध)नें**—न. स्वयंपाक्याचें हात पुसण्याचें फडकें. [सं. शोधन]

**सोदर**—वि. एकाच आईच्या उदरांतून जन्मलेले; सख्खे भाऊ. [सं.]

**सोद्रा-द्या-धा-ध्या-सोदडा**—वि. १ बदमाष; लुच्चा. (व.) सोद्रा. २ रंगेल; स्वैर. ३ (गो.) जार. [हिं.] सोदाई-सोदे(धे)-गिरी-शाई, सोदावें-स्त्री. न. १ उडाणटप्पुपणा; लुच्चेगिरी; बदमाषी. २ रंगेलपणा; स्वैरपणा. -वि. सोद्यासंबंधीं.

**सोनक**—पु. (महानु.) खाटीक. ' सोनकानें उरगुडें घेतलें। वैकुंठीचें। '-शिशु १६०.

**सोनका**—पु. सोंडका पहा.

**सोनगादी, सोनदोर-रा, सोनवादी**—स्त्री. पु. स्त्री. सोंडगादी, सोंडदोर, सोंडवादी इ० पहा.

**सोनामुखी**—स्त्री. १ भुईतरवडीचा पाला. हा रेचक असतो. ढाळकाकरितां याच्या पाल्याचा काढा घेतात. २ (कों.) सुवर्णमुखी-माक्षिक.

**सोनवी**—स्त्री. निशाण; झेंडा.

**सोनार**—पु. १ सोन्याचे अलंकार घडविणार माणूस व त्यांची एक जात. २ (ल.) लोभी, चिक्कू माणूस. ३ ज्याचा आवाज सोनारानें मारलेल्या हातोडीप्रमाणें निघतो असा एक पक्षी. ४ एक क्षुद्र सपक्ष जंतु. [सं. सुवर्णकार] म्ह० १ सोनार आणि कोणाला होणार !=कोणास फसविणार नाहीं ? सोनार शिंपी कुळकर्णी आप्पा यांची संगत नकोरे बाप्पा=हे सर्व संगतीच्या माणसास लुबाडणारे आहेत. सोनारानें कान टोचणें-योग्य मनुष्यानें कानउघाडणी करणें. सोनारकी-स्त्री. १ सोनाराचा धंदा. २ (ल.) चौर्य करण्याचें कसब. सोनारडा-पु. निंदेनें सोनारास म्हणतात. सोनारा-वि. (व.) कवच्या रंगाचा (बैल इ०). सोनारी कावा-मत-पुन. सोनाराचें दागिन्यांतील सोनें चोरण्याचें कसब; फसवेगिरी.

**सोनी**—स्त्री. गायनांतील एक राग.

**सोनी**—स्त्री. (कु.) लहान मुलाचें जननेंद्रिय.

**सोनें**—न. १ कांचन; सुवर्ण; पिवळया रंगाची जड व मोलवान अशी एक धातु. २ दसऱ्याचे दिवशीं सीमोल्लंघन करून आल्यावर इष्टमित्रांस देण्यासाठीं आणलेलीं आपटयाचीं पानें. -वि. १ मोलवान; किंमतीचा; महत्त्वाचा; ' सोन्यासारखें मूल. ' २ (चुकीनें) सार्णे; उजेडाकरितां राखलेला धाब्यांतील भोकसा. [सं. सुवर्ण; फ्रें.जि. सोवन, सोनें; पोर्तु.जि. सोनकै] म्ह० सोन्याची सुरी झाली म्हणून काय उरीं घालावी ? (वाप्र.) ०आणि सुंगध-उपयुक्त व सुंदर; फायदेशीर व दिखाऊ. ०होणें-मरणोत्तर उत्तम गति प्राप्त होणें; चागलें, चांगल्या परिस्थितींत मरण येणें. सोन्याचा धूर, पाऊस निघणें-पडणें, सोन्यानें दांत किसणें-अतिशय श्रीमंती असणें. सोन्याहून पिवळा-अतिशय उत्तम. बावन कसी सोनें-१ उत्तम, मुळींच हीणकस नसलेलें सोनें. २ (ल.) उत्तम, शुद्ध वर्तनाचा, प्रामाणिक मनुष्य, किंवा वस्तु. सोनें गाळणें-सोन्याचा रस करून आंतील भेसळ काढणें. कांहीं सोन्याचा तर कांहीं सवागीचा गुण असणें-सोनें उजळतांना सवागीचा उपयोग करतात. त्यावरून एखादें महत्कृत्य घडवून आणण्यांत महत्त्वाच्या गोष्टी-

प्रमाणें अनुषंगिक गोष्टींचेंहि सहाय्य होणें, थोराप्रमाणें हलक्याचेंहि सहाय्य लागणें. **सोन्याचा दिवस**-पु. महत्त्वाचा, आनंदाचा दिवस. **सोन्याची सीता**-स्त्री. ( बायकी ) ( ल. ) नवऱ्याची लाडकी म्हणून नखशिखांत दागिन्यांनीं नटविलेली स्त्री. **सोन्याचे दरवाजे होत व ठसठसां लागोत**-( व. ) मुलगा कसा का होईना पण होवो मग तो त्रासदायक झाला तरी चालेल. असेना पण वाचो. **सोन्याचें हाड**-न. नेहमीं उत्कर्ष, भरभराट होणारा माणूस. सामाशब्द- **सोनओ( व )ळखखी**-स्त्री. दसऱ्याचें सोनें ( आपटयाचीं पानें ) वांटताना झालेली तोंडओळख, **०कळी**-स्त्री. सोनचाफ्याच्या कळयांसारखा केलेला सोन्याच्या कळयांचा हार. **०काव**-स्त्री. एक जातीचा गेरू. **०कावळा**-पु. १ कुक्कुटकुंभा; भारद्वाज. २ ( कों. ) कृष्णकावळा. ३ पांढरा कावळा ( काल्पनिक ). **०कावळा शिवणें**-( बालभाषा ) आई विटाळशी होणें. **०किडा**-पु. काजवा; कोणताहि चमकणारा किडा. **०कुला सोनक्या, सोना-न्या**-वि. लाडका (मुलगा). **०केतक-की**-स्त्री. केळीची एक जात. **०केळ**-स्त्री. एक चांगल्या जातीची केळ. -न. सोनकेळीचें फळ. हें पिवळें धमक व गोड असतें. **०खत-खात**-न. माणसाच्या विष्टामूत्राचें खत. **०चड-डी; सोनचिडी-चेडी**-स्त्री. १ ( को. ) डोंबाऱ्याची ( कोल्हाटयाची ) चिमणी; खेळ करणारी बायको, बाहुली. २ एक जातीची चिमणी. ३ ( गो. ) वयस्क कुमारी; घोडनवरी. **०चाफा(पा)**-पु. एक जातीचें चाफ्याचें झाड. याच्या फुलास सोनचापें ( फें ) म्हणतात. याचा रंग पिवळा व वास मधुर असतो. **०जुई**-स्त्री. पिवळसर फूल येणारी जुई व तिचें फूल **०टका-क्का**-पु. १ एक फूलझाड व त्याचें पिवळसर फूल. २ एक प्रकारचें जुनें सोन्याचें नाणें; ( त्यावरून ) सोन्याचा तुकडा. ३ आवडत्या मुलास म्हणतात. ४ (विणकाम) आरसड व गोल यांचेमध्यें अडकविलेला एक दगड. **०तरवड**-पु. एक जातीचा ( पिवळा व तांबडा ) तरवड. शंकासुर पहा. **०ताव**-पु. १ घोडयाचा पाय दुखावला असतां, तापलेल्या तव्यावर त्याचा पाय ठेवून वर पाणी ओतून द्यावयाचा डाग. २ सोनें तापवून पाण्यांत न बुडवितां निवूं देणें. ३ एखाद्याची खरडपट्टी काढणें; गालीप्रदान करणें. ( क्रि० बसणें; देणें ). **०पावडा**-वि. ( कुत्सितार्थी ) गरीब; दुर्दैवी ( माणूस ) **०पितळ**-न. स्त्री. उत्तम, चमकणारें पितळ ( धातु ) **०फळ**-स्त्री. एकजातीचें भात, साळ. **०मळी**-स्त्री. उंसाचा रस कढवितांना ढोरमळीच्या नंतर येणारी मळी. **०यणी**-न. सोनें तापवून तें ज्यांत बुडविलें आहे असें पाणी; हें बाळंतीण किंवा आजारी माणसास देतात. **०वेल**-स्त्री. १ एक जातीचें भात. २ अमरवेल; आकाशवेल; दाभणाएवढी जाड, वृक्षावर पसरणारी, सोन्यासारखे पिवळ्या रंगाचे बारीक धागे असणारी, शेरावर वाढणारी वेल. ३ (ल.) शेळी; मेंढी ( यांच्या व्यापारानें बराच पैका मिळतो यावरून ). ४ (ल.) नागवेल ( हिच्या पानांच्या व्यापारापासूनहि बराच पैका मिळतो यावरून ) **०वै**-स्त्री. ( महानु. ) सोन्याची वात. ' कीं सोनवै कैवल्यपथा । पाजळली ते । ' -शिशु ३०. **०सळा**-वि. १ सोनेरी रंगाचे पट्टे असलेलें, रेशमी किंवा जरतारी ( कापड, पीतांबर ). ' कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सावळा बाइयानों । ' २ पिवळसर ( केस, गहूं, घोडा इ० ). **सोनुला**-वि. सोनकुला पहा. **सोनेंनाणें-सोनेंवाणें**-न. सोनें, रुपें इ० विषय; सोन्याचे दागिने व नाणें किंवा रोकड. **सोनेरी**-वि. सोन्याच्या रंगाचें; सोन्याचें; आंत सोनें असलेलें ( वस्त्र, शाई, कलाबतू, मुलामा, रंग, वेलबुट्टीचा कागद इ० ). **सोनेरी टोळी**-स्त्री. दुसऱ्याला हरतऱ्हेनें फसवून लुबाडणारी धाडशी लोकांची टोळी. **सोनेळ-ळें**-सोनकेळ-ळें पहा. **सोन्नारिंग**-न. ( गो. ) मोसंबें फळ. [ सोनें+नारिंग ]

**सोनेग्वत**--न. ( कु. ) गुप्तबेत; कूटमंत्र; मेतकूट. ' त्यांचा काय सोनेग्वत आसा. '

**सोप, सोपट**--नपु. १ केळ, चवेणी या झाडाची त्वचा, साल. २ बैलाच्या गळयांतील घंटांचा पट्टा ( पूर्वी केळीच्या सोपटाचा करीत यावरून ). ३ केळीचें सबंध पान, डांग. ४ दाणे नसलेलें कणीस. ' कणेंविण सोपटें । कणसें लागलीं आथी एक दाटे। ' -ज्ञा ९.४३३. ४ उसांचें चिपाड. -वि. फोल; निष्फळ; व्यर्थ. ' तरी वोसणताही बोलु तयाचा । परी सोपु वचे । ' -ज्ञा ८.६. **०पडणें**-बाजरी-जोंधळयाच्या पिकावर कीड पडणें. **सोपटणें**-अक्रि. अशक्त होणें; झडणें: दुबळे होणें. **सोपटया**-वि. चरकांतील उसाच्या चोयटया काढणारा. **सोपाट**-न. ( कुण. ) सोपट.

**सोपटें**—न. सोकटी पहा.

**सो( सों )पणें**—उक्रि. हवाली करणें; ताब्यांत, स्वाधीन करणें, देणें. [ सं. समर्पण हिं. सौंपना ] **सोंपविणें**-दुसऱ्याकडे देणें; एखाद्याच्या हवाली करणें. **सोंपीव**-वि. सोंपविलेलें. **सोंपीव खातें**-न. हिंदी दिवाणांच्या ताब्यांत दिलेलें राज्यकारभाराचें खातें.

**सोंपणें**—अक्रि. १ संपणें पहा. २ ( कु. ) मरणें.

**सोंपरी**—वि. निमुळती.

**सोपल**—पु. ( व. ) आट, पीळ दिलेला ताग, अंबाडी.

**सोपस**—वि. ( राजा. ) नाजूक; कोमल ( स्त्री, प्राणी इ० ).

**सोपस**—स्त्री. हांव; लोभ; इच्छा.

" **सोपस्कर**—वि. सर्व आवश्यक वस्तु व साधनें यांनीं युक्त; सर्व साहित्यांनीं भरपूर. [ सं. स+उपस्कर ]

**सोपस्कार**--पु. १ अन्न, घर, शरीर इ०कांस विशेष रुचि, शोभा इ० यावी म्हणून जे अनेक प्रकारचे उपचार, उपाय इ० करतात ते; एखाद्या गोष्टीच्या पूर्णतेला लागणाऱ्या साधनांची सिद्धता, संस्कार. २ अतिशय जपणूक ( बहुधा अव. प्रयोग ). जिवाचे सोपस्कार करणें, लावणें=नाजूकपणें वागविणें, हाताळणें; आदरसत्कारानें वागविणें, कोड पुरविणें ).

**सोपा**—पु. १ घराची ओवरी, ओटी, पडवी, ओसरी; चौकाच्या बाजूची उंच जागा, लांब पडवी. २ कोठा; कोठार. ३ गोठा. [ अर. सुफ्फा ]

**सोपा-पें**—वि. सुखावह; भानगडीचें नसलेलें; सुलभ; अवघड नसलेलें. [ सं. स्वल्प ] **०रा-रें**-वि. ( चित्पा. ) सोपें.

**सोपा-पें**—पुन शाईत बुडवून ठेविलेली चिंधी.

**सोपाण-न**—स्त्री. ( गो. ) पायरी; जिन्याची पायरी; जिना; शिडी. [ सं. सोपान ] **०मार्ग**-पु. १ जिना; पायऱ्यांचा रस्ता, सुलभ असा मार्ग, रीत. २ आचरणास सोपा उपाय.

**सोपाधिक**—वि. ( संसार, चिंता, माया इ० ची ) उपाधि असलेलें. याच्या उलट निरुपाधिक.

**सोप्ती**—पु. सोबती पहा.

**सोफ**—वि. लटकें; फोल. [ हिं. ]

**सोफा**—पु. वेतानें विणलेला पलंग; कोच. [ इं. ]

**सोबकणें**—उक्रि. १ दगड इ० वर वस्त्र धुतांना हलकेंच आपटणें; चुबकणें; जमीनीवर दाणदिशीं हापटणें; हबकणें. २ (ल.) ( माणूस इ० स मारणें ), धोपटणें, बडवणें. [ ध्व. ]

**सोंबट**—वि. कोमट.

**सोंबटी**—स्त्री. सोंगटी.

**सोबणी**—स्त्री. ताटांतील पातळ पदार्थ न पसरण्यासाठीं ताटाखालीं ठेवावयाचें लाकडी टेंकण; पाण्याच्या भांड्याखालील यावयाचें टेकण; वटकण. [ फा. ]

**सोबणी**—स्त्री. हडळ इ० पिशाचबाधेमुळें शरीराला येणारी कृशता; लागीर.

**सोब( भ )त**--स्त्री. १ मैत्री; संगत. २ मित्र; सवंगडी. [ अर. सोह्बत ] **०संगत**-स्त्री. लहानमोठी, बरीवाईट संगत, मैत्री, ( क्रि० करणें; धरणें ). **सोबती**-पु. स्नेही; मित्र; बरोबर येणारा मनुष्य; सवंगडी. २ प्रतिस्पर्धी; दडपता, दाबता मनुष्य; व्यक्ति; गोहो; मारता पोर याप्रमाणें. याचें स्त्रीलिंगी रूप ' सोबतीण ' होतें. **सोबती वेल्हाळ**-वि. संगत धरण्यासारखा **सोबती संगती**-पु. ( व्यापकपणें ); मित्र सांगाती; सहचर.

**सोबनशेरा**—पु. ( व. ) जोगवा.

**सोबा( भा )ग**—न. ( अशिष्ट. ) सौभाग्य. **सोभागिणी**-स्त्री. ( ग्रा. ) सौभाग्यवती.

**सोभत, सोभतसंगत, सोभती, सोभतीसंगती**— ' सोबत ' इ० पहा.

**सोम** —पु. १ चंद्र. २ सोमवल्ली; तिचा रस. ३ क्षुपणी रोग. ४ सोमयाग; ( यांत सोमरसपान होतें त्यावरून ) ५ शंकराचें एक नांव. ६ ( ल. ) अमृत. ७ -वि. चुकीनें ( सौम्य पासुन ) थंड. [ सं. ] **०कांत**-पु. चंद्रकांत मणी. **सोमकांती**-वि. सोमकांत मण्याचा केलेला ( आरसा इ० ). **०दिन-वार-वासर**-पु. चंद्राचा वार; रविवारच्या पुढील दिवस. **०नाथ**-पु. बारा ज्योतिर्लिंगापैकीं काठेवाडांतील एक शंकराचें लिंग. **०प**-वि. सोमरस पिणारा ( यज्ञकर्ता, देव इ० ) **०याग**-पु. यज्ञ; सोम अर्थ ४ पहा. **०याजी**-पु. सोमयाग करणारा दीक्षित. **०रोग**-पु. सोम अर्थ ३ पहा. **०लता**-स्त्री. सोमवल्ली. **०वती**-वि. सोमवारी आलेली ( अमावास्या ); बायकांचें एक व्रत, यांत १०८ फळें ब्राह्मणास देतात, ( यावरून ). **०वती घालणें**-पुष्कळ संख्या असणें **०वल्ली-वेल**-स्त्री. १ सोम अर्थ २ पहा. २ ( विनोदानें ) भांगेचें झाड व भांगेचें पेय. **०वंश**-पु. चंद्रापासून निघालेला एक क्षत्रिय वंश. **०वाऱ्या तेली**-पु. शंकरभक्त तेल्यांचा एक वर्ग. हे सोमवारीं घाणा चालवीत नाहींत. **०सिद्धांत**-पु. शैवांतील एक पंथ व त्याचें तत्त्वज्ञान. **०सूत्र**-न. शिवाचें तीर्थ गाभाऱ्याबाहेरील ज्या कुंडांत पडतें तें कुंड; गायमुख. **०सूत्री प्रदक्षिणा**-स्त्री. शंकराला प्रदक्षिणा घालतांना वरील कुंडापर्यंत येऊन परतावयाचें व उलट दिशेनें जाऊन पुन्हां या कुंडापर्यंत यावयाचें व परत शंकरासमोर यावयाचें अशा प्रकारें कुंड न ओलांडता केलेली प्रदक्षिणा.

**सोमट(ळ), सोमाळा**—वि. १ कोंबट. २ सोमाल, नाजूक. [ सं. सोष्मन् ]

**सोमता**—क्रिवि. ( कु. ) तत्काळ; ताबडतोब.

**सोमल, सोमलखार**—पु. एक प्रकारचा क्षार; याचे पांढरा व तांबडा असे दोन भेद आहेत.; रसकर्मांत श्रेष्ठ ( इं. ) आर्सेनिक. [ हिं.; अर. सुंबुल ] **सोमली**-वि. सोमलाचा केलेला; ज्यांत सोमल हें मुख्य द्रव्य आहे असें. ( औषध इ० )

**सोमाजी सकलकळ्या**--पु. सोमाजी नांवाचा एक कवि सर्व कलांत निपुण होता; त्यावरून हुशार व सकल कलापूर्ण माणूस; ( उपरोधानें ) सर्वज्ञपणाचा भाव आणणारी व्यक्ति.

**सोमा( मो )सा**—पु. कंठी, चंद्रहार इ० अलंकाराचे निरनिराळे पदर जेथें एकत्र करतात तें टोपण, जाड तुकडा; बिरड्याजवळची जागा.

**सोमीगोमी**--पु. ( बायकी खेळ ) फुगडीप्रमाणें दमछाकीचा, दोघींनीं खेळण्याचा खेळ. नेसत्या लुगड्याच्या पदराची दोन्ही टोकें दोन हातांत धरून, पदर पाठीकडून डोक्यावरून पुढें

आणून उभे राहून डावे उजवे बाजूस; नाचत नाचत लवावयाचें व तोंडानें 'सोट मी, गोट मी। छानी छकुली, मथ्थुली।' असें म्हणावयाचें. [गोम द्वि.]

**सोय**--स्त्री. (कु.) ओल्या नारळाच्या चवांतून (किसांतून) रस पिळून काढल्यानंतर राहिलेला चोथा.

**सोय**—स्त्री. सर्व अर्थी सोई पहा. १ लाभ; प्राप्ति. 'किंबहुना सोये। जीव आत्मयाची लाहे।' –ज्ञा १३.१२१. २ मेळ; जुळणी. 'आंबुला आंबुलिये। संगती ना सोये।' –ज्ञा १३.९७९. ३ विश्रांतिस्थान. 'तैसी आपली सोय देखे। आपुलिया स्वभावा मुके।' –ज्ञा १७.२२९. ४ आश्रय; आधार. 'आणि इये कृष्णमूर्तीची सवे। यालागीं सोय धरिली जीवें।' –ज्ञा १२.२२.५ अस्तित्व.' नाहीं रूपाची जेथ सोये। तेथ दृष्टिचें कांहींचि नोहे।' –अमृ २.५०. **सोय करणें**-(व.) (ल.) सरळ करणें; ठोकणें; चोप देणें; बडविणें. **सोय बसविणें**–(व.) खोडकी, नांगी मोडणें. **सोयधाय**-स्त्री. (गो.) नातेंगोतें. **सोयसाय**-स्त्री. (ना.) व्यवस्था. **सोयीचें बोलणें**-सरळ बोलणें. **सोयीवर येणें**-ताळयावर येणें. **सोये**-स्त्री. (काव्य) सोय. -स्त्री. लग्नानें जडलेला आप्तपणा; नातें.

**सोयरगत**—स्त्री. विवाहसंबंधामुळें झालेला आप्तपणा.

**सोयरा**—पु. १ लग्नामुळें झालेला आप्त; नातेवाईक. २ वेश्या, बटीक इ० चा भाडया, संभोगार्थ ठेविलेला कायमचा माणूस; जार. म्ह० १ धरील तो सोयरा, वर्म पाहील तो वैरी.' २ सोयऱ्यांत साडू, हत्यारांत माडू, भोजनांत लाडू=या सर्वांचा सोयीनें फायद्याकडे उपयोग होतो. ०धायरा-जन-पु. नातेवाईक; स्नेही; सोबती; (व्यापकार्थी अव. प्रयोग) (गो.) सोयधायरा. [सोयरा द्वि.] **सोयरी**-स्त्री. १ आप्त स्त्री. २ ठेवलेली स्त्री; रखेली. **सोयरीक**-स्त्री. १ सोयरगत पहा, विवाहसंबंध. २ (ना.) लग्नांत नवरीस दागिने घालण्याचे वेळचा विधि. **सोयरें माणूस**-न. नातेवाईक.

**सोर**—स्त्री. (कों.) मातीची लहान तांबली; (हेट.) सोरकुल.

**सोर-रु**—पु. ओरड; आकांत आक्रोश. [फा. शोर]

**सोर**—पु. डुक्कर. 'रागद्वेषादिक सोर।' –ज्ञाप्र २६७. [सं. सूकर; हिं. सुवर]

**सोर(रा)गणें**--अक्रि. (बे.) अक्रि. दमणें; श्रमणें.

**सोरंजन, सोरंजनमिश्री, सोरंजनशिरीन**--सुरंजन पहा.

**सोरट-ठ**--पु. १ हल्लीचा काठेवाड देश. २ (संगीत) गाण्याचा एक राग. –वि. काठेवाडी (माणूस); त्यावरून दांडगा; आडदांड. [सं. सुराष्ट्र, सौराष्ट्र] **०टाई-ठाई**-स्त्री. दांडगाई; छातीठोकपणा; धिटाई. **०टी**-स्त्री. काठेवाडांतील तांदुळाची एक जात. –वि. काठेवाडी. **सोरटी बैल**-पु. काठेवाडांतील बैल हा उंच असून याचे खूर कणखर व शिंगें लहान असतात.

**सोरा, सोरमीठ**—पु.न. नैट्रिक ॲसिड व पोटयाश यांच्या मिश्रणाचा एक क्षार, सूर्यक्षार (शोभेची दारू इ० उपयोगी). [सं. सूर्यक्षार फा. शोरा]

**सोरा**—पु. १ (नाविक) टोपणानें फळीस पाडलेलीं भोकें बुजविण्याकरितां तयार केलेला लाकडी गज; सुरसा. २ गुऱ्हाळांतील धुराडें; राख पाडण्यासाठीं ठेविलेलें भोंक.

**सोरा-ऱ्या**--पु चकल्या, शेव, कुरडया करण्याचा सांचा. [का. सोर=गळणें]

**सोराळें**—न. एक भांडें; सोऱ्या? 'मग निपजलीं गंगाळें। अर्धनारी सोराळें।' –कालिका २८.२८.

**सोरी**—स्त्री खेळांतील डाव. 'हातीं सापडलें उभें बैसो नेदी कोणी। सोरीमागे सोरी घेती ओणवें करूनी।' –तुगा २०३.

**सोरो**--पु. (कु.) पिण्याची दारू. [सं. सुरा]

**सोऱ्याबळु**--वि (कु.) अत्यंत दारूबाज.

**सोरोप**—पु. (कु.) साप. [सं सर्प]

**सोल**—पु. एक चपटा मासा.

**सोल**--पु जाड, भक्कम दोर (गाडी, नांगर, इ०चा); नाडा **०खंड**–न. १ 'सोल १ पहा. २ दोरांचा जुंबाडा. [सोलणें?]

**सोल**—पु. अमसुल; कोकमसोल. **०नारिंग**-न. नारिंगाची एक जात. **०वणी**-न. आमसुलें कोळून केलेलें पाणी (कालवणासाठीं). **सोलणें**–उक्रि. १ वरील पापुद्रा, साल, कातडी इ० काढून टाकणें. २ टरफल, फोलपट काढणें; शेंगाच्या आंतील बीज काढणें. [का. सुलि] **सोला, सोलाणा**–पु. हरभरा, पावटा इ०च्या ओल्या शेंगांतील सोलून काढलेला दाणा; शेंगदाणा. **सोलाट**–वि. (ल.) फटिंग; सडासोट. 'घरकुंटुब ना अभवो। गांव ना तुज ठाव। सोलाट तूं पहा हो। लागला जगीं।' –एभा २७७१. **सोलीव**-वि. १ त्वचा इ० सोलून काढलेलें. २ (ल.) पक्का, पूर्ण (लुच्चा, लबाड; लवंगा). ३ (ल. काव्य) स्वच्छ; अंतर्गाभ्यांतील; अस्सल. 'सोलींव निर्वचूं। फलिताथुँचि।' –ज्ञा १६.१३.१०४९. **सोलीवदारिद्य**-अत्यंत गरीबी.

**सोलव**--स्त्री. (कु.) एक जातीचें पोफळ.

**सोलव**--स्त्री. (कु.) मोठी टोपली.

**सोलें**—न. (कर.) पायांतील एक अलंकार.

**सोलोग**--पु. (कु.) वृषण कापलेला डुक्कर.

**सोल्दाद**—पु. सोल्जर; शिपाई. [जर्मन सोल्हाट]

**सोल्या**—पु. एक फूलझाड; फुलास सोलें म्हणतात.

**सोल्याचें तेल**—न. (खा.) करडईचें, भुइमुगाचें तेल.

**सोळ**—न. (कु.) एक जातीचें पोफळ.

**सोव**--पु.अव. (राजा.) ढोंग; सोंग (दुखणें, दारिद्र्य इ० चें). (क्रि० लावणें; करणें; मांडणें). ०लाव्या-वि. ढोंगी; कोंगाडी.

**सोवता-तें**—वि. १ सवता; निराळा. २ स्वतःचा. -क्रिवि. स्वाधीनपणें. [सं. स्वतः]

**सोवन-नें-सोनें**—न. धुराडें; झरोका; सार्णे.

**सोंवळ**--वि. (कों.) नाजूक; कोमल. [सं. सोमल]

**सो(सों)वळा**—वि. १ शुद्ध; पवित्र; स्वच्छ; ओंवळ्याच्या उलट (वस्त्र, मनुष्य, वस्तु); स्नान इ० केल्यानें पवित्र होणारा. २ (ल.) मोकळा; शुद्ध (लांच, गुन्हा इ० पासून). ३ स्वच्छ; सुंदर (रस्ता, गांव इ०). ४ कौटुंबिक व्यवहारापासुन स्वतंत्र; अलिप्त (इसम). ५ सप्रवर नसलेलें (लग्न इ०). [सं. सुमंगल, समुज्ज्वल] **सोवळी होणें**-विधवेचें केशवपन होणें. **सोंवळी गोबाई**-स्त्री १ काशींतील एक पवित्र देवी (यावरून) २ अत्यंत सोवळी बाई. **सोवळें**-न. १ संध्या पूजा इ० कर्माच्या वेळीं शुद्धतेनें राहतां यावें म्हणून इतर अमंगल पदार्थापासुन दूर ठेविलेलें धूतवस्त्र किंवा रेशमी किंवा लोकरीचें वस्त्र. २ सोवळेपणाची स्थिति. **सोवळें घेणें**-(बायकी) बाळंतीण स्त्रीनें महिना दीड महिन्यानें सोवळें नेसून देवाचें तीर्थ घेऊन देवधर्मास योग्य होणें. **सोवळें सोडणें**-(बायकी) रुखवताचे वेळीं वराकडून वधूचे आईस जें खण व लुगडें देतात तें. **सोवळेकरी**-पु. आचारी; स्वयंपाकी ब्राह्मण.

**सोंवळा**—पु. एक जातीचें व्यापारी जहाज.

**सोवा**—स्त्री. मनांतील गोष्ट. मनसुब पहा.

**सोवागी**—स्त्री. एक क्षार; सवागी पहा.

**सोवाणी**—स्त्री. (महानु.) बैठक; आसन. [सं. सु+आसन ?]

**सोवाणी**—स्त्री. पायरी. 'आयुष्यपंथें प्राणिगणीं। करोनि अहोरात्रीची सोवाणी।'-ज्ञा ११.४२४. 'इंद्रनीळा सोवाणी। वरी बैसोनि पद्मासनी।'-दाव १४५. [सं. सोपान]

**सोवें**—न. दुःख.

**सोव्हा(हा)ळा**—पु (रा.) सोहळा पहा.

**सोशा**—पु. (सोनारी) एक प्रकारचें तांब्याचें भांडें.

**सोशा**—वि. सों! सों! करीत व अकस्मात येणारा, वहाणारा (वारा). [ध्व.]

**सोस**—पु. (सोनारी) तार ओढतांना, चपटाई करतांना निघालेला बारीक तंतु.

**सोस**—पु. सहनशीलता; संयमन; सोसणें; सहन करणें. (क्रि० धरणें, करणें). [सोसणें] ०णूक-स्त्री. १ सोस पहा. २ जाचणूक; अपेक्षा; हाल भोगणें. ०क, **सोशीक-सोसाळू-सोशीक**-वि. सहनशील; सहिष्णु; सोसणारा; धीराचा. **सोसणें**-सक्रि. साहणें; सहन करणें. -अक्रि. मानवणें; पचनी पडणें; प्रतिकूल न होणें (अन्न, औषध इ०). 'हें औषध तुला सोसेल.' [सं. सह्=सोसणें]

**सोस**—पु. १ जबर हांव; तीव्र इच्छा; हव्यास. (क्रि० घेणें) २ तहान. ३ तीव्र यत्न. -शास्त्रीको. ०घेवडी-मावशी-स्त्री. दागिने, वस्त्रें, खाद्यपदार्थ इ० विषयीं जबर हांव असलेली स्त्री. [सं. शोष; का. सोसु=हांव; ते सोस=हांव] ०करणें-हांवरेपणानें वस्तु मिळण्याची इच्छा करणें. अतिलोभ धरणें. **सोसासोसानें, सोसेंसोसें**-अति उतावीळपणानें; हांवरेपणानें. **सोसी-शी**-वि. हांवरा; लोभी. **सोसणी**-स्त्री. हांवरेपणा. 'येथें भिन्नसोसणी। नलगे निरूपणीं करणें तुज।'-एभा ४.१८.

**सोंसा**—पु वादळ; सों सों असा आवाज करणारा वारा. [ध्व.] ०वारा-पु (कु) तुफानी वारा. **सोसाट-टा**-सुसाट-टा पहा. **सोंसों**-क्रिवि. सों सों या आवाजानें (युक्त वारा).

**सोसाळें**—न. सोनें; धातु. -मनको.

**सोस्क**—न. (बे.) मस्ती; धांगडधिंगा.

**सोस्ता-स्ती**—वि. कमाल दर, भर सारा असणारी; जिच्यावर साऱ्याची पूर्ण आकारणी करण्यांत येते अशी (जमीन, मळा, बिघा इ०). (या जमीनीस इस्तावा लागू करीत नाहींत). 'हें शेत सोस्तें कीं नवरान ?' अशा साऱ्यास सोस्ती(-स्त्री.), सोस्तें (-न.) असें. म्हणतात या 'सोस्ती' च्या उलट 'इस्ताव्याची, नवरान, उक्ती, कौली' (जमीन). [सोसणें]

**सोहं, सोहम्**—पु. १ मी 'ब्रह्म' आहे; मी तें (ब्रह्म) आहे असा भाव. २ गर्भावस्थेंत मूल या मंत्राचा जप करतें व जन्मल्यानंतर 'कोऽहं' (=मी कोण आहे ?) असा उच्चार करतें अशी एक समजूत. [सं. सः=तें ब्रह्म+अहं=मी] ०भाव-पु. 'मीच ब्रह्म' ही भावना (गर्भावस्थेंतील किंवा ब्रह्मज्ञान झाल्यानंतरची). ०मूर्ति-मूर्तिब्रह्म-न. गर्भावस्थेंतील मूल (कारण या अवस्थेंतील मुलाची भावना सोहंभावाची असते)

**सोहनी**—पु गायनशास्त्रांतील एक राग. यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति षाडव. वादी धैवत, संवादी गांधार. गानसमय रात्रीचा चवथा प्रहर.

**सोहनें**—पु. धारें; धुराडें; सार्णे; सोनें.

**सोहपा-पें**—वि. सोपा-पें.

**सोह(हो)लत**—स्त्री. १ सवलत; परस्परांस सोइस्कर अशी सवड. 'मनुष्यास सोहलत राहिली नाहीं.'-इमं २९५. २ सोइस्कर; सुखावह बाब; गोष्ट; सुरळीत चाललेला व्यवहार;

साम. 'प्रयागाची रद-बदली आहे तोहि मन्सुबा सोहलतीनें होईल तरी करावा.' -पया ३३८. [अर. सुहलत्]

**सोह(हा)ळा**—पु. १ उत्सवसमारंभ; आनंददायक प्रसंग; उत्सव. २ मौज; उत्सव; गर्भादान, लग्नादि शोभन संस्कार; आल्हादकारक प्रसंग (खेळ, मेजवानी इ०) करणें. ३ मानवी जीवितांतील भोगावे लागणारे बरेवाईट प्रसंग किंवा संस्कार. [सं. सौहार्द] **सोहळें**-न. लीला; आनंदजनक खेळ.

**सोहागा-गी**—पु.स्त्री. सवागी क्षार.

**सोहे**—स्त्री. चर्या. 'ओळखिली बंधूची सोहे.।' -स्त्रिपु ७३.४७.

**सोहेर, सोहेरणें, सोहेरतुला**—सुवेर इ० पहा.

**सोहेरगत, सोहेरा-री, सोहेरीक, सोह्यरगत, सोह्यरा-री, सोह्यरीक**—सोयरगत, सोयरा इ० पहा.

**सोहोलत, सोहोळा**—सोहलत, सोहळा पहा.

**सोहोरत**—स्त्री. सोय; सोपेपणा; सुलभता. [सोहोलत]

**सोळका-क्या**—वि. (गुऱ्हाळ) फडांतील ऊंस आणून त्यांचीं पातीं काढून ते साफ, चरकांत लावण्यास योग्य असे करणारा. [सोलणें]

**सोळा**—वि. सोंवळा पहा. **०ओळा**-वि. सोंवळा व ओवळा.

**सोळा**—वि. १६ ही संख्या [सं. षोडश-सोलह-सोला-सोळा] **म्ह०** संगमनेरचे सोळा आणि धांदरफळचा गोपाळा-अतिशय लुच्चा माणूस; **सोळबांड(बाण)चक्रबांड (चक्कर-बाण)**-वि. (व.) उडाणटप्पु; बृथापुष्ट; सोटया; अडदांड; अडमुठा; रानवट; खुशालचंद; निरक्षर; दांडगेश्वर. **सोळकी**-स्त्री. कामकऱ्यांचा सोळाजणांचा जथा, संच, टोळकें. **सोळकीचा**-वि. वरील टोळकें ज्यास लागतें असें मेहनतीचें (काम); सोळा लोक उचलावयास लागतात असा वजनदार दगड किंवा इतर पदार्थ. **सोळन्हाण-णें, सोळंवदण**-न. लग्नापासुन सोळाव्या दिवशींचें वधूवरांचें स्नान व त्या दिवशीं जांवयास द्यावयाचा मानपान. **सोळभोंक**-पु. सोळबांड पहा. [भोंक=शून्य] **सोळवंड-डी**-स्त्री. नारळादि फळें, चाफ्यादि फुलें इ०चा १६ चा संच; स्त्रियांनीं १६ ब्राह्मणांस द्यावयाचें एक दान. [सं. वृंद=वंड] **सोळा आणे**-पु अव. क्रिवि. पूर्ण रुपाया; त्यावरून सर्वश्रेष्ठ असा; सर्वांत चांगला असा; पूर्ण; भरपूर; पक्कें; उत्कृष्ट. (माणूस, वस्तु, गोष्ट). **०कळीं तपणें**-(व.) सोळा कलांनीं युक्त असणें (चंद्र) त्यावरून (ल.) हातीं हुकमत व पैसा भरपूर असणें. **०गुणांचा खंडोबा**-पु.अठरा गुणांचा खंडोबा पहा. **०शृंगार-शिंगार**-सोळा संस्कार या अर्थी चुकीनें म्हणणात. **संस्कार**-पु.अव. गर्भाधान, पुंसवन इत्यादि संस्कार. संस्कार पहा. २ (ल.) आयुष्यांतील भोगावे लागणारे बरेवाईट प्रसंग; आपत्ती; अडचणी (क्रि० होणें). ३ (ल.) शिष्टाचाराची, आदरातिथ्याची वागणूक. **०सूक्ष्मभूतें**-न. अव. पंचतन्मात्रा; पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें व मन यांचा समुदाय. पचतन्मात्रा पहा. **सोळु(ळो)ला(ली)**-वि. सोळा पायल्यांचा (मण, खंडी). **सोळें**-न. सोळा रुपये सोळा या भावाचें उत्तम सोनें, (ज्ञानेश्वरकालीन). 'वानिभेदासि ये सोळें -ज्ञा १५.३४१.

**सोळाकिर्ली**—स्त्री. (कु.) साळुंकी (पक्षी).

**सोक्षमोक्ष**—पु. कांहीं एक गुंतुन पडलेल्या व्यवहाराचा बरा किंवा प्रतिकूल कांहीं तरी कायमचा शेवट ठरवून टाकणें; सुटणूक; मृत्यु; मोकळीक, मुक्तता; भिजत पडलेल्या व्यवहाराचा धाडशीपणानें लावलेला बरावाईट निकाल. (क्रि० होणें,) [सं. मोक्ष+सोक्ष द्वि]

**सौ.**—स्त्री. सौभाग्यवती या शब्दाचें संक्षिप्त रूप.

**सौकट**—पु. कोष्ट्याचा माग. 'सौकटाचिया बोजा। पसरो का बहु पुंजा।' -अमृ ७ २४१.

**सौंकणें-कावणें-कील-केल-कींव**—सोंकणें इ० पहा.

**सौकर्य**—न. सुकरता; सुलभता. [सं.]

**सौख्य**—न. सुखीपणा; समाधान. [सं.]

**सौंगडा-डी**—पु.स्त्री. संवगडी पहा. 'आतां हा आम्हा सौंगडा झाला। कर्णपुत्र।' -कथा ६.९.१०५.

**सौगंद्**—स्त्री. शपथ. 'मुसुलमान होऊन मोडील त्यास सौवराची सौगंद असे.' -रा १५.१३५. [फा.]

**सौचिया**—पु. कोयती, लहान कोयता.

**सौजन**—पु. सुजन व्यक्ति (पूर्वी देशमुख देशपांड्यांना लिहावयाच्या पत्रांतील मायना) [सं. सज्जन]

**सौजन्य**—न. १ सुजनता; चांगुलपणा; सभ्यपणा, उत्तम वर्तणूक. २ प्रेम. 'सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य।' -तुगा २५००. ३ विनय. [सं.]

**सौतें**—वि. निराळें; स्वतंत्र. -क्रिवि. स्वतः; खुद्. सवतें पहा. [सं. स्वतः]

**सौत्र**—वि. सुत्रासंबंधीं; नियमांनीं ठरविलेलें; आंखीव, ठराविक. [सं.] **सौत्रामणी**-पु. एक प्रकारचा सुत्रकथित यज्ञ. यांत सुरा हें हविर्द्रव्य असतें. 'याग करितां सौत्रामणी।' -एभा ५.२७२.

**सौंदड**—स्त्री. एक जातीचें झाड.

**सौंदड-र-ळ**—पु. मोटेचा सोंडदोर. [सोंड+दोर]

**सौंदण-णी**—स्त्री. १ धोब्याची पाणी साठवून त्यांत कपडे धुण्याची दगडी किंवा धातूची दोण. 'समुद्र आणि सौंदणी।' -हवि १.८५. २ नदी, सरोवर. -शर.

**सौंद(दु)री**—स्त्री. (व.) मीठ. 'अगोदर सौंदरी वाढा.' [ सिंधु ]

**सौंदर्य**—न. सुंदरपणा; लावण्य; देखणेपणा; उत्कृष्ट रूप [सं.]

**सौंदळ, संवदळ**—न. सैन्य. 'सौदळीं भांडतां मग कण कील्या मीठ किती।' -ऐपो १२. [सं. सम+दळ]

**सौदा**—पु. (नाविक) होडीचा खालचा भाग.

**सौदा**—पु. १ व्यापार; व्यवहार; देवघेव; बाजारहाट क्रयविक्रय. २ खरेदी-विक्रीचा माल; जिन्नस. [फा. सौदा] **०ग(गि)र**-पु. व्यापारी-उदमी. 'भिन्न भिन्न सौदागरी। सह-वर्तमान जाया कुमरी।' -मुसभा २.९१. [फा.] **०ग(गि)री**-स्त्री. सौदा अर्थ पहा. सौदागिराचा धंदा, उद्योग. -वि. व्यापारी; सौदागरासंबंधीं. **०वणी**-स्त्री. सौदा अर्थ १ पहा. **०सूत**-पु.न. सौदा अर्थ १,२ पहा.

**सौदाम(मि)नी**—स्त्री. वीज; विद्युल्लता. [सं.]

**सौध, सौधव**—पु न. राजवाडा चुनेगच्चीचा; मोठा वाडा; चुनेगच्ची भव्य मंदीर. [सं.]

**सौनंद**—न. मुसळ. 'सौनंदे कामपाळे अति अतुळबळें।' -गस्तो ५३.

**सौप्तिक**—वि. सुप्तावस्थेसंबंधीं. [सं.]

**सौब**—स्त्री. तर्फ; बाजू. [अर. सौब्]

**सौबरी**—स्त्री. एक झाड. [सं. सौवीर]

**सौभ(भा)ग, सौभाग्य**—न. १ सौंदर्य. २ भाग्य; नशीब 'एवढें एक सौभग।' -ज्ञा १५.१७. ३ ज्याचे योगानें आपणांस मान्यता, शोभा, प्रतिष्ठा, तेज इ० लाभतें असा अधिकार, विद्या, वतन, सामर्थ्य इ० विषय. ४ सवाष्णपणामुळें काजळ, शेंदूर, कुंकू, मंगळसूत्र, बांगड्या इ० वस्तु धारण करण्याचा बायकांचा अधिकार; सुवासिनीत्व. ५ कुंकू, शेंदूर. [सं. सुभग; सौभाग्य] **म्ह०** गौर रुसली आणि सौभाग्य घेऊन बसली=रुसुन बसलेल्याची कोण पर्वा करतो अशा अर्थी योजतात. **सौभाग्य मिरविणें लावणें**=सौभाग्यवति स्त्रीनें आपला तोरा मिरविणें. **सौभाग्याचा टिका**-सौभाग्याचें चिन्ह, कुंकू. **०चिन्ह-द्रव्य**-न. कुंकू, बांगड्या वगैरे. **०तंतु**-पु. १ मंगळसूत्र. २ (ल.) नवरा. **०धन**-न. नवरा. 'घातला तिच्या दुष्टानें सौभाग्यधनावर घाला।' -विक १४. **०वती**-स्त्री. सुवासिनी स्त्री. **०वायन वाण**-न. स्वतःला सौभाग्य चिरकाळपर्यंत लाभावें म्हणून सुवासिनी स्त्रिया सौभाग्यद्रव्यांचें ब्राह्मणांस जें दान (वाण) देतात तें. **०शुंठी-सुंठ**-स्त्री. ज्यांत प्रमुख्यानें सुंठ घातलेली असते असा एक औषधी पाक.

**सौमनस्य**—न. मनाचा चांगुलपणा; मनाचा पक्केपणा. [सं.]

**सौमास**—न. (बायकी) शरीराचा नाजूक भाग. [सुकुमार+मांस]

**सौम्य**—पु. १ सोमाचा, चंद्राचा पुत्र बुध (देव व ग्रह). २ नवखंड पृथ्वींतील एक खंड. ३ ४३ वा संवत्सर. -न. मृग-नक्षत्र. -वि. १ मृदु; नरम; हलकें; तीक्ष्ण नसलेलें; साधें (औषध, मनुष्य, स्वभाव, कृति, उपाय). २ शांत; स्थिर; स्तब्ध; समाधानी. ३ चंद्रासंबंधीं. [सं.] **०ग्रह**-पु. बुध, गुरु, शुक्र हे ग्रह. **०वार-वासर**-पु. बुधवार. **सौम्यगोल**-पु. उत्तरेकडील एक प्रदेश. **सौम्या**-स्त्री. उत्तरदिशा. [सं.]

**सौर**—पु. एक झाड.

**सौर-रा**—वि. शूर (शिपाई). 'तो सौरा चांग समरंगीं।' -एभा १६.१२९. [सं. शूर]

**सौर**—पु. १ सौरमास. २ शनिग्रह. *-वि. १ सूर्यासंबंधीं (पूजा, उपासव इ०). २ सूर्याच्या गतीवरून गणना केलेला (वर्ष, दिवस इ०). [सं.] **०दिवस**-पु. कोणत्याहि एका ठिकाणच्या याम्योत्तरावरून सूर्याच्या लागोपाठ होणाऱ्या दोन फेऱ्यांच्या मधला काळ. **०मान**-न. सूर्याच्या गतीवरून काल मोजण्याची पद्धति. **०मास**-पु. सूर्य एका राशींतून दुसऱ्या राशींत जाई-पर्यंत जो काल जातो तो. **०वर्ष**-न. पृथ्वीस सूर्याभोवतीं एक प्रदक्षिणा घालावयास लागणारा काल; ३६५ दिवस, ६ तास, ९ मिनिटें व दहा पूर्णांक तीनचतुर्थांश सेकंद. **सौरी**-स्त्री. सूर्याची स्त्री. **सौर्य**-न. तेज.

**सौरभ्य**—न. १ सुगंध. २ कीर्ति. [सं.]

**सौरस**—पु. १ गोडी; प्रसाद. 'म्हणउनि मागे कंठीचा सौरस।' -तुगा ८७८. २ संबंध. 'हें कल्पनेचेनि सौरसें।' -ज्ञा ९.९१. ३ सामर्थ्य. -ज्ञा १०.६. ४ अभिप्राय. 'आतां अदंभा-चिया वोळखीसी सौरसु देवों।' -ज्ञा १३.२०१. ५ योग्यता; 'तेथ सौरसेंवीण जाय। बुद्धि तयाची।' -ज्ञा ६.४५९. ६ आसक्ती; हेतु; इच्छा. 'पुरत्री सौरस मनींचा।' -एभा १५६५. ७ यत्न. [सं. सुरस] **सौरस्य-सौरहस्य**-न. १ सुरसपणा; प्रेमभाव. २ सुरसपणा; चवदारपणा. ३ मैत्री; स्नेहभाव; उत्तमप्रकारचें दळणवळण.

**सौराथ-र्थी**—स्वार्थ-र्थी पहा.

**सौरी**—स्त्री. १ स्त्रीवेषांतील हिजडा. २ बेशरम, स्वैर स्त्री. 'सौरियांच्या फेरी।' -तुगा २९७. ४ मुरळी. -वि. निर्लज्ज. [स्वैर]

**सौलत**—सोहलत पहा.

**सौष्ठ(ष्ठ)व**—न. १ चांगुलपना; उत्कृष्टपणा; सौंदर्य. २ चपलता. [सं.]

**सौसारखा**—वि. आमूलाग्र सारखा.

**सौहृद, सौहार्द**—न. मैत्री; स्नेह. [ सं. ]

**सौळ**—वि. ( राजा. ) मचूंळ; सवळ.

**स्कंद**—पु. १ कार्तिकस्वामी. २ विभाग. [ सं. ]

**स्कंध**—पु. १ खांदा. २ झाडाची फांदी; शाखा. ३ पुस्तकाचें प्रकरण, भाग. ४ ज्ञानाच्या ५ शाखा. पंचस्कंध पहा. ५ सैन्याचा व्यूह. ६ पंचविषय व इंद्रिय पहा. ७ समूह, समुदाय. ८ एक प्रकारचें वृत्त. ९ राज्यारोहणास आवश्यक असलेली कोणतीहि वस्तु ( चवरी, गंगोदकाचा घट इ० ). १० सप्तस्कंध ' पहा. ११ ( ज्योतिष ) गणितस्कंध; होरास्कंध; संहितास्कंध ( काळ, ऋतु, मंत्रतंत्र, भविष्य इ० चें ). [ सं. स्कंध्=जाणें ]

**स्का-स्की-स्कें**—वि. ( तं. ) सारखा-खी-खें.

**स्खलन**—न. १ अडखळणें; घसरणें. २ ठिबकणी; पडणें; गळून पडणें. ३ वीर्यपात. ४ ( ल. ) तोतरें बोलणें; बोलतांना अडखळणें. ५ नीतिबाह्य वर्तन करणें; पाप करणें. **स्खलित**-वि. १ दोषी; पातकी; दुर्वर्तनी. २ चुकलेला; अडखळलेला. [ सं. स्खल्=पडणें ]

**स्तन**—न. १ थान; आमा. २ अचळ; सड. [ सं. स्तन्=ध्वनि करणें ] ०**देणें**—थानांतील दूध पाजणें. ०**पात**-पु. वार्धक्यानें बायकांची थानें लोंबणें. ०**पान-प्राशन**-न. थानांतील दूध चोखणें, पिणें ( मुलानें, वासरानें ). ०**मर्दन**-न. ( शृंगार ) कुचमर्दन; स्तन कुस्करणें; रति प्रकार **स्तन्य**-न थानांतील दूध.

**स्तंब**—पु. १ घोंस; झुबका; झुबक्याचें झाड; घोंसदार झाड. २ समूह; कांड. ३ अणुरेणु. [ सं. ]

**स्तबक**—पु. १ घोंस; झुबका. २ ग्रंथाचा विभाग. [ सं. ]

**स्तब्ध**—वि. १ थांबलेला; गति बंद पडलेला; स्थिर; अडथळा झालेला किंवा केलेला; निश्चल; उगा; निःशब्द; खोळंबून राहिलेला. २ मनाचा कणखर; निश्चयी; न नमणारा. ३ ताठरलेला; अवटरलेला. ४ मन, शरीर यांची गति, शक्ति कुंठित झालेला. [ सं. स्तंभ्=रोध करणें ] ०**णें**-अक्रि. १ थांबणें; स्थिरावणें; बंद पडणें. २ उभें राहणें, निश्चल असणें.

**स्तंभ**—पु. १ खांब; सोट. २ थांबलेली स्थिति; स्तब्धता. ' सुनि स्तंभु चालया । '—ज्ञा १८.१५५४. ३ लघवी, वीर्य यांचा अटकाव; भीती इ० नें स्तब्ध होणें; मति, जाणीव इ० गुंग होणें. ४ अडथळा; अटकाव; जडता. ५ वृक्षाचें खोड. [ सं. ] ०**क**-वि. थांबविणारें. ०**न**-न. १ थांबविणें; अटकविणें; गति बंद पाडणें; प्रतिबंध. २ सप्तोपचार पहा. मंत्र, जादूटोणा इ० नीं गति इ० बंद पाडणें; इंद्रियांचें चलनवलन बंद पाडणें; नियमन; निग्रह. ३ वरील बंद पाडण्याचें कोणतेंहि साधन. ४ वीर्य लवकर न पडणें; वीर्यस्खलन होऊं नये म्हणून घेण्याचें औषध, साधन. **स्तंभित**-वि. स्तब्ध पहा.

**स्तंभ**—पु एक अढळ तारा. ' खलाशांच्या मतें ध्रुवतारा हि किंचित विचल असून स्तंभ मात्र पूर्ण अविचल आहे. '—चित्रमयजगत् एप्रिल १९३७. [ सं. ]

**स्तर**—पु. थर; पडदा. [ सं. ]

**स्तव**—शअ. साठीं; करितां; कारण; मुळें; बद्दल. [ सं. ]

**स्तव, स्तवन, स्तुति**—पु.न.स्त्री. (अप स्तूत) स्तुति करणें; स्तवन; वर्णन; वाखाणणी; गुणवर्णन; प्रशंसा; स्तोत्र. [ सं. स्तु=स्तुति करणें ] **स्तवणें**-उक्रि. स्तवन; वर्णन; वाखाणणी करणें. **स्तवनीय, स्तुत्य, स्तव्य**-वि. स्तुति इ० करण्यास योग्य; प्रशंसनीय; वाखाणण्याजोगें. **स्तुतिपाठक**-पु. १ भाट; प्रशंसा इ० करून श्रोत्यांच्या अंगीं धैर्य उत्पन्न करणारा माणूस; वैतालिक. २ खुशामत करणारा. **स्तुतिप्रिय**-वि. आपली स्तुति केलेली आवडते अशा स्वभावाचा. **स्तुतिवाद**-पु गुणवर्णन; शिफारस; वाखाणणी; स्तुतिपर भाषण. **स्तोता**-वि. स्तुति करणारा. **स्तोत्र**-न १ स्तुति; स्तवन. २ देवता; गुरू इ० च्या प्रशंसापर गद्य किंवा पद्य रचना.

**स्तिमित**—वि. मंद; आळशी; स्थिर; मठ्ठ; मद्दड; जड. [ सं. ] **स्तिमिताई**-स्त्री. मंदपणा; जडपणा; मद्दडपणा.

**स्तूप**—पु बुद्धाच्या अवशेषावर बांधलेली एक विशिष्ट आकाराची इमारत. [ सं. स्तूप्=ढीग घालणें ]

**स्तेय**—न. चोरी; उचलेगिरी. [ सं. ]

**स्तोम**—पु. १ रास; ढीग. २ संच; जमाव; समुदाय ( चराचर वस्तूंचा ). -न. मंडळ; समाज; टोळी; संघ; समूह. [ सं. ष्टुभ्=थांबविणें ]

**स्तोम**—पु. १ बडेजाव; पोकळ अभिमान; गर्व; पोम; स्तुति. ( क्रि० माजविणें=फाजील प्रशंसा करणें ). २ एक संस्कार. उदा० व्रात्यस्तोम [ सं. स्तु=प्रशंसा करणें ]

**स्त्री**—स्त्री. १ बायको; मादी. २ पत्नी; स्वतःची बायको; भार्या. ३ स्त्रीलिंगी शब्द, वस्तु. ४ फळें येणारी वेल, झाड इ०. [ सं. ] **स्त्रीचें सोनें होणें**-उतारवयांत स्त्रीनें पतीच्या आधीं मरणें. **स्त्रीच्या नाकावर पदर येणें**-वैधव्य येणें. सामाशब्द— ०**गमन-संग**-नपु. मैथुन. ०**चरित्र**-न. स्त्रीची चालचलणूक; कावेबाज वर्तणूक इ०. **म्ह०** ( गो. ) स्त्रीचरित्र गाढ; जोन्याक आयलें खाड तुम्ही चिकेसरा आड, जोयांचें वचूं नी खांड. ०**चिन्ह**-न. स्त्रीचें जननेंद्रिय, गुह्य. ०**दास-लंपट-पर-बुद्धि-वश**-वि. स्त्रियांविषयीं आसक्त किंवा बायकोच्या मर्जीप्रमाणें वागणारा; बाईलबुद्ध्या. **म्ह०** स्त्रीबुद्धिप्रलयंगता. स्त्रीबुद्धिः प्रलयावहा. ०**धन**-न. स्त्रीची हक्काची मालमत्ता ( लग्नाचे वेळीं मिळालेले दागदागिने किंवा आईबापाकडून मिळालेलें धन इ० ). याच्यावर तिचा पूर्ण हक्क असतो. या धनाचे सहा प्रकार आहेत.

०धर्म-पु. १ स्त्री अस्पर्श होणें. २ लज्जा, विनय इ० स्त्रीचे गुण. ०धर्मिणी-वि. रजस्वला. ०पुरुषधर्म-पु. स्त्री, पुरुष यांचीं परस्पर कर्तव्यें. ०पुरुष-पु अव. नवराबायको. ०रत्न-न. सुंदर व पतिव्रता स्त्री. ०राज्य-न. १ पुराणांत वर्णिलेलें एक स्त्रियांनीं चालविलेलें राज्य. २ (ल.) ज्या कुटुंबांत पुरुषापेक्षां बायकोचें प्रस्थ जास्त असें कुटुंब. ०रोग-पु. प्रदररोग. ०लिंग-न. नामाच्या तीन लिंगापैकीं 'जी, ती, ही' अशा सर्वनामरूपांनीं ज्या नामार्थाचा परामर्ष होतो त्या नामाचें जें लिंग तें. -वि. त्या लिंगानें युक्त. ०लोभ-पु. स्त्रीविषयीं आसक्ति; स्त्रीलंपटपणा. ०हत्या-स्त्री. स्त्रीचा खून. स्त्रैण न. स्त्रीत्व. -वि १ बायक्या. स्त्रीदास पहा. २ स्त्रीसंबंधीं (व्यवहार). [सं.]

स्थ—वि. राहणारा; वास करणारा. 'गर्भस्थ; जन्मस्थ'. [सं.]

स्थंडिल—न यज्ञ, होम इ० करितां केलेला साधारण एक हात चौरस व चार अंगुळें उंचीचा मातीचा ओटा.

स्थल-ळ—न १ जागा; ठिकाण. २ मोबदला; ऐवज. 'त्याच्या स्थळीं हा चालेल. ३ मुद्दा; प्रयोजन. 'एथ अविद्यानाशु हें स्थळ।'-ज्ञा १८.१२४३. ४ अनेक शेतांचा एक डाग. ५ हुद्याची, कामाची, अधिकाराची जागा. ६ जमीन. हिच्या उलट समुद्र ७ उपवर मुलीला देण्यायोग्य वर, ठिकाण. [सं. ष्ठल्=थांबणें; स्था=थांबणें] ०चर-वि. जमिनीवर राहणारा, वावरणारा (मनुष्य, पशु इ०). ०देवता-स्त्री. स्थानिक देव. ०मार्ग-पु. खुष्कीचा रस्ता; जमिनीवरील वाट. याचे उलट जलमार्ग. ०शुद्धि-स्त्री १ अपवित्र जागा मंत्रादिकांनीं पवित्र करणें; सडासंमार्जन. २ प्रवासांतील तळशोधणी. स्थलांतर-न. दुसरी जागा पहाणें किंवा थारेपालट (क्रि० करणें).

स्थविर—वि. म्हातारा; वृद्ध. [सं]

स्थाणु—पु.न. १ खांब. २ खुंटा; काठी; झाडाचें खोड; मेढ. ३ दहावा रुद्र. -वि. अक्रम; स्थिर; गच्च. [सं.]

स्थातव्य—न. थोडा वेळ मुक्काम; वस्ति. -वि. ठेवण्याजोगा; नेमण्याजोगा; गच्च बसविण्यास, निश्चित करण्यास, ठरविण्यास योग्य. [सं. स्था=राहणें] स्थाता-वि. उभा राहणारा; थांबलेला; व्यापलेला.

स्थान—न. १ जागा; स्थळ; ठिकाण; राहण्याची जागा. २ दिशा; स्थानिक परिस्थिति. ३ योग्य काळवेळ; हंगाम; प्रसंग; संधि. ४ एखाद्याचे ऐवजीं असणें. ५ (व्याकरण) वर्णोच्चार जेथून होतो तो शरीराचा भाग. [सं. स्था=राहणें] ०च्युत-भ्रष्ट-वि. जागा, हुद्दा, परिस्थितीपासून सुटलेला, काढलेला. ०क-न. १ देऊळ; देवालय. -अकक भा. २. कृष्णकौतुक ३९. २ मठ; उपाश्रय. ०पति-पु. मिरासदार. -ज्ञा १३.३७६. ०माहात्म्य-न. जागा, हुद्दा इ०चें अंगचें विशेष महत्त्व; अंमल; गुण; सामर्थ्य (ज्यामुळें त्या जागेवरील माणसाचा लोकांच्या मनावर प्रभाव पडतो). ०संख्या-स्त्री. गणित किंवा भूमिति श्रेढींतील पदांची संख्या. स्थानापन्न-वि. स्थानावर स्थापलेला. स्थानिक, स्थानीय-वि स्थळ, जागा, हुद्दा, स्थिति इ० संबंधीं. उदा० गुरु-शिर-स्थानिक; कांहीं विशिष्ट स्थानासंबंधाचा. स्थानिक स्वराज्य-न. म्युनिसिपालिटी; गांवसभा. स्थानी-स्त्री. सभा. 'तेथ यादवाची स्थानी बैसली।'-शिशु ३४८.

स्थापणें—अक्रि. १ ठेवणें; लावणें; रचणें; गच्च बसविणें. २ स्थापन करणें; उभारणें; व्यवस्था लावणें. ३ सिद्ध करणें. ४ एकाग्र करणें. (मन, चित्त वगैरे) ५ रचणें; पाया घालणें. [सं. स्था. राहणें] स्थापक-वि. १ ठेवणारा; स्थापन करणारा; बांधणारा; दगड, खूण वगैरे घालणारा. १ स्थापना, उभारणी, करणारा, पाया इ० घालणारा, रचणारा. २ नियमन करणारा; आज्ञापक; ठरविणारा; निश्चित करणारा. ३ सिद्ध, खरें शाबित करणारा. स्थापन-ना-न.स्त्री. स्थापणें पहा. १ रचाई, उभारणी; संस्थापन; व्यवस्थित योजना. २ निश्चय; शाबिती. ३ नियमन; आज्ञापन; निश्चिति. ४ प्राणप्रतिष्ठा (देवतेची); उपास्य दैवतावर चित्ताची एकाग्रता; मनाची स्थिरता; दृढता. ५ गर्भारपणांतील एक विधि; पुंसवन संस्कार. स्थापनीय-स्थाप्य-वि. स्थापणें, उभारणें इ०स योग्य, अवश्य, शक्य. स्थापविणें-सक्रि. स्थापणें याचें प्रयोजकरूप. स्थापित-वि स्थापन इ० केलेला. स्थापत्य शास्त्र-न. इमारती, पूल, सडका वगैरे बांधण्याचें शास्त्र; गृहशिल्पशास्त्र.

स्थाय—पु. (राग) रागाचा अंश; स्वरयुक्त थोडा स्वरसमूह. [सं. स्था=थांबणें] स्थायिक, स्थायी-वि. १ राहणारा, मुक्काम किंवा वस्ती करणारा, उपरी नसलेला; टिकाऊ; कायमचा; स्थिर. २ रागाचें स्वरूप व्यक्त करणारा चीजेचा पहिला भाग. स्थायीभाव-पु. १ (साहित्यशास्त्र) विभाव, अनुभाव व व्यभिचारीभाव यांच्या योगानें व्यक्ततेप्रत आल्यामुळें ज्या मनोविकारास रस ही संज्ञा प्राप्त होते तो मनोविकार. हे रति, हास, शोक, उत्साह, क्रोध, भय, निर्वेद, विस्मय इ० आठ आहेत. २ कायमची स्थिति स्थायीवर्ण-पु. (राग) थांबून थांबून वारंवार म्हटला जाणार तोच तोच स्वर.

स्थाली—स्त्री. थाळी; थाळा; ताट; अन्न शिजविण्याचें भांडें. [सं.] ०पाक-पु. गृहस्थाश्रमीं त्रैवर्णिकानें गृह्याग्नीवर करावयाचा याग. होमाकरितां भात शिजविणें. ०पुलाकन्याय-पु. शितावरून भाताची परीक्षा करणें.

**स्थावर**—न. १ न हालवितां येणारी मालमत्ता; घर वगैरे स्थिर संपत्ति. [ सं. ] —वि. अचल; न हालणारें; स्थिर; खिळलेलें; निश्चल; हालविण्यास अशक्य. **०इस्टेट-जिंदगी**—स्त्री. शेतीवाडी, घरवाडा, बागबगीचा इ० मालमत्ता. **०जंगम**—वि. हालणारें व न हालणारें; स्थिरचर. **०प्रतिष्ठा**—स्त्री. स्थिरप्रतिष्ठा पहा. **०विष**—न. खनिज किंवा वनस्पतींचें विष. याचे उलट प्राणिज विष. **स्थावरणें**—अक्रि. १ स्थिर, कायम राहणें; आधार, पाया, आश्रय मिळविणें. २ गेलेली पत, शक्ति परत मिळविणें.

**स्थित**—वि. असलेलें; थांबलेलें; उभें असलेलें; राहिलेलें. [ सं. स्था=राहणें ] **०प्रज्ञ**—वि. सिद्ध; ज्याची बुद्धि स्थिर झाली आहे असा.

**स्थिति**—स्त्री. १ राहणें; उभें राहणें; थांबणें; अवस्था; दशा; रीति; तऱ्हा; परिस्थिति; वास. २ विश्वाच्या तीन अवस्था—उत्पत्ति, स्थिति आणि लय, किंवा संहार ( यांच्या देवता आहेत त्या—ब्रह्मा, विष्णु, शंकर ) यांपैकीं मधली अवस्था. ३ स्थिरपणा; कायमी; स्थिरता; सातत्य. ४ ( ज्योतिष ) ग्रहणांचा स्पर्शापासुन मोक्षापर्यंतचा काल. ५ रक्षण.–हंको. [ सं. स्था=राहणें ] **०ओळखणें**—जागा, अवस्था ओळखणें. **०वर येणें-असणें**—योग्य स्थळीं जागीं, अवस्थेप्रत येणें, असणें. **स्थितिशास्त्र**—न. पदार्थांच्या स्थिर अथवा चर अवस्था आणि पदार्थांना गतिमान किंवा गत्युन्मुख करणाऱ्या शक्ती यांचें विवेचन करणारें शास्त्र. ( इं. ) स्टॅटिक्स. **०रीती**—स्त्री. चालचलणूक; वागणूक; आचरण; नीतिमर्यादा. **०स्थापक**—वि लवचीक, ताणल्यानें लांब होऊन ढिला सोडल्यावर पुन्हां पूर्वस्थितीवर येणारें. **०स्थापकत्व-ता**—न.स्त्री. लवचीकपणा.

**स्थिमित, स्थिमिताई**—स्तिमित, स्तिमिताई पहा.

**स्थिर**—वि. १ कायम; निश्चित; स्तब्ध; शांत; न हालणारें; मजबूत; बळकट; निश्चयी. २ एके ठिकाणीं कायम राहणारा. ३ विश्वासु; अस्थिर वृत्ति नसलेला; नेहमीचा. ४ शांत; थंड; समाधानी वृत्तीचा. ५ अचंचल; फरक न पडणारा ( दिवस, नक्षत्र ); ज्यांच्या ठायीं कार्य आरंभिलें असतां लवकर होत नाहीं व झालें असतां लवकर नाश पावत नाहीं अशीं ( रोहिण्यादि नक्षत्रें. वृषभादि राशी, रविवार इ० याचे उलट चर पहा.) ६ स्थावर पहा. **०प्रतिष्ठा**—स्त्री. १ ( एखाद्या देवळांत देवतेची ) कायमची स्थापना. २ ( ल. ) कोणतेहि ठिकाणचा कायमचा निवास. **०बुद्धि**—स्त्री. मन, स्वभाव यांचा कायमपणा, समतोलपणा; दृढबुद्धि; याचे उलट चंचलबुद्धि. २ ( ल. ) मंदबुद्धि; जडबुद्धि. —वि. अशा बुद्धीनें युक्त. **०वेळ-वेळा**—स्त्री. एखाद्या कामास आरंभ केला असतां मंदगतीनें चालून कायम टिकून राहतें अशी वेळ. रात्रीच्या किंवा दिवसाच्या ३० घटिकांच्या आठ विभागां पैकीं आठवा विभाग. वेळ अर्थ ७ पहा. **०स्थावर**—न. शांतता; स्तब्धता. —वि. शांत; सामसुम; स्वस्थ; स्तब्ध, गडबड जाऊन शांत स्थितीला आलेलें. **०ता**—स्त्री. निश्चलपणा, शाश्वतपणा; स्थैर्य; कायमपणा; मजबुती, निर्धास्तपणा; पक्केपणा; विश्वासुपणा; थंडपणा; शांतपणा ( मनाचा ). **स्थिराव(वि)णें**—उक्रि. १ स्तब्ध शांत, निश्चित होणें. २ थांबणें; खंड पडणें. ३ विसावा घेणें; थांबणें; राहणें; टिकणें. ४ स्थिर करणें; शांत करणें; मजबूत करणें. ५ बंद पाडणें; प्रतिकार करणें. **स्थैर्य**—न. स्थिरता पहा.

**स्थीत**—स्त्री. स्थिति पहा. [ सं. स्थिति ] **०रीत**—स्त्री. स्थितिरीति पहा.

**स्थूल-ळ**—वि. १ मोठा; जाडा; थोर. २ ओबडधोबड; अगडबंब; मोठा व खडबडीत, लठ्ठ, ठोकळ. ३ दाट; गर्द. ४ जड; मंद; मूर्ख. ५ जड; दृश्य; साकार; याचे उलट सूक्ष्म. [ सं. स्था=राहणें ] **०देह-शरीर**—पु.न. वस्तुमात्राचें पंचभूतात्मक शरीर; जड देह. लिंगदेहाच्या उलट; धिप्पाड शरीर. याचा उपयोग विशेषणाप्रमाणें करतात. **०दृष्टि**—स्त्री. मनुष्यदृष्टि; अज्ञानदृष्टि; मायिकदृष्टि. 'ते सहसा मुद्रा सोडिली । स्थूलदृष्टीची जवनिका फेडिली ।'—ज्ञा ११.१२१. २ देहच आत्मा असें मानणें; जड दृष्टि. **०बुद्धि**—वि. जडबुद्धि; ढोबळ समजूत असलेला. **०भोग**—पु. जागृतीमधील प्रत्यक्ष भोग **०मान**—न. ढोबळ माप, अंदाजी मोजमाप; तर्क. २ दीर्घ कालमर्यादेनें मोजणें, गणना करणें; सूक्ष्ममानाचे उलट. ३ आकारमान पहा; ठोकळमान. **०वाद**—पु. आत्मा हेंच शरीर असा वाद. **०वादी**—वि. असा वाद करणारा. **०सूक्ष्म**—न. १ विश्व; सृष्टि; जगत् 'तें कर्ता कर्म कर्मफळ । ये त्रिपुटी येकी केवळ । वांचूनि कांहींचि नसे स्थूळ-। सूक्ष्मीं इये ।'—ज्ञा १८.८११. २ पंचभूतात्मक जड व वासनात्मक लिंगशरीर. —वि. थोर व लहान; जड व अजड.

**स्नान**—न. १ अंगधुणें; आंघोळ; न्हाणें. २ अभ्यंग स्नान करणें. [ सं. स्ना=अंगधुणें ] म्ह० स्नान करून पुण्य घडे तर पाण्यांत बेडूक थोडे ? **०पान**—न स्नान आणि खाणेंपिणें इ० **०विधि**—पु. सशास्त्र स्नान करणें; समंत्रक संकल्पयुक्त स्नान. **०संध्या**—स्त्री. स्नान व संध्या, देवपूजा, तर्पण इ० २ ( ल. ) लांचलुचपत. 'त्या कामांत कांहीं तरी स्नानसंध्या दिसते.' **०संध्याशील**—वि. कर्मनिष्ठ; सदाचरणी. **स्नात, स्नातक**—पु. सोडमुंज झालेला, ब्रह्मचर्याश्रमांत विद्या संपादन करून गृहस्थाश्रम घेण्यास तयार झालेला पुरुष; या काळांतच वेदांचें ज्ञान मिळविणाऱ्यास 'विद्यास्नातक,' न मिळविणाऱ्यास 'व्रतस्नातक' व ज्ञान मिळवून लग्न न करणाऱ्यास 'अभार्यस्नातक' म्हणतात. —वि. स्नान केलेला. **स्नाता**—वि. स्नान करणारा.

**स्नायु**—पु. प्राण्यास गति, चलनवलन यांची शक्ति देणारा व वाटेल तेव्हां संकुचित किंवा ढिला करतां येण्यासारखा

शरीरांतील तंतुयुक्त भाग. [ सं. ] ०गत- वि. स्नायूमध्यें असलेला ( वात ).

**स्निग्ध**—वि. १ तेलकट; चरबीयुक्त; तुपट; ओशट. २ चिकटणारा; तुळतुळीत. ३ मृदुत्व, मऊपणा आणणारें ( औषध ). ४ सौम्य; प्रेमयुक्त; स्नेहाळ. [ सं. ]

**स्नुषा**—स्त्री. सून. [ सं. स्नु=गळणें, पाझरणें ]

**स्नेह**—पु. १ तेल, चरबी इ० ओशट पदार्थ. २ एकत्र, एकजीव होण्याचा धर्म; स्निग्धता. ३ मैत्री; प्रेम. [ सं. स्निह्=चिकटणें ] **स्नेहांत, स्नेहावर पाणी घालणें**-मैत्री, मित्रभाव; मोडणें, तोडणें. ०**जोड**-स्त्री. मैत्रीलाभ. ०**बुद्धि**-स्त्री १ तीव्र स्मरणशक्ति. २ मित्रत्व; प्रेम. –वि १ असल्या स्मरणशक्तीचा. २ मायाळू; दयाळू; प्रेमळ. ०**भाव-वाद**-पु मित्रत्व; प्रेमळपणा; दाट स्नेह. **स्नेहन**-न. १ मर्दन; चोळणें. २ ( वैद्यक ) तेलकट पदार्थ चोळणें. **स्नेहाकर्षण**-न. एकाच प्रकारचे दोन परमाणु एकत्र ठेवणारी शक्ति. **स्नेहांकित**-वि. ( पत्रलेखन ) स्नेही; मित्रत्व असलेला. अंकित पहा. **स्नेहाळ-ळू**-वि. १ तेलकट, चरबीयुक्त पदार्थ जास्त असलेला. २ ममतार्द्र; प्रेमळ. **स्नेही**-पु. मित्र; सखा. –वि. १ मित्रत्वाचा; मैत्री असलेला; प्रेम असलेला. २ तेलकट; चरबीयुक्त.

**स्पंज**—पु. किड्यापासून समुद्रांत उत्पन्न झालेला व छिद्रें असलेला एक मऊ, स्थितिस्थापक पदार्थ. [ इं. ]

**स्पर्धणें**—अक्रि. चढाओढ, वरचढपणा, मत्सर इ० करणें; ईर्षेनें बरोबरी करणें. [ सं. स्पर्ध् ] **स्पर्धा**-स्त्री. मत्सर; ईर्षा; वरचढ होण्याची इच्छा; चढाओढ. **स्पर्धी**-वि. मत्सरी; चढाओढ लावणारा; स्पर्धा करणारा.

**स्पर्श**—पु १ शिवाशीव; संसर्ग; भिडणें. २ संपर्क; संसर्गाची जाणीव. ३ वस्तूंतील संसर्गाचा गुण; संयोग. ४ 'क, ख' इ० पासून 'भ, म' पर्यंत पहिल्या पांच वर्गांतील कोणतेंहि व्यंजन. ५ परीस; स्पर्शमणी. ६ लवलेश; भाग; अंश. 'त्याचे हृदयांत दयेचा स्पर्श नाहीं.' ७ हवा; वारा. [ सं. स्पृश ] ०**मणि**-पु. परीस. ०**रेषा**-स्त्री. जी सरळ रेषा वर्तुळाच्या परिघास एका बिंदूंत मात्र स्पर्श करते ती. ०**स्नान**-न. ग्रहण लागण्याच्या वेळची आंघोळ. **स्पर्शणें**-उक्रि. शिवणें; धक्का लावणें किंवा लागणें. **स्पर्शास्पर्श**-पु. सोंवळेओंवळे किंवा सामाजिक उच्च नीच यांची परस्पर शिवाशीव. **स्पृश्य**-वि. स्पर्श करण्यास योग्य. **स्पृष्ट**-वि. स्पर्श झालेलें.

**स्पष्ट**—वि. १ स्वच्छ; साफ; उघड; असंदिग्ध. २ तंतोतंत; बिनचूक ( भविष्य, जमाखर्च इ० ). [ सं. स्पश्=व्यक्त करणें ] ०**क्रांति**-स्त्री. आकाशांतील गोलांचें कोनात्मक अंतर. ०**ग्रह करणें** ) राशिचक्रांतील ग्रहाचें राशिचक्रारंभापासून अंतर (काढणें). ०**परिधि**-पु. पृथ्वीची अक्षांशरेखा. ०**वक्ता**-वि. १ उघडपणें भीडमुर्वत न ठेवतां बोलणारा. २ मनांत कांहीं लपवून न ठेवतां उघडपणें बोलणारा. **स्पष्टीकरण**-न. विवरण; साफ, उघड, स्वच्छ करणें; विशदीकरण; उघड करणें; उदाहरणें देऊन मनावर बिंबविणें; प्रसिद्ध करणें. करण पहा. २ **स्पष्टीकृति**-स्त्री. ग्रहाचे खरे रेखांश शोधून काढण्याची रीत.

**स्पिरिट**—न. एक प्रकारची दारू. [ इं. ]

**स्प्रिंग**—स्त्री. स्थितिस्थापकत्वाचा गुण अंगीं असलेली पोलादी कमान किंवा सर्पिलतार वगैरे. [ इं. ]

**स्पृहा**—स्त्री. इच्छा; वांच्छा; आकांक्षा. [ सं. स्पृह्=लोभ धरणें ] **स्पृहणीय**-वि इच्छा करण्यास योग्य; इच्छिण्यास योग्य; इच्छिण्याजोगें; प्रशंसनीय. [ सं. ]

**स्फटिक**—पु पैलूदार खडा; कांतियुक्त पारदर्शक दगडाची एक जात. [ सं. ]

**स्फटी**—स्त्री. तुरटी. [ सं. ]

**स्फारणें**—सक्रि. स्फुरणें. 'तो शब्द स्फारला।' –गीता १.१२८९.

**स्फीत-ति**—स्त्री. १ स्तुति; प्रशंसा; मान; शिफारस. २ मोठेपणा; मान्यता; प्रतिष्ठा; थोरपणा; वैभव; उत्कृष्टपणा; ( क्रि० सांगणें ). 'दंभस्फीति भलत्या भावें।' –तुगा ११७९. [ सं. ]

**स्फुंज**—पु. फुंज; गर्व. [ सं. ]

**स्फुंजणें**—अक्रि. स्फुंदणें, मुसमुसणें. [ ध्व. ]

**स्फुट**—वि. १ उघड; विस्तृत. २ फुटलेलें; विकसित. ३ (ल.) धड केलेलें; स्पष्ट विवरण केलेलें; स्पष्ट; स्वच्छ. ४ मोकळा; किरकोळ; सुटा; फुटकळ; अलग. ( कविता, गोष्ट, कथा, वाक्य ). ५ ( ज्यो. ) स्पष्ट; [ सं. स्फुट्=फुलणें ] ०**फल**-न. ( भूमिति ) नक्की क्षेत्रफळ.

**स्फुटि**—स्त्री. स्फोट; चमक; तेज; कडकडाट; गडगडाट. 'माजीं कल्पांतविजूंचिया स्फुटी।' –ज्ञा ११.२०४. [ सं. ]

**स्फुंद, स्फुंदन**—पु.न. स्फुंदणें; हुंदका. [ सं. ] **स्फुंदणें**-अक्रि. हुंदके देऊन रडणें; मुसमुसणें.

**स्फुरण**—न. १ फुरफुर; भरभर; कंप ( डोळा, कातडी, अवयव यांचा ); लखलखाट. ( वीज, तरवार, इ०चा ); चमक, लुकलुक ( तारा, रत्न इ० ची ); आवेश, राग इ० चा झटका; संचार; स्फूर्ति ( युद्ध, वाद यांतील ); थरथराट; कंप ( राग, भीति इ० मुळें ). २ एखादी गोष्ट एकदम आठवणें; स्मरण होणें; मनांत उद्भूत होणें. ३ धडधड; धक्का. [ सं. स्फुर्=फुरफुरणें ] **स्फुरणें**-क्रि. स्फुरण पहा; कंप पावणें, मनांत एकाएकीं येणें; सुचणें. **स्फूर्त-र्ति**–१ स्त्री. स्फुरण पहा. एकाएकीं प्रादुर्भाव; स्फुरणें. २ थरकांप. ३ मनांत उत्कटतेनें प्रगट होणारी शक्ति; प्रतिभा.

**स्फुलिं(ल्लि)ग**—पु. विस्तवाची ठिणगी. २ (गणित) एक आण्याचा १/१६ वा किंवा शिवराईचा १/१६ वा भाग (लानिक आहे.)

**स्फोट**—पु. १ व्रण: फोड; चट्टा. २ फुटणें, तुटणें किंवा तसली अवस्था. ३ फूलइ० उमलणें. ४ एखाद्या गोष्टीची वाच्यता. ५ दारू वगैरेचा भयंकर आवाजासह भडका. [सं. स्फुट्=फुटणें] **स्फोटक**-पु. फोड. 'स्फोटक एक उद्भवला।' –गुच ५.२८. –वि एकदम फुटणारें; भडका होऊन फुटून उडणारें (दारूसारखें द्रव्य). **स्फोटन**-न. फुटणें; मोडणें; फाटणें.

**स्मर**—पु. १ मदन; काम. 'स्मरादि रिपुमन्मनीं अहि न काळ भेका कसे।'–केका २१ २ स्मरण. [सं.] ०**गृह**-न. स्त्रियांची योनि. **स्मरारि-र**-पु. शंकर.

**स्मरण**-न. १ आठवण; चिंतन. २ स्मृति; मनांत उद्भवणें. ३ पुन्हां उपस्थित होणें. ४ स्मृति; स्मरणशक्ति. ५ स्मरणें पहा. ६ स्मारकाची वस्तु (अलंकार इ०). ०**टिपण**-न. आठवणी साठीं केलेलें टांचण; टांचणवही. ०**वही**-स्त्री. स्मरणार्थ टांचणें केलेलं पुस्तक. **स्मरणी**-स्त्री. सामान्यतः तेरा मण्यांची जपाची माळ. (क्रि० घेणें=ध्यास, चिंतन करणें). **स्मरणीय**-वि. आठवणींत ठेवण्यास योग्य. **स्मृत**-वि. आठवण झालेलें. **स्मारक**-वि. आठवण करून देणारें (कृत्य, वस्तु). –न. स्मृति कायम रहावी म्हणून केलेलें कार्य (मंदिर, चित्र, वस्तु, ग्रंथ वगैरे)

**स्मरणें**—उक्रि. १ आठवणें; आठवण होणें, करणें; मनांत आणणें, येणें; मनांत उपस्थित होणें, करणें. २ उपास्य देवतेचें वगैरे चिंतन करणें; ध्यान करणें. ३ वारंवार आठवण करणें; न विसरणें. [सं. स्मृ=स्मरणें]

**स्मशान, स्मशान वैराग्य, स्मश्रू**—'श्मशान' इ० पहा.

**स्मित**—न. १ गालांतल्या गालांत हसणें. २ फूल उमलणें. याचा विशेषणासारखाहि अर्थ होतो. [सं. स्मि=गालांत हसणें]

**स्मृति(त)**—स्त्री. १ आठवण. २ 'स्मरण' पहा. ३ हिंदुधर्मशास्त्रासंबंधीं मनु आदिकरून ऋषींनीं घालून दिलेले नियम मागून आठवून लिहिलेले ग्रंथ प्रत्येकीं व त्यांतील वचन; कायदे ग्रंथ [सं. स्मृ=स्मरणें] ०**चिन्ह**-न. आयुष्यांत घडलेल्या गोष्टींची अवशेषरूप खूण; शरीरादिकांवर टिकून राहिलेली एखादी खूण. ०**विरोध**-पु धर्मशास्त्रास येणारा बाध; धर्मशास्त्रविरुद्ध गोष्ट. बेकायदेशीरपणा. ०**शास्त्र**-न स्मृति अर्थ ३ पहा. **स्मार्त**-वि. १ स्मृतींना अनुसरणारें (धर्म इ०). २ स्मृतीनें मान्य केलेलें ३ आठवणविषयक; स्मरण करण्याचें. **स्मार्तकाल**-पु. स्मृतीनें ठरविलेली, कायद्यानें ठरविलेली (१०० वर्षांची) मुदत. **स्मार्तकालातीत**-वि. कायद्याच्या मुदतीच्या बाहेर गेलेलें.

**स्यंदन**—न. ठिबकणें; पाझरणें. –पु. रथ. 'रमेश रथि सारथी चतुर वागवी स्यंदना।' -भीष्मप्रतिज्ञा. [सं. स्यंद्=जाणें]

**स्यमंतक**—पु सत्राजितानें सूर्यापासुन मिळविलेलें एक बहुमोल रत्न. यापासुन सोनें मिळत असे. [सं.]

**स्रग्धरा**—स्त्री. एक वृत्त. याच्या एकेका चरणांत २१ अक्षरें व म, र, भ, न, य, य, य हे गण असतात. [सं.]

**स्रजणें**—उक्रि. (काव्य) उत्पन्न करणें; बनविणें; निर्माण करणें. 'तरी जग हें स्रजिलें अवघें'–व्यं. [सं. सृज्=निर्मिणें]

**स्रव, स्राव**—पु. १ ठिबकणी; गळती; पाझर; प्रवाह; झरा. २ पाझरलेला पदार्थ. ३ गर्भपात (पांच महिन्यांच्या आंतील). [सं. स्रु=जाणें] **स्रवण**-न. १ स्रव पहा. २ घाम, लघवी, पू वाहणें. **स्रवणें**-अक्रि. गळणें; ठिबकणें; पाझरणें (द्रव पदार्थ); वाहूं देणें, पाझरूं देणें. **स्रोत**-पु. प्रवाह.

**स्रष्टा**—पु ब्रह्मदेव; जगनिर्माता. –वि. उत्पन्न करणारा; निर्माण करणारा. [सं.]

**स्रुक्**—न. एक पळीसारखें यज्ञीय पात्र. [सं]

**स्लीपर**—पु.१एक जाती वा जोडा.२रुळाखालील लांकूड.[इं.]

**स्लेट**—स्त्री. लिहिण्याची दगडी पाटी. [इं.]

**स्व**—सना. आपलें आत्मविशिष्ट. –नपु. स्वतः; स्वात्मा; आपण. –न स्वतःची मालकी; मिळकत. –स्त्री. (बीजगणीत) अधिक रक्कम. –वि. आपलें; स्वतःचें. [सं] **स्वकपोल कल्पित**-वि. (चुकीचा प्रयोग) मूलभूत प्रमाण नसतां स्वतःच्या कल्पनेनें रचलेलें; डोक्यांतून काढलेलें. ०**कर्म**-न स्वजातीचें नियुक्त काम, उद्योग, कर्तव्य; स्वतःचें काम. ०**कष्टसंपादित-कष्टार्जित**-वि. स्वतःच्या श्रमानें मिळविलेलें. ०**कार्य**-न स्वकर्म पहा. ०**कीय**-वि. स्वतःचें; स्वतःच्या मालकीचें; कुटुंबांतील; घराण्याचें. ०**गत**-वि. स्वतःचें, स्वतःशीं (बोलणें इ०). याचे प्रकार:–(अ) रंगभूमीवर एकटयाच पात्रानें केलेलें भाषण. (आ) रंगभूमीवर दुसऱ्या पात्राशीं संवाद चालू असतां त्यास ऐकू न जातां प्रेक्षकांना ऐकूं जाईल असें केलेलें भाषण. (इ) रंगभूमीवर अनेकांशीं संवाद चालू असतां मध्येंच कांहीं मजकूर फक्त एकाच व्यक्तीस ऐकूं जाईल असा बोलणें इ० –वा. म. जोशीकृत. सोयरीक पुस्तकाची प्रस्तावना पृ. ७. ०**गोत्री**-वि. स्वतःच्या गोत्रांतील, कुळांतील; आप्तसंबंधीं. ०**च्छंद**-पु. स्वतःची इच्छा, हट्ट, हुक्की, लहर. या शब्दापूर्वीं 'आपला' हा शब्द वापरण्याची एक रीत आहे. 'हा आतां आपल्याच स्वच्छंदानें वागूं लागला.' –वि. स्वच्छंदी; हट्टी; लहरी; नादिष्ट; स्वेच्छाचारी; स्वतंत्र. ०**जन-नी**-पु.स्त्री. स्वतःच्या घराण्यांतील, जातींतील इसम; आप्त; सखा. ०**जाति**-स्त्री. स्वतःची जात, कुळी. ०**ज्योति**-वि स्वयंप्रकाशित. ०**तंत्र**-वि. १ निरावलंबी; अनियंत्रित; मोकळें; स्वैर; स्वतःच्या

इच्छेप्रमाणें चालणारा ( यावरून पूर्ण वाढीचा ). २ ( निंदार्थी ) हट्टी; लहरी; स्वेच्छाचारी; मोकाट; नाटाळ. ३ वेगळा; निराळा; बाजूचा. ०तंत्रता, स्वातंत्र्य-स्त्रीन. स्वाधीनता; मुखत्यारी; स्वच्छंदीपणा; निरावलंबिता; स्वैरवृत्ति; अडदांडपणा; अवखळपणा. स्वतः-क्रिवि. आपण होऊन; आपणामुळें-पासुन-कडून; स्वभावतः; आपोआप; जातीनें; व्यक्तिशः. स्वतः प्रमाण-वि प्रमाणासाठीं स्वतःखेरीज इतरांची गरज नसलेला; स्वयसिद्ध ( वेद इ० ). स्वतः सिद्ध-वि. १ स्वतः होऊन साध्य झालेलें, तयार झालेलें, उत्पन्न झालेलें; स्वयंभू ( ब्रह्म इ० ). २ स्वयंप्रमाण; स्वयंसिद्ध. स्वतां-तें-क्रिवि. स्वतः पहा. स्वतां-पु. नवरा ( बायकी शब्द ). स्वत्व-न. मालकी; धनीपणा; मालकी हक्क; आपलेपणाचा धर्म. स्वत्व निवृत्ति, स्वत्वाभाव-स्त्रीपु. आपली मालकी दुसऱ्यास प्राप्त करून देणें; आपला हक्क सोडणें. स्वत्वबोधन-न. मालकी हक्क प्रस्थापित करणें. स्वत्वहानि-स्त्री. हक्क, पदवी धन, यांचा नाश. स्वोत्पत्ति-स्त्री. मालकी हक्काचें मूळ. स्वदस्तूर-न. १ स्वतःची सही; स्वाक्षरी. २ ( कागद, खत इ० ) स्वतःच्या हातानें लिहिणें; स्वतः लिहिलेला मजकूर स्वदेश-पु. स्वतः राहतो तो देश; मायभूमि; मूळ गांव, जागा स्वदेशपरिधि-पु. पृथ्वीगोलावरील स्थानिक अक्षांशाचें वर्तुळ स्वदेशी-वि. स्वदेशांत उत्पन्न झालेली. ( वस्तु ). स्वदेशी चळवळ-वि. स्वदेशी माल वापरण्यासंबंधीं लोकांस उपदेश करण्याची क्रिया, प्रचार. स्वधर्म पु १ स्वतःचा वर्णाश्रमधर्म कर्तव्य, धंदा. २ पदार्थाचा गुण; नैसर्गिक प्रवृत्ति-स्वभाव इ० स्वपरभाव-भेद-पु. आपपर भाव, हें आपलें व हें दुसऱ्याचें हा भेद करण्याची प्रवृत्ति. ०प्रकाश-पु. ब्रह्म -वि. स्वतःच प्रकाशमान होणारा; स्वयंस्फूर्तीनें शिकलेला; स्वप्रभ. स्वभाग-पु. १ आपला वांटा. २ आपलें नशीब. ०योनि-वि. आईच्या बाजूनें संबंध असलेला. स्वरस-पु. १ अंगरस; पाणी मिसळल्याखेरीज काढलेला फळांतील रस; नारळांतील पाणी किंवा त्याचें दूध. २ (ल.) भाषण, काव्य इ० ची गोडी, माधुर्य. ०राज्य-न. १ स्वतःचें राज्य; स्वतंत्र राज्य. २ स्वराज्यांतील चौथाईचा कर; गोदावरीपासुन कृष्णेपर्यंतचा प्रदेश. ३ हिंदुपदपातशाही. ४ लोकांच्या हितासाठीं, लोकनियुक्त अधिकाऱ्यांनीं लोकमतास अनुसरून चालविलेली राज्यपद्धति. ५ ( वेदांत ) ब्रह्मैक्य. 'ऐसेनि ब्रह्मैक्या सारिखें । स्वराज्य येतां जवळिकें ।' -ज्ञा १८.१०७२. ०रुचि-वि. स्वतःच्या आवडीनिवडीप्रमाणें वागणारा; कलाप्रमाणें चालणारा. ०वश-वि. स्वतंत्र; मोकळे; स्वैर. ०वृत्ति स्त्री १ आपला उद्योग, धंदा. २ आपली उपजीविका. ०संतोषें-षानें-क्रिवि. राजीखुशीनें; बळजबरीनें नव्हे असें ( लिहिणें, करणें इ० ) ०सत्ता-स्त्री. आपला हक्क. ०सत्ताक-त्मक-वि आपला हक्क असलेलें. ०संपादित-वि. आपण मिळविलेलें स्वसंपादित मिळकत-स्त्री. जी मालमत्ता वडिलार्जित नसुन, वडिलार्जित मालमत्तेची विशेष किंवा मुळींच मदत न घेतां मिळविली ती. ०संवेद्य-वि. आपण होऊन जाणलें जाणारें; ज्ञानरूप. ०साक्ष-क्रिवि. समक्ष; डोळ्यासमोर; एकाद्याच्या साक्षीनें. ०स्त्री-स्त्री. आपली पत्नी, भार्या. ०स्थान-न. आपली जागा, राज्य. ०हस्त-पु. स्वतःची सही. ०हित-न. आपला लाभ, फायदा, नफा.

स्वच्छ—वि. १ शुद्ध; पवित्र; उत्तम; चांगलें; निर्मळ. २ स्पष्ट; साफ साफ ( बोलणें इ० ). [ सं ] स्वच्छता-स्त्री. पवित्रपणा, शुद्धता; निर्मळपणा.

स्वधा—उद्गा. पितरांना उपचार अर्पण करतांना अथवा अन्नदान, पिंडदान करतांना म्हणावयाचा मंत्र. [ सं. ]

स्वन-स्वनि—पु. आवाज. स्वनित-क-न. १ आवाज. २ एक १४ ओळींची कविता ( इं. ) सॉनेट. स्वनित-वि. वाजणारें; आवाज करणारें; वाजविलेलें.

स्वप्न—नपु. मनुष्यास निद्रावस्थेंत असतां जागृतींतल्याप्रमाणें सृष्टींतील गोष्टींचा होणारा भास; मनाच्या जाणीवची एक स्थिति. [ सं. स्वप्=झोप घेणें ] म्ह० मनीं वसे तें स्वप्नीं दिसे. ०न जाणें-अस्तित्व नसणें; स्वप्नांतहि न दिसणें; न आढळणें. ०पाहून जागा होणें-अनुभवावरून शहाणा होणें. स्वप्नाचें भाकीत सांगणें-स्वप्नाचा अर्थ लावणें. स्वप्नीं नसणें-अत्यंताभाव; मुळींच नसणें. स्वप्नीं नेणणें-मुळींच माहीत नसणें. स्वप्नी पुऱ्या-मांडे-खाणें-मनोराज्य करणें. सामाशब्द-०दोष-पु. स्वप्नावस्था अर्थ २ पहा. ०प्रपंच-पु. स्वप्नांतील देखावा, जग ०वत्-वि. मिथ्या; न टिकणारें; भ्रामक; पोकळ. ०विचार-पु स्वप्नाचा अर्थ सांगणें. ०सृष्टि-स्त्री. स्वप्नप्रपंच; न टिकणारी गोष्ट; मिथ्या जग. स्वप्नाकार-वि. भ्रामक; मिथ्या; क्षणिक; बदलणारें. स्वप्नावस्था-स्त्री. १ चार अवस्थांपैकीं दुसरी; स्वप्न पडणें. २ झोपेंत वीर्यपात होणें. ३ मायिक जगत् किंवा जीवित.

स्वभाव—पु. प्रकृति; प्रकृतिगुण; सहजधर्म, स्वाभाविक अवस्था, उपजत गुण, नैसर्गिक धर्म. [ सं. ] म्ह० स्वभावो दुरतिक्रमः=स्वभावास औषध नाहीं. स्वभावें-स्वभावानें-क्रिवि. १ स्वतः; खुद्द. २ आपोआप, साहाजिकपणें. ०गति-गत्या, स्वभावतः-क्रिवि. नैसर्गिक गुणामुळें, मार्गानें; सहजपणें; मोकळेपणें; साहजिकरीत्या. ०चित्र-न. एखाद्या व्यक्तीची मनांत भरण्याजोगी अशी थोडक्यांत वर्णन केलेली माहिती, स्वभाववर्णन. ०वाद-पु. ( वेदांत ) आधिभौतिक किंवा जडवाद; प्रकृतिवाद; ईश्वरसत्तावादाचे विरुद्ध. ०सिद्ध-वि. प्रकृतिसिद्ध; नैसर्गिक

(गुण) **स्वाभावि(वी)क**-वि. नैसर्गिक; साहजिक; जन्मजात. -क्रिवि. आपोआप; साहजिकपणें; बाह्य कारणाशिवाय. **स्वभावोक्ति**-पु. (अलंकार) जात्यादिकाचे ठायीं राहणारा स्वभाव वर्णिला असतां हा अलंकार होतो.

**स्वयं, स्वयम्, स्वयमेव**—क्रिवि. स्वतः होऊन; जातीनें स्वतःच्या प्रेरणेनें; अंतःस्फूर्तीनें; खुद्द. [सं. स्वयम्] ०**ज्योति**-वि. स्वज्योति पहा. ०**दत्त**-पु. आईबाप जिवत असतां वयांत आल्यावर आपण होऊन दत्तक पुत्र मानलेला मुलगा; (विशेषणा प्रमाणेंहि उपयोग होतो). ०**निर्णय**-पु आपल्यावर कोणी कसें राज्य करावें, राज्यपद्धति कशा प्रकारची असावी इ० गोष्टी स्वतः ठरविणें. ०**पाक**-पु. १ स्वतःच्या हातांनीं अन्न शिजविणें. २ अन्न शिजविणें, (सामान्यतः). ३ शिजविलेलें अन्न. ०**पाकी**-पु. सैंपाक करणारा; आचारी. ०**प्रकाश**-वि. १ स्वज्योति पहा. २ स्वतः ज्ञान मिळविलेला; स्वयंज्ञानी. ०**बोध**-पु. आत्मज्ञान; ब्रह्मज्ञान. ०**भ-भू**-पु. ब्रह्मा; ब्रह्मदेव; विष्णु; शिव; काळ; प्रेम; पर्वत. -वि. १ मूळचा; स्वतः उत्पन्न होणारा. २ स्वतः एखाद्या पाषाणांत प्रादुर्भूत झालेला किंवा दृष्टांतानें लोकांस समजलेला (देव, देवता). याच्या उलट स्थापित. ०**वर**-पु.न. कन्येनें स्वतःचा पति पसंत करून वरणें. ०**सेवक**-पु आपल्या इच्छेनें सेवकभावान लोककार्य करणारा. **स्वयें**-क्रिवि. स्वतः होऊन; आपण होऊन स्वतः सिद्धपणें; स्वयंस्फूर्तीनें; खुद्द.

**स्वर्**—न. १ आकाश. २ स्वर्गलोक. ३ इंद्रलोक. [सं.] **स्वर्गंगा-नदी**-स्त्री. आकाशगंगा. **स्वर्धुनी**-स्त्री. भागीरथी नदी. **स्वर्लोक**-पु. स्वर्ग.

**स्वर**—पु. १ (राग) गायनोपयोगी नाद, श्रुति; या सात आहेत व यांचे शुद्ध, विकृत, अचल, उद्धृत, तीव्र, कोमल असे भेद आहेत. २ वेदमंत्रांतील अक्षरांचें उदात्तानुदात्तत्व दाखविणाऱ्या त्या त्या अक्षरांवर दिलेल्या खुणा. ३ (व्याकरण) दुसऱ्या वर्णाच्या साह्यावांचून स्वतंत्रपणें उच्चारला जाणारा वर्ण. ४ साधारणतः आवाज, ध्वनि ५ नाकपुड्यावाटें वाहणारा वायु ५ शब्द उच्चरतांना त्याच्या विशिष्ट अवयवावर पडणार जोर. [सं. स्वृ=ध्वनि करणें] ०**देणें**-गाण्याची सांथ करणें. ०**भजणें, वाहणें**-कल दर्शविणें, झुकणें (मन, इच्छा इ० चा); कार्याचे आरंभी कोणत्या नाकपुडींतून स्वर वाहतो तो कार्यास अनुकूल प्रतिकूल आहे हें पाहणें; यावरून अनुकूल मत होणें. ०**करण**-न. सा री ग म प ध नी या अक्षरांचे उलटापालटीनें बनविलेलें. गाणें. ०**बद्ध**-वि. गाण्यांतील नियमानुसार रचलेलें (गीत, पद्य) ०**भंग**-पु. १ विकारामुळें आवाज बिघडणें. २ गाण्यांतील बेसुर ०**मंडल-ली**-नस्त्री. एक प्रकारचें तंतुवाद्य. ०**मेळ**-पु दोन किंवा अधिक स्वरांचा योग्य मिलाफ. ०**शास्त्र**-न. नाकांतून वाहणाऱ्या श्वासाचें लक्षण, गती-वरून प्रश्न पाहण्याचें शास्त्र. ०**सप्तक**-न. (राग) शुद्ध सात स्वरांचा समुदाय. ०**ज्ञान**-न. गाण्यांतील स्वरांचें ज्ञान. **स्वरांतर तान**-स्त्री. चार स्वरांची तान.

**स्वरूप**—न. १ स्वतःचें रूप, आकार, ढब, चेहरा. २ मुद्रा; तोंडवळा; हुबेहुब रूपरेषा. ३ प्रकृति; स्वभाव. ४ लावण्य; सौंदर्य. ५ आत्मस्वरूप. 'आंतु मीनलेनि मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें।'-ज्ञा ८.९३. ६ महत्त्व; वैशिष्ट्य. 'मग मत्स्वरूप काय ब्राह्मण आले दुरूनि जेवाया । त्यांसि तुझी भगिनी हे बा न नमुनि जरि म्हणेल जेवा या।'-मोवन ८.१९. **स्वरूपता**-स्त्री. चार मुक्तींपैकीं एक; ईश्वरासारखें रूप होणें; सरूपता. 'स्वरूपचि व्हावें ते स्वरूपता । तिसरी मुक्ति।'-दा ४.१०२४. **स्वरूप प्राप्ति**-स्त्री. ब्रह्ममय होणें. **स्वरूपवान**-वि. सुंदर, देखणा. **स्वरूपस्थिति**-स्त्री. १ प्रकृत्ति; भावना इ०ची अवस्था. २ ब्रह्मस्वरूप होणें. ३ नैसर्गिक अवस्था. **स्वरूपाकार**-वि. ब्रह्मस्वरूप झालेला. **स्वरूपी**-वि. तत्सदृश; तल्लक्षणवान; तदाकार.

**स्वर्ग**—पु. इंद्राचा लोक, देवाचें वसतिस्थान, पुण्यकर्में करणाऱ्यास मृत्यूनंतर मिळावयाचा लोक. [सं.] **म्ह०** स्वतः मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाहीं=कष्टावांचून फळ नाहीं. **२ स्वर्ग दोन बोट उरणें**=गर्वानें फुगणें. **स्वर्गाची वाट**=मृत्यु. **स्वर्गास हात पोहोंचणें, स्वर्गीं ध्वज लावणें**=इच्छिलेलें अतिशय उच्चपद प्राप्त होणें, कृतकृत्य होणें. सामाशब्द- ०**गति**-स्त्री. मरणें; स्वर्गाची वाट, रस्ता. -वि. स्वर्गी जाणारा. ०**द्वार**-न. स्वर्गाचा रस्ता; मार्ग ०**पुष्प**-न. पारिजातकाचें फूल. ०**वास**-पु. १ स्वर्गांत राहणें. २ मृत्यु. ०**वासी**-वि. १ स्वर्गांत राहणारा. २ नुकताच मेलेला. **स्वर्गारोहण**-न. १ स्वर्गांत जाणें. २ मृत्यु पावणें. **स्वर्गीय, स्वर्ग्य**-वि. १ स्वर्ग लोकांतील. २ स्वर्गासंबंधीं ३ (ल.) अत्यंत उत्कृष्ट.

**स्वर्ण, स्वर्ण-कदली-कार-पुष्प-माक्षिक**—सुवर्ण, सुवर्णकदली इ० पहा.

**स्वल्प**—वि. १ फार थोडें; किंचित. २ क्षुल्लक; सोपें. [सं.] **स्वल्पाहार**-पु फराळ; थोडेसें जेवण.

**स्वसणें**—अक्रि. श्वास टाकणें. [सं. श्वस्]

**स्वसा**—स्त्री. बहीण. [सं.]

**स्वस्त**—वि. शांत; स्वस्थ; सुखी; शारीरिक व मानसिक सौख्य भोगणारा. [सं. स्वस्थ] **स्वस्तावणें**-अक्रि. शांत होणें, समाधानी बनणें.

**स्वस्त-स्ता**—वि सवंग, महाग नसलेला. [हिं.] **स्वस्ता (स्था)ई**-स्त्री. सवंगपणा. **स्वस्तावणें**-अक्रि. सवंग होणें.

**स्वस्ति**—उद्गा. बरें; चांगलें; कल्याण; उत्कर्ष: क्षेम, आशीर्वादाचा एक प्रकार. 'रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति'=दोन्ही

पक्षांस खूष ठेवणें, दोन बगरीवर हात ठेवणें. [सं.] ०वाचन-न. व्रत; शांती इ० मंगलकार्याच्या आरंभीं करण्याचा एक विधि; पुण्याहवाचन. ०क्षेम-अ. स्वस्ति पहा. -न. त्रास, गडबड इ० कांहीं न होतां कुशल किंवा यथास्थित असणें. सुस्थिति; चांगली स्थिति. स्वस्त्ययन-न. लग्नमुंजींतील एक धार्मिक समारंभ, स्वस्तिवाचन; पुण्याहवाचन.

**स्वस्तिक**—न. १ एक शुभदायक चिन्ह. हें जैनांच्या सातव्या तीर्थंकराचें निदर्शक आहे. २ एक विशिष्ट बांधणीचें देऊळ. ३ कोणताहि शुभ, मंगल पदार्थ. [सं.]

**स्वस्थ**—वि. १ सुखी; समाधानी; तृप्त; निरोगी. २ उगा; स्तब्ध; निश्चयी; शांत; (शारीरिक, मानसिक दृष्ट्या). ३ (चुकीनें) सवंग. ४ निश्चयी; करारी. [सं. स्था=राहणें] **स्वस्थता**-स्त्री. सुख; निश्चलता; शांतता; फुरसत. **स्वस्थावणें**-अक्रि. शांत होणें; स्थिरावणें. **स्वस्थाविणें**-क्रि. १ शांत करणें; संतुष्ट करणें. २ (चुकीनें) सवंग करणें. **स्वास्थ्य-स्थ**-न. १ प्रकृति, धंदा इ० त सौख्य; समाधानीपणा. २ उपजीविकेचें सुखाचें साधन; (इनाम, जमीन इ०). ३ आत्मविश्वास. ४ आरोग्य; आराम.

**स्वागत**—न. आतिथ्य; पाहुण्याचा उत्तम आदरसत्कार करणें, तो करण्याची क्रिया. [सं.]

**स्वागी**--स्त्री. सवागी पहा.

**स्वाड**--वि. चांगलें; शुभ, उत्तम (नेहमीं द्वाड शब्दाशीं योजून उपयोग) 'बाहेर निघतांच स्वाडद्वाड शकुन पहावा.'

**स्वाति-ती**--स्त्री. पंधरावें नक्षत्र. [सं.] **०चा पाऊस**-पु. या नक्षत्रावर पडणारा पाऊस. त्यानें समुद्रांत मोती उत्पन्न होतात अशी लोकसमजूत.

**स्वात्म**--वि. आपल्या आत्म्यासंबंधीं. [सं.] **०सुख**-न अंतःसुख; ब्रह्मानंद. **स्वात्मानुभव**-पु ब्रह्माचा अनुभव.

**स्वाद**--पु. १ चव; लज्जत; गोडी; आमोद. २ चव घेणें; गोडी चाखणें. ३ वास; सुवास. [सं.] **स्वादिष्ठ-ष्ट, स्वादिक**-वि. चवदार; लज्जतदार; रुचकर. **स्वादु**-वि. १ गोड. २ चविष्ट, मधुर.

**स्वाधिष्ठान**--न. १ गुदद्वार. २ (योग) षट्चक्रांतील दुसरें चक्र. ३ स्वतःचें स्थान. [सं.]

**स्वाधीन**—वि. आपल्या इच्छेप्रमाणें चालणारा; दुसऱ्याचे ताब्यांत नसलेला, स्वतंत्र; मोकळा. -वि. कबज्यांतील. -शअ अंमलाखालीं; काळजीखालीं; ताब्यांत; आधीन. 'मी आपले बापाचे स्वाधीन आहे.' [सं.] **०पतिका-भर्तृका**-स्त्री. नवऱ्यास मुठींत ठेवणारी बायको.

**स्वाध्याय**--पु. वेदपठण; वेदाध्ययन; तें सुरू करण्याचा दिवस. [सं.] **स्वाध्यायी**-वि. १ वेदाध्ययन करणारा (विद्यार्थी). २ (चुकीनें) साहाध्यायी.

**स्वानंद**—पु. आत्मानंद; ब्रह्मानुभव. -वि. आत्मसुखाचे आनंदांत मग्न झालेला. [सं.] **स्वानंदसोहळा**-पु. आत्मानंदाचा अनुभव घेणें.

**स्वानुभव, स्वानुभूती**—पुस्त्री. १ तुर्यावस्था. २ आत्मानुभव, स्वतःचा अनुभव. [सं.]

**स्वाभिमान**—पु. १ स्वतःचा (चांगला, वाईट) अभिमान; गर्व. २ तेजस्विता; दुसऱ्यानें निष्कारण केलेल्या उपमर्दाची असहिष्णुता. ३ पोकळ अहंकार. [सं.]

**स्वामि-मी**—पु. १ धनी. २ मालक. देवता; ईश्वर; राजा. ३ गुरू; नवरा; साधु; संन्यासी, गोसावी. क्वचित् 'स्वाम' असेंहि रूप आढळतें उदा० स्वाम आज्ञा करतील त्याप्रमाणें मी चालेन. -वि. मुख्य; श्रेष्ठ. [सं.] **स्वामित्व**-न. १ धनीपणा; मालकी; ताबा. २ शेत, धंदा इ० मालकापासुन करावयास घेतांना मालकास त्याबद्दल द्यावयाची हक्काची रक्कम; मालकी हक्क. **स्वामिनी**-स्त्री. धनीण; मालकीण. **स्वामिद्रोह**-पु. गुरू, राजा, धनी यांच्याशीं केलेली फितुरी, द्वेष. **स्वामिद्रोही**-वि. मालकाशीं द्रोह करणारा.

**स्वायत्त**—वि. स्वाधीन पहा.

**स्वार**—पु. घोड्यावर बसलेला माणूस; सैनिक; राऊत. [फा. सवार्]

**स्वार**—न. (नाविक) सुकती अगर भरती पूर्ण झाली म्हणजे कांहीं वेळ पाणी स्थिर राहणें अशी अवस्था.

**स्वारबी**—वि. (को.) बकरीं, गुरें यांच्या मलमूत्रांनीं राबविलेली, खतविलेली (जमीन).

**स्वारस्य**—न. १ स्वाभाविक, नैसर्गिक गोडी; चव; रसाळपणा; अभिरुची; माधुर्य (काव्य, भाषण इ०). २ चांगलेपणा; उत्कृष्टपणा; चांगुलपणा. ३ मर्म; खुबी. [सं.]

**स्वारी, सवारी**—स्त्री. १ घोड्यावर बसणें. २ घोड्यावर बसलेली व्यक्ति. ३ मोहीम; दौड; धावणी. ४ वाहन. ५ (बहुमानार्थी) आपण स्वतः. 'आमची स्वारी काल नाटकाला गेली होती.' ६ मोठ्या माणसाचा लवाजमा, परिवार, सरंजाम, मिरवणूक. ७ हत्यारी लोकांची टोळी; तिचा हल्ला. ८ कोणत्याहि वाहनावर आरूढ झालेला मनुष्य. ९ राजा; सरदार इ० थोर व्यक्ति. १० (ल.) प्रेतयात्रा. ११ (बायकी) नवरा. १२ (कुस्ती) एक प्रकारचा पेंच यामध्यें खालच्या गड्यास वरचा गडी दोन पायांच्या पकडीमध्यें पकडतो. (क्रि० घालणें, भरणें). १३ मध्यरात्रीं निघणारी वेताळाची फेरी. १४ संचार; अवसर.

१५ मोहरमांत मुसलमानांमध्यें होणारा पीर वगैरेचा संचार. [फा. सवारी] ०करणें-हल्ला चढविणें. ०पेच-पु. स्वारी अर्थ ११ पहा. ०शिकारी-स्त्री. (व्यापकार्थी) मिरवणूक; लवाजमा; स्वारी करणें; शिकारीस जाणें; मोहीम.

**स्वार्थ**—पु. १ स्वतःचा फायदा, लाभ; मतलब. २ वाच्यार्थ; मुख्य अर्थ; मुद्दा; (भाषण इ० तील). ३ स्वतःची मालमत्ता. ४ (व्याकरणें) जेथें क्रियापदानें एखाद्या गोष्टीचें विधान साक्षात होतें म्हणजे एखादी गोष्ट आहे किंवा नाहीं इतकें मात्र समजतें तेथें असणारा अर्थ. [सं.] ०त्याग-पु. स्वहितावर तिलांजली देणें; स्वतःच्या मतलबावर पाणी सोडणें; स्वतःच्या हिताकडे दुर्लक्ष करून एखादें महत्कार्य करणें. ०पर-परायण-वि. आपमतलबी; स्वतःचेंच हित पाहणारा. ०बुद्धि-स्त्री. आपमतलबीपणा. -वि. आपमतलबी. **स्वार्थी**-वि. १ मूलभूत अर्थाप्रमाणें. २ नेहमीं आपला फायदा पाहणारा; मतलबी.

**स्वाहपी**—वि. शांत; संतुष्ट; समाधानी. [सं. स्वाहा= अग्निची ज्वाला]

**स्वाहा**—अ. १ देवास हवि देण्याचा मंत्र. २ अधाशीपणानें खाणें. (क्रि० करणें=गिळंकृत करणें.) ३ (ल.) दुसऱ्यानें विश्वासानें ठेवलेली वस्तु उपटणें; अपहार करणें. **स्वाहाकार**-पु. देवतांस अग्नीच्या द्वारें हविर्भाग देणें.

**स्वाक्षर-री**—न.स्त्री. १ स्वतःच्या हातचें लिहिणें. २ स्वतःची सही; स्वदस्तुर. [सं.]

**स्विष्टकृत्**—स्त्री. १ मुख्य होम झाल्यावर द्यावयाची आहुती. २ (ल.) समाप्ति; शेवट; अखेर. ३ (ल.) समूळ नाश; उच्छेद. [सं.]

**स्वीकरण-स्वीकार**—न.पु. १ कबूल करणें; हक्क बजावणें; पत्कर घेणें. २ स्थिति, वाद इ० कबूल करणें; मानणें; संमति देणें. ३ अंगीकार करणें. [सं.] **स्वीकारणें**-सक्रि. घेणें; हक्क सांगणें; मान्य करणें; मानणें; अंगीकार करणें; संमति देणें. **स्वीकृत**-वि. घेतलेलें; अंगिकारिलेलें; मान्यता, कबूली दिलेलें.

**स्वीय**—वि. स्वतःचें; स्वतःसंबंधीं. [सं.]

**स्वेच्छ**—वि. १ स्वैर; स्वतःच्या मनाप्रमाणें वागणारा. २ उनाड; अवखळ; आडदांड; मोकाट; उच्छृंखल. -क्रिवि. यथेच्छ; आपल्या मनाप्रमाणें. [सं.] **स्वेच्छा**-स्त्री. १ स्वतःची मर्जी. २ आडदांडपणा; उनाडपणा. **स्वेच्छाचार-गमन-विहार**-पुनपु. स्वच्छंदीपणाचें आचरण. **स्वेच्छाचारी-गामी-विहारी**-वि. स्वेच्छ पहा.

**स्वेत-तु**—पु. (अप.) सेतु; पूल. [सं. सेतु]

**स्वेद**—पु. १ घाम. २ वाफ. [सं.] ०ज-वि. घामापासून उत्पन्न होणारा. (प्राणी, ऊ इ०)

**स्वैंपाक, स्वैंपाकघर, स्वैंपाकी**—स्वयंपाक इ० पहा.

**स्वैर-री**—वि. स्वेच्छ पहा. स्वच्छंदी; उनाड; आडदांड. [सं.] ०गति-स्त्री. १ स्वेच्छाचार पहा. २ -वि. स्वेच्छाचारी पहा. ०गामी-वृत्त-त्ति-वि. स्वेच्छाचारी पहा. **स्वैरिणी**-स्त्री. उनाड स्त्री; व्यभिचार करणारी बाई; स्वच्छंदी स्त्री; वेश्या.

**स्वोदय**—पु. (ग्रह, नक्षत्र इ० चा) उदय; उगवणें; उदयाचा ठराविक काल. लंकोदय, चर इ० पहा. [सं.]

**स्वोपार्जित**—वि. स्वतः कष्ट करून मिळविलेलें. [सं.]

---

# ह

**ह**—मराठी व्यंजनमालेंतील तेहतिसावें व्यंजन. अक्षरविकासाच्या पांच अवस्थांपैकीं पहिली गिरनारचा अशोक लेख, दुसरी मथुरेचा शोडास जैन लेख, तिसरी गिरनारचा रुद्रदामन् लेख, चौथी अप्सद लेख, व पांचवी अकराव्या शतकांतील उज्जनीचा लेख यांत आढळते,

**हं**—उद्गा. लक्ष वेधणें-देणें, सूचना, संमति, पसंति दाखविणें इ० चा दर्शक शब्द; हां. [ध्व.]

**हइता, हइराण, हइराणगत, हइरान, हईक**—हैता, हैराण इ० पहा.

**हउदा, हउशा, हऊसी, हऊळा, हऊद, हऊर, हऊस, हऊसदार**—हौदा, हौशा इ० पहा. **हउस**-स्त्री. इच्छा; हौस पहा. 'परस्पर बिघाडविसीं हउस राहिली नाहीं.' -चंद्रचूड दप्तर १.१०५.

**हक, हकटक, हकदार इ०**—हक्क, हक्कटक इ० पहा.

**हक**—हक्क पहा. ०ताला-पु. उच्च ईश्वर. 'एखादे आपले हिंदूंचे तीर्थी बसौनु हकतालाची बंदगी करून हजरत साहेबास द्वा देऊनु.' -इंम ६७. [अर हक्क्-तआला] ०नाहक-नाक-क्रिवि. नाहक; विनाकारण; अन्यायानें. 'आजदीड महिनाहक्कनाहक फिरतो.' -चंद्रचूड दप्तर १.१३७. 'वेधिलें चित्त हकनाक उशीर लाविला।' -प्रला १३१. ०होणें-मरणें. 'नजबखानास राजयक्ष्मा रोग होऊन चौदावे रविलाखरीं हक जाला.' -मदबा १. ११८. ०परस्ती-स्त्री. १ सत्यपूजा. २ कृतज्ञता. -पेअ ६१.

**हकणें, हकलणें**—(विप्र.) हाकणें, हाकलणें पहा.

**हकम**—पु. गांव-जिल्हा-अधिकारी; मालक. हाकीम पहा. [अर. हकूम्] ०हकमात-स्त्री. राज्यकर्ता वर्ग; अधिकारी वर्ग. **हकमी-माई**-स्त्री. हकमाचें काम, अधिकार; स्वामित्व; मालकी. हकिमी पहा.

**हकमक-हकम**—क्रिवि. हटकून; मुद्दाम.

**हकमी, हकमाई**—स्त्री. हकीमाचा धंदा, वृत्ति, काम इ०. [हकीम]

**हकळा**—पु. गवताचा एक प्रकार.

**हकाटणें, हकाटा, हकाटी, हकारणें, हकारा**—हाकाटणें, हाकाटा इ० पहा. [हाक]

**हकारणी**—स्त्री. चालू करणें; चालविणें (गलबत, नाव); ढकलणें; शीड उभारणें. हकारणें पहा. **हकारणें**–उक्रि. १ किनाऱ्यापासून पुढें आंत–समुद्रांत ढकलणें, चालवणें, नेणें, हाकणें (नाव, बोट). २ शीड उभारणें (गलबताचें–जलप्रवास सुरू करतांना). ३ सोडणें; हांकणें; चालविणें (गाडी, बैलांचा तांडा, खटारा इ०). ४ जोरानें सोडणें; वेग देणें (वल्हीं मारून नाव इ० स). ५ तांतडीनें, लवकर जाण्याविषयीं सांगून पाठविणें; रवाना करणें (दूत, जासूद). ६ सपाटून पळविणें; भरधांव काढणें (घोडा इ०). ७ बोलावणें. हाकारणें पहा. म्ह० आषाढी आणि सण हकारी. [ध्व. हाकार]

**हकालणें**—उक्रि. १ काढून देणें–लावणें, घालवून देणें (पशु, पक्षी इ०). २ हाकणें पहा. ३ हकारणें अर्थ १–४ पहा. [हकारणें; हिं. हकारना] **हकालपट्टी**–स्त्री. काढून लावणें–देणें; हद्पारी.

**हकाहाक, हकाक**—स्त्री. आरडाओरड; बोंबाबोंब; हाकाटी. हाकाहाक पहा. [हाक द्वि]

**हकि(की)कत, हकीगत**—स्त्री. १ बातमी; वृत्तांत; वर्णन; अहवाल. २ घडलेलें वर्तमान; गोष्ट; प्रसंग; वाका. 'साहेबी हकीकती मनास आणून पाहतां...'–रा १७.३८. [अर. हकीकत्] ०नामा–पु. घडलेल्या गोष्टीचा लेखी वृत्तांत, अहवाल. [फा.]

**हकीम**—पु वैद्य; वैद्यकी (मुसलमानी) जाणणारा; युनानी वैद्य. [अर. हकीम्] **हकिमाई, हकिमी**–स्त्री. हकिमाचा धंदा, काम; वैद्यकी (युनानी).

**हकीम**—पु. अधिकारी; अंमलदार. हकम, हाकीम पहा. 'त्याचे हकिमाचे इतलेशिवाय स्वारी निभावून जाणार नाहीं.' –ख १०.५६१४. [अर. हकुम्] **हकिमी**–स्त्री अधिकार; अंमल. 'प्रांत मजकूर हकिमी गंगाधर प्रतिनिधी यांजकडे होती.' –वाडबाबा २.३२. [फा. हाकिमी]

**हक्क**—पुन. १ अधिकार; मालकी; वारसा. २ देशमुख, देशपांडे, महाजन इ० पिढीजाद महाल–गांव–अधिकाऱ्यांचा गावबलुतेंतला किंवा पिकाचा वांटा, हिस्सा; वर्षासन. 'आम्ही मोहिब्बाचे हक्कामध्यें हमेशाचे दर्गामध्यें शुक्रुजारी करीत असतो.'–ब्रच ५.२४०. ३ (ल.) धंदा; उद्योग; काम. 'झाडावर चढणें हा वानराचा हक्क आहे.' ४ पगार; प्राप्तव्य. 'ज्याजती होईल तितकी किंमत करून त्याच्या हक्कांत धरावी.' –सभासद २३. ५ नेमणूक. 'पाटील कुळकर्णी यांसी हक्क बांधून दिला.' –सभासद २५. ६ सत्य. [अर. हक्क्] ०करणें–देहांतशिक्षा करणें. –मदरु १.१६. ०होणें–मरणें. **हक्का(का)टक्कां(कां)त येणें, हक्काटकास येणें**–१ तावडींत, सपाट्यांत सांपडणें; आटोक्यांत येणें; हातांत–अवसानांत–टप्प्यांत–कक्षेत–आवांक्यांत–अधिकारांत येणें २ मर्जीस येणें; संमत होणें. ३ आंकड्यांत, हिशेबांत बसणें. **हक्काटक्कांत जाणें–गुजरणें–उरकणें–अटपणें–आटोपणें–मरणें**–भर तारुण्यांत, ऐन उमेदींत मरणें, नष्ट होणें. ०अदाव–पु १ हक्क रुसुम पहा. २ (सामान्यतः) हक्क. ०जवारी–स्त्री. हक्कदारपणा. –शर. ०टक्क–टाक–पु १ देशमुख इ०. पिढीजाद गांवकामगारांना रोख द्यावयाचे पैसे. २ (सामान्यतः) हक्क. ०ताला–उच्च ईश्वर. हकताला पहा. ०दस्तुरी–स्त्री. १ हक्क आणि वहिवाट; हक्क आणि ठरलेली बलुतीं, वतन. २ (सामान्यतः) हक्क. ०दार–वि. १ वार्षिक बलुताचा किंवा पिकाचा अंशतः मालक. २ वारस; वांटेकरी. [फा] ०दारी–स्त्री. १ हक्कदाराचा भाग, वांटा. २ हक्क धारण करणें; हक्क. ०माल–पु सत्तेचा माल; हक्काचें स्वामित्व; आपला योग्य हक्क आहे असा माल. 'हा पदार्थ माझा हक्कमाल आहे, माझा मला द्यावा.' 'बक्षीस कांहीं देणार होतां तें न द्याल तर न द्या पण चाकरीचा पैसा तो तर माझा हक्कमाल आहे.' **हक्कनहक्क, हक्कनाहक**–क्रिवि. १ बरोबर असो कीं नसो; न्यायानें किंवा अन्यायानें; सकारण किंवा अकारण; कशाहि रीतीनें अविचारानें. २ नाहक पहा. [फा. हक्–ना–हक्] ०रसूम–रुसूम–लाजिमा–पुअव. १ देशपांडे इ० पिढीजात अधिकाऱ्यांचे हक्क आणि विशेष अधिकार; वतनदारी हक्क वगैरे. २ हक्क व भोगवटा; विशेषाधिकार; कायदेशीर हक्क व प्रस्थापित मालकी. ०हराम–हरामाचा–वि. वाजवी व न्याय्य; बरोबर कायदेशीर. 'हक्क हरामाचा पैसा–अधिकार–वृत्ति–मिळकत.' (हराम शब्दाचा गैर कायदा असा मूळ अर्थ वाईट असतां मराठींत या वाक्प्रचाराला सोवळेपणा आलेला आहे). हक्काहरामाचा पहा. ०हलाल–हलालाचा–वि. वाजवी; न्याय्य; कायदेशीर. [अर–हलाल्=कायदेशीर] ०हवाल–पु. सुस्थिति; भरभराट; (पीक, बाजारभाव, पाऊस, व्यक्ति इ०ची). ०हिशेब–शोब–पु हक्क आणि येणें; बरोबर, खरा हिशेब–हिशेबी येणें. **हक्काचे दाणे**–खळें झाल्यावर मळण मातेरें व चांगले दाणे कांहीं महारास सोडावे लागतात तो हक्क. **हक्का हिशेबाचा**–वि. निर्विवाद हक्काचा, मालकीचा. **हक्का हरामाचा**–वि. १ न्याय्यान्याय्य रीतीनें मिळविलेला; भल्याबुऱ्या मार्गानें केलेला (पैसा). २ अन्याय्य; अप्रामाणिक; लबाडीचा (धंदा, काम, पैका इ०).

**हक्कार**—पु. हाकारा; हाकाटी हाक मारणें; ओरडणें. [सं]

**हग**—पु. मल; विष्ठा; गू (मनुष्य, पशु इ० चा). [सं. हद्] ०ओक–वक–स्त्री. (पटकींतील) ओराचे ढाळ, ओकारी वगैरे.

शको. ७. ३८

[ हगणें+ओकणें ] **हगटणें**–अक्रि. ( क्रोध–तिरस्कारार्थी ) हगणें. ' ससें उठलें कुत्रें हगटलें. ' हगुटणें पहा. **हगणवट**–न. जनावराचें गुदद्वार. **हगणें**–उक्रि. १ मल, विष्ठा शरीराबाहेर टाकणें; मलविसर्जन करणें. २ बाहेर टाकणें, पडणें ( डोळ्यांतील चिपडें, पू ). ३ वर टाकणें–येणें ( समुद्रांतील घाण ) ४ वर, बाहेर फेंकणें, येणें ( जात्याचा खिळा ढिला झाल्यामुळें पीठ ). ( हें क्रियापद सकर्मक व अकर्मकहि आहे ). **म्ह०** हगल्या पेक्षां निपटणें बरें. **हगंद(दा)री, हगदारी**–स्त्री. सार्वजनिक शौचाची जागा; परसाकडेची जागा. जेथें मल, विष्ठा, घाण पडते अशी जागा. [ हगणें+दरी ] **०मुती-मूत**–स्त्री. भीतीनें, तीव्र वेदनेनें मलमूत्र विसर्जनाची होणारी घाई; धास्तीनें मलमूत्र विसर्जन होणें. ( क्रि० सुटणें; लागणें ). **हगरड**–स्त्री. १ ढेंडाळी; हगवण. २ विष्ठा. घाण इ० ढीग. **हगरडा-रडें, हगिरडा-डें, हगुरडा-डें**–वि. १ शौचाहून आल्यावर ढुंगण न धुतलेला. २ ( ल. ) अपुरा; अर्धवट राहिलेला; मध्येंच बंद पडलेला ( काम, धंदा इ० ). ३ बिघडलेलें; खराब झालेलें ( काम इ० ). ४ घाणेरडें; ओंगळ; किळसवाणें. ५ क्षुल्लक; निरुपयोगी; बिनकिंमतीचें. **हगरा**–वि. १ सदोदित हगणारा. २ ( ल. ) भित्रा; भ्याड. ३ ( व्यापक ) वाईट; ओंगळ; घाण; किळसवाणी ( व्यक्ति, वस्तु, गोष्ट इ० ). ४ क्षुद्र; गबाळ; निरुपयोगी; कुचकामाचा. **हगरी-रें**–स्त्रीन. १ शौचासाठीं केलेली व्यवस्था; ठाकोली. २ शौचाची लांकडी घडवंची; गलबतावरील मलविसर्जनाची जागा. ३ या घडवंचीचें भोंक. ४ ( गुऱ्हाळ ) चुलाण्यांतील राख ज्या थारोळ्यांतून खालीं पडते त्याचें भोंक. ५ ( हगरी ) शेतांत ठिकठिकाणीं ठेवलेल्या खताच्या राशी–प्रत्येकीं. ६ शेतांत खत न्यावयाच्या गाडींत खत भरण्यासाठीं असलेल्या कुरकुलाचें मागील दार, झडप. **हगरें**–न. ( अशिष्ट ) १ सोरा; यवक्षार. २ टाईप पाडण्याचें यंत्र. **हगली मुतली, हगलेंमुतलें**–स्त्री.न. १ क्षुद्र; बारीकसारीक गोष्ट; लहानसहान चुका, अपराध, गैरवर्तन ( दुसऱ्याजवळ गाऱ्हाणी केलेलें ). २ एखाद्याच्या साध्या, स्वाभाविक, खासगी गोष्टी. ( क्रि० सांगणें; कानावर घालणें; पाहणें ). ' हा दिवाण चाकर लोकांचीं हगलींमुतलीं राजाच्या कानावर घालतो. ' ३ ( लहान मुलाच्या ) हगण्यानें भरलेले कपडे; गुवेलें. **हगवण**–स्त्री. अतिसार; वारंवार शौचास होणें. **म्ह०** फुकाची भाजी हगवणीस काळ. **हगवणकर-करी**–वि. हगवणीचा आजार असलेला. **हगवणें-विणें**–सक्रि. १ शौचास, परसाकडेस बसविणें ( मूल इ० ). २ ( ल. ) ओशाळणें; लाजविणें; गोंधळविणें; दांत पाडणें. ३ नाश करणें; नायनाट करणें; घाबरून सोडणें; रडकुंडीस आणणें; बिघडविणें ( सल्ला, युक्ति, धाडसाचें काम ). ४ बलात्कारानें काढणें; परत देण्यास भाग पाडणें ( पैसा इ० ). **हगाड**–स्त्री. हगंदरी पहा. **हगीरडामुतीरडा**–वि. हगरडा अर्थ १ पहा. **हगिरडें**–न. फुरसें ( एक जातीचा साप ). **हगीर**–वि. हगरा पहा. **हगीरमुतीर**–वि. ( ल. ) घाबरगुंडी झालेला; अतिशय गोंधळलेला; दुःख, भीति इ० मुळें देहभान सुटलेला; पांचावर धारण बसलेला. **हगुटणें**–अक्रि. १ परसाकडेस घाई होणें; परसाकडेस लागणें. २ हगणें; हगटणें पहा. ३ ( ल. ) गर्भगळित होणें. ४ घाबरगुंडी उडणें;' उगीच घाईत असणें. [ हग+उठणें ] **हगूट**-पु. परसाकडेची घाई. गुदद्वारावाटे नुकताच बाहेर पडलेला किंवा पडत असलेला मळ; विष्ठा. **हगूर**–वि. हलका. **हगेरा, हगोला**–वि. गुवानें भरलेला, बरबटलेला ( कपडा ). **हगेरें, हगोलें**–न. गुवानें भरलेलें वस्त्र, दुपटें; गुवेलें. **हग्या, हगिया**–वि. १ शौचास बसलेला, निघालेला. २ शौचास नेण्याचा ( तांब्या, जोडा इ० ). ' दुराणी हगियांसी ( जोडयांनीं ) मारूं लागले. ' –भाब १४०. ३ हगावयास लावणारा. ४ ( ल. ) अतिशय जोराचा ( मार इ० ).

**हंग**—हंगे पहा.

**हंगवणें, हंगून काढणें**–केलेले उपकार वारंवार बोलून दाखविणें.

**हंगाम**—पु. मोसम; ऋतु; सुगी ( पीक पाणी इ० ची ); योग्य काळ ( एखाद्या व्यवहाराचा ); ऐन सराई ( उद्योग–धंदा इ० ची ). [ फा. हंगाम् ] **०शीर**–क्रिवि. हंगाम चालू असतां ( विकणें, विकत घेणें इ० ); –वि. ऋतु, समय याला योग्य; यथाकालोचित; वक्तशीर. ' या गांवावरी हंगामशीर प्रजन्य पडला नाहीं. ' –रा ६.१८५. **हंगामी**–वि. १ हंगामापुरता; तात्पुरता ( चाकर, नोकर इ० ). २ हंगामासंबंधीं; हंगामाच्या वेळचा; हंगामशीर.

**हगामा**—पु. कुस्त्यांची दंगल. [ फा. हंगाम् ]

**हंगामा**—पु. १ धुमाकूळ; गडबड; धिंगाणा; धुडगूस; धुमश्चक्री. ' जरीमरीनें यंदा फार गांवांत हंगामा केला. ' २ आरडाओरड करून केलेला हल्ला; गर्दी. ' त्यानें मजवर हंगामा करून मला पाडलें. ' ३ दंगा; बखेडा. ' नेतेसमयीं दोनचार माणसें जखमी जाली, हंगामा जाला होता. ' –रा १.२५. ४ ( सामा. ) नाश. [ फा. हंगाम् ]

**हंगे-गें, हंगये**—क्रिवि. १ इकडे; या दिशेनें; इकडून. २ आतां. [ ध्व. हं. ] **०तंगें**–न. उडवाउडवीचें भाषण; टंगळमंगळ; टाळाटाळ. ( क्रि० करणें; लावणें; चालविणें; म्हणणें ). –क्रिवि. विसंगतपणें; कांहीं तरी बोलून; टोलवाटोलवी करून; टाळाटाळीनें. ( क्रि० म्हणणें; बोलणें; करणें ). [ हंगे द्वि. ] **०तंगें म्हणतां**–हां हां म्हणतां; एकदम.

**हगोनगी**—स्त्री. ऐक्य; एगानगत, येगानगत.

**हुंचत्वंच, हुंचात्वंचा**—नस्त्री. मी तूं; अरे तुरे; एकेरीवर येणें; हमरीतुमरी करणें. [ सं. अहम्+च+त्वम्+च ]

**हजबी**—स्त्री. जनावराच्या पाठीवरून पैसे नेण्यासाठीं केलेली, मध्यें तोंड असलेली लांब पडशीसारखी दुहेरी पिशवी; पडशी; हसबी पहा.

**हजर, हजरजबाब, हजरजामीन, हजरनीस, हजरबिगार, हजराहजरी**—हाजीर; हाजीरजबाब इ० पहा.

**हजरजावंद**—क्रिवि. हुकुमांत; आज्ञेत.

**हजाम**—पु न्हावी; नापित. [ अर. हज्जाम् ] **हजामत**—स्त्री. १ हजामाचें काम; श्मश्रू; ( डोक्यावरील व चेहऱ्यावरील ) केंस काढण्याची क्रिया. २ ( ल. ) ताशेरा; खरडपट्टी; बोडंती; चांगल्या शिव्या देऊन केलेली कानउघाडणी. ३ लुटणें; लुबाडणें; नागवणूक ( क्रि० करणें ).

**हजार**—वि. १००० संख्या; सहस्र; दहा शंभर. 'तोफ हजारो हजार सुटली ।' –प्रला ५२. [ फा. हझार् ] **म्ह०** हजार वळसे आणि एक गांठ. **०पांचशें पाऊस पडणें**–थोडासा पाऊस पडणें; शिंतोडे येणें.

**हजारा**—पु. ( सोंगटया ) तीन फाश्यांनीं नऊ किंवा सात हें ( छतीन नऊ, पाचचार नऊ किंवा पांचदोन सात ) पडलेलें दान. [ फा. ] **हजारा**–स्त्री. अनेक धारा पडणारें कारंजें. **हजारी**–स्त्री. १ पुष्कळ छिद्रें असलेलें नळाचें, कारंजाचें तोंड. २ हजार सैनिक बाळगण्याची मन्सबी. –वि. हजारासंबंधीं; [ फा. हजार् ] **हजारी कारंजें**–न. पुष्कळ धारा उडतात असें कारंजें; हजारा. **हजारी घर**–न. एका विशिष्ट तऱ्हेनें बांधलेलें घर. **हजारी पान**–न. जनीचें पान पहा. **हजारी माड**–पु. हजार नारळांचें उत्पन्न देणारें माडाचें झाड. **हजारी मोगरा**–पु. अनेक फुलांचा गुच्छ येणारें एक फूल झाड. **हजारों, हजारोंहजार**–वि. असंख्य; हजारानें मोजतां येणारें.

**हजिबा, हजिम्मा, हजिमा**—पु. १ तुंबळ, अतोनात गर्दी; दाटी; झिमड; खेंचाखेंच. २ अतिरेक; अमर्यादपणा; पराकाष्ठा ( चैन, रंगतमाशा, भांडण, युद्ध, वैर, पाऊस, पीक, जिन्नस, सामुग्री इ० ची ). ( क्रि० माजणें; जमणें; होणें ). ३ फजीती; टर; धुव्वा. ( क्रि० होणें, उडणें ). 'पुढें डौल कसा होतो पहावें, परंतु हजिमा आहे.' –ख ९.४८.७४. [ अर. हझीमा ]

**हजिरी, हजिरीखर्डा-पट-पत्रक-बंद-याद हजीर, हजीरजबाब-जबाबी, जामीन-नीस-बिगार-बिगारी-मजालस, हजेरी**—हाजिरी; हाजीर इ० पहा.

**हंजी**—अ. हांजी पहा.

**हजूर हशम**—पु. खास राजाचे शरीर संरक्षक शिपाई.

**हज्रत-ती**—पुस्त्री. स्वामी; महाराज; धनी ( राजा, पैगंबर, अगर इमामादि श्रेष्ठ आणि वंद्य पुरुष यांस लावतात ). [ अर. हझ्रत् ]

**हट-ट्ट**—पु. १ हेका; दुराग्रह; खणपट. २ मत्सर; चुरस; आकस. ३ ( सामा. ) आग्रह. [ सं. हठ ] **०जिरणें**-हट्टीपणा जाणें; समजूत होणें, पडणें; ( एखाद्या गोष्टीस ) वळणें. **हटा(ट्टा)स पेटणें**–हट्ट करून बसणें; जिद्दीस येणें; अटीस पेटणें. **हटणें**–अक्रि. हट्टी बनणें; हट्ट करणें; न ऐकणें. 'कालपासुन पोर हटला.' **०कोर-खोर**–वि. हट्टी; हेकाड; हेकेखोर; न जुमानणारा. **०तट**–पु. १ अतिशय हट्टीपणा; हेका; आपलें खरें करण्यासाठीं भांडण, धडपड. 'हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिशी कां शिरीं । मठाची उठाठेव कां तरी.' –राला २ चिकाटी; अत्याग्रह. **हटातटाचा, हटातटानें, हटातटीं**–असे प्रयोग रूढ आहेत. **०तटीं**–क्रिवि. तडकाफडकीं. –शर. **०निग्रह**–पु. अत्यंत चिकाटी; आग्रह; हेका. **०वाद**–पु. अतिशय हट्ट; हेकेखोरपणा. ( क्रि० करणें; घेणें; धरणें ). **०वादी**–पु. अत्यंत हेकेखोर; हट्टी. **हटा(ठा)त्**–क्रिवि. जबरीनें; जुलमानें; बळेंच. [ सं. ] **हटिया**–वि. १ हट्टी. २ हटयोगी. 'म्हणोनि हटियातें जिणिजे । इहींचि जगीं ।' –ज्ञा ३.२६६. **हटी**–वि. हट्टी पहा. **हटु**–वि. १ हट्टी; आग्रही. २ ( महानु. ) न हटणारा. 'तया शौर्येंसीं तट्टु । बळेंसीं हट्टु ।' –भाए ३५८. **हटूनतटून**–क्रिवि. १ हट्टानें. २ चिकाटीनें; निश्चयानें., **हटेंच**–वि. १ हट्टानें बळेंच; कोणाचें न ऐकतां. 'नको जाऊं म्हणत असतां हटेंच गेला.' २ हटात् पहा. **हटेंतटें**–क्रिवि. १ हटकून. २ जबरीनें. **हटेला**–वि. हट्टी; दुराग्रही. **हट्टी, हट्टीबाज-खोर**–वि. हटेला; हेकेखोर; दुराग्रही.

**हट-ट्ट**—पु. बाजार; मंडई; विशेषतः फिरता बाजार, जत्रा. [ सं. हट्ट ] **म्ह०** १ हटीं जेवण मठीं निद्रा. ( स्वैराचार दाखविण्यासाठीं योजतात ). २ हट गोड आहे परंतु हात गोड नाहीं. ( बाजारी माल चांगला आहे पण तयार करणारा चांगला नाहीं). **हटास ओघळ जाणें**–रेलचेल, समृद्धि असणें. **०करीकरीण**–पु. स्त्री. १ बाजारकरी; बाजारकरीण. २ बाजारांत विक्री करणारा माणूस, स्त्री; दुकानदार. **०कोरी**–पु. हटकरी पहा. 'राम्याराम्या लांब दोरी, हटकोऱ्याच्या भाकऱ्या चोरी.' **०बाजार**–पु. बाजारहाट. 'कुटुंबवत्सळ खर्च पदरीं । म्हणवूनि धावे हटबाजारीं ।' **०वट**–स्त्री. फळें; भाजीपाला विकण्याची जागा; भाजीबाजार. **०विलासिनी**–स्त्री. वेश्या; बाजारबसवी. [ सं. ] **हटाऊ**–वि. १ बाजारासंबंधीं; बाजारी. २ हलका; क्षुद्र; नीच. **म्ह०** हटाऊ गुरु आणि शिटाऊ–पटाऊ–भेटाऊ चेला.

**हटक**—स्त्री. १ हांक मारणें; बोलावणें. २ ( रस्त्यांत ) अडथळा, खोळंबा करणें. ( क्रि० लागणें; लावणें ). **हटकण-णी**–

स्त्री. १ हांक; हटक; ओरड; आव्हान. ( क्रि० करणें; लावणें ). २ चौकशी; विचारपूस. ( क्रि० लावणें; लागणें ). **हटकणें**-उक्रि. १ हांका मारणें; बोलावणें. 'तें तुज विदित असो गे जो तो कामी गळां पडे हटकी।'-मोसभा ६ २०. २ आव्हान देणें. ३ चौकशी करणें; विचारणें. ४ विरोध करणें; अनादरणें. ५ आमंत्रण देणें. ६ संबोधणें; उद्देशून बोलणें. ७ थांबविणें. [ हिं. हटकना ] **हटकाहटक**-स्त्री. १ परस्परांस हांका मारणें. २ एकमेकांची चौकशी, विचारपूस करणें. [ हटक द्वि. ]

**हटकून, हटीं**—क्रिवि. १ न चुकतां; बरोबर; कांहीं झालें तरी; खचित; निःसंशय. २ निश्चयानें; कशास न जुमानतां. ३ मुद्दाम; मनस्वीपणें.

**हटणें**—उक्रि. चमचा, पळी इ० नें शिजलेली डाळ इ० चेंपणें, घाटणें. अहाटणें पहा.

**हटणें**—अक्रि. माघार घेणें; परतणें; मागें जाणें-येणें; पराभव पावणें. [ हिं हटना ] **हटविणें**-सक्रि. मागें सारणें; ढकलणें; परतविणें; पळवून लावणें; पराभव करणें.

**हटहट, हटहटणें**— हडहड, हडहडणें पहा.

**हट्टी**—स्त्री. १ लहान बाजार; जत्रा. २ एकाच जातीच्या किंवा धंद्यांतल्या माणसांच्या घरांचा समुदाय. उद० बुरुड-सुतार-गवळी-भंगी-मांग-हट्टी. ३ गांवापासुन थोडक्या अंतरावर असलेलीं भिल्ल, रामोशी इ०चीं घरें, वस्ती. 'भिल्लांची-रामोशांची-कातकऱ्यांची हट्टी.' ४ भिल्ल, रामोशी इ० लोकांचा मोठा अड्डा, बालकिल्ला. ५ असल्या लोकांचा जमाव, टोळी, कंपू. [ सं. हट्ट ]

**हठ**—पु. हट्ट, दुराग्रह. हट-ट्ट पहा. [ सं. ] **०योग**-पु. १ प्राणवायूचा निरोध करून त्याच्या द्वारें चित्तवृत्तीची एकाग्रता करण्याचा योगांतील एक प्रकार. २ सतत एका पायावर उभें राहणें, अधोमुख होऊन धूम्रपान करणें, हात वर करून उभें राहणें इ० प्रकारचें घोर तप. याच्या उलट राजयोग.

**हठकविता**—स्त्री. ओढूनताणून, कशी तरी रचलेली कविता. याच्या उलट प्रासादिक कविता.

**हड**—उद्गा. कुत्रा हाकलतांना, बैलाला पळवितांना उच्चारावयाचा शब्द. [ ध्व ] **०हड**-अ. गाय, कावळा, कुत्रा वगैरेस हाकारण्याचा शब्द. -स्त्री. १ धुडकावणी; झिडकारणी; तुच्छतेचे शब्द. 'भिकारी पडलों आतां लोकांची हडहड सोसण प्राप्तच आहे.' २ ( भिकारी वगैरेंचें ) कंटाळवाणें भटकणें; दगदग; लोकांकडून नेहमीं हकालपट्टी होणें ( क्रि०करणें) 'पोटासाठीं मला ही हडहड करावी लागते.' 'आतां म्हातारपण झालें ही हडहड सोसवत नाहीं.' ३ दुःखकारक अस्वस्थता, अशांतता. **हडाविणें, हडाविणें**-उक्रि. धुडकावणें; हिडीसफिडीस करणें; घालवून देणें; धिक्कार करणें; झिडकारणें.

**हड**—स्त्री. तळीं, डबकीं, खंदक इ० तून उगवणारें झाड, लांब गवत, लव्हाळें.

**हड**—पु. ( दक्षिण महाराष्ट्र ) पाणमांजर.

**हड**—पु. हाड; अस्थि; ( प्र. ) हाड पहा **हडकी**-स्त्री. १ लहान हाड. २ महारांना गांवांतील मेलेल्या जनावरांचीं हाडें, चामडीं इ० ठेवण्यासाठीं दिलेली बिगरसारा जमीन. **हडकी, हडोळा**-पु. ( व्यापक. ) महाराची इनामी जमीन. हाडकी व हाडोळा पहा. **हडकुळा, हडक्या**-वि. १ अतिशय रोड; हाडें निघालेला. २ ( ल. ) गर नसलेलें ( फळ ). **हडक्या ऊंस**-पु. रस थोडा पण गोड, जाड सालीचा कळक्या ऊंस. **हडवळा**-हडोळा पहा. **हडवैर**-न. फार दिवसांपासुन चालत आलेलें भयंकर शत्रुत्व; हाडवैर. **हडस**-वि. १ मजबूत हाडांचा, बांध्याचा. २ निरोगी; निकोप प्रकृतीचा; खणखणीत ( म्हातारा माणूस ). ३ ( चुकीनें ) अडस; हेकाड; हेकेखोर.

**हडकणें**—उक्रि. ( मागावरील कापड, चटई, वेणी इ० ) घट्ट आणि अटस होण्यासाठीं हातानें किंवा कांहीं साधनानें झटकणें; ठोकणें; आवळणें.

**हडकणें, हडंगणें, हडणें**—अक्रि. १ वाळणें; कडकडीत होणें ( ओलें कापड इ० ) सुकणें. २ रोडावणें.

**हडकता**—वि. ( चुकीनें ) १ अटकाव, प्रतिबंध करणारा. २ हटकता-विचारणारा; अडकता. 'हडकती सासू ना धडकता भावा.'

**हडगरी**—वि. हडगर गांवासंबंधीं कापड इ०.

**हडगा, हंडगा**—वि. १ बायकांत वावरणारा; बायल्या; वायक्या; रांडयाराघोबा. २ हिडगा पहा.

**हडगा**—पु ( कु. )तांबडी कुर्ली.

**हडगी**—स्त्री. मोठी टोपली.

**हडद-दा-दें**—स्त्री.पु.न. १ ( ल. ) गुंता; पायखोडा; बेडी ( कुटुंब, नोकरी, धंदा, काम इ० ची ) ( क्रि० वसणें; येणें; करणें; निवारणें; टाळणें; चुकविणें ). २ वेदा; त्रास; कष्ट; खस्ता ( लहान मुलें, आजारी माणसें, फार पाहुणे, मोठे समारंभ, मेजवान्या इ० प्रसंगींची ). ( क्रि० वाढणें; सोसणें; भोगणें; पुरवणें; करणें; निघणें; पुरणें, पडणें, होणें ) 'पाहुण्यांचा हडदा भारी पडला पण काढावा लागतो.' 'लग्नाचा हडदा पार केला.' 'घोडयाची हडद मीच काढतो.'

**हडप**—न. १ जामीन; ओल; तारण; गहाण ( यावयाच्या पैशासाठीं ). २ नोकरी बजावल्याचा दाखला म्हणून ठेवलेला जिन्नस. ३ आरोपी किंवा एखादा माणूस वेळेवर हजर ठेवण्यासाठीं यावयाचा जामीन; जामीनकीचीरक्कम.

**हडप**—न. १ पानदान; पानपुडा. 'हडप मी वोळगेन।' –ज्ञा १३.४१९. [का. हडप; देप्रा. हडप्प=तांबूलपात्र] २ (गो.) न्हाण्याची धोकटी. **हडपा**–पु. मोठी पेटी; मांदूस; संदूक. [का. हडप] **हडपी, हडपु, हडपेकरी**–पु. राजे, मोठे लोक इ०च्या जवळ असलेला, लागेल तेव्हां विडा देणारा नोकर; तांबूलकरंड-कवांही. स्त्रीलिंगी-हडपिणी. 'जाइली सुनी देखे आंधरीं। तरि म्हणे हडपु कवणाचा।' –भाए ३८४. 'हडपी देती विडिये करूनी।'–ह १४.११. 'सर्वे सखी हडपिणी। सैरंध्री सूत्रधारी।' –कालिका ३०.३७. [का. हडपिग]

**हडप**—पु गहाळ; गुप्त; नाहींसा; गिळंकृत. 'कांहीं केंद्रांतून खादी चोरीस गेल्याचे किंवा हडप झाल्याचे रिपोर्ट आले होते.' –विविधवृत्त २७-८-३७. पृ. २८. [गडप? हजम?]

**हडपता**—वि. अडपता पहा.

**हडपा**—पु. पंखा; झडपा पहा. **हडपणें**–अक्रि. वारा घालणें; झडपणें पहा.

**हडपा**—पु. १ जिन्याच्या तोंडावरचें दार, झांकण. २ झडपे असलेलें भिंतींतील फडताळ. ३ (कों.) धान्य वगैरे ठेवण्याची मोठी पेटी. [का. हडप]

**हडबड**—स्त्री. गडबड; गोंधळ (दंगा, धांदल इ० मुळें) 'एक म्हणती धरा धरा। हडबड झाली वीरा।' [हिं.] **हडबडणें**–अक्रि. १ गोंधळून जाणें; गडबडणें; खडबडणें. 'हडबडोनि उठे नंद राणी।' –ह ११ २०१. २ अकांडतांडव करणें; बेचैन होणें (लहान मुलानें). [हिं. हडबडना] **हडबडाट**–पु. अतिशय गोंधळ; गर्दी; घाई; धांदल.

**हडबडीत**—वि. (प्रां.) खडबडीत; ओबडधोबड.

**हँडबिल**—न. हस्तपत्रक; लहान जाहिरात. [इं.]

**हंडरीमडकीं**—नअव. (सामा.) हंडीमडकीं पहा.

**हडवंग**—पु. (राजा. कों.) क्रोधयुक्त स्पर्धा; मत्सरपूर्वक भांडण. **हडवंगणें-वांगणें**–अक्रि. खराब, अशक्त, क्षीण होणें; हडकणें. **हडवंगी**-वि. हट्टी; हेकेखोर. 'त्या हडवंग्याची समजूत कोणी करावी?'

**हडविणें**—उक्रि. खालून जोर लावून वांकविणें; खालीं करणें (झाडाची फांदी, मान इ०).

**हडसण**—स्त्री. एक औषधी वनस्पति.

**हडसणें**—सक्रि. १ हिसकणें; झटकन ओढणें; झटका मारणें; एकदम जोरानें ओढणें. २ आवळून, खेंचून बांधण्यासाठीं जोरानें ओढणें. (क्रि० बांधणें). हडसून बांधणें असाहि प्रयोग रूढ आहे ३ खेंचणें; ठासणें; आपटणें; जमीनीवर आदळणें; ठोकून दाट बसविणें (मागावरील कापड, चटई, साखरेनें वगैरे भरलेलें पोतें इ०). ४ (कों.) गिऱ्हाइकाला देण्यापूर्वी लाभ बरकत येवो अशा बुद्धीनें कापड इ० माल जमीनीवर, फळीवर, पेटीवर आपटणें (कापडवाल्यांत हा प्रघात विशेष आहे). ५ निक्षून, बजावून सांगणें, बोलणें. [सं. हट] **हडसणी**–स्त्री. १ हडसण्याची क्रिया; झटका; हिसडा. २ ढकलणी; घोळणी. **हडसणी**–स्त्री. मागावरील कापड ठासण्यासाठीं असणारी एक फळी; फणी.

**हडसूनखडसून**–क्रिवि. १ हडसण्याची क्रिया करून; झडकून; हिसडून; जोरानें ओढून. २ ठोकूनठाकून; हालवून. ३ निक्षून; बजावून. 'हडसून खडसून हें सनंग दिलें.' ४ उघडपणें; राजरोस; बिनदिक्कत. 'हडसूनखडसून दरवडा घातला.' ५ रोकठोक; स्पष्टपणें; धडधडीत; तोंडावर; निर्भिडपणानें. 'हडसून खडसून जबाब दिला.' ६ सरळपणानें; उघडपणें; हमखास; मनावर बिंबेल अशा रीतीनें.

**हडसणें**—उक्रि. हडपणें. झडपणें पहा. **हडसणी**–स्त्री. झडपणी.

**हडहडणें**—अक्रि. १ सुकणें; वाळणें (ओली जमीन, कापड). २ कृश होणें; रोडावणें. हडकणें पहा. **हडहडीत**–वि. रोडावलेला; कृश.

**हडळ-ळी**—स्त्री. १ एक स्त्री पिशाच; जखीण पहा. २ (ल.) वाईट, दुष्ट स्त्री.

**हंडा**—पु. १ मोठ्या तोंडाचें पाणी वगैरे सांठविण्याचें भांडें. २ गर्भसुती व १२ हात लांबीची साडी. [सं. हंड; हिं.] ०**पळी**–स्त्री. (ल.) वरणभात; नवऱ्यापेक्षां दिसण्यांत मोठी नवरी असलेलें जोडपें.

**हडि**—उद्गा. कुत्र्यास हाकलण्याचा शब्द. हड पहा.

**हडी**—स्त्री. (कु.) चर; खुलाण.

**हंडी**—स्त्री. १ लहान हंडा किंवा मडकें. 'कां पाषाणाचिया माथां। हांडी फुटली पार्था।'–ज्ञा १६.३६८.(समासांत) दह्यांडी; उकडहंडी. २ मोठ्या पेल्याच्या आकाराचा एक कांचेचा टांगावयाचा दिवा. [सं. हंड] **हंडीशीं हंडी फुटणें**–अत्यंत खेंचाखेच, गर्दी होणें. ०**मडकीं**–न.अव. (व्यापकपणें) स्वयंपाक इ० चीं भांडींकुंडीं.

**हंडीबाग**—पु. १ गारुडी, नजरबंद इ० लोकांचा हस्तक, पोऱ्या. २ (ल.) चलाख, प्रौढबुद्धी, चाणाक्ष पोरगा. ३ नेहमीं स्वयंपाकघरांत खाण्यासाठीं घुटमळणारें मूल. ४अन्न मिळविण्याच्या कामीं खटपट न करतां नेहमीं खाण्याकडे मात्र लक्ष ठेवणारा माणूस; आळशी परान्नपुष्ट व्यक्ति. [हिं.]

**हडुं(डों)ग**—नपु. १ अडथळा; मोडा; विघ्न. (क्रि० घालणें; पडणें). २ अडचणीची स्थिति; व्यत्यय. (क्रि० करणें; होणें).

**हडुक**—न. १ लहान हाड. २ (अल्पार्थी) हाडूक. [हाड]

**हडे**—क्रिवि. (कु.) इकडे.

**हंडें**—न. १ लहान-मोठें स्वयंपाकाचें भांडें. २ (हेटाळणीच्या अर्थानें) हंडी. [हंडा] **०भांडें-मडकें**-न. हंडीमडकीं पहा. **०साडी**-स्त्री. हंडा अर्थ २ पहा. **हंडोल-हंडूल**-न. १ लहान हंडा. २ (तिरस्कारार्थी) हंडें; हंडी.

**हडोळ-ळी**—स्त्री. हडळ पहा.

**हडोळा-ळी**—पुस्त्री. हडकी; हाडोळा पहा.

**हडौती**—स्त्री. गळ्याखालील हाडांचा खळगा. ' मग कंठनाळ आटे। हनुवटी हे हडौंती दाटे। ' -ज्ञा ६.२०७. [हाड+वाटी?]

**हड्डी**—स्त्री. हाड. [देप्रा. हड्ड; म. हाड] **०नरम करणें**-चांगलें, बेदम मारणें. -नारुकु ३.६२.

**हड्डें**—न. (गो.) छाती; स्तन. **हड्डयांत कलकलणें**-(गो.) छाती धडधडणें.

**हड्या**—पु. १ कुत्रा, कावळा इ० पशु; हडकें खाणारा, चघळणारा. -उद्गा. कुत्रा पक्षी वगैरे हांकलण्याचा शब्द. हड पहा. [ध्व.]

**हड्या**—पु. (व.) बैलगाडी खालीं टेकण्याचा धुरीला जोडलेला खुंटा.

**हड्यावर्ण**—पु. अस्थिगत व्रण. हाड्यावर्ण पहा.

**हण**—पु. हूण लोक व त्यांचा देश. [सं. हूण]

**हणगें**—न. (कों.) हिणगें; एक प्रकारची कळकाची टोपली.

**हणगोबा**—पु. १ हनुमान. २ मूर्ख, अडाणी, सुस्त माणूस. ३ (निंदार्थी) दुसऱ्याच्या तंत्रानें वागणारें बाहुलें; शेंदूर फासलेला दगड. [सं. हनुमान्] **०करणें**-१ स्वतःच्या अकलेनें ज्यास काम करतां येत नाहीं त्यास तें करावयास उद्युक्त करणें; घोड्यावर बसविणें. २ परदेशीं गेलेला मनुष्य परत येईल कीं नाहीं हें ठरविण्यासाठीं त्याची शेणाची प्रतिमा करणें. **मारून मुटकून (कुटून) हणगोबा करणें**-बळेनें एखाद्याकडून विशिष्ट काम करून घेणें

**हणणें**—उक्रि. १ हाणणें; मारणें; तडाखा देणें. २ छाटणें; तोडणें; काटणें. ३ ठार मारणें. [सं. हन; प्रा. हण] **हणविणें**-उक्रि. १ हणणें पहा. २ मारविणें; हणणें प्रयोजक.

**हणभर**—वि. (गो.) दणकट (माणूस).

**हणम**—वि. १ (प्रा.) मोठ्या व उभ्या शिंगांचें (जनावर). २ (ल.) मोठ्या शरीराचा; थोराड; धिप्पाड (माणूस, पशु).

**हण(णु)मं(वं)त**—पु. हनुमान; मारुती. [सं. हनुमान; प्रा. हणुमंत-वंत] **०भोंवरा**-पु. एक फूलझाड व त्याचें फूल. **हणमंताचें शेंपूट**-न. लांबलचक गोष्ट; त्रासदायक काम; मारुतीचें शेंपूट.

**हणवटली, हणवटी, हणू, हणवी**—स्त्री. हनुवटी; हनु. [सं. हनु]

**हणा**—स्त्री. घोड्याच्या जिनाची सोंड. [हिं. हणा; का. हणे=बुंधाचा वरचा भाग]

**हणेफणे**—पु. (बे.) हुतूतूचा खेळ.

**हत्**—उद्गा. पशु इ० हांकलून लावतांना, मनुष्यास रागानें झिडकारतांना उच्चारावयाचा शब्द. [ध्व.]

**हत**—वि. १ तडाखा लागलेला; ठोकलेला. २ ठार मारलेला. ३ (ल.) नाश पावलेला; लोपलेला; खुरटलेला इ० अर्थानें समासांत उपयोग. उदा० हत-ज्ञान-पराक्रम-दैव-श्री इ०. [सं. हन्-मारणें] **०दैव-भाग्य**-वि. कमनशिबी; हीनभाग्य; दुर्दैवी. **०लज्ज**-वि निर्लज्ज; विनयहीन. **०वीर्य**-वि. दुबळ; नामर्द; ताकद नसलेला; सत्त्व-गुण-जोम-महत्त्व-सामर्थ्य नाहींसें झालेला (मनुष्य, प्राणी, औषध, वनस्पति इ०). **०श्री**-वि. संपत्ति, भरभराट, वैभव नष्ट झालेला; कंगाल; गरीबी आलेला. **०ज्ञान**-वि. बुद्धि, समज नष्ट झालेला. **हताश**-वि. निराश; आशानष्ट; दुर्बळ. [हत+आशा]

**हत-करवत-खंड-खवणी-नळा-पाणी, हता-निराळा-वेगळा, हतोटी, हतोफळी**—हात शब्दामध्यें पहा.

**हत(द)गा**—पु. भोंडल्याप्रमाणें पावसाळ्याच्या आरंभीं (हस्त नक्षत्राच्या वेळीं) मुली एक खेळ खेळतात तो. [सं. हस्त; प्रा. हत्थ]

**हत(द)गा**—पु. अगस्ता; एक फूलझाड, याच्या फुलांची भाजी होते.

**हततुक**—स्त्री. अटकळ. -शर

**हतरकी**—स्त्री. (कों.) जमीन भाजण्याचे टहाळे वगैरे. [हांतरणें]

**हंतरणें, हंतरी, हंतरूण**—अंथरणें, अंथरी इ० पहा.

**हतरूं, हतरूड**—न. (तिरस्कारार्थी) हत्ती.

**हतवटी**—स्त्री. हातवटी पहा. ' शंखासुर मर्दिला समुद्र मंथिला धन्य तुझ्या हतवटी। ' -पला १.२१. ?

**ह(हा)तवसणें**—सक्रि. हस्तगत करणें. ' एवं प्रपंचाचें जें स्फुरण। तें स्वप्रकाश ब्रह्मपूर्ण। तें हातवसूनि ब्रह्मज्ञान। विकल्पच्छेदन हरि करी। ' -एभा २८.२९९. [हात]

**हतवा**—पु. हत्ता; केशर-कुंकु इ० नें भरलेल्या हातानें भिंतीवर उठविलेलें हातानें चिन्ह. (क्रि० देणें). [हात]

**हंता**—वि. १ तडाखा, ठोसा मारणारा. २ ठार करणारा. [सं.]

**हतासन**—न. (प्रा.) निमित्त; मिष. -शर

**हतियार-येर, हतेर**—हत्यार पहा. 'आपण हात आपण हतियार।' -ज्ञा ११.२१४.

**हतोडा**—पु. घण; ठोकण्याचें साधन. [ हिं. ] **हतोडी**—स्त्री. लहान हतोडा. [ सं. हस्त+ताड; प्रा. हत्थाड ]

**हत्ता**—पु. १ तालमींत दंड काढावयाच्या वेळीं हात टेंकण्याकरितां केलेले दगडाचे, विटेचे, लाकडाचे, मातीचे ठोकळे किंवा ओटे. २ चेंडू, कवडया इ० खेळतांना जेथून खेळावयाचें ती जागा, मर्यादा. ३ हस्तचिन्ह; हतवा पहा. ( क्रि० देणें ). [ हात ] **केवडयाचा हत्ता**=केवडयाचें अपुरें उमललेलें कणीस.

**हत्ती**—पु. १ सोंड असलेलें एक प्रचंड जनावर; गज; कुंजर; वारण. २ नक्षत्रमालेंतील १३ वें नक्षत्र; हस्त. म्ह० पडेल हत्ती तर पाडील भिंती. ३ ( जरतार ) तूर ज्यांत फिरते तो खांब. ४ बुद्धिबळांतील एक मोहरें. [ सं. हस्तिन्; प्रा. हत्थि ] म्ह० १ हत्तीला अंकुश केवढा असतो! ( मोठयाला लहानहि भारी होतो ). २ हत्ती गेला व शेंपटाशीं अडकला-एखादें प्रचंड काम अखेरपर्यंत सुरळीत होऊन शेवटीं मात्र नासणें. ३ हत्ती चालतो आणि कुत्रे भोंकतात-श्रेष्ठांचा मत्सर करणारे लोक असतात पण त्यांचें कांहीं चालत नाहीं. ४ हत्तीबरोबर बैलाचें वारगोळें. **०दारांत झुलणें**-अत्यंत श्रीमंती असणें. ( वाप्र. ) **हत्तीचा अंकुश**-पु. ( ल. ) चोपून काम करून घेणारा. **हत्तीचा पाय**-पु. १ ( ल. ) ज्याच्या औदार्यानें, श्रीमंतीनें पुष्कळ लोकांचा संसार सुखानें चालतो अशी व्यक्ती, काम, धंदा, नोकरी, इस्टेट इ०. २ एक खेळ. **०दांत**-पुन. हत्तीचा दांत; हस्तीदंत. **०दांती**-वि. हस्तिदंती (काम, वस्तु इ०). **०पाव**-न. पांढरें रेशीम. **०बार**-पु. हस्तनक्षत्राच्या पावसानें येणारें पीक. दुसरीं दोन पीकें-मृगबार, आंबेबार. **०भोग**-पु एक प्रकारचा जाड तांदूळ. **०महाल**-पु. हत्तीखाना. **०सोंड**-पु. एक मुलांचा खेळ. **हत्तीण**-स्त्री. हत्तीची मादी. **हत्तीचें उथाण**-न. हस्तनक्षत्राच्या वेळचा अतिशय उकाडा. **हत्तींच्या आहारांत लाखो मुंग्यांचा आहार चालणें**-थोरांच्या खर्चांत अनेक गरीबांचा आपोआप समावेश होणें. **हत्तीच्या गंडस्थळीं बसणें**-थोर वैभवास चढणें. **हत्तीच्या दांतासारखे दांत असणें**-दुटप्पी वर्तन असणें. ( हत्तीचे खायचे दांत व दाखवावयाचे दांत निराळे असतात यावरून ). **हत्तीच्या पायांत-पावलांत -सगळयांचे पाय-पावलें**-मुख्य व्यक्तींत हाताखालील सर्व व्यक्तींचा समावेश आपोआप होतो. **हत्तीवर बसणें**-मदांध होणें; दारूनें मत्त होणें. **हत्तीशीं टक्कर घेऊं नये**-बलिष्ठाशीं वैर करूं नये. **हत्तीस ओंढाळ कोण म्हणेल?** -थोरांचें बिंग बाहेर कोण फोडील? **हत्तीसारखें वतन**-अलोट संपत्ति; वैभव. **हत्ती होऊन लांकडें खाणें, मुंगी होऊन साखर खाणें**-मोठे ( गर्विष्ठ ) पणानें आपदा येतात तर नम्रतेनें सुख लाभतें. **हत्तीचें मढें-प्रेत**-१ अवाढव्य, बोजड, न पेलणारें प्रकरण, काम. २ फार कंटाळवाणें, त्रासदायक काम. ( क्रि० पुरणें; उचलणें ). 'मला हत्तीचें मढें पुरावयाचें आहे.' **हत्तीच्या पायानें जाणें**-फार सावकाश जाणें ( रोग, इ० ) **०खाना**-पु. हत्ती ठेवण्याची जागा; पीलखाना.

**हत्या-त्या**—स्त्री. १ हिंसा; खून; वध; एक फौजदारी गुन्हा. उदा० आत्महत्या. २ ( निंदार्थी ) मरतुकडा, रोगट, अशक्त माणूस किंवा पशु. [ सं. ] **हत्यारा**-वि. हत्या करणारा; खुनी. उदा० बाळ-ब्रह्म-गो-पितृ-गुरु-हत्यारा. 'दशरथ पातकी ब्रह्महत्यारासी। नवल त्याचे कुशीं जन्म तुझा।' -तुगा ९४८. [ सं. हत्याकार ]

**हत्या, हत्त्या**—पु. १ ( विणकाम ) हात्या; मागाच्या फणीचा दांडा; हात. २ उभे दोरे जींत ओवलें आहेत अशी फणी बसविलेली लांकडी चौकट ३ रहाटाच्या चाकाचा दांडा. ४ हत्ता पहा. [ हात ] **०दांडी**-स्त्री. वरील फणीची चौकट; महादेव पार्वती.

**हत्याण**—न. गाढवी, घोडी इ० स्त्री जनावर माजावर येणें, त्यास संभोगेच्छा होणें. **०करणें-हत्याणास येणें**-माजास येणें.

**हत्यार**—न. १ शस्त्र; आयुध. २ अवजार; साधन; उपकरण ( धंदा चें, कामाचें ). [ सं. हन्-मारणें. दे. प्रा. हत्थियार हिं. हथियार ] **०बंद, हत्यारी**-पु. सशस्त्र शिपाई; लष्करी माणूस. -वि. शस्त्रधारी; सशस्त्र.

**हत्रूं**—न. ( तिरस्कारार्थी ) हतरूं; हत्ती.

**हद, हदनामा**—हद्द, हद्दनामा पहा.

**हदगा**—पु. हतगा पहा.

**हदन**—न. परिमाण; प्रमाण. -स्त्री. १ ( कों. ) योग्य रीत, क्रिया ( एखादी गोष्ट करण्याची ). २ ( गो. ) योग्य वेळ. [ का. ]

**हदरणें**—अक्रि. १ हालणें; कंप पावणें; थरथरणें; लटपटणें. २ धक्यामुळें, भीतीमुळें क्षुब्ध होणें; मनास धक्का बसणें. ३ -उक्रि. धक्का देणें; गदगदां हालविणें. [ ध्व. ] **हदरा**-पु. धसका; धक्का; गदागदां हलणें.

**हदहदणें**—अ. हदरणें पहा.

**हंदा**—पु. ( उ. कों. ) शेतमजुरीचे कामांत शेतकऱ्यांनीं परस्परास करावयाची मदत; इरजीक.

**हदाल-ळ**—वि. थोराड; प्रचंड; मोठा; स्थूल ( जनावर, वस्तु ). [ हदा; तुल० का. हदुल ] **०पार्वती-पारोती**-स्त्री. अतिशय स्थूल, फोपशी बाई; फातिमा.

**हवालीफुवाली-ळी**—स्त्री. पुदवा, पुदाडा पहा. ( क्रि० काढणें; घालणें; पाडणें; करणें ). [ पुदाली द्वि. ]

**हदी**—पु. वाटाड्या. 'आपणांपासीहि हे स्थलाचे हदी ज्याणी स्थल पाहिले असेल ते विदीत करतीलच.' -पेद ३. १८३. [ अर. हादी ]

**हदीस**—स्त्री. पैगंबराचें वाक्य. -वाड २३. [ अर. हदीस् ]

**हंदु( द )ळणें, हंदुळहिंदुळ, हंदळहिंदळ**—हांदुळणें इ० पहा.

**हदेरा**—वि. घाणेरडा; ओंगळ; हगरा. [ सं. हद=विष्ठा ]

**हंदोळविंदोळ**—स्त्री. चळवळ. -शर. -वि. चळवळ्या. [ हांदुळणें द्वि. ]

**हद्द**—स्त्री. १ मर्यादा; बांध; कांठ; कड. २ शेवट; पराकाष्ठा; तड; अतिरिक्तता. 'आतां हद्द झाली.' -सभासद ६६; -वाड-सनदा १७३. [ अर. ] **०नामा**-पु. १ गांवशिवेचें टांचण; शेत-सीमांची नोंदवही. २ इनाम किंवा वहित शेतांचें सीमापत्रक. -पुस्त्री. हद्द अर्थ २ पहा. **०महदूद-मौदूद**-स्त्री. मर्यादा; सीमा (सामान्यतः). -वि. मर्यादित; सीमांनीं युक्त 'हद्दमहदूद पांढरीवरी जें उत्पन्न होईल तें निमें दोनी ठाईं तारोतार वांटून द्यावें.' -रा १५.५१. [ अर. हद्द+महदूद् ] **०हदूद**-स्त्री. मर्यादा. 'हद्द-हदूद बांधणें' -रा ६.५७९.

**हद्या**—पु. रेडा; हेला. [ हल्या ]

**हन**—अ. १ अन्; आणखी. २ हि; पादपूरणार्थक शब्द. 'अथवा नावें हन जो रिगे।' -ज्ञा ४.९७. [ आणि-अन्-हन् ]

**हनन**—न. १ वध हिंसा; ठार मारणें. २ मारणें; ताडन. ३ काटणें; छाटणी. [ सं. हन्=मारणें ] **हननीय**-वि. ताडन करण्यास, ठार मारण्यास योग्य.

**हनवट**—पु. स्त्रियांचा पायाच्या बोटांत घालावयाचा एक दागिना. अणवट, अनवट पहा.

**हन( नु )वटी, हनु**—स्त्री. तोंडाच्या खालच्या जबड्याचा पुढील भाग; दाढी; चिबुक. [ सं. हनु+सं. पट्टी; प्रा. वट्टी; म. वटी ] **हनुवटी**-स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखेपु ३३७ **हनुग्रह-स्तंभ**-पु. दांतखीळ बसणें. [ सं. ]

**हनपट्टी**—स्त्री. (बे )गाडीच्या साट्यांतील पुढची लाकडी पट्टी.

**हनुमंत-मान्**—पु मारुती; बजरंगबली. [ सं. ] **म्ह०** १ गांव जळाला, हनुमंत निराळा=कळ लावून देऊन स्वतः नामानिराळा रहाणारा. २ सूर्यापुढें दिवटी हनुमंतापुढें कोल्हाटी. **०जयंती, हनुमज्जयंती**-स्त्री. मारुतीची जन्मतिथि; चैत्री पौर्णिमा.

**हनोज**—क्रिवि. अद्यापि; अजून. -रा १०.१६४. [ फा. हनोज़् ]

**हपका**—पु. अपका (चुलीवरचा पदार्थ इ० वर दिलेला); जोरानें पाणी इ० शिंपडणें; शिपका. ( क्रि० मारणें; टाकणें; देणें ). [ध्व.]

**हपटणें**—उक्रि. अपटणें पहा.

**हप( ब )शी**—पु. १ अबिसीनिया देशांतील माणूस; सिद्दी. २ श्यामल; जंजिरेकर. [अर. हबशी ] **०पट्टी**-स्त्री. १ हबशी सरकारनें बसविलेली पट्टी. २ सक्तीची, जुलमी पट्टी, कर. **हप( ब )सा( शा )ण**-न. १ अबिसीनिया देश. २ दक्षिण कोंकणांतील हबशी राजाच्या ताब्यांतील प्रांत; जंजिरा. ३ यांतील लोकांचा तेथील अंमल. **हप( ब )सा( शा )णी**-वि. हपसाणाविषयीं; हबशा संबंधीचा ( प्रांत, अंमल इ० ).

**हपाप**—पु. १ शिव्याशाप; तळातळाट ( क्रि० घेणें; देणें ). 'माझे हपाप तुला भोंवतील.' २ जुलूम; त्रास; छळ. (क्रि० लावणें, देणें; लागणें; बसणें; चालणें). **म्ह०** हपापाचा माल गपापा= जुलुमानें दुसऱ्याकडून काढलेलें द्रव्य आलें तसें लवकर जाणें. **०णें**-(क्वचित्) जुलुम सोसणें; जुलमामुळें तळतळणें; हांकाटी करणें. [ सं. हा ! पापम् ! ] **हपापी**-स्त्री. भय; भीति; धडकी. ( क्रि० घेणें; सुटणें; लागणें ).

**हपाप**—स्त्री. हांव; अनावर इच्छा. 'वाढती श्रीमंती, वाढता लौकिक याविषयींची माझी हपाप कांहीं कमी होईना.' -वांईकर भटजी. [ ध्व. हप् ] **हपापणें**-अक्रि. १ हांव करणें; फार लोभ सुटणें; लोभी दृष्टि ठेवणें. २ अतिशय उतावीळ होणें; उत्कंठित होणें.

**हपीस**—न. कचेरी. 'रजिष्ट्राचें हपीस आणि मामलतदार कचेरी थोड्या तासांच्या प्रवासानें मिळण्यासारखी असेल.' -आगर ३.८५. [ इं. ऑफिस ]

**हपूस**—पु. एक उत्कृष्ट जातीचा कलमी आंबा. [ पोर्तु. अल्फान्सो ]

**हप्ता, हफ्ता**—पु. १ पैसे ( पगार, मजुरी इ० ) देण्याची ठराविक दिवसांची मुदत. २ मुदतींत दिलेला किंवा द्यावयाचा पैका एकदम देतां न येणाऱ्या रकमेचा ठराविक मुदतीनें थोडाथोडा देण्याकरितां ठरविलेला भाग; किस्त. 'बाकी निमे ऐवज राहिला त्याचे तीन हप्ते ठरले आहेत.' -वाडसमा १.३४४. ३ आठवडा; सप्ताह. [ सं. सप्ताह; फा. हफ्ता=आठवडा ] **हप्तेबंदी**-स्त्री. १ हफ्त्या हफ्त्यानें रक्कम फेडण्याचा ठराव. २ हफ्त्यानें करावयाची फेड.

**हबक, हबा**—उद्गा. खंडोबाचा भक्त अंगांत आणतांना काढतो तो शब्द, उद्गार. [ ध्व. वाघाची आरोळी ] **हबकणें**-अक्रि. १ भक्ष्यावर उडी मारतांना वाघ इ० नें डुरकाळी फोडणें; डरकाळणें. २ हबा ! हबा ! असें ओरडणें ( वाघ्यानें ).

**हबक**—स्त्री. १ धक्का बसण्याची जागा; नुकसानीचा धंदा, व्यापार. २ आलेलें नुकसान; तोटा. ( क्रि० येणें; बसणें; देणें ). ३ बाईट प्रसंग; अडचण; त्रास; लचांड; कटकट ( क्रि० येणें ) ४ धक्का; आचका; हिसका; हबका. ( क्रि० बसणें ). [ ध्व. ] **हबकणें**-उक्रि. १ जोरानें हलविणें; धक्का देणें, बसणें; हिसकणें. २ ( ल. ) लुगाडणें; लुटणें; बुचाडणें. ३ जोरानें खालीं आदळणें; आपटणें. **हबका**-पु. १ धक्का; हबक ( ४ ) पहा. ( क्रि० बसणें; देणें, मारणें ). 'गाडयावर बसून चाललें म्हणजे अंगास हबके बसतात.' २ तोटा; हबक अर्थ २ पहा. ३ जोरानें पाण्याचा शिपका मारणें ( भात इ० वर ); हपका पहा. ( क्रि० मारणें, टाकणें ). **हबकी**-स्त्री. १ धक्का; हबक अर्थ ४ पहा. २ ( ल. ) तोटा; हबक अर्थ २ पहा.

**हंब( बा )रणें**—अक्रि. गाईबैलाचें हम्मा ! असें ओरडणें. [ ध्व. ] **हंब( बा )रडा**-पु. १ गाई-बैलांचा शब्द; डुरकणें. २ (ल.) आक्रोश; दीनवाणी रडणें. ( क्रि० फोडणें ). 'फोडिती हंब रडा या हरिचा लागे सुहृत्कदंब रडाया.' -मोकृष्ण ५३.१७.

**हंबरातुंबरी**—स्त्री हमरीतुमरी पहा.

**हंबरू**—पु. ( महानु. ) गळफांस 'तैसा प्रपंचाचां हंबरु। केवि ल्ये जिउ निराकारु।' -भाए ५९६.

**हंबरू**—पु हमरु पहा.

**हंबलणें**—सक्रि. गिळणें.

**हबा**—उद्गा. हबक पहा.

**हबा, हंबा**—स्त्री. १ ओरडा, हंबरडा पहा. २ ( मुलांच्या भाषेंत ) गाय इ० जनावर. [ ध्व. ] -क्रिवि. गुरांच्या ओरडण्या-प्रमाणें. **हबासणी**-स्त्री. जोरानें ओरडणें; खेंकसणें.

**हबा( वा )र**—पु. जमीन सारखी करून घेणें. -वि. सपाट; समपातळींत.

**हंबि( बी )र**—पु. १ थोर पुरुष; सरदार; अमीर. 'आले कचेरीस बोलाविले हंबीर।' -इपुश्लिपो २२०. २ योद्धा. [ अर. अमीर् ] ०**राव**-पु. एक किताब.

**हंबुलें**—न. ( गो. ) हंबरणें. [ ध्व. ]

**हबू**—पु. ( गो ) बाऊ.

**हंबेतुंबे**—नस्त्री. अरेतुरे; हमरीतुमरी. [ हिं. ]

**हबेधुबे**—स्त्री. आदळआपट. 'गद्दयाचे बाह्य स्वरूपावरून लांबच्या प्रवासानें त्याची फार हबेधुबे झाली असावी.' -घारपुरे-कृत स्यूत सौतिक पृ ९४.

**हबेरा**—पु. खेच; ओढ.

**हबेलंडी**—स्त्री. १ घाबरगुंडी; दुर्दशा; गाळण; पच्ची. २ पंचाईत; अडचणीची स्थिति; फजीति; हलबेलंडी पहा. [ हिं. हा+बे+लंडी ]

**हम**—वि. सर्व. [ फा. हमह; अर. आम् ] ०**खास-खास्त**-क्रिवि. १ प्रसिद्धपणें; जाहीररीतीनें; लहानमोठया सर्वा लोकांसमक्ष-करितां-बरोबर. 'म्यां हमखास रुपये दिल्हे आणि तो नाहीं म्हणतो.' 'हमखास दर म्हणाल तर बारा रुपये खंडी आहे.' २ निश्चयपूर्वक; खात्रीनें; हटकून. ३ सर्वसामान्य. [अर. आम+खास] ०**चौरस**-वि. चारी बाजू सारख्या असलेला. ०**चौरस बिलवर**-ज्या बिलवरावरील पैलू चौरस आकाराचे असतात असा बिलवर. ०**जात**-स्त्री. सर्व जातीच्या, प्रकारांच्या लोकांचा समुदाय; सर्व प्रकारची जनता. (क्रि० जमणें; मिळणें). 'येथें हमजात मिळाली, कोण कोण्हाला पुसतो.' -वि. १ त्याचा जातीचा ( माणूस, जनावर ). २ सारख्या वयाचा. ०**रंग**-पु. (गंजिफा) एकच रंग; तोच रंग. -वि. एकाच रंगाचा. ०**रस्ता-रहा**-पु. रहदारीचा, सार्वजनिक रस्ता; राजमार्ग.

**हमगी**—वि. सर्व. 'खानगौडा दत्तक घेतलेला व तिघी बायका हमगीस आणून ठेविलें.' -ख ९.४६९८. [ फा. ]

**हमतामी**—वि. ( गो. ) कर्तबगार

**हमन( ण )गोळा**—पु. ( बायकी ) १ ओबडधोबड गोळा ( कणीक, शेण, चिखल इ० चा ). २ फोफशी, लठ्ठ व्यक्ति. ३ वेडावांकडा ढीग, रास ( भिंत इ० ). ४ ( निंदार्थी ) ढेरपोटें, आळशी मूल. [ हणम+गोळा ]

**हमरा**—वि. ( नाशिक ) लायक; समर्थ; बरोबरीचा. [ फा. हम्राह् ] **हमराई**-स्त्री. १ हुशारी; लायकी. २ संगत; जूट. 'ज्यांजबर रुपया येतो त्यांजला जखम लागली असतां हळद-फटकूं मिळणें कठीण. तेव्हां फौजेची हमराई राहते कशी ?' -हौके ३०.

**हमरातुमरा, हमरीतुमरी**—स्त्री. अरेतुरे; एकेरीची भाषा; जोराचें भांडण; हबरातुंबरी पहा. [ हिं. ]

**हमराह**—क्रिवि. संगती; बरोबर; सामील. 'आपलें उत्तम जाणाल तें करणें; आम्ही तुमचे हमराह आहोंत.' -रा १.१९८. [ फा. हम्राह् ] ०**करणें**-गोळा करणें. 'फौज हमराह करून सुभा पातशाई याजवर आणून घालावे.' -हौके ७.

**हमरू**—पु. किनारीदार रेशमी वस्त्र. [ फा. आमरू ]

**हमरो**—पु ( गो. ) उंबरठा.

**हमलो**—पु ( गो. ) तांबडी मुंगी.

**हमशा, हमशाधुमशा**—पु. धुडगूस; धांगडधिंगा, बाचा-बाची; ओढाताण. ( क्रि० घालणें; मांडणें; माजणें; चालणें ). [ ध्व. ]

**हमशाई**—स्त्री. १ शेजार; शेजारसंबंध. शाई पहा ( क्रि० लागणें; असणें ). २ शेजार हक्क; समाईक भिंतीचा वगैरे हक्क. -वि. शेजारील. 'त्या प्रांतीचे वतनदार हमशाई गांवीचे.' -रा १५.८०. [ फा. हम्सायः ] ०**शाईदार**-वि. शेजारी.

**हमसर**—पु. ग्रामस्थ. -पेद १०.७०.

**हंमा**—हंबा पहा.

**हमाणी-नी, हमीण, हमिणी-नी, हमेणी**—स्त्री.पुस्त्री. १ पैसे ठेवण्याची लांब पिशवी; कसा. 'कंबरेस हमिन्या द्रव्याच्या.' -मदरु १.६४. 'जिनसवार हमीणे दिल्हे.' -इमं ७. २ कोडबोळें. [फा. हम्यानी]

**हमाम**—पु. उखळ; खल. [फा. हावन्. हिं.] **०दस्ता**-पु. खल व बत्ता. [हिं.]

**हमामखाना**—पु. न्हाणीघर; स्नानगृह. [अर. हम्माम्+फा. खाना]

**हमामा**—पु. १ गुराख्यांचा एक खेळ. 'पेंधा म्हणे यमुनेसी। तूं बायको होऊन आम्हासीं। हमामा आजि घालसी।' -ह १०.८९. २ (ल.) धुमश्चक्री; धुडगूस; धांगडधिंगा (खेळांतील). (क्रि० घालणें; मांडणें; माजणें; करणें). ३ अस्ताव्यस्त ढीग, रास; गडगा (माती, चिखल इ० चा); ओबडधोबड रचना (घर, भिंत इ० ची). हमशा पहा.

**हमामो**—पु. निवळीचें बीं.

**हमाल**—पु. १ ओझें वहाणारा मनुष्य; मजूर. २ पालखी इ० वाहून नेणारा माणूस; भोई. ३ अफूच्या बोंडांतील रसाचा घट्ट गोळा होण्यासाठीं तो रस तांब्याच्या पत्र्यावर तुडवून मळण्याचें काम करणारा इसम. हें काम हा इसम माजूमच्या कैफांत करतो. [अर. हम्माल्] **हमाली**-स्त्री. १ हमालाचा पेशा, धंदा, कामगिरी. २ हमालाची मजुरी. ३ बिन डोक्याचें-अक्कलेचें काम; केवळ शारीरिक कष्ट **हमाली चाकरी**-स्त्री. १ हमाली धंदा. २ मुख्यतः निरोप आणणें-पोहोंचविणें एवढी नोकरी. ३ हातावरचें काम; आज आहे उद्यां नाहीं असा रोजगार. ४ हलकें काम.

**हमिचा**—पु. तांब्याचे पैसे वगैरे ठेवण्याची, चारी पाय शाबूत आहेत अशा कोंकराच्या कातड्याची पिशवी.

**हमी**—स्त्री. जामिनकी (तिऱ्हाईत माणसानें भरण्याची); जिम्मा; खात्री. (क्रि० देणें; भरणें; घेणें; पटणें; पटविणें). [अर. हामी] **०टमी**-स्त्री. (सामा.) हमी; खात्री (क्रि० करणें; देणें; भरणें). **०तारण**-न हमीटमी. (क्रि० देणें; घेणें; पटविणें). **०दार**-वि. जामीन राहणारा. 'ती जवळून आपण ऐवजाचा हमीदार घेतला.' -ऐटि १.२२. **०दारी**-स्त्री. हमीदाराचें काम, पेशा. **०पत्र**-न. जामीनखत; खात्री पटविण्यासाठीं लिहून दिलेला कागद.

**हमीधुमीचा**—वि. दिखाऊ; डौलाचा; थाटामाटाचा; डामडौलाचा; दिपविणारा; झगझगीत; उठून दिसणारा (रूप, इ० समारंभ).

**हमीन**—स्त्री. खरतुडीचें मूळ, कांदा.

**हमीर**—पु. (संगीत) कल्याण रागाचा एक प्रकार.

**हमी(मे)श-शा**—क्रिवि. नेहमीं; सतत; चिरकाल. [फा. हमिशह्]

**हमु**—पु. अहंकार. -शर. [सं. अहम्; अर. हिम्यान्]

**हमरु**—पु. घोडा फिरविणारा. -शर. [फा.]

**हम्वार**—वि. प्रसन्न; सरळ. 'ज्यांत त्यांची मर्जी हम्वार राहे तें करणें योग्य.' -इमं २५५. [फा. हम्वार्]

**हय**—पु. घोडा; अश्व. [सं.] **०कुंडी**-वि. मानेवर भोंवरा असलेला (घोडा). हें घोड्याचें शुभ चिन्ह आहे. **०भंग**-वि. पोटावर पांढरे ठिपके असलेला (घोडा). हें अशुभ चिन्ह होय. **०मेध**-पु. अश्वमेध. **०विक्रय**-पु. घोडे विक्री. हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें निषिद्ध आहे. विक्रय पहा.

**हंय**—क्रिवि. (गो. कों. कु.) येथें. [सं. इह] **०सर**-(हेट.) येथवर. **०सून**-क्रिवि. येथून.

**हयकत**—स्त्री. (माण.) हाल; अपेष्टा; तारंबळ. [हाय!]

**हयकोल**—पु. सरी; गळ्यांतील बायकी दागिना. [अर. हैकल्]

**हयगई-य-यी, हैगई**—स्त्री. १ दुर्लक्ष; हेळसांड. 'परोपकार, परमार्थसाधन इ० पुण्यकर्माविषयीं हयगय केल्यास पाप वाढतें.' २ ढिलाई; चालढकल; दिरंगाई. 'सत्कर्माविषयीं हयगय करूं नये, आयुष्य थोडें आहे.' ३ बेफिकिरी; अनादरबुद्धि. 'घोड्याचे पोटाची हयगय केल्यास घोडा वाळेल.' [हिं.]

**हयता**—सना. (राजा. कुण.) १ तो; तो पलीकडचा. 'त्याची मीं तुला गोष्ट नाहीं सांगितली, हयता शेवटास बसला आहे तो त्याची गोष्ट.' २ ज्याप्रमाणें तो या सर्वनामापासून तिकडचा, तिकडे, तसा, तेवढा, तेथें इ० रूपें होतात त्याप्रमाणें हय या सर्वनामापासून. **हयतिकडचा, हयतिकडे, हयतसा, हयतेवढा**-इ० रूपें होतात. [हा+तो]

**हयपत-पती-वत-वती**—हैबत इ० पहा.

**हयराण-न, हयराणगत, हयराणी-नी**—हैराण इ० पहा.

**हयवान**—पु. १ पशु; जनावर; निर्बुद्ध प्राणी. २ (ल.) अगदीं अशक्त, नाजूक प्रकृतीचा माणूस. [अर. हयवान्=सजीव प्राणी]

**हयवासी**—वि. (कु.) स्वार्थी ?

**हयहाय-हुय**— हायहाय-हुय इ० पहा.

**हया**—स्त्री. लज्जा; विनय. [अर.]

**हयात-ती**—स्त्री. १ आयुष्य; जिंदगी; जिवंतपणा. 'आज पासून आमची हयात खुंटली येसें भविष्य केलें.' -भाज १८३४.

'काय हयाती बाकी असेल ते, ते स्थळीं अखेर होय तर उत्तम आहे.' –मत्रबा १.१५६. २ उमर; वय. –वि. जिवंत. [अर. हयात्] ०मुलाकात-मुलाखत–स्त्री. (कागदोपत्रीं) तुमची आमची जगून भेट (होणें). हयातीचा दम–१ आयुष्यांतील जोम; उत्साह; शक्ती; सत्त्व; वीर्य; रग. २ जगण्याची आशा, इच्छा. हयातीचा दम असला तर–आम्ही तुम्ही जगलों वांचलों तर.

**हयासा**—पु. धोड्याच्या तंगास लावण्याची वादी किंवा दोरीचा तुकडा; जेरबंद. [फा.]

**हय्यंगवीन**—न. कालच्या दुधाचें साजूक तूप. 'हय्यंगवीन जैसें सुरसिक रसनेपुढें न तेल टिके।' –मोवन. [सं.]

**हर**—पु. शंकर; शिव. 'तेथ हरु म्हणे नेणिजे। देवी जैसें कां स्वरूप तुझें।' –ज्ञा १.७१. [सं.]

**हर**—पु. (गो.) अजगर. म्ह० हर उवता म्होण गायंडोळ उवता=अजगर उडतो म्हणून गांडूळ उडतो.

**हर**—वि. (व) कठीण; टणक. ०हालणें–अक्रि. नरम होणें; थोडेंफार शिजणें (अन्न).

**हर. हरजीत**—स्त्री. हार, हारजीत पहा.

**हर**—वि. प्रत्येक; दरएक उदा० हरघडी-वखत-रस्ता-गांव-जागा इ०. [फा.] ०उपाय–पु. दरएक इलाज, युक्ति, साधन; सर्व, नाना इलाज, युक्त्या (विशेषतः अव. प्रयोग). ०एक–वि. १ प्रत्येक; जो जो कोणी तो तो. 'हरएक मनुष्यासमागमें पत्र पाठवून संतोषवीत असावें.' २ कसलाहि; कोणाचाहि. 'जुने लोक यांस हरएक उपद्रव न केला.' –मराचिस २८. ०एकरंगी–वि. निव्वळ एकाच रंगाचा (घोडा). हें अशुभ लक्षण आहे. अशुभ चिन्हें पहा. ०कशी–वि. कशीबशी; हरएक. 'हरकशी निभावणूक करून तंजावरपर्यंत आले.' –पेशवे० महाराष्ट्र २४४. ०कसबी–वि. १ हरएक कौशल्याचें काम करणारा; अष्टपैलू कारागीर. २ हरकामी. ०काम–न. प्रत्येक किंवा कोणतेंहि काम, धंदा; वेळीं उपस्थित होईल तें काम. ०कामी-काम्या–वि. १ जरूर पडेल तें तें काम करण्यास तयार असलेला; अशा बोलीनें ठेवलेला (माणूस). २ कोणतेंहि किंवा दरेक प्रकारचें काम करण्यास समर्थ असलेला; कोणतेंहि काम करण्यास ज्याचे हात वळतात असा. ३ अनेक प्रकारें उपयुक्त होणारी (वस्तु). ०कोणही-कोणी–वि. १ भलतासलता कोणी. २ प्रत्येक जण; दरएक. ०घडी–क्रिवि. वारंवार; प्रत्येकक्षणीं;; नेहमीं; घटकोघटकीं. ०जिन्नस–पु. सर्व तऱ्हेचा माल, जिन्नस; किरकोळ व्यापारी वस्तू. ०जिनशी-सी–वि. हरएक, अनेक जातीचा-प्रकारचा; सर्व प्रकारचा. 'त्याचे दुकानीं लहान मोठे गोड आंबट असे हरजिनसी आंबे आहेत.' ०तऱ्हा–स्त्री. प्रत्येक रीत, योजना, युक्ति, साधन इ० (विशेषतः अव. प्रयोग); नाना तऱ्हा-प्रकार. [फा.] ०दम–क्रिवि. हरघडी. ०दमख्याली–पु. १ दरेकक्षणीं नवीन कल्पना, लहर, ख्याल. २ (अव.) अनेक युक्त्या, यत्न, बेत, योजना, साहसें, श्रम. 'हरदमख्याल करून त्यानें लग्न केलें.' ३ शोधकता; कल्पकता; हिकमत. 'ज्याचे अंगीं हरदमख्याल नाहीं असला एकमार्गी काय उपयोगी?' ०दमख्याली–वि. १ फार उलाढाल्या करणारा; चळवळ्या; उद्योगी; युक्तिबाज. २ (ल.) लहरी. '(शिंदे) जात्या हरदमख्याली...कसें करितील याचा विश्वास नाहीं.' –ख ७.३२. ३ लबाड. 'त्यांत तो (हैदर) हरदमख्याली आहे.' –ख १०९६. ०प्रयत्न-प्रेत्न–पु. प्रत्येक प्रकारची खटपट, श्रम, योजना. २ (अव.) सर्व प्रकारच्या खटपटी इ०. ०बयाज-द-बहाणा–पु. दरएक सबब; ढोंग, युक्ति, कावा, खोटी कहाणी (अपराध्यानें पुढें केलेली). (क्रि० करणें). ०बाबी-बाब–वि. दरेक बाबीसंबंधींचें (बाब=जमाबंदीचा प्रकार). जसें-हरबाबी बंद-कागद-हिशेब-वसूलबाकी इ०. ०भास–वि. फार हुशार; अष्टपैलू; सर्व गोष्टींत निपुण; बहुगुणी. ०भांत–वि. १ वरील शब्द पहा. २ सर्व प्रकारचा; जातीचा, तऱ्हेचा, नानाविध. ०मळ-माळ–स्त्री. १ माणसें, गुरें इ० ची चालणारी रांग, ओळ, जाणाऱ्यायेणाऱ्यांची माळका. (क्रि० लावणें; लागणें; चालणें; टळणें; मोडणें). २ नेमलेली, ठरविलेली वेळ. (क्रि० संभाळणें; साधणें; टळणें; चुकणें). ३ परिचय; घसट; वावर. ०युक्ती–स्त्री. दरेक उपाय, योजना, बेत, मसलत; (अव.) सर्व उपाय इ०. ०येक–वि. हरएक पहा. ०वखत–क्रिवि. हरघडी. ०वळ–स्त्री. हरमाळ अर्थ १ पहा. ०साव–न. चोर, शत्रू इ० धाडीवर, सर्व प्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन उठलेला गांवकऱ्यांचा, शेतकऱ्यांचा समूह, थवा. (क्रि० उठणें, मिळणें). ०हमेश-शा–क्रिवि. नेहमीं. ०हुन(न्न)र–न. प्रत्येक कौशल्य, युक्ति, कसब; (अव.) सर्व कलाकौशल्य. ०हुन(न्न)री–वि. हरकसबी; हरहुन्नर जाणणारा.

**हर**—वि. १ हिरावून नेणारा; उचलून नेणारा; पळविणारा. (समासांत) 'धन-कीर्ति-सुख-कफ-वात-ज्वर-हर इ०' २ (गणित) भाजक. ३ (गणित) अपूर्णांकाचा छेद. [सं. हृ=हरण करणें] ०क–पु. चोर; लुटारू. –वि. हरण करणारा; हर अर्थ १ पहा.

**हरक**—न. एक प्रकारचें पांढरें कापड; हारक. [इं.?]

**हरकणें**—अक्रि. (क.) हुरळणें; हर्षित; होणें. हरखणें पहा.

**हरकत**—स्त्री. १ अडथळा; आडकाठी; विरोध; अडकविण्याचें, थांबविण्याचें कोणतेंहि कृत्य, प्रकार (क्रि० करणें). 'बेडर मजकूर काबू वख्त पाहून जागा व मकानें घ्यावयाचे उद्देशें हरकत करणार.' –रा ५.६८. २ प्रतिकूल वर्तन, (देणें-घेणें-चाकरी इ० व्यवहारीं); अयोग्य कर्म. ३ विलंब; खोटी. [अर. हरकत्] ०खोर, हरकती–वि. हरकत करणारा, घेणारा

**हरकत**—स्त्री. ( संगीत ) विशिष्ट स्वरांची तान.

**हरक( को )ल, हरकलपटणी**—स्त्री. एक प्रकारचा तांदूळ, साळ.

**हरका**—पु. घोड्याच्या पाठीच्या कण्यास होणारा रोग. अश्वप २.३००.

**हरकारा**—पु १ दूत; निरोप्या; जासूद; बोलावणेकरी ( राजा, सरदार इ० जवळील. याचे हातीं गोंडा असलेली काठी असते ). २ हेर; टेहळ्या. ' तेथील लष्करची माहीयेत खरी कळावी म्हणून दोघे हरकारे पाठविले होते. ' –चिरा ४४. [फा. हर्कारा ] ०**गिरी, हरकारगी**-स्त्री. हरकाऱ्याचें काम, धंदा; जासुदी. ' तुजे बाप नार शेणवी यासी हरकारगी मिरास वेसाई यांणी मोकर करून दिवाण–चाकरीसी ठेविले होते ' –सासं ३ जुलै २५.

**हरकी, हर्की**–स्त्री. १ वादांत ज्याचा जय होतो, त्यानें हर्ष झाल्याबद्दल सरकारांत द्यावयाचें द्रव्य; नजर. ' कुंभार खरे झाले त्यांजपासून हरकी घेतली. ' –वाडसमा ३.२६५. २ हरवलेली वस्तु आणून देणारास दिलेली बक्षिसी. ३ चांगली नोकरी केल्याबद्दल, एकदम लाभ झाला असतां, एकाएकीं मित्रभेट झाली असतां, कोणतेंहि आनंददायक कृत्य चालू असतां वाटावयाचें बक्षीस. [ सं. हर्ष; म. हरख ] ०**पत्र**-न. बक्षीसपत्र. ०**शिरिणी–शेरणी**-स्त्री. १ हरकी अर्थ १ पहा २ आनंदाचे प्रसंगीं वांटलेली मेवामिठाई. [ शेरणी=मिटाई ]

**हरकीपत्र**—न. वादांत हरणारापासुन घेण्याविषयींचें पत्र. –शर. [ हरणें ]

**हरकेंड**—न. ( राजा. ) १ हरीक धान्याचा पोकळ दाणा; तुस, गोंड, केंड. २ ( निंदार्थी ) हरीक. [ हरीक+केंड ] **हरकेण–कयेण–कयाण**-न. ( कों. कु. ) हरीकाचें गवत; काड. [ हरीक+तृण ]

**हरख**—पु हर्ष; आनंद. [ सं. हर्ष; हिं. हरख ] **हरखणें**–अक्रि. हर्ष पावणें; आनंदणें.

**हरखी**—स्त्री. हरकी पहा.

**हरगा, हरगेचार, हरगेभाई**—' हिडगा ' पहा.

**हरगाह**—अ ज्याअर्थी. –रा २०.४७. [ फा. हर्गाह् ]

**हरगी( घी )ज–स**—क्रिवि. १ हरहमेश; नेहमीं. ' तेथें तुम्हांकडून उपसर्ग हरगीस होऊं नये. ' –वाडदुबा. २ मुळींच; बिलकूल. ' सासरसीचा त्रह हरगीस होत नाहीं. ' –पेद ६.१९०. ' जे मजला मानिती । माझ्या विचारें वर्तती । ते हरगीस झोला न पावती । ' –रामदिवटा ६. [ फा. हर्गिझ् ]

**हरजुरी**—स्त्री. ( वे. ) आंब्याच्या झाडावरील एक औषधी बांडगूळ.

**हरडफुंक्या**—हुरडफुंक्या पहा.

**हरडा–डी**—हिरडा–डी पहा.

**हरडा**—पु. ( सोनारी ) कमरेच्या गोफाचा एक भाग.

**हरडी**—स्त्री. एक जंगली झाड.

**हरडें**—न. ( कु. ) अंतःकरण; छाती. [ सं. हृदय ]

**हरण**—पु न. मृग; एक जनावर. –स्त्री. हरणी. [ सं. हरिण ] ०**फाशांत सांपडणें–पडणें**-अडचणींत पडून हताश होणें. ०**फाशांत घालणें–पाडणें**-अडचणींत आणणें, टाकणें. ०**काळजी**–स्त्री. (एका गोष्टीवरून ) अतिशय काळजी ( हरवलेल्या वस्तूची, इ० ); एखाद्या गोष्टीबद्दल अतिशय चिंता; काळजी. ' हरणकाळजी फारच बाई मी मला दिलासा कोणीं द्या ग । ' –पला ४.२. ०**टोळ**–स्त्री. भयंकर विषारी, हिरव्या रंगाची, झाडावर चढणारी सापाची एक जात; सापटोळी. –बदलापूर ३४८. ०**दोडी**–स्त्री. एक वनस्पति, वेल. ०**मान्या–शिकारी–ऱ्या**–वि. हरणाची शिकार करणारा; पारधी. ०**वीत–वेण–वेत**–नस्त्री. तात्काल, सुलभ प्रसुति ( मुलें होणाऱ्या स्त्रीची ). ०**वेल**–स्त्री. फार वाढणारी, फळांतून रेशमासारखा कापूस निघणारी, पानांची भाजी होणारी एक वेल; हरणदोडी. ०**शिकार**–स्त्री. हरणाची पारध. **हरणाळें**–न (चांभारी) हरणाचें कातडें. **हरणाचें काळीज**–न भीति. ' तुम्ही एवढें मनुष्य, दुराणी तो दृष्टीस पडेनात, रांडापोरें घोडी ओढतात, तुमच्या पोटांत हरणाचीं काळजें कशीं शिरलीं ? ' –भाब ९१. **हर( रि )णी**–स्त्री. १ हरणाची मादी. **हरणूली**–स्त्री. ( चंद्रपुरी ) ( लाडक्या भाषेंत ) हरण. ' मी ग हरणूली होईन । वनामधिं जाइन् पळून । ' –मासं जुलै १९३२.

**हरण**—न. १ जबरदस्तीनें नेणें; लुटणें; अपहार. २ नाश; घात करणें; दूर करणें; नाहींसें करणें ( पाप, रोग, भास इ० ). ( समासांत ) पापहरण; दुःखहरण; दोषहरण इ०. ' कुळहरणीं पातकें । ' –ज्ञा १.२२९. ३ ( गणित ) भागाकार. [ सं. ] **हरणीय**–वि. लुटून नेण्यास योग्य; हरण करण्याजोगी ( वस्तु इ० ).

**हरण**—स्त्री. सोनार, लोहार यांची ऐरण. [ हिं. अहरन ]

**हरणी**—स्त्री. ( बैलगाडी ) बैलास चाक लागूं नये म्हणून चाकाचे पुढें आडवें जोडलेलें लांकूड.

**हरणें**—उक्रि. १ बलात्कारानें, अन्यायानें नेणें, घेऊन जाणें; उपटणें; अपहार करणें. २ दूर करणें; नाहींसें करणें; निवारणें ( दुःख, शोक, पाप, त्रास, अडचण, दोष, रोग इ० ). ' पै हरूनि कफवात । ' –ज्ञा १४.१९६. ३ जिंकणें; जितणें ( बक्षीस ). ' त्यानें पहिल्या डावास शंभर रुपये मांडले ते म्यां हरले. ' –अक्रि. १ पराभव पावणें; हटणें ( युद्ध, खेळ,

वाद इ० त). २ अपुरें पडणें; कामास न येणें; निष्फळ होणें (बुद्धि, प्रयत्न, शक्ति, शहाणपणा इ०). ३ (ल.) फसविणें; भुलविणें. 'लाघवी हरी मेखळे। लोकु जैसा।' -ज्ञा १५.२४१. [सं. हरण] **हरतलेपण**-न. अभाव; नसलेपणा. 'हें अथी तरी कार्यसें हरतलेपण।' -अमृ ७.१०४.

**हरताळ**—स्त्री.पु. एक पिवळें विषारी-द्रव्य. [सं. हरिताल] **०लागणें-फासणें**-१ दोष देणें, लावणें. २ (हस्तलिखित लेखांतील अक्षरें इ० वर हरताळ लावून) खोडणें; रद्द करणें. **०लागणें**-रद्द पडणें; चुकीचा ठरणें; खोटा ठरणें. **०तीज**-स्त्री. हरताळका पहा. **०भस्म**-न. हरताळाचें भस्म.

**हरताळ**—पु. बाजार, व्यवहार बंद असणें; प्रत्येक दुकानास कुलूप लागणें, असणें; बाजारी संप; काम बंद पडणें. [हर+गु तालुं=कुलूप] **०पडणें**-दुर्मीळ होणें; अत्यंत उणीव असणें; वाण पडणें. **०बाजारांत पडणें**-१ थोर व्यक्ती मेली असतां, किंवा सरकारच्या जुलमाचा निषेध प्रदर्शित करण्याकरितां व्यापाऱ्यांनीं आपापलीं दुकानें खुषीनें बंद ठेवणें; व्यापार-व्यवहार बंद करणें.

**हरताळ(लि)का**—स्त्री. १ हरताळ अर्थ १ पहा. २ भाद्रपद शुद्ध तृतीयेस सुवासिनींनी गौरीची, पार्वतीची करावयाची पूजा; त्या दिवशीची तिथि. ३ पूजेची पार्वतीची मूर्ति; हरितालिका. [सं. हरितालिका]

**हरदर्हाल**—क्रिवि. केव्हांहि. 'हरदर्हाल मोहिब्बाचे कामामध्यें तफावत तजावज करणार नाहीं.' -ब्रप २४०. [फा.]

**हरदावळ**—पु. घोड्याचे छातीवरील भोंवरा; हा अशुभकारक असतो. [सं. हृदावर्त; हृदय+आवली] **हरदावळी**-वि. वरील भोंवरा असलेला (घोडा).

**हर(रि)दास**—पु. १ कथेकरी; कीर्तनकार. २ (खा.) कोल्हाट्याप्रमाणें एक कसब करणारी शूद्र जात. -गांगा १२२. [सं. हरिदास] **हरदाशी-सी**-वि. हरदासविषयक; हरदासाचा (पोषाक, वाद्य, तट्टू इ०). **हरदासवळ**-स्त्री. शाहीरांतील एक पक्ष; हे देवास प्रकृतीपेक्षां श्रेष्ठ मानून तुरा-लावणी गातात. **हरदासी घोडा-तट्टू**-पु. हडकुळें, ठेंगणें, रेंरें करीत चालणारें तट्टू.

**हरदू**—वि. १ (खतपत्रांत) दोघेहि; दोन्ही पक्षांचे. 'हरदू असाम्यांचे घराची जप्ती करतील.' -वाडसमा १.१९०. २ दोहोंपैकीं प्रत्येक; जोडी. [फा. हर्दो] **०पक्षकार**-पु.अव. वादांतील दोन्ही पक्षांचे पक्षकार; वादी-प्रतिवादी; दोन्ही पक्ष. **०मुसना जुमला**-क्रिवि. हरवलेली सनद पुन्हां करून देतेवेळीं तिच्यावर लिहिण्याचा शेरा. [मुसन्ना=दुहेरी नक्कल]

**हरदू, हरदुसर**—स्त्री. (गंजीफा) हुकुमाचीं अनुक्रमें दोन पानें जसें-वजीर-एक्का; एक्का-दुव्वा; दुव्वा-तिव्वा इ०. वरच्या रंगांतील याचे उलट खालच्या रंगातील दहिल्या-नाहिल्या, नहिल्या-अठ्या वगैरे. [फा.]

**हरद्द**—न. १ अर्थ; उद्देश; मनाचा कल; झोंक. २ मजकूर; अभिप्राय; मुद्दा; मतलब (भाषण, क्रिया इ० चा) 'शामलाकडील वकील बोलाऊन आणून त्याचें हरद्द मनास आणून पक्का तह करणें.' -वाडसमा १.३११. [सं. हार्द]

**हरप-फ, हर्फ**—पु. १ (कागदपत्रांत) अक्षर; वर्ण (विशेषतः अरबी, फार्सी). 'तहनाम्यांत कांहीं हर्फ नीट करावयाचे ते करून.' -रा ५.३३; -ब्रव ८९. २ दोष; ठपका. (क्रि० लावणें; ठेवणें; आणणें; लागणें; येणें). ३ (कारकुनी) घड्या पाडलेल्या कागदांत दुसऱ्या रकान्याचे मध्यापासून पुढील रकान्यापर्यंत ओढलेल्या रेषेचें नांव. [अर. हर्फ्] **०ब-हर्फ**-क्रिवि. अक्षरशः. 'कलमांची फर्द सरकारची आली ती हरफ-ब-हर्फ वाचून दाखविली.' -रा ७.८.

**हरपणें**—उक्रि. १ हरविणें; गमाविणें. -अक्रि. सांडणें; जाणें; नाहींसें होणें; नष्ट होणें. 'द्वैषाचिया भावें हरिसम झाले। भाव हरपले देहादिक।' -तुगा ८८. [हरणें]

**हरपररेवडी**—स्त्री. एक प्रकारचा लहान आंवळा आणि त्याचें झाड; रायआंवळा व रायआंवळी. [सं. हरिपर्वरी; हिं. हरफारेवडी]

**हरब(भ)क-की**—स्त्री. (कु.) खादाडपणा. -वि. खादाड; हांवरा.

**हरबटणें**—अक्रि. (कों.) लडबडणें; बरबटणें (माती, चिखल इ० नीं अवयव किंवा स्वयंपाकाचीं भांडीं इ०).

**हरबडणें**—क्रि. (ना.) ऐन वेळेवर इकडेतिकडे शोध करणें.

**हरंबळ**—स्त्री. हयगय.

**हरंबळणें**—अक्रि. तळमळणें, हरमळणें पहा. 'तेणें दुःखें प्राणी हरंबळे।' -दा ३.७.३९.

**हरब(भ)रा**—पु. एक द्विदल धान्य; चणा; घोड्यास खावयास द्यावयाचें एक कडधान्य. [सं. हरि=घोडा किंवा हर=शिव+भरक] **हरभऱ्याचे झाडावर चढविणें-बसविणें**-आपलें काम करून घेण्यासाठीं एखाद्याची फाजील स्तुति करून त्याला खूष करणें; खुशामत करणें; बनविणें; फसविणें. **हरभऱ्याच्या झाडावर चढणें**-अशा खोट्या स्तुतीला भुलणें; फसणें. 'याला एखादे वेळीं तूं फार चांगला दिसतोस असें कोणीं म्हटलें असेल, तेवढ्यावरच स्वारी हरभऱ्याच्या झाडावर चढली आहे!' -अतिपीड.

**हरमळ**—स्त्री. हरमाळ ( हर=प्रत्येक मध्यें ) पहा.

**हरमळ**—वि. (कों.) ( दुःख, आजार इ० नें ) अस्वस्थ; बेचैन **हरमळणें**-अक्रि. तळमळणें; तडफडणें.

**हरमळणें**—अक्रि. परिचित होणें; ओळख होणें. हरमाळ पहा. [ हरमळ-माळ=परिचय ]

**हरमोर**—स्त्री. हरमाळ ( हर=प्रत्येक मध्यें ) पहा.

**हरया( ये )ळी**—स्त्री. हरळी; दूर्वा.

**हरराजी, हराजी, हर्राजी**—स्त्री. लिलांव. [ अर. हर्राज्, हराज् ]

**हरल-ला-ली**—पुस्त्री. (कु. कों.) १ लहानसा प्रवाह; ओढा; ओघळ ( विशेषतः पावसाळ्यांतील ); त्याचें पात्र, मार्ग. २ पाण्यासाठीं खोदलेला चर, पाट; लहान कालवा.

**हरला**—पु बांबूची लहानशी वाटोळी टोपली; लहान हारा.

**हरव( वि )णें**—उक्रि. १ घालविणें; गमाविणें; सांडणें (संपत्ति, कीर्ति, नांव, प्रकृति, सद्गुण, मान इ० ). २ घालविणें; गमवावयास लावणें; नुकसान सोसावयास लावणें; मुकविणें; लुबाडणें. ३ प्रतिपक्षास हरे असा करणें; पराभव करणें ( वाद, लढाई, खेळ इ० त ). [ हरणें प्रयोजक ] **हरवस करणें**-(माण.) हरवून घेणें; आपत्ति ओढवून घेणें.

**हरवळ**—वि. ( दादर ) उग्र.

**हरवळ**—स्त्री. ( दादर ) हयगय.

**हरव( वा )ळ**—वि. १ खेळकर; आनंदी ( मूल ). २ ( माण. ) चपळ.

**हरवार-ळ**—वि अलवार; हलकें व मऊ; मोवर ( अनरसा इ० पक्वान्न ). हळवार पहा.

**हरवेल**—स्त्री. ( गो. ) हरणटोळ नांवाचा हिरवा साप.

**हरवो**—वि. ( कु. ) हिरव्या रंगाचा; हिरवा.

**हरशीं-शें-सूं**—क्रिवि. ( गो. ) एरवीं; सहज.

**हरस**—पु. ( बे. ) बैलगाडीचा कणा.

**हरसट**—स्त्री. ( ना. ) चंपाषष्ठी. सट पहा.

**हरस्व**—वि. ऱ्हस्व; लहान. 'चौदा विद्यांचा गोसावी। हरस्व लोचन हिलावी।' -दा १.२.१३. [ सं. ऱ्हस्व ]

**हर! हर!**—उद्गा. शिव, शिव; वाईट वाटलें असतां निघणारा शब्द. [ सं. ] **०महादेव**-उद्गा. ( आवेश, औत्सुक्य दर्शविणारा उद्गार ) १ निकराचा हल्ला करतांना मराठ्यांची लढाईंत उच्चारावयाची रणगर्जना. 'हरहर महादेव या रणघोषांत।'-संग्राम ६९. २ पंगत जेवावयास बसतांना म्हणावयाचा शब्द ( याच्या आधीं 'पार्वतीपते' म्हणतात ). ३ सर्वस्व नाश; नायनाट; सत्यानाश ( एखाद्या वस्तूचा, माणसाचा ).

**हरहरला**—क्रिवि. १ हटकून; खात्रीनें; बिनचूक. २ सतत; नेहमीं. [ ? हरणें-हरला न हरला तरी ]

**हरहरा, हरारा**—पु. ( व. ) पातळसर शिरा. 'हरहरा करून रोग्याला खायला घातला.' [ ? हिं. हरीरा=एक पेय ]

**हरळ-ळी**—स्त्री. एक गवत; दूर्वा. [ सं. हरिताली; प्रा. हरिआली; हिं. हरियल ] **०ची मुळी**-स्त्री. १ ( दूर्वा उपटली तरी तिचा बीजांश जमीनींत राहून पुन्हां पुन्हां उगवतेच त्यावरून ) अनेक प्रकारचे छळ, त्रास इ० सोसूनहि टिकाव धरणारी जात, कुळी, समाज. २ जमीन, अधिकार, हुद्दा, मान इ० कोणत्याहि रीतींनीं काढून घेतला असतांहि पुन्हां तो परत मिळविणारी व्यक्ति, विशेषतः वतनदार इसम. ३ अनेकवार औषधादिकांनीं दबविला तरी पुन्हा उचल घेणारा रोग, आजार. **हरळीप्रसाद**-पु. १ ( ल ) हरदासी तट्टू; किंमतींत उतरलेला घोडा; नुसत्या गवतावर राहणारा ( चंदी न मिळणारा ) घोडा. २ कुचकामी नोकर.

**हरळ**—पुन. १ डोळ्यांत त्रिकाळ पाणी सुटण्याचा व खुपण्याचा एक रोग. २ डोळ्याचा एक विकार; खुपऱ्या. ( क्रि० येणें. ).

**हरळ**—पु. लहान दगड; बारीक खडे; कण; गार; केर; धूलीकण. 'आणि घासाआंतील हरळु। फेडितां लागे वेळु।'-ज्ञा १३.३३६. -स्त्री वाळू. 'सिकता हरळ शिजवितां। मवाळ नव्हे कल्पांती।' [ का. हरळु ]

**हरळ**—स्त्री. खाष्ट सेवा; त्रासदायक काम, नोकरी; दगदग; त्रास. ( क्रि० लागणें ) 'काय हो ह्या पोराची हरळ लागली.'

**हरळ-ळा**—पु. १ ( वागी, मिरच्या इ० कांचें ) रोप लावण्यासाठीं जमीनींत खोदलेली लांबट खळी; खांच, चर. २ पाणी नेण्याचा पाट; कालवा. हरल पहा. ३ पाणी वाहण्यानें पडलेला ओघळ; चर.

**हरळ**—वि. सैल; विरळ; फटी, भेगा असलेला. अरळ पहा. **हरळणें**-अक्रि. फट ठेवणें, पाडणें; दूर, विरळ असणें ( दांत, झाडें इ० ). 'दांत करकरे आणि हरळे।'-दा ३.७.२३.

**हरळगा**—पु. ( बे. ) एक जातीचा तांदूळ.

**हरळी**—स्त्री. ( प्र. ) १ आरोळी; मोठ्यानें मारलेली हाक. २ आक्रोश; दुःखानें फोडलेला हंबरडा, किंकाळी; बोंब. ( क्रि० फोडणें; मारणें ). ३ ( नाट्य ) राक्षसपात्राची आरडाओरड. [ आरोळी ]

**हरा**—पु. १ हारा; बांबूच्या कामट्यांची मोठी टोपली; पाटी ( भाजी, फळें इ० ठेवण्याची ). २ ( ल. ) हाराभर जिन्नस ( वाळकें, फळें इ० ). म्ह० १ वाळकाचा हरा आणि ताकाचा डेरा ( फार दिवस टिकत नाहींत ). २ हरा वारा देव्हारा ( दोन दिवसांचा )=क्षणभंगुरता, नश्वरता दर्शक.

**हरांजनी**—वि. एक विशिष्ट रंगाचा( घोडा ).-अश्वप १.२८.

**हराडा**—पु. (व.) तापाची कसर; अंग मोडून येणें. 'एवढा फोड झाला त्याचा हराडा आला असेल.'

**हराम**—वि. १ बेकायदेशीर; असमान; विषम; दुष्ट; वाईट; अन्यायी; गैरशिस्त; निंद्य (व्यक्ति, काम). २ निषिद्ध (अन्न). [अर. हराम्] **०खोर**-वि. १ स्वामिद्रोही; लुच्चा; बेइमान. २ निषिद्ध अन्न सेवन करणारा. ३ लांचखाऊ; अप्रामाणिक; [फा. हराम्खुर्] **०खोरी**-स्त्री. १ बेकायदेशीर कृत्य; अप्रामाणिकपणा; स्वामिद्रोह; लुच्चेगिरी. २ निषिद्ध अन्नसेवन. ३ लांच खाणें; अन्यायाची प्राप्ति. [फा. हराम्खुरी] **०जादगी**-स्त्री. १ हरामखोरी; लुच्चेगिरी. 'जमीनदारांनीं हरामजादगी केली.' -रा १. २४४. २ स्वामिद्रोह. 'रयत हरामजादगी करून अंमल सुरळीत देत नाहीं.' -रा ८.१५८. **०जादा**-वि. १ अनौरस; जारज. २ स्वामिद्रोही; लबाड; बेइमान. ३ धूर्त; दुष्ट; कपटी; बदमाष; ठग. [फा. हराम्झादा] **०जादी**-स्त्री. १ अनौरस स्त्री. २ हरामजादगी; लबाडी. 'त्यांच्या हरामजाद्या व मकरे सर्व नबाब बहादूर यांचे ध्यानांत.' -रा १९.५९. **०नमकी**-स्त्री. निमकहरामी. 'पादशहाशी ज्यानें हरामनमकी बे-अदा केली.' -पया २१. **०मोत**-स्त्री. वाईट प्रकारें आलेला मृत्यु. **हरामाचा**-वि. लबाडी, अन्याय इ०नीं मिळविलेला (माल, पैसा). **हरामी**-वि. लबाड, लुच्चा; कपटी; हराम पहा. -स्त्री. हरामखोरी.

**हरावल**—पु. हरोल; सैन्याची आघाडी. [फा. हरावुल्]

**हराशिवा**—उद्गा. स्पष्टपणें नाकबुली; नकार देतांना उच्चारावयाचा शब्द. [सं. हर! शिव!] **०गोविंदा**-उद्गा कांहीं उत्तर नाहीं, कृति नाहीं, अगदीं तटस्थता आहे असें दर्शविणारा उद्गार; रामशिवा!, गोविंदा!.

**हराष**—पु. तोटा; नुकसान; हानि. [सं. ऱ्हास; अर. हराज्] **०काळ**-पु. अडचणीची परिस्थिति, दिवस; उतरती कळा; विनाशकाळ. **हरावणें**-अक्रि. नष्ट होणें; नाहींसें होणें; उतरती कळा लागणें.

**हरास**—पु. लिलांव; विक्री. 'पांचशें शेतें हारासाला निघालीं असून त्यांपैकीं ३० हरासही झालीं.' -केसरी २१.५.३७. हैराज पहा.

**हराहोरा**—पु. हरें वारें पहा.

**हरि**—पु. १ विष्णु; कृष्ण. 'हरि ज्यांचा कैवारी त्या पांडुसुतांसि वंदितों भावें.' -मोआदि १.७. (समासांत) हरि-सत्ता-कीर्तन-कथा. २ जुन्या संस्कृत व प्राकृत वाङ्मयांत हरि शब्द पुढील अर्थानें आढळतो. उदा० घोडा; सिंह; माकड; बेडूक; सूर्य; इंद्र; यम, वायु, चंद्र, प्रकाशकिरण, पोपट; सर्प इ०. ३ पृथ्वीच्या नऊ वर्षां-(भागां) पैकीं एक वर्ष (हें निषध व हेमकूट यांच्यामध्यें आहे). [सं.] **०खग**-पु. विष्णुवाहन; गरुड. 'त्याच्या विमान येइल कायी न येतांचि हरिखग मनातें.' -मोवन. **०गण**-पु. वानरसेना. 'सुग्रीवें घालुनि आपुली आण। आणविले सप्तद्वीपांचे हरिगण।'. **०चंदन**-पु. पिवळा चंदन; कुंकुमागरु. -न. केशर. **०जन**-पु महार, मांग, भंगी इ० अस्पृश्य मनुष्य व जात (महात्मा गांधींनीं तयार केलेला शब्द). **०जागर**-पु एकादशीच्या रात्रीचें जागरण. 'दशमीव्रत एकभुक्त साचार। एकादशी उपोषण हरिजागर।' **०दास**-पु. १ हरीचा भक्त, उपासक. २ कथेकरी, हरदास पहा. **०दिन-दिनी**-पुस्त्री. एकादशी. -जैअ १७.१२४. **०दिशा**-स्त्री. पूर्वदिशा. 'हरीदिशेप्रती गमन करी। तों पुढें सह्याद्री देखिला।' -जैअ १६.२. **०द्वार**-पु. उत्तर हिंदुस्थानांतील एक तीर्थ क्षेत्र; येथें गंगा हिमालयांतून बाहेर सपाटीवर येते. **०नाग-ग**-वि. १ एकरंगी पण पाठ पांढरी असणारा (घोडा). -मसाप२. १. २ दोन्ही कानांत आणि डोक्याच्या केसांत भोंवरा असलेला (घोडा). -अश्वप १.१०१. **०पद**-न. मेषसंपात; महाविषुव. [सं.] **०पाठ**-पु. विठ्ठलभक्तिपर नामदेवरचित अभंग. **०भक्त**-वि. १ विष्णुभक्त. (विशेषतः) हरिनाम घेत संन्यासवृत्तीनें फिरणारा भक्त. २ (ल.) पक्का नास्तिक; दांभिक; ढोंगी. ३ (ल.) भोळसर; वेडसर **०भक्तपरायण**-वि. भगवद्भक्त; संत; हरदास. **०रंगण**-न. देवापुढील भजन किंवा नृत्य करण्याची जागा. -एभा १७.१९०. 'गरुडपार हरिरंगणीं। टाळ मृदुंगाचा ध्वनी।' **०वर्ष**-न. हरि अर्थ ३ पहा. **०वासर**-पु. १ द्वादशीचा प्रथम पाद; तिथिवासर (यांत भोजन करावयाचें नसतें). २ आषाढ, भाद्रपद, कार्तिक या महिन्यांतील शुद्ध द्वादशीचा व अनुक्रमें अनुराधा, श्रवण, रेवती या नक्षत्रांचा योग; नक्षत्रवासर. **०विठ्ठल**-उद्गा. भजनांतील नामोच्चार. -न. (ल.) सत्यानाश; नासधूस; सर्व समाप्ति; कार्यहानि इ०. **हरीचा लाल**-पु.वि. १ चैनी मनुष्य; रंगेल मनुष्य. 'डफ तुणतुणे वाजविणारे हरीचे लाल कोण असतील?' -स्वप २९. २ कोणी तरी, कोठला तरी माणूस.

**हरिकअम्ल**—न. (शाप) क्लोरिक ॲसिड. [हर=क्लोरिन+अम्ल]

**हरि(री)ख-क**—पु आनंद; हर्ष; उल्हास. [सं. हर्ष; प्रा. हरिस; हिं. हरिस] **हरिखणें, हरिखावणें, हरिखेजणें**-अक्रि. आनंद होणें, पावणें. 'जो आत्मलाभासारिखें। गोमटें कांहींचि न देखे। म्हणोनि भोगविशेखें। हरिखेजे ना।' -ज्ञा ३. ७५९; १८.२३३.

**हरिण**—पु. मृग. हरण पहा. [सं.] **हरिणी**-स्त्री. हरणाची मादी. २ स्त्रियांच्या चार जातींपैकीं एक. चित्रिणी पहा. ३ (काव्य) एक वृत्त. याचे चरणांत १७ अक्षरें व न, स, म, र, स, ल, ग, हे गण असतात. उदा० 'हृदय उलतें शोकें माझें नव्हे द्विविधा तरी। विकल करते मूर्च्छा काया न जीवित संहरी।

**हरित**—वि. हिरवें. [ सं. ]

**हरि( री )तणें**—सक्रि. हिसकावून घेणें; काढून घेणें; नाहींसें करणें. 'पूर्वकर्में स्वतंत्रता। हरितली कीं।' –विपू १००. –एभा २३.५१९. [ सं. हृ=हरण करणें ] **हरिता, हर्ता**–वि. १ नाहींसें करणारा; हरण करणारा. २ चोर. –एभा २.३८८. **हरिपत्र**–न. आपण हरलों असें लिहून द्यावयाचें पत्र; जितलेख. 'अथवा यावें हरिपत्र.' –गुच २५.३६.

**हरिताल**—पु. हरताळ पहा. **हरितालिका–हरिताली**–स्त्री. 'हरताळका–हरताळतीज' पहा.

**हरिद्र**—न. हरद्र पहा. [ सं. हार्द्र ]

**हरिद्र**—न. ( दादर ) दारिद्य. [ सं. हृ–हर ]

**हरिद्रा**—स्त्री. हळद. [ सं. ] **०मेह**–पु. पिवळी लघवी होणारा एक रोग. 'प्रमेह' पहा. **०राग**–वि. हळदीच्या रंगाचें ( नीलरागाच्या उलट ). २ (ल.) चंचल; अस्थिर वृत्तीचा, प्रेमाचा.

**हरिन्मणि**—पु. पाच रत्न. [ सं. ]

**हरिपी–प्या**—वि. धाडशी; साहसी. हरीप पहा.

**हरियळ–ह्याळ**—पु. मधमाशा खाणारा एक प्राणी.

**हंरियाळ**—पुस्त्री. हऱ्याळ पहा. [ हिं. ]

**हरिश्चंद्र**—पु १ सूर्यवंशांतील एक प्रसिद्ध राजा. यानें स्वप्नांत दिलेलें वचन अनेक संकटें सोसून पूर्ण केलें. २ ( ल. ) (हरिश्चंद्रासारखा) सत्यवचनी, उदार माणूस. [ सं. ]

**हरी**—स्त्री. हार; ओळ; रांग ( झाडें, पिकें इ० ची ). [ सं. हार ] **हरीं**–क्रिवि. दिशेनें; ओळीनें; सरी.

**हरी**—स्त्री. पराभव; हार. 'तेवीं पुत्रांपुढें रघुनाथ। हरी आपण घेतसे।' –जैअ ३६.६५. [ सं. हृ=हरण करणें ]

**हरीक**—पु. कोदु नांवाचें हलकें, नाचणी सारखें धान्य. याच्या ४ जाती आहेत. भात, पेज इ० करतात; आकार राईसारखा, व रंग पिवळा असतो. –वगु ६.२५. **हरि( र )काचें जातें**–न. हरीक दळण्यासाठीं एक विशिष्ट प्रकारचें केलेलें मातीचें जातें.

**हरीतकी, हर्तकी**—स्त्री. पिवळा हिरडा. याचे ७ प्रकार आहेत सप्त हरीतकी पहा. [ सं. ]

**हरीप–फ**—पु. १ शत्रु; वैरी; बलाढ्य प्रतिस्पर्धी. २ शौर्यादि गुणांमुळें दुसऱ्याचें दमन करणारा माणूस. 'आतां देवा कोठें जाशी। गांठ पडली हरीपाशीं।' ३ लबाड, धूर्त माणूस; कावेबाज शत्रु. 'मराठे हरीफ बहुत आहेत, असें बोलले.' –सभासद ४९. –दिमरा १.२६१. ४ गोहो; घोव; वस्ताद; तोडीस तोड देणारा; तुल्यबल. मनुष्य. [ अर. हरीफ् ] **हरिपी–फी, हरिफाई**–स्त्री. १ वैर; शत्रुभाव. २ धाडस; साहस; धैर्य; धाडसी कृत्य. ३ धूर्तता; चतुराई; कावेबाजी. 'आतां तुमची त्यांची भेटी खासे खासे यांची करवितों; तुम्हीं हरिफी करून कार्यभाग करणें तो करावा.' –सभासद १५. **हरिपी–प्या**–वि. धीट; साहसी; धाडसाच्या कामांत पुढें असणारा.

**हरीमूग**—पु. मुगा( धान्या )ची एक जात. रंग हिरवा. –कृषि ३२३.

**हरुख–ष, हर्ख**—पु. हर्ष; हरीक–ख पहा. 'हरुषकाळीं विषमकाळीं।' –दा ४.३.५. [ सं. हर्ष ] **०मात**–स्त्री. आनंदाची बातमी. 'आली दारा देखे हरुषाची गुढी। सांगितली पुढीं हरूखमात।' **हरूषतें**–वि. हर्षित.

**हरेवा( हो )रें**—न. ( ख्यालीखुशाली, चैन इ० ची ) अस्थिरता; चंचलता; क्षणभंगुरता; पोकळपणा; इ०. होरा वारें; हराहोरा. हरा पहा. [ होरा=भविष्य+वारें=देव इ० चा संचार ] म्ह० हरेवारे देव्हारे किंवा हरावारा देव्हारा.

**हरोल–ळ–ली**—स्त्री. १ हरवल पहा. सैन्याची आघाडी बिनी. 'जाधवराव पुढें हरोलीस आले.' –पेद १.२२. २ ( ल. ) पुढारी माणूस; नायक. 'तुम्ही या मनसबियास हरोल होऊन मनसुबा सिद्धीस जाय तें करणें.' –वाडशाछ ३०; –पेद १.१२. [ फा. हरावुल् ]

**हरोह(हा)र**—विक्रि. हारोहार पहा.

**हरोळी**—स्त्री. आरोळी पहा. –लोककथा २.८०.

**हरोळी**—स्त्री. आरोळी; गाकर; लहान पोळी, भाकरी. 'गूळ घालून हरोळ्या केल्या.' ( लक्ष्मीबाई टिळक ) १३३. [ अहार–ळ+पोळी ]

**हर्क**—पु. हरिख; हर्ष. 'तर्कोत तर्कला किं तर्क। हर्कोत हर्कला किं हर्क।' –ज्ञाप्र ३९०. [ सं. हर्ष ]

**हर्ता**—वि. हरण करून नेणारा; बलात्कारानें घेऊन जाणारा. पळवून नेणारा. २ निवारण करणारा ( संकट इ० ). 'सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची।' –गणपतीची आरती. [ सं. ] **हर्तृत्व**–न. १ पळवून नेणें; बलात्कारानें लुबाडणें; हरण; अन्यायानें संपादन. २ लुबाडण्याची इच्छा.

**हर्येळ**—पु. हरियळ पहा.

**हर्र**—उद्गा. मेंढ्या, बकरीं इ० ना हांकावयाचा शब्द. [ ध्व. ]

**हऱ्याळ**—पु. लहान हिरवट साप. [ सं. हरित्=हिरवा+अहार–आर=अजगर ]

**हर्वजेनें**—क्रिवि. कोणत्याहि रीतीनें. 'शिकंदरि याहून शादल निघाला म्हणजे मार्गीच हर्वजेनें शिक्षा करितो.' –रा ६२३. [ फा. हर्वजह् ]

**हर्ष**—पु. आनंद; उल्हास; सुख. [ सं. ] **०माण**–वि. आनंदित; उल्हासित; आनंद उपभोगणारा. **०वायु**–पु. अत्यंत आनंद झाला असतां होणारा वातविकार. **०शोकविरहित**–वि. स्थितप्रज्ञ; मनाच्या सुखदुःखादि भावनांपासुन मुक्त. **हर्षक**–

वि. आनंद देणारा. हर्षज-न. १ आनंद करणें-देणें; आनंदावस्था २ -पु. (ज्यो.) चवदावा योग. ३ -नपु डोळयांचा एक रोग हर्षणें हर्षिणें-अक्रि. आनंदणें; आनंद पावणें. 'दाता देखतां याचक हर्षती।' हर्षामर्ष-र्षा-पु. १ तंटाभांडण; अरेतुरे; गालिप्रदान; चुरस. 'त्यांचा तुमचा हर्षामर्ष पहिलेपासुन लागला.' -वाडशाछा २४. २ आनंद व क्रोध; रागलोभ. 'हर्षामर्ष ठेलें। तुजेनविण।' -ज्ञा १२.१६८. [हर्ष+अमर्ष] हर्षित-वि. आनंदित; आनंदलेला; आनंदित झालेला किंवा केलेला.

हल् —पु १ व्यंजन. २ अर्धाक्षर, व्यंजन दर्शविणारी अक्षराचे खालील पाय तोडावयाची (्) खूण. (क्रि० देणें; करणें). ३ असल्या खुणेचें अक्षर. [पाणिनीच्या पहिल्या माहेश्वर सूत्रांवरून] हलन्त-वि. ज्या शब्दाच्या शेवटीं स्वर नसून व्यंजन असतें असा (शब्द).

हल —पु. नांगर. -एभा २७.२५६. [सं.] ०धर-हला-युध-पु. बलराम यादव. 'तीतें स्वमतें हलधर धृतराष्ट्रसुतासि द्यावया पाहे।' -मोकृष्ण ८६.२. हलबंदी-स्त्री. गायकवाडींत जमीन कसण्यासाठीं वापरण्यांत येणाऱ्या दोन बैलांच्या नांगरावरील कर -दा. ना. आपटेकृत सयाजीराव गायकवाड (तिसरे) यांचें चरित्र खं. १, पृ. ३३९. [हल=नांगर+बंदी]

हलअ(आ)पदा-अपेठा—हाल मध्यें पहा.

हलक—स्त्री गवयाचा गळा; आवाज; फिरकी. [अर. हल्क्]

हल(लु)क, हलाक-ख—वि. १ निःशक्त झालेला; दमलेला; क्षीण (दुखणें, श्रम इ० नें). 'दोनतीन चपेट होऊन बहुत हलाक जहालों आहों.' -चित्रगुप्त ७९. २ गरजू; निष्कांचन; दरिद्री. [अर. हलाक्] हलाकी-खी-स्त्री. १ थकवा; शीण; अशक्तपणा; क्लांति. 'आपलें राज्य नवें त्याहीमध्यें दोनतीन चपेट होऊन हलाखी झाली आहे.' -सभासद ४७. २ कंगालपणा; अत्यंत दारिद्र्य; दुर्दशा. 'हलाखीची स्थिति' असा रूढ प्रयोग. 'लश्करांत दाणाचारा मिळेना तेव्हां हलाकींत आले.' -मराचिथोशा ५८. [अर. हलाकी]

हलकट—वि (सर्व अर्थानें) हलका पहा. [अल्पार्थी हलका]

हलकट—स्त्री. (राजा.) दंगाधोपा; हाणमार; लुटालूट. 'गंगातीराकडे अताशीं हलकट आहे तुम्ही तिकडे जाऊं नका.' [अर. हलाकत्] हलकटणें-अक्रि. दंगा चालू असणें.

हलकडी—स्त्री. १ नथेचे लोंबते मोती. झिरमिळया. २ मोती गुंफण्यासाठीं दुफांशी नथेला जो तुकडा जोडतात तो. ३ झोंपाळा, पाळणा इ० टांगण्याचा आंकडा, कडी. [अर. हलका]

हलकथोल—न. चित्रें इ० कांस रंग देण्याचे उपयोगी एक पदार्थ; हा जस्तापासून करतात. [अर. हला=विरघळणें+कथील]



हलकलणें—अक्रि. १ (दंगाधोपा, आग, दुष्काळ इ० नीं देश, गांव जनसमुदाय इ०) गडबडणें; गोंधळणें. २ अस्वस्थ, बेचैन, फार प्रक्षुब्ध होणें (एखाद्या व्यक्तीनें). [कल्कल्+हल् द्वि]

हलकल्लोळ-कल्होळ-कालोळ—पु. आरडाओरड; बोंबाबोंब, गडबड; गोंधळ; मोठा बेसूर आवाज (वाद्यें इ०चा); तुंबळ ध्वनि; कडकडाट. [कल्लोळ+हल द्वि]

हलकव्हई—स्त्री. जस्तापासून केलेला एक मऊ हलका पदार्थ; हलकथील.

हलका-गा—पु. १ झोंपाळा, पाळणा इ० च्या दोऱ्या, कड्या छतास टांगण्यासाठीं केलेले विशिष्ट आकाराचे आंकडे प्रत्येकी. 'लावून रुपेरी हलके हिंदुळे बांधिले।' -प्रला. २ दिवा इ० टांगण्याचा आंकडा. 'फणीं पिवळीं हलक्यांना। आंत पिवळया मोंबत्या आरसे पिवळे झलक्याना।' -प्रला ९३. [अर. हलका] हलकी-स्त्री. झोंपाळा इ० टांगावयाची आंकडी, कडी. हलका पहा.

हलका—पु. एक वाद्य. याला हलका व धूम नांवाचीं दोन डफडीं असतात. संबळ पहा. हलकी-स्त्री. एक वाद्य; खंजिरी; डफडी. हलका पहा.

हलका—पु (बे. कर्ना.) शेतांतील ढेंकळें फोडण्याचें दांताळें; एक औत. [का हलिके; तुल० सं. हल]

हलका—वि. १ वजनांत कमी; जड नसलेला. २ लहान; न्यून (प्रमाण, वजन, लांबी इ० मोजतांना). ३ कमीप्रतीचा; कडक नसलेला (गुण, प्रभाव इ० त). 'अंमलाच्या बाबतींत अफूपेक्षां भांग हलकी.' ४ सौम्य; मंद; कमजोर (थंडी, पाऊस इ०). ५ जड नसलेलें; पचण्यास सोपें (अन्न). ६ शरीरास गुणकारी, (अन्न); पचण्यास सोपें (पाणी). ७ सहन करण्याजोगा; फारसा मोठा नसलेला; क्षुद्रक (रोग, विकार, काम). ८ कमी महत्त्वाचें; किरकोळ (काम, बाब). ९ कमी दर्ज्याचा, अधिकाराचा, वजनाचा (माणूस). १० कमी किंमतीची (वस्तु). ११ बेताची; प्रमाणशीर; कमी (किंमत, अट). १२ क्षुद्रक; गौण (विषय). [सं. लघु; प्रा. हलुअ; हिं हलका; तुल० सं. क्षुल्लक] कानाचा हलका-वाटेल त्याचें ऐकून त्यावर विश्वास ठेवणारा. जिवाचा मनाचा हलका-संकुचित दृष्टीचा; क्षुद्र; हलकट. बुद्धीचा हलका-कमी बुद्धीचा; मंद डोक्याचा; मूर्ख. ०पतला-वि. (व) कमकुवत; दुबळ; किरकोळ. ०फराळ-पु थोडें अन्न व पुष्कळ पाणी पिणें. ०फूल-वि. अत्यंत हलका. ०भार-पु. कमी पत, नांव. हलक्यानें-क्रिवि. हळू; लघुप्रमाणानें; सावकाश (बोलणें, चालणें इ०). 'हलक्यानें-बोल, चाल इ०.'

**हलकारत-ती**—स्त्री. १ आंत दिवे (कापूर इ०) लावून देवास ओवाळावयाचें एक लांबट व चापट असें धातुमय पात्र. २ आरती. [हलका+आरती ?]

**हलकारा**—पु. जासूद. हरकारा पहा. **हलकारगिरी-करागेरी**-स्त्री. हलकाऱ्याचें काम व हुद्दा.

**हलकावणी**—स्त्री. हुलकावणी पहा.

**हलकावणें**—अक्रि. १ हलकें होणें; अशक्त, कमी होणें. 'कष्टांचा भारही हलकावत जाईल.' –तुफान २९. २ विनीत, नम्र होणें. –उक्रि. १ हलकें करणें. २ (एखाद्याचा ताठा, गर्व) उतरविणें; खालीं करणें. [हलका]

**हल्कून-द**—वि. मऊ व नाजूक; हलकी (वस्तु, प्रकृति, व्यक्ति). [हलकें]

**हलकूम-न**—पु (कुस्ती) हातखोडा; आपला हात जोडीदाराच्या पलीकडच्या बगडीवरून घालून, अलीकडच्या आपल्या हाताच्या कोंपराच्या सांध्यांत आपल्या हाताचें मनगट धरून, जोडीदाराच्या पोटास दाब देऊन घुसमटून चीन करणें. **हलकूम उलटा**-पु. (जंबिया) आपल्या जंबियानें जोडीदाराच्या गळयाच्या घांटीजवळ उजवीकडे मारणें. **०सोधा**-वरील डावाच्या उलट म्हणजे जोडीदाराच्या घांटीच्या डाव्याबाजूजवळ मारणें. [अर हल्क-हल्कूम्=गळयाची घांटी]

**हलकें**—न १ लहान लहका हलकी (कडी इफडें). २ लहान हलकरती. [हलका] **हलकें डोसकें-डोकसें-मस्तक**-न. १ हजामतीला सोपें व रांठ नसलेल्या केसाचें डोकें; याचे उलट जड डोसकें. २ मस्तक हलकें होणें (रक्त जाण्यानें इ०). ३ लवकर बिघडणारें, भडकणारें डोकें; याच्या उलट शांत डोकें ? **०फूल**-वि. साधें, बिनत्रासाचें (काम धंदा).

**हलख**—स्त्री.वि. हलक पहा.

**हलखुशामत-ती**—हाल्खुशामत पहा.

**हलखूद**—वि. हलकें; सहज व्यवस्था करतां येणारें; अव जड नसलेलें; बिनत्रासाचें (काम, गद्दा, शरीर इ०). [हलका+सं. क्षुद्र; फा. खुर्द्=लहान]

**हलगती**—वि. हलगत म्हणून एक पेठ आहे तेथील (कापड इ०).

**हलगरजी-जू**—वि. निष्काळजी; स्वत: वाटेल तेव्हां, वाटेल तसें काम करणारा; सुस्त; मंद (प्र.) अलगरजी. [फा. अहल्-इ-गरझ्=स्वार्थी] **हलगरज**-स्त्री. सुस्तपणा; निष्काळजीपणा. असेंहि नाम कधीं वापरतात.

**हलगा**—(सर्व अर्थी) हलका कडी पहा.

**हलगी**—हलकी पहा.

**हलगां मालगो**—स्त्री. टगळमंगळ; नानूं; कांकूं; चालढकल' (क्रि० करणें). –क्रिवि. कांकूं करीत. [ध्व]

**हलचाल, हलणें, हलता नारळ**—हालचाल इ० पहा. [दे. प्रा. हल्ल; हिं. हिलता]

**हलद(दि)वा**—वि. (कों) पिवळा. [हळद]

**हलपटणें**—सक्रि. (बे.) फेकणें.

**हलापला**—वि. (क.) चपळ; दक्ष; भरभर काम करणारा.

**हलफिलाल**—क्रिवि. आत्तां; याक्षणीं; लवकर. [अर. हाल, फिल्हाल]

**हलफूल**—वि. हलका फूल.

**हल(ळ)बी**—पु. नागपूर-वऱ्हाड प्रांतांतील एक रजपूत मद्रा हिंदु जात. हे लोक शेती करून असतात. याच्या अनौरस संततीस 'खाल पंक्त' म्हणतात. यांस जातीनें बहिष्कृत केल्यामुळें हे इस्लाम धर्म स्वीकारतात. याच्यांत घरजांवई करून घेण्याची चाल आहे. अशा घरजावयास 'घाडगले' म्हणतात. –केसरी ३०.६.३६.

**हलबेलंडी-बालंडी-बेलंडें, हलबिंडया-बंडया**—स्त्री.स्त्री.न.स्त्री.अव. (अशिष्ट) गाळण; तारांबळ; तिरपीट; भीतीमुळें होणारी अवस्था, स्थिति. [हिं हे+बे+लंड]

**हलमस्त**—वि. दरिद्री परंतु गर्विष्ठ; हालमस्त पहा.

**हलमा दांडू**—वि. (व.) आडदांड. 'सुन सांपडली हलमा दांडू.'

**हलयाणें**—सक्रि. हलासिणें; हाणणें. –शर.

**हलवा**—पु. १ एक मिठाई. २ तीळ, लवंगा वेलचीदाणा इ० साखरेच्या पाकांत घोळून त्यावर कांटा आणून केलेली एक मिठाई; संक्रांतीचा तिळगूळ. ३ एक जातीचा मासा. [अर. हल्वा] **हलव(वा)ई**-पु. हलवा व इतर मिठाई करणारा व विकणारा मनुष्य; मिठाईवाला. [फा. हल्वाई] **म्ह०** हलवायाचे घरावर तुळशीपत्र-ब्राह्मणे=परभारे दुसऱ्याची वस्तु तिसऱ्यास देणें; आईजीच्या जीवावर बाईजी उदार याप्रमाणें.

**हलवांग**—पु. (गो.) खुशामत्याचा अंगविक्षेप. [हलविणें+अंग]

**हलवान**—न. कमी किंमतीच्या शालीचें एक फर्द; अलवान पहा.

**हलवान**—न. एक पेल्यासारखें भांडें.

**हलवी**—स्त्री. एक लहान झाड.

**हलसान**—क्रिवि (व.) बेजार (क्रि० होणें). [हलाक]

**हलसूद**—वि. हलकें; अवजड नसलेलें (शरीर, ओझें इ०). हलखूद पहा. [हलकें]

**हलह(हा)लणें**—अक्रि. राग इ० विकारानें अंगाचा थरकाप होणें. [ हिं हल्हलाना; म. हलणें द्वि. ] **हलह(हा)लून**-क्रिवि. कापत कापत. ( क्रि० उठणें ).

**हलहलीत**—वि. अत्यंत दरिद्री; हीनदीन. [ हाल ]

**हलहवाल**—पु. संकटमय दुःखद स्थिति. हालहवाल पहा.

**हलाक-ख**—हलक पहा.

**हलायक**—वि. पांच ते दहा अंगुळेंपर्यंत पांढरे पाय असलेला ( घोडा ). –अश्वप १.९.

**हला(ल्ला)ल**—वि. १ योग्य; धर्म्य; विहित; न्याय्य; अनिषिद्ध ( खाद्य वस्तु, दान इ० देण्याचे पदार्थ ); विधीपूर्वक मारलेल्या पशूचें ( मांस ). 'मुलानानें फात्या न दिला तर बकरें मुर्दाड म्हातें म्हणजे तें हलाल होत नाहीं.' –गांगा ११३. २ रास्त; योग्य; प्रामाणिक; उत्तम; कायदेशीर ( धंदा, नेमणूक, काम, फायदा, मिळकत, संपादन ). [ अर. हलाल् ] **०करणें**-मुसलमानी धर्मशास्त्राप्रमाणें पशु मारणें; जबा-जबे करणें. **हलालाचा**-वि. योग्य मार्गानें, न्यायानें मिळविलेला, संपादलेला. **०खार**-पु. १ स्वतः श्रम करून खाणारा माणूस. २ भंगी; झाडू. 'क्षेत्र मजकूरच्या गल्या हलालखोराकडून झाडवून निर्मळ राखणें.' –वाडसमा ३.१२. ३ हलकें काम करणारा माणूस. [ फा. हलालखुर् ] **हलालखोरी**-स्त्री १ हलालखोराचा धंदा, स्थिति. २ हलका धंदा ३ प्रामाणिकपणा; इमानीपणा. 'तुझे बाबें नरसो दामोधरें हुजूर हलालखोरी बहुत वजा साणिली.' –रा १५.३१. –वि. हलालखोरासंबंधीं (भाषा, वश. इ० ). **हलाली हरामी**-स्त्री. प्रामाणिकपणा व अप्रामाणिकपणा; बरेवाईटपणा. –वि बरेवाईट; भलाबुरा 'हलाली-हरामीची गांठ पडली तर यांस मारून न यावी.' –भाव ८१. [ अर. ]

**हलालणें**—अक्रि. अतिशय हलणें, हलहलणें. [ हलणें ]

**ह(हा)ला(स)सिणें**—क्रि हाणणें. –हंको. 'जेणें उरीं हालासि पांपरा। तयाचा चरण वाहाती दातारा।' –माज्ञा ११.१०५.?

**हलाहल**—न. १ समुद्रमंथनांतून निघालेलें भयंकर विष. 'शंकरें धरिलें हलाहला। तेणें नीलवर्ण झाला गळा।' –व्य. २ सापाचें जलाल विष. ( सामा. ) जहर, जहाल विष हालाहल पहा.

**हली, हलिक**—पु नांगऱ्या; शेतकरी; कर्दा. 'जैंवि भजे शस्त्रपाणि हलिक वडा।' –मोवन ४.९२. [ सं. हल ]

**हलीमवाली**—पुअव. मोठेधाकटे; उच्चनीच; श्रीमंतगरीब; सरसकट सारेजण. [ अर, अहालीमवाली ]

**हलोहरामो**—स्त्री. ठकबाजी; लुच्चेगिरी यांचा अतिरेक. –वि. लुच्चा; लबाड; अप्रामाणिक; भामटा. [ हरामी द्वि. ]

**हलुवट**—वि. हलकें. हलुवट पहा.

**हलुस्वार**—वि. ( कु. ) हौशी.

**हलूमालू**—स्त्री. टंगळमंगळ; चालढकल; कांकूं; नानू. –क्रिवि. टंगळमंगळ, कांकूं करीत. हलगोमालगो पहा.

**हलेणें**—सक्रि. बडविणें; मारणें. 'तरी चाखिता गूळगुळें। माखिलें काजळ काजळें। कां घेपे वेपे गुळें हालया शूळ।' –अमृ ७.५०. 'साउलियेते साबळें। हालया भोय आदळें।' –अमृ ६.४४.

**हलेसा**—पतिंगा पहा.

**हलो**—पु. ( कु. ) रेडा; हल्या.

**हलोह(हा)ल**—क्रिवि हलफिलाल. हालोहाल पहा. [हिं.]

**हल्य**—वि. नांगर, नांगरट इ० संबंधीं. [ सं. ] **हल्या**-पु. रेडा; टोणगा. [ सं. हल्य; हिं. हेला ] **हल्याहल्या करणें**–( कर. ) टुमणें लावून काम करून घेणें.

**हल्ल**—हाल पहा. 'प्राणवल्लभा हल्ल पावल्या.' –अमृत युद्धवर्णन पृ. ५५.

**हल्लक-ख, हल्लकी-खी**—हलाक, हलाकी पहा.

**हल्लर**—पु. अंगाईगीत; पाळणा. 'अनुहत बाळका हल्लरु गाती।' –तुगा ४०३५. 'हल्लर गाती यशोदा सुंदरी।' [ ध्व. हला! ]

**हल्ला**—स्त्रीपु १ चढाई; छापा; एलगार. 'शिवाजी आपला पुत्र याजवरी हल्ला करावी.' –सभासद १०. २ ( ल ) आवेशानें झटणें; जोमानें, निश्चयानें एखाद्या कामास लागणें. 'तुम्ही साप्रत लिहिण्यावर हल्ला मांडला हें काय?' [ अर. हल्ला ] **०हरकत**-स्त्री. १ अडथळा; त्रास; विघ्न; तंटा; बखेडा. (सर्वसामान्यपणें). 'या वाटेनें तुम्ही खुशाल जा, कोणी हल्ला हरकत करणार नाहीं.' 'हा गृहस्थ बरा आहे त्यास रुपये दिले असतां कांहीं हल्ला हरकत करणार नाहीं.' २ ( चुकीनें ) हिल्ला हरकत. असेंहि रूप आढळतें.

**हल्लाळ**—हालाहल पहा.

**हल्लाळी**—वि. मारलेल्या जनावराचें काढलेलें ( कातडें ); हलाली पहा. याच्या उलट मुर्दाडी.

**हल्लीं**—क्रिवि. सांप्रत; आतां; यावेळीं. हाली पहा. **हल्ली-माजी**-माजी इ० पहा.

**हल्लीसक नृत्य**—न. रासक्रीडेचा एक प्रकार. या नृत्यांत एक पुरुष व एक स्त्री अशी माळ लावून चक्राकार फेर धरून नृत्य करतात. अथवा क्वचित् एकच पुरुष असून स्त्रिया मात्र अनेक असतात. –किरातकृत भासाच्या बालचरित नाटकाचा मराठी अनुवाद व त्याची प्रस्तावना, पृ. ५. [ सं. ]

**हल्संधि**—पु. व्यंजनाशीं होणारा संधि. उदा० महान्+अहं=महानहम्. [ सं. ]

**हवई(यी), हवाई**—स्त्री. १ मोठी चंद्रज्योत ( शोभेच्या दारूची ). २ एक प्रकारचा बाण ( दारूचा ). 'हवया गगनातें भेदिती। देव पाहती विमानीं।' –ह २४.१३४. [ फा. हवाई ]

**हवडा**—पु. (बायकी) कपटानें गिळंकृत करणें; डला. (क्रि० मारणें).

**हवदा**—पु. हौदा पहा.

**हवन**—पु. होम; अग्नींत आहुती टाकणें. 'गुरुवाक्यहुताशीं। हवन केलें।' -ज्ञा ४.१२३. 'अथर्वणें वेदें केलें हवन। प्रहशांति यथोचिता।' -एरुस्व ५.२२. **हवणें**-सक्रि होम करणें; आहुति देणें. [सं. हु] **हवनी**-स्त्री. होमकुंड.

**हवरा**—वि. लोभी; हावरा पहा.

**हवरा-री**—पुस्त्री. पांढरे तीळ.

**हवलदार-री**—हवालदार-री पहा.

**हवलदि(दी)ल**—वि. भयभीत; घाबरलेला; गोंधळलेला. हवालदिल पहा. [फा.] **हवलदिली**-स्त्री. भीतीची अवस्था; काळजी; चिंता; हवालदिली.

**हवशा-शी-सी, हवस, हवसदार**—हौशा, हौस इ० पहा. 'मामल्याची हवस कांहीं राहिली नाहीं.' -इमं ६७.

**हवळा**—पु. हुळा; भाजलेले हिरव्या हरभऱ्याचे घाटे. [सं. होलक]

**हवळा**—वि. लोभी; अधाशी; हावरा. [हांव]

**हवळा**—वि. नाजूक; कोमल (व्यक्ति, रचना, प्रकृति, शरीर, झाड इ०). [हळवा]

**हवा**—स्त्री. १ वारा; वायु; पंचमहाभूतांपैकीं एक. २ हवेचें शीतोष्णमान; प्रकृतीवर परिणामकारक गुणधर्म. ३ आकाशाची पोकळी; अंतराळ. 'पक्षी हवेंत उडतात.' ४ हवापाणी. ५ धुंदी. 'उतरली भरज्वानीची हवा।' -पला. [अर. हवा; तुल० सं. वह्] **०खाणें**-सहल करणें; घराबाहेर उघडया मैदानांत इ० फिरावयास जाणें. **०खेळणें**-घरांत हवेचा प्रवाह सर्वत्र मोकळे-पणें वहाणें. **०दोज**-वि. उंच; गगनचुंबी. 'हवादोज शामीने.' -भाब १८३४.४८ **०फेर**-पु. (गु.) प्रकृति सुधारण्यासाठीं दुसरे ठिकाणीं चांगल्या हवेंत जाणें; हवापालट. **०शीर**-वि. पुष्कळ वारा असलेली; शुद्ध हवा मुबलक खेळते अशी (जागा इ०). **हवाई**-वि. हवेसंबंधीं. **हवाई जहाज**-न. विमान.

**हवाई**—स्त्री. छापा; हल्ला. 'तेथून सडे होऊन रोज फौज देत चलली म्हणजे त्याजवरी हवाई करावयास येईल.' -ख १. २०७.

**हवाडी**—स्त्री. सुकाणूची मूठ.

**हवारू**—वि. (गो. व्यापारी सांकेतिक भाषा) दोन (संख्या). अवारू पहा.

**हवाव**—स्त्री. शोभा; रंग. 'सहज रंगें हवावें।' -ज्ञा १५. १६१. 'कैशी बोलाची हवाव।' -ज्ञा ६.१३२.

**हवाल**—पुस्त्री. (बरीवाईट) चालू परिस्थिति; हालहवाल पहा. (कामकाज, व्यक्ति, देश, स्थान इ० ची). 'वाचून दाखव-तील त्याजवरून कच्चा हवाल अवघा ध्यानास येईल.' -दिमरा १.१३३. [अर. अह्वाल]

**हवा(व)लदार**—पु १ सुभेदाराच्या हाताखालचा मुलकी अधिकारी. २ किल्ल्याचा रखवालदार अधिकारी. ३ इंग्रजी सैन्यां-तील सार्जंटच्या तोलाचा अधिकारी (जमादार, नाईक याप्रमाणें); निरनिराळ्या खात्यांतील या पदवीचे अनेक अधिकारी असतात. ४ एक पोलीस अधिकारी. [फा. हवालदार्] **हवालदारी**-स्त्री. हवालदाराचें काम; अधिकार इ०. [फा.]

**हवालदिल-ली**—वि. घाबरलेला; धीर सुटलेला. हौलदिल इ० पहा. [फा.]

**हवाला**—पु. १ ताबा; काळजी; भिस्त; दुसऱ्याकडे सोप-विणें. २ हमी; जामीनकी. -घका ९८. ३ रखवाली; राखण; टाकलेला विश्वास (क्रि० पार पाडणें; उरकणें; चालविणें इ०). 'निज-प्रियजनांकडे तरिहि दे हवाला जशी।' -केका १५. ४ मुखत्यारी; जबाबदार ताबा किंवा अधिकार. (क्रि० देणें; घेणें). [अर. हवाला] **हवाला-ली-लें**-क्रिवि. (रक्षणादिसाठीं) स्वाधीन. (क्रि० करणें; होणें; असणें इ०) **हवालणें**-उक्रि. सोंपविणें; सुपूर्त करणें; स्वाधीन करणें; जबाबदारीवर टाकणें; हवाला देणें (कर्ज, काम इ०). 'हें घर बांधण्याचें काम मजकडे हवालून द्या' **हवालत**-स्त्री. सोंपवणूक; जबाबदारी; भिस्त. हवाला पहा. 'अठरा हजार रुपये हवालतीस होते तेही परिहार करून.' -मदरु २.१४. [अर.] **हवाला कवाला-टवाला**-पु. (सामान्यतः) हवाला; हमी इ०. [हवाला द्वि.]

**हवाची**—स्त्री. (कों.) धांवल्यानें लागलेली धाप; दमा; ऊर्ध्व. [ध्व. हाः!]

**हवि**—न होमांत टाकावयाचें (तूप, भात इ०) द्रव्य, पदार्थ; बळी. [सं. हविस्] **हविर्त्रि**-स्त्री. होमकुंड. **हविष्य**-न. १ हवन करावयास योग्य वस्तु; हवि. २ व्रतादि दिवशीं भक्षणीय असा शुद्ध पदार्थ (गोधूम, गोदुग्ध इ०). ३ (ल.) वरील पदार्थ खाण्याचें व्रत, नियम, बंधन. ४ (उप.) नेहमीचो लोकाचारा-विरुद्ध किंवा स्वैर वागणूक, वहिवाट, नेम, प्रघात, व्यसन. 'या गांवांत सर्व लोकांस रांडबाजी हें तर हविष्य आहे.' 'घोड्यावर बसणें हें त्याचें हविष्य आहे.' **हविष्यान्न**-पु हवि; हविष्य अर्थ १ पहा. २ तांदूळ, गहू इ० धान्य व तूप, दूध इ० हवनीय पदार्थ. ३ हे पदार्थ खाऊन रहावयाचें एक व्रत. [सं. हविष्य+अन्न]

**हवेली**—स्त्री. १ मोठा वाडा; राजवाडा; मंदिर; मोठें व उंच सुशोभित घर. २ जिल्ह्याचें मुख्य ठिकाण; राजधानी (प्रांत जिल्हा यांच्या मुख्य शहराच्या नांवापुढें किंवा मागें जोडून हा

शब्द येतो ). ३ राजधानीचे भोंवतालचा भाग; गिर्द. ४ पुणें जिल्ह्यांतील आंत पुणें शहर असलेला एक तालुका. [ फा हवीली ] ०दाखल-वि. गृहप्रविष्ट. ' आम्ही हवेलीदाखल जाहलों. ' -रा ६.२८८.

**हवेली**—स्त्री. ( गु. ) गुजराथेंतील वैष्णवांचें देवालय. -महात्माजीचे सत्याचे प्रयोग. [ फा हवीली ]

**हव्य**—न. १ तूप, भात इ० हवन करावयास योग्य पदार्थ; हवि २ यज्ञयागादि कर्म. [ सं ] ०कव्य—न. ( देवांसाठीं तें हव्य व पितरांसाठीं तें कव्य ) देव व पितर यांना हविर्भाग अर्पण करावयाचा विधि होमहवन, व्रत; पूजा, श्राद्धपक्ष इ०. ' त्याचे घरीं कांहीं हव्यकव्य झालें असतां मला बोलावतात. ' ०पाक—पु देवतांसाठीं तयार केलेलें अन्न इ०; होमान्न. ०वाट्—पु. अग्नि.

**हव्यास**—पु १ उत्कट इच्छा; तृष्णा; हाव; छंद; नाद. २ सोस. ( क्रि० घेणें; लागणें ). ' दुर्बोधतत्वकथनीं ज्याचा सर्वत्र परम हव्यास।' -मोभीष्म १२.३८ ' या जोशीबुवास पुस्तकसंग्रह करण्याचा हव्यास फार.' ३ उत्साह [ अर हवस्; हवे अशी आस ] **हव्याशा सी**—वि. १ सकाम; सतृष्ण. २ नादी; छंदी; सोसबाहुला.

**हश( शा )म**—न. लवाजमा; परिवार; नोकरचाकर; शिपाई-प्यादे; अनुयायी( मोठ्या लोकांचे ). [ अर. हशम् ] ०दस्तगाह-पन्हा—वि. ऐश्वर्यसंपन्न. ०नवीश-स, ०नीस-पु. किल्ल्या वरील किंवा सैन्यांतील सैन्याची हजेरी, हिशेब इ० ठेवणारा अधिकारी. [ फा. हशमनवीस् ] ०निशी-सी-स्त्री. हशमनीसाचें काम, हुद्दा. ' प्रांत बेलापूर येथील हशमनिशी शामजीराम यांजकडे होती. ' -वाडसमा ३ १२. ०फडणवीस-फडणीस-पु. हशमनवीश. **हशमत**-हशम पहा. [ अर. हश्मत् ] **हशमी**-वि. हशमसंबंधीं.

**हशा**—पु कापडाची किनार. कांठ ( शाल, गालिचा, दुलई इ० चा ). [ अर. हासिया ] **हशेदार**-वि. किनारीदार. ' गाद्या मखमलच्या हशेदार. ' -वाडबाबा १.११३.

**ह( हं )शा**—पु. १ मोठ्यानें खो खो हसणें; हास्य. ( क्रि० करणें; पिकणें ). २ हंशी पहा. ३ लहान मुलाचें हंसणेंखिदळणें. [ सं. हस्; हिं. हंसी ]

**हं ह)शी**—स्त्री. हंशा; उपहासात्मक हंसणें; विडंबन; मस्करी. ( क्रि० करणें; मांडणें ). [ हिं. ] ०खुशी-स्त्री. प्र प्रवृत्ति; प्रसन्नमर्जी; राजीखुशी. ०खेळी-स्त्री हसणें व खेळणें; मजा;चैन. हशीखेळीं-खालीं-नें-मध्यें इ०. ( कारक विभक्तींत प्रयोग ). [ हंसण+खेळणें ]

**ह( हं )शी( सी )ल**—न. ( प्र. ) हाशी( सी )ल. १ सरकार देणें; आकार. २ हेतु; उद्देश; अर्थ; तात्पर्य. ३ टपाल इत्यादीचा खर्च, आकार, किंमत, फी. ४ प्राप्ती; लाभ; नफा. ' साहुकारीमुळें जकातीचेंच हशील होईल. ' -मराभा ३७. -वि प्राप्त. ' पुढें मुद्दे हशील होतील. ' -ख २.५४८. [ अर हासिल् ]

**हंस**—पु. १ एक पक्षी. हा मानससरोवराकडे असतो. बदकापेक्षां मोठा व पांढरा असून दूध आणि पाणी एकत्र केलें असतां त्यांतून दूध निवडून पिणारा, जबर उडणारा, पोहणारा पक्षी असा त्याचा लौकिक आहे. बदक; बरट. २ ( ल. ) जीवात्मा. ' हंसाविणें कुडी. ' -वमा. ३ संन्याशातील एक भेद; परमहंस ४ ब्रह्म; परमात्मा. ५ विष्णु, सूर्य इ० देव. [ सं. ] ०कंकणी-पु ( संगीत ) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. आरोहांत ऋषभ व धैवत वर्ज्य जाति औडुव-संपूर्ण. वादी पंचम, संवादी षड्ज. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर ०गति-गामिनी-वि. हंसाप्रमाणें चालणारी ( स्त्री ). ०ध्वनी-पु. ( संगीत ) एक राग. यांत षड्ज. तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, पंचम, तीव्र निषाद हे स्वर येतात. जाति औडुव-औडुव, वादी षड्ज, संवादी पंचम वेळ रात्रीचा पहिला प्रहर. ०नाद्-पु हंस, बदक यांचा किलकिलाट. ०पद-न. काकपद ( लिखाणांत केलेलें ). ' हंसपद देवोनी ओळी। उणें अक्षर रेखिजे मौळी। ' -मुआदि २५.५९. ०पक्ष( हस्त )-पु. नृत्यांतील एक अंगविक्षेप. आंगठा व करंगळी यांशिवाय सर्व बोटें मिटणें ( तीं तळहातास न चिकटतील अशीं वांकविणें ), आंगठा कोणत्याहि बोटास न चिकटवितां थोडा वांकविणें व करंगळी उभी ठेवणें. ' हंसपक्षी नितबकु ऐसे। भेद सांगतां कथा ठाकैल। '-भाए ४५८. ०पुतळी-स्त्री. गळयांतील पुतळीचा एक प्रकार.' हंसपुतळ्या तेज कल्लोळ। ' -देवीदासकृत भामावर्णन ६. ०बुद्धि-स्त्री. तीव्रबुद्धि; विषय चटकन आकलन करण्याजोगी बुद्धि; तारतम्य बुद्धि -ज्ञानप्रकाश १७-८-३८. -वि. अशा बुद्धीचा. ०माला-स्त्री. हंसाची रांग, पंक्ति. ०मुख( हस्त )-न. नृत्यांतील एक अंगविक्षेप. आंगठा, तर्जनी व मधलें बोट या तीन बोटांचीं अग्रें एकत्र जुळविणें, करंगळी व अनामिका हीं उभीं ठेवणें. ०वाहन-पु ब्रह्मदेव. ०वाहिनी-स्त्री. सरस्वती. ०क्षीरन्याय-विवेक-पु. दूध पाण्याच्या मिश्रणांतून हंस दूध तेवढें काढून पितो अशी समजूत आहे त्याप्रमाणें एखाद्या कृत्यांतील दोषाकडे दुर्लक्ष्य करून त्यांतील गुणांचें ग्रहण करणें. **हंसलें**-न ( महानु ) हंसाचें चित्र काढलेलें, अगदीं पांढरें स्वच्छ वस्त्र. ' गौर्वी मुरळे हसलें। ' -प्रमा ८. **हंसात्मा**-पु. प्राण्याचा जीवात्मा. ' हंसात्मा प्रगट। दावील सुभट। सद्गुरु वसिष्ठ। तोचि आणा।' **हंसासन**-न.

योगशास्त्रांतील एक आसन. प्रथम मयूरासनाप्रमाणें आकृति करून नंतर पाय मयूरासनांतल्याप्रमाणें अधांत्रीं न धरतां त्याचीं बोटें जमिनीवर ठेवून स्थिर राहाणें. –संयोग ३४९. **हंसी**–स्त्री. १ हंसाची मादी. २ तिच्याप्रमाणें चालण्याची गति. 'दाखविती गती नानापरी। उष्ट्री नाकुळी हंसी मयूरी।' –जै ४.२२.

**हसकार-रा**—पु. (बायकी) (डोळ्यांत अश्रु, तलाव-विहरींत पाणी, घरांतील तूप इ० संबंधीं योजतांना) पूर्ण अभाव, नकारघंटा याअर्थी अभावात्मक प्रयोग. 'हा रडतो खरा पर डोळ्यांत पाण्याचा हसकारा नाहीं.' [सं. अस्तिकरण–असणेंकार–असकार?]

**ह(हं)सडणें**—उक्रि. १ जोरानें हिसका देणें; आंचका मारणें; ओढणें; झटकणें. २ (ल) (एखाद्यापासून) द्रव्य इ० काढणें; धुतारणें; लुबाडणें. ३ भोसडपट्टी काढणें; खडकावणें; खडसणें. [ध्व.] **ह(हं)सडा**–पु १ जोराचा हिसका, झटका, आचका (तंगडी इ० चा). २ मृत्युसमयींचा जोराचा श्वास, घोर. ३ (ल) खरडपट्टी, खडसणी (क्रि० देणें). आसडा पहा.

**ह(हं)सणें**—उक्रि. १ हास्य, स्मित करणें. २ (ल.) एखाद्यास नांवें ठेवणें, खोडया काढणें, उपहास करणें. ३ (ल.) फुटणें; उलणें (करंजी, गुरवळी लाडू इ०). [सं हसन] **(खाप-रानें) हसणें**–(चुलीवर ठेवलेल्या) वर जमलेल्या मशीनें पेट घेणें. **हसना नाहीं पोसना नाहीं**-अत्यंत पोरका, गरीब, सुखदुःख देणारा कोणी आप्तेष्ट नसलेला **हसायला आहेत पोसायला नाहीं**-फक्त थट्टा, फजीति करणारे लोक असतात, पोटाला कोणी घालीत नाहींत. **हसत हसत-हसतां हसतां दांत पाडणें**-न रागावतां, चरफडतां एखाद्याची फजीती, पराभव, नाश करणें. **हसत्या बरोबर हसणें, रडत्या बरोबर रडणें**–वारा येईल तशी पाठ देणें. **हसून गोड (साजरें)करणें**–१ दुसऱ्याचा राग, विषाद, शेवटीं गोडगोड शब्द बोलून घालविणें. २ गोड बोलून फसविणें. **हंसतील त्यांचे दांत दिसतील**-लोकांनीं नांवें ठेवल्यास त्याची पर्वा न करणें. **आपण हंसे लोकांना शेंबूड आपल्या नाकाला**-दुसऱ्याला ज्या दोषाबद्दल हंसावयाचें तोच दुर्गुण आपणापाशीं असणें **हंसत गौरी-पार्वती-लक्ष्मी**-स्त्री. हसत-मुख, आनंदी स्त्री. ०**चहाड**-वि. हंसत हंसत चहाडया कर-णारा. ०**मुख**-न आनंदी, हंसरा चेहरा. –वि. उल्लसित, आनंदी वृत्तीचा. ०**शिंदळ**-वि. १ नखरेबाज, चटकचांदणी (परंतु प्रत्यक्ष व्यभिचारी नाहीं अशी स्त्री). २ मांठभोळयानें हंस-ण्याची खोड असलेला (पुरुष). ३ हंपवून फसविणारा, भ्रष्ट-विणारा, भुरळ घालणारा; गोड बोलून केसानें गळा कापणारा. **हंसता**–वि. १ हंसणारा. २ (ल.) हौशी; रंगेल; आनंदी; खेळकर. म्ह० 'हसती बायको रडता पुरुष कामाची नाहींत.' **हसती**–स्त्री हास्यविनोद. **हसती(स्ती)दंती भेट ओळख**–स्त्री. न बोलतांना नुसतें परस्परांकडे पाहून हंसुन झालेली भेट; केवळ परस्पर स्मित करण्याइतकी ओळख. **ह(हं)सरा**-वि. १ नेहमीं किंवा पुष्कळ हंसणारा. २ खेळकर, आनंदी (मूल इ०). **हंसाबाजी**-स्त्री १ हास्यविनोद; थट्टा. २ मस्करी; टिंगल, उपहास [हिं.] **हसित**–न (न्याय) मुख, नेत्र व गाल हे ज्यामध्यें किंचित विकसित होऊन कांहींसे दांत दिसतील असें हंसणें. हसिताचे प्रकार:–अतिहसित, अपहसित, उपहसित, विहसित, स्मित. –मराठी रंगभूमी ३३२. **हसूं-सं हंसू-सें**–न. १ हंसणें, हास्य. २ विटंबना, उपहास; फजिती. 'चौघां-मध्यें माझें हंसें झालें.' ३ हसण्याचा विषय, हास्यास्पद वस्तु.

**हसंती**—स्त्री. शेगडी, आगटी. [सं]

**हसबी**—स्त्री. रुपये इ० भरून घोडयावर घालून गांवांस न्यावयाच्या उपयोगी पडशीसारखी पिशवी [अर.]

**हसरा**—पु (चांभारी; कों.) चामडे ठोकण्याचा बत्ता. –बदलापूर १८६.

**हंसलो-ळी**—स्त्री. गळयाजवळचें हाड ०**उलटी**-स्त्री. (जंबिया) आपल्या जंबियानें जोडीदाराच्या गळयाच्या उजव्या बरगडी जवळीच खड्डयांत वार करणें. ०**सीधी**-स्त्री. (जंबिया). वरील डावाचे उलट डाव, उजव्या ऐवजीं डाव्या बरगडीजवळचा वार [हिं.]

**हं(ह)सळी, हंसोळी**—स्त्री चांदी-सोन्याची लहान सरी; (लहान मुलाचा) गळयातील एक दागिना. [हिं हंसली]

**हसोक**—पु (कर.) अशोकाचें झाड, अशोक. त्याचें फळ, बी. [सं. अशोक]

**ह(हं)सोळा**—स्त्री. एक रानवट फळझाड. **ह(हं)सोळें**-न. हसोळीचें फळ. **हसोळीं खाणें**-अतिशय, बेफाट हंसणें.

**हस्कार-रा**—पु हंसकार-रा पहा.

**हस्त**—पु १ हात; कर. २ कोंपरापासून मधल्या बोटाचे टोंकापर्यंतची लांबी; तितक्या लांबीचें माप; चोवीस अंगुळांचें परिमाण. ३ हत्तीची सोंड. ४ तेरावें नक्षत्र (अव. प्रयोग). ५ खांबाचा वरचा भाग व त्यावर पेललें जाणारें ओझें किंवा पाखाडी यांमधील ठोकळा, लांकडी चापट तुकडा. ६ (बुद्धि-बळें) एकदां प्यादयास हात लावला कीं तें खेळलेंच पाहिजे अशी खेळाची रीत, प्रकार (विशेषण, क्रियाविशेषण किंवा उद्गार-वाचक प्रयोग होतात). [सं.] ०**क**–पु १ हात. 'दोन हस्तक व तिसरें मस्तक' यांनीं नमस्कार करणें, एवढेंच काय तें देण्या-मारखें राहिलें आहे अशावेळीं म्हणावयाचा प्रयोग. २ मदत-नीस, हाताखालचा आज्ञांकित माणूस. ३ एखाद्याच्या सांगण्या-

वरून, चिथावणीनें काम करणारा इसम, गुमास्ता, अडत्या, एजंट ०कडें-कडगें-न हातांतील कडें. 'हस्तकडगें देऊनि कौशिक मार्गे फिरविले।' -सप्र ३.७८. ०कौशल-ल्य-न. हातकसब; हातकामांतील नैपुण्य, हातोटी; हाताची कारागिरी; (चित्रलेखन; भरतकाम; विणकाम इ०तील). हस्तकरा-हस्तक अर्थ २ व ३ पहा. हस्तक्रिया-स्त्री. हातकाम; हातानें केलेलें काम (अनुष्ठान, रसायन इ० प्रसंगीं). ०गत-वि. हातांत, ताब्यांत गेलेला; स्वाधीन झालेला; हातीं आलेला; काबीज केलेला; स्वाधीन. ०गुण-पु. हाताचा गुण (चांगला, वाईट, काम, धंदा औषध इ० प्रसंगीं सुरू करतांना, देतांना). ०चापल्य-न. हाताची चपळता, हस्तकौशल्य ०दोष-पु लेखांत, हाताचे दुर्गुणानें आलेली अशुद्धता; असावधानतमुळें हातून घडलेली चूक. ०पगरस्त-स्ता-वि (बुद्धिबळ) एकदां प्याद्यास हात लाविला कीं तें खेळलेंच पाहिजे, किंवा एकदां एखादें प्यादें एखाद्या जागीं नेऊन बसविलें कीं तेथेंच ठेविलें पाहिजे असा कडक नियमानें खेळावयाचा प्रकार, पद्धत ज्यांत आहे असा (खेळ, बाजी). -क्रिवि. वरील नियमाप्रमाणें (क्रि० खेळणें). [हस्त=हात+पग=पट+फा. दस्त-हात] ०पत्रक-न थोड-क्यांत माहिती देणारें पत्रक; प्रसिद्धीपत्रक; जाहिरात. ०परीक्षा-स्त्री. हातानें स्पर्श करून, हात पाहून रोग, भविष्य इ० सांगणें. ०पाव-पु खांबाखालील व वरील भाग; पिढें आणि तळखडा. [हात+पाय] ०मात्रा-स्त्री. हातातील कडी, तोडा इ० अलंकार. 'हस्तमात्रा कर्णमात्रा। कृष्णासी वोपिल्या विचित्रा।' -एरुस्व १५.१४९. [सं.] ०मिलाफ-पु हस्तांदोलन; (इं.) शेकहांड. ०लाघव-न. १ हस्तकौशल्य. २ हाताचा हलकेपणा; हस्तचापल्य. ०शाखा-स्त्री.अव. हाताचीं बोटें. 'महाकर्कशाकार ताराच देखा। क्षणें लागतां खंडल्या हस्तशाखा।' -मुगयुद्ध १८०. ०संकोच-पु (हात आखडणें), कृपणपणा, चिक्कूपणा. ०सामुद्रिक-न हातांवरील रेषा पाहून भविष्य सांगण्याचें शास्त्र. हस्तागौर-री-स्त्री. हस्तनक्षत्रीं हत्तीवर बसविलेली गौरीची मूर्ति. हिचें व्रत असतें त्यास हस्तागौरीव्रत म्हणतात. हत्ती, शंकर, पार्वती, गणपती या चार मूर्ति सोन्याच्या करून त्यांची चौदा दिवस पूजा करून समाप्तीच्या वेळीं हत्तीसह त्या मूर्ती ब्राह्मणांस दान देतात. -गजगौरीव्रत. हस्तांतर-न. हाताचें अंतर. (ल.) भिन्नपणा. 'तैसा मीचि अज्ञानद्वारें। दिसे परी हस्तांतरें।' -ज्ञा १८.११२८. हस्ताक्षर-न. १ स्वतःच्या हातचें, स्वतः लिहिलेलें अक्षर. २ स्वतःची सही; स्वःक्षरी. हस्ते-क्रिवि. १ हातानें. २ तर्फे; मार्फत; करवीं. (देणें; घेणें इ०). 'राघो नारायण यांजकडील जमा रुपये हजार हस्तें दाजीबा।' हस्ते परहस्ते-क्रिवि. स्वतःच्या हातानें किंवा (व) दुसऱ्याकडून; प्रत्यक्ष अथवा (आणि) अप्रत्यक्ष. हस्तोदक-न १ हातावर घ्यावयाचें पाणी. २ जेवणाच्या वेळीं संन्याशाच्या हातावर घालावयाचें पाणी. ३ दान देण्याच्या प्रसंगीं उदक सोडण्यासाठीं हातांत घ्यावयाचें, हातावर सोडावयाचें पाणी. 'तो तूं परब्रह्मचि असावें। मज देवें दिधलासी हस्तोदकें।' -ज्ञा १०.३२२. ४ हस्तनक्षत्रीं पडलेला पाऊस. हस्त्य-वि. हातासंबंधीं; हातचें.

हस्तबूद-पु सारा. -वि. मुलकी; वसुली. 'शिंद्याचे हस्तबूद अमल चालू लागले.' -ख ८.४०४६. [फा.]

हस्तमुख-वि. हसतमुख पहा.

हस्ती-पु. १ हत्ती; एक जनावर. २ हस्त नांवाचें १३ वें नक्षत्र [सं हस्तिन्] ०दंत, हस्तिदंत-पु. हत्तीचा दांत; (सामा.) हत्तीचें हाड. याचे पुष्कळ जिन्नस होतात. ०दंती-वि. हत्तीच्या दातासंबंधीं, दातांचें केलेलें (फणी; बुदबळें; इ० जिन्नस). हस्तिनी-स्त्री. १ हत्तीण. २ स्त्रियांचा एक वर्ग. यांतील स्त्रिया खादाड असतात, स्त्रियांची कनिष्ठ जात; लठ्ठ व फार कामुक स्त्री ०मद-पु हत्ती माजला म्हणजे त्याच्या गंडस्थळांतून वाहणारा एक प्रकारचा रस. ०मेह-पु. एक प्रकारचा लघवीचा रोग व तपली लघवी, प्रमेह पहा. ०शुंडा-स्त्री. हत्तीची सोंड.

हस्ती-पु. (चांभारी) चामडें ठोकण्याचें हत्यार.

हस्तोना-पु (कातकरी) प्रेत ठेवण्याच्या जागेवरील धोंडा. -बदलापूर १२२.

हस्ब-क्रिवि. प्रमाणें. [अर. हस्ब्] हस्बुउजमन-क्रिवि. तपशीलाप्रमाणें. हस्बुहुकूम-पु. आज्ञापत्र. 'सुरजमल व माधोसिंग यांस हस्बुहुकूम व जयाप्पास खिलत वगैरे पाठविले.' -रा ६.३९७. -क्रिवि. आज्ञेप्रमाणें.

हस्मासुस्मी-स्त्री. (कर.) गर्दी, कोंडमारा. (क्रि० होणें).

हं हं-स्त्री. हां, हूं पहा. (क्रि० करणें). -उद्गा. अवधानदर्शक उद्गार, हो हो! (क्रि० करणें; हणणें). [ध्व.]

हहह-उद्गा. हा, हा, करून मोठ्यानें हसण्याचा ध्वनि. [ध्व]

हळ-स्त्री. कढत वाऱ्याचा झोत, झळ.

हळ-पु १ हाळ, लांबट चर. २ (व.) विहिरीजवळील गुरांचें पाणी पिण्याचें लांबट टांकें, हौद. हाळ पहा.

हळ-स्त्री. हाळ पहा.

हळ-पु. नांगर. [सं. हल]

हळआयी, हळाई-स्त्री. अंगाईगीत. [अंगाई गीतांतील पहिल्या शब्दावरून]

हुळकणें—अक्रि. (कों.) हुडकणें; वाळणें; कोरडें व हलकें होणें; सुकणें. [हळका]

हळका, हळकावणें—हलका, हलकावणें इ० पहा.

हुळकुंड—हळद पहा.

हळखळ—स्त्री. (गो.) हळहळ.

हळजणें—अक्रि. (महानु व.) बाळंत होणें. 'सुना हळजती तरी लेकच होती।' -अज्ञातच ५.७.

हळद—स्त्री. एक झाड; याचें मूळ, मुळापासून तयार केलेली पूड; हळकुंड. [सं. हरिद्रा; प्रा. हलिद्द] म्ह० पी हळद आणि हो गोरी=उतावीळपणाबद्दल योजतात. 'आजपर्यंत लोकांनीं जीं मोडमोठालीं कामें उरकलीं, तीं लागलीच पी हळद हो गोरी या न्यायावर उरकलीं नाहींत.' -निचं (वाप्र.) ०उतरणें-लग्नात वधुवरास लाविलेली हळद मंगलस्नान घालून समारंभानें काढून टाकणें. -ऐरापुविवि १४९. ०काढणें-(क.) बाळंतपण, लग्न इ० उरकल्यानंतर त्यांतून मोकळीक देण्यासाठीं स्नान घालणें. 'आज हळद काढावयाची आहे तेव्हां गुळपोळयांचें जेवण आहे.' ०खेळणें-(कऱ्हाड) विवाहांत नवरानवरींनीं स्नानाचे वेळीं एकमेकांवर हळद उडविणें. ०लाग(ल)णें-१ (विवाहाचे वेळीं वधूवरांस प्रथम हळद लावून मंगलस्नान घालतात त्यावरून) विवाह संस्कार होणें २ वैभवास, मानमान्यतेस चढणें; भाव वाढणें. ३ (ल.) दुर्भिळ होणें. 'हलीं भाद्रपद महिना, भटांना काय हळद लागली आहे; तेव्हां आम्हीं पक्ष लांबविला.' हळदीचा डाग लागणें-विटाळ होणें-लग्न झाल्यावर थोडेच दिवसांत नवरा किंवा बायको मरणें. हळकुं(खुं)ड-न. हळदीच्या मुळाचें कुडें; (गो.) हळकुटा [हरिद्राखंड] म्ह० अर्ध्या हळकुंडानें पिवळें होणें=थोडयाशा यशानें, प्राप्तीनें, गर्वानें ताठून जाणें. हळकुंडासाठीं लग्न मोडणें-एखादी क्षुल्लक बाब न जुळल्यामुळें मोठें कार्य जुळत आलेलें असून तें मोडून टाकणें हळदकुंकू-विडे, हळदी कुंकू-विडे-न पुअव. चैत्रांत किंवा नवरात्रांत सुवासिनी स्त्रियांनीं परस्परास व कुमारिकांस वांटावयाचें सौभाग्यदर्शक हळद व कुंकू आणि विडे देणें व ओटया भरणें इ०. समारंभ. 'शेजारच्या मुली आपल्या सासरीं जाऊं येऊं लागल्या म्हणजे पुष्कळ वेळां सरोजिनिला हळदीकुंकू करण्याची पाळी येई.' -ज्ञामू. हळदवणी-पु. (कु.) एक ग्रामाचार. हळद लेकूरवाळी-स्त्री. एक प्रकारचें फांया फुटलेलें हळकुंड. हें शुभ मानतात व लग्नांत घाण्यासाठीं घेतात. हळदिवा-दुवा-वि. हळदीरंगाचा; पिवळा. [सं. हळद+इव] हळदीचा गाभा-पु. अत्यंत सुंदर रंग, अंगकळा हळदुली-स्त्री हळद लावण्याचा समारंभ. 'उठिलीं वधूवरें हळदुली स्वानदें।' -एकनाथ. हळदुटणें-हळदुटण-न. (तंजा.) सुनमुखानंतर वधूवर परस्परांस हळदकुंकू, पानसुपारी इ० देतात तो समारंभ. [हळद+उटणें]

हळदेमाळी-पु. हळद विकणारा माळी. हळद्या-पु. १ कावीळी सारखा एक रोग (माणूस, झाड इ० स होतो). २ एक जातीचें विष. ३ मधाच्या पोळयांतील पिठासारखा एक पिवळा पदार्थ.

हळंदें—न. एक गोड पांढरें मूळ.

हळब—पु. (बे.) सनदी शिपाई. [का. हळब=म्हातारा शिपाई]

हळबळा—वि. गोड व मनमिळाऊ स्वभावाचा; गोडबोल्या.

हळवट—वि. १ हळवें; लवकर पिकणारें (एक प्रकारचें धान्य). २ मऊ, गोड (प्रकृति, स्वभाव) ३ नाजूक; कोमल (प्रकृति, शरीर, रचना). ४ भिकार; खराब; हलकी (शेतजमीन). [हळू+वट प्रत्यय] ०बुद्धीचा-वि. अल्पज्ञ; उथळ बुद्धीचा. ०भुकेचा-भूक सहन न होणारा. हळवा, हळा-वि. १ इतर सजातीयापेक्षा लवकर पिकणारें (धान्य); याचे उलट माहान्. २ असलें धान्य पेरण्यास योग्य किंवा पेरलेली (जमीन). [हळू]

हळवा—पु एक खाऱ्या पाण्यांतील मासा.

हळ(ळु)वार—वि. १ अलवार; नाजूक; कोमल; फार श्रम सोसण्यास असमर्थ; हलका; मृदु. २ हलका; खुपखुशीत; उंची; श्रीमंती (कणीक, तूप इ० चें पदार्थ, पक्वान्न). -क्रिवि नाजूकपणें. ०णें-अक्रि नाजूक होणें; हळूं होणें. 'जें यमदमीं हळुवारलें। आइतें होतें।' -ज्ञा ४.१३५ ०पण-न हलकेपणा; सूक्ष्मपणा. 'अति हळुवारपण चित्ता। आणुनिया।' -ज्ञा१.५७; ६.२६? [हळू+वार]

हळवी अंबगी-गौरी—स्त्री. एक जातीची नाचणी (धान्य).

हळवें—न. नागपंचमीचे पूर्वी पिकणारें किंवा इतर सजातीयापेक्षा लवकर निघणारें तांदूळ, सावा, वरी इ० धान्य, पीक. [हळवा]

हळ(ळी)स—पुन. नांगराचा दांडा. [सं. हल+अंस-आस]

हळसांदें—न. (गो.) चवळी सारखें तांबुस रंगाचें एक धान्य; अळसुंदा. [का. अळसंदी]

हळहळ(हा)ळ—स्त्री. १ हुरहुर; चित्ताची अस्वस्थता; अस्वास्थ्य; मोठी काळजी (शारिरीक, मानसिक). (क्रि० लागणें, वाटणें; करणें). 'न हीं भक्तीचें बळ। तंववरी हळहळे हळहळे।' २ खेद; पश्चात्ताप. (क्रि० लागणें; करणें). ३ चिंता; त्रास; दगदग. [सं. हलहल किंवा हरहर!] ०खळबळ-स्त्री. चिंता आणि त्रास; हळहळ पहा. हळहळणें-अक्रि. हुरहुर वाटणें; खेद, शोक करणें; त्रस्त असणें. हळहळाट-पु. हाहाःकार; थयथयाट. 'अवं नोहे प्रळय अबाट। कीं प्रळयदशाचा हळफळाट।' -नव ४.८१. हळहळीचा माल-पु. विकणारास

फार मनस्ताप देणारा पीडादायक माल. **हळहळीत**-वि. अस्वस्थ; चिंताग्रस्त; त्रस्त.

**हळहळ**—वि. (व.) कोमट (पाणी, शरीर इ०). 'आंग हळहळ लागतें.'

**हळा**—वि. हळवा पहा.

**हळा**—पु. (कु.) पोफळीची विरी; झावळीच्या बुडख्याशीं असणारें विरविरीत वेष्टन.

**हळाखळ**—स्त्री. १ अस्वास्थ्य; बेचैन; हळहळ पहा. २ (अव. प्रयोग-हळाखळा) तळतळाट, जुलूम झालेल्या लोकांचे शिव्याशाप. (क्रि० येणें) **हळाखळीचा माल**-हळहळीचा माल पहा.

**हळाहळ, हळाळ**—न. हालाहल विष; कालकूट. 'हळाहळ आगी पियालें।' -ज्ञा ११.३५८. [सं. हालाहल]

**हळी**—स्त्री. १ टोपली; रोवळी; हाळ. २ डोईंतील एक बायकी दागिना. ३ (गो.) मोगरीच्या फुलांची वेणी.

**हळु-ळू**—वि. १ हलका; अजड. २ हळक; मोकळें. 'डोळे काढले कपाळ हळू झालें.' ३ (इतर अर्थी) हलका पहा. [सं. लघु=लहु-हळु] **हळु-ळू, हळूहळू, हळूच-कण-कन-कर-दिशी**-१ सावकाश; हलकेंच; आस्ते; मंदगतीनें. २ सहज; सौम्यतेनें (बोलणें, चालणें, हळणें, वागणें). **म्ह०** (व.) हळु बोल्या गोंधळ घाल्या -हळूच चुगली खाऊन कलागत लावणारा. **हळुमळ-माळ-वार**-वि. नाजूक; मऊ; कोमल (व्यक्ति, प्रकृति, फूल झाड इ०). अरुवार पहा **हळुवट**-वि. १ (काव्य) साधारण हलकें, मऊ, नाजूक, सौम्य. 'उपमे तुळितां निर्जर नगर। चढे हळुवट आकाशीं।' २ क्षुद्र; क्षुल्लक; तिरस्करणीय. ३ हळवट पहा. ४ लहान; लघु. 'श्रीगुरु ते वस्तु घनवट। लघुते बोलिजे हळुवट।' ५ उणें; न्यून **०वाय**-क्रिवि. (गो.) हळुहळू. **हळुवें**-वि. हलकें.

**हळौंदा**—पु. अळसुंदा; हळसुंदा पहा.

**हळ्या**—पु एक प्रकारचा तवा.

**हळ्ळीगाडा**—पु. (बे.) मोठ्या चाकांचा गाडा.

**हा**—सना. १ पुल्लिंगी दर्शकसर्वनाम. व्यक्ति किंवा वस्तु यास उद्देशून योजलेला शब्द. 'या कृष्णेनें तेव्हांपासुनि केवळ ऋषीच हा केला।' -मोउद्योग ५.१२. २ अविलंबिता, तात्कालिक क्रिया दर्शविण्यासाठीं हें सर्वनाम योजतात. 'तुम्ही पुढें चला हा मी मागून येतों.' ३ स्वतः, खुद्द याअर्थी. 'मी हाच आलों-येईन.' [सं एषः; प्रा. एसओ-अपभ्रंश एहो] **०ठायवरी-ठावोवरी**-क्रिवि. येथवर. 'हा ठावोवरी वियोगा भेटे।' -अमृ १.६.

**हा**—उद्गा. १ एकदम, एकाएकीं प्रतिबंध, विरोध करतांना निघणारा उद्गार. २ शोकदर्शक उद्गार, हाय! हाय! 'वनोवनिं फिरा पिशापरि म्हणा अहोरात्र हा।' -केका ८१. ३ (पांखरें इ०) हाकलतांना काढलेला उद्गार. 'दाजिबा हा-हा-हा-हा करी।' -मायदेव. [ध्व.] **०कपाळा**-उद्गा. (कपाळावर हात मारून काढलेला) शोकाचा उद्गार. हायरे! देवा! 'मी कां तशीं आणिन हा! कपाळा!' -आशबरी १४. **०कार**-पु. हाहाःकार, शोकध्वनि. 'तों आकार धिकार देखुनि उठे हाकार माडीवरी।' -आसी ३४.

**हा**—क्रि. (कु. गो.) आहे. [आहे-हाय-हा]

**हां**—उद्गा. १ मान्यता, कबुली, रुकार इ० दर्शक अव्यय; होय. 'जाशील का म्हणून विचारिलें तेव्हां हां म्हणालास आतां कां नाहीं म्हणतोस.' २ अकल्पित आनंद, थोडें आश्चर्य, समाधान इ० दाखविण्याचें अव्यय. 'हां! आतां श्लोक लागला.' 'हां गा सूर्ये काय शिळा।' -ज्ञा १०.२०२. ३ दुःखोद्गार, वेदनादर्शक उद्गार. हाय! (क्रि० म्हणणें). ४ इषारा देणें, सावध करणें, जागें करणें, धमकी देणें इ० अर्थी उद्गार. 'हां! खबरदार पुढें बोललास तर.' 'तंव सात्यकी बोलिला। हां गा अे शिशुपाळा।' -शिशु ८६४. [ध्व.]

**हाइहुई**—उद्गा. हायहूय पहा.

**हाईस येणें**—अक्रि. थकणें; जेरीस येणें. हाय, हायास येणें पहा. [हाय]

**हाउली-ळी**—स्त्री. (महानु.) समूह. 'जिणौनि अन्य साधनांची हाउळी।' -ज्ञाप्र ७३९; -भाए ६३८. [सं. आवलि?]

**हाऊ**—पु. (कु.) बाऊ. 'पडशावी तान्हा हाऊ आला।' -तुगा ३५५७. [ध्व. आऊ]

**हा(हां)क**—स्त्री. १ आरोळी; नांवाचा मोठ्यानें उच्चार; बोलावणें. (क्रि० मारणें). २ मोठ्यानें ओरडणें; बोंब, आरडा करणें. 'सभेमाजि रायापुढें हाक गेली।' -राक १.४. ३ दुर्लौकिक; सार्वजनिक चर्चा; हाकाटी. ४ आरोळी ऐकूं जाईल इतकें अंतर. 'वाटेवर हाक हाकेवर चौक्या होत्या.' ५ विकणारानें आपल्या मालाची पुकारलेली किंमत. (यावरून) त्यानें जबर किंमत मागणें. 'पेठेंत तांदळाची हाक दाहा रुपये फरा असी आहे.' 'जिन्नस पुष्कळ येतांच वाण्याची हाक कमती झाली.' ६ (ल) उपदेश. 'बा! हाणिली सुरभिला जेंवि तुझ्या तेंवि लात हांकेला।' -मोशल्य १.१०. ७ बडबड; आरडाओरड. 'तुमच्या होणार काय हाकांनीं।' -मोउद्योग ८.७९. [हिं. प्रा. हक्का] **०देणें**-१ हाक मारणें. २ ओ देणें, बोलावल्याबरोबर येतों म्हणून धांवून येणें. ३ उपयोगी

पडावयास किंवा गरज भागविण्यास तयार होणें. ०फोडणें-मोठयानें दुःखोद्गार काढणें; मोठयानें हांक मारणें; टाहो फोडणें. -मोआदि २. ०मारणें-१ बोलावणें, हाका मारणें. २ कार्य करणें, पाड लावणें. 'मद्गति हे अन्याचें येथें मारील काय हाक बळ।' -मोवन ६.३. हाका मारणें-१ ओरड करीत बसणें; चरफडत राहणें, केलेल्या चुकीबद्दल दुःख भोगीत बसणें, दुसऱ्याचे नांवाचा बभ्रा करणें, मोठयानें तक्रारी करीत सुटणें. 'कां न तुम्हींहि परिसा मारित आलों अशाचि हाका मी।' -मोउद्योग ११.५१. २ काम अपुरें पडून राहणें; प्रगति खुंटणें, बेत, कार्य इ० फिसकटणें. हाक ना बोंब-१ बिनबोभाट; तक्रार, नाखुषी इ० न दर्शविणें. २ केलेली ओरड, तक्रार एखाद्याचे कानीं जावयाची मुष्कील, अशक्यता. हाक बोंबम-स्त्री. आरडाओरड; हाकाटी; गलबला. हाकटणें-उक्रि. १ मोठयानें बोलावणें, एकानें किंवा अनेकांनीं एकास किंवा अनेकांस, जोराजोरानें हांक मारणें. -वामनराधा ५३. २ डांगोरा पिटणें; बोभाटा करणें. हाकणें-उक्रि. १ पशूंना लवकर जाणे इ० करितां शब्द, काठी इ० नीं नेटानें चालविणं; त्यांना काढून लावणें, पिटाळणें, पुढें ढकलणें. २ संसारादि खटलें कसेंहि करून चालविणें, रेटणें. ३ अतिशयोक्ति दिसायाजोगी किंमत, बातमी, गप्प सांगणें, झोकणें. हाकलणें-सक्रि हाकणें पहा. हुकारणी, हाकारणी-स्त्री. (जहाज इ०) चालू करण्याची क्रिया. हाकरणें, हाकारणें-क्रि. गलबत, नाव इ० चालू करणें, त्यांस गति देणें. २ गलबत चालू करण्याकरितां त्याचें शीड वाऱ्यावर पसरणें. ३ बैलांचा तांडा, प्रवासी यांना प्रवास करण्यास सांगणें. ४ एखाद्या कामगिरीवर जासूद, नोकर पिटाळणें, दवडणें. ५ घोडा इ०कांस जलद चालण्याबद्दल इशारा देणें, दौड करावयास लावणें. हाकावणें-उक्रि. (प्रा.) हाकणें १ अर्थ पहा. हाकहूल-स्त्री. आरडाओरड; हांकाटी, दंगा. [हिं.] हाका-पु (बडोदें) शिकारीचें जनावर दडलेल्या ठिकाणाहून हुसकविण्यासाठीं केलेली ओरड; हाकारा. (क्रि० करणें). 'हाका सुरू जाहला वाघ निघून गेला।' -गापो २३. हाका करणाऱ्यास हांक्या किंवा हांकेवाला म्हणतात. -गापो २३. हाकाक, हाकाहाक-स्त्री. १ हाकहूल पहा. २ तक्रार; ओरड. 'कोणा ग्रंथकाराची लेखणी भाषेच्या कोतेपणामुळें थांबली अशी हाकाक अजून कोणाच्या कानीं नाहीं.' -नि २०१. हाकाटा-टी-पुस्त्री. १ अनेक हाकांचा; आरोळयांचा आवाज; गलबला; गोंधळ. २ एखाद्याचे विरुद्ध ओरड; बोभाटा; तक्रार. ३ हवी असलेल्या वस्तूसाठीं जोराची मागणी. ४ ओरड; दंगा; गोंधळ; कल्ला. ५ कुप्रसिद्धि; डांगोरा. हाकटयाचा-वि. विद्वत्ता, धन इ० असण्याबद्दल प्रसिद्ध; नांव, कीर्ति झालेला; असकऱ्याचा. हाकारणी, हाकारणें-हकारणी-णें पहा. हाकारणें-सक्रि. १ ओरडून हांक मारणें; बोलावणें. २ शीड उभारून गलबत चालू करणें; शीड उभारणें; हकारणें. ३ चालू करणें; गती देणें. म्ह० आषाढी आणि सण हाकारी. हाकारा-पु १ हाकाटा पहा. बोलावणें. 'नवखंडीचिया राया हाकारा केला।' -संतराजीरूख १३. ५. २ दवंडी. ३ दरारा. ४ (नगरी) बोभाट. हाकालणें-उक्रि. हकालणें पहा. हाकाहाक-की-स्त्री. १ अनेक हाकांचा मिळून झालेला आवाज, यानें त्याला, त्यानें याला याप्रमाणें हांक मारणें; यामुळें झालेला गोंधळ. २ सर्वसामान्य सर्वत्र ओरड; हाकाटी; उदा० पावसाची-पिकाची-पाण्याची-हांकाटी; जुलमाविरुद्ध ओरड; उदा० कोतवालाची-मामलेदाराची-हांकाटी. ३ बाजारांतील जिन्नसांची चढीची किंमत इ०; किंवा जिन्नस संपल्यानें होणारी हांका मारण्याची अवस्था; दुर्भिक्ष.

हाक. हक्क—पु. हक्क पहा; तेथेंच सामासिक शब्द पहा. 'तुका म्हणे तरी म्हणवावें सेवक। खादलें तें हाक अन्न होय।' -तुगा ३६१३.

हाकम, हाकमाई. हाकमी—हाकीम इ० पहा.

हाकाल-ळ—क्रिवि. अद्याप; आतांपर्यंत; या वेळेपर्यंत. मयादेपर्यंत, पावेतों, वरी. इ० शब्दाशीं हि हा शब्द जोडला जातो. [हा+काल] 'तूं हाकाल खोटें बोलला नाहींस.' 'मीं हाकालपर्यंत तुझें वाईट केलें नाहीं.'

हाकिकत, हाकिकतनामा—हकिकत इ० पहा.

हाकी(कि)म—पु. देश, सुभा, परगणा, शहर यावरचा मुख्य अधिकारी, (मामलेदार, मोकाशी इ०). -रा ६.२९७. [अर. हकम्] ०शरा-पु. धर्मशास्त्री. -रा १८.२१. हाकिमी, हाकिमाई-स्त्री. नगरचें-परगण्याचें अधिपत्य; हाकिमाचा हुद्दा व काम.

हाकीम—पु. वैद्य; हकीम. -वामनविराट ६.५७. [अर. हकीम्]

· हाग. हागओ(व)क, हागणें, हागंदरी, हागमूत, हागरड, हागरडा, हागरा, हागरो, हागरें, हागवण, हागवणकर, हागार, हागिरडा, हागुरडा—हग, हगओक पहा. हागदोडा-स्त्री. (व.) उकिरडा.

हांग—उद्गा. छान! वाहवा! [ध्व.] 'आनंदया बोलिला हांग असा माझा भाई।' -ऐपो ७०.

हांगा—अ. (गो.) येथें. हंग पहा. ०सर-क्रिवि. (गो.) येथवर. ०सलें-वि. येथलें.

हांगाडेंगी—स्त्री. (व.) हयगय; दुर्लक्ष. [हांग द्वि.]

हागे—पुअव. लुटारू. -हरिवंशाची बखर २७.

**हागोडा**—वि (ना.) हगिरडा पहा. **हागोडें काम**-न. (ना.) अव्यवस्थित, अपूर्ण काम.

**हाज**—स्त्री. पर्वताचे कडयाखालील जागा, रस्ता.

**हाज, हज्ज**—स्त्री. मक्केची यात्रा. [अर. हज्ज]

**हाजत**—स्त्री. जरूरी; अडचण. 'परशुरामपंत यांस बिलफैल इंग्रजांचे तंबीकरितां आणवावे ऐसी हाजत नाहीं.' -रा १९. १०६. [अर. हाजत्]

**हांजा**—पु लांझा पहा.

**हांजा**—पु. (नाविक) लांकडी बोंबास शीड अडकविण्यासाठीं त्याचे शेंडयावरील भोंकांत भरून घेतलेली दोरी.

**हाजिबा, हाजिमा-म्मा**—पु हजिम्मा पहा.

**हाजिरी**—स्त्री. १ हजर असणें; प्रत्यक्षता; विद्यमानता; उपस्थिति. २ हाजिरी घेणें. ३ उपस्थितीची नोंद. (क्रि० घेणें). ४ अशा नोंदीची वही; रजिस्टर; मस्टर. [फा.] ०**खरडा-पट-पत्रक-बंद-याद**-पुनस्त्री. हजिरी नोंदण्याची वही. ०**ग(गि)णती**-स्त्री. (सैन्याची) मोजणी; मोजदाद. **हाजिरा हाजिरा** -क्रिवि. विश्रांती घेत घेत; दम खात (हमाल, जनावरें इ० नीं वाहतूक करतांना). [हाजीर द्वि.]

**हांजी**—उद्गा. हां! जी!; कोणी बोलत असतांना ऐकलें असें विनयानें उत्तर देताना उच्चारावयाचा शब्द. [हां! जी! हिं.] ०**हांजा**-स्त्री खुशामत; पुढें पुढें करणें. (क्रि० करणें, म्हणणें).

**हाजी**—पु. मक्केची यात्रा करून आलेला मुसलमान. [अर. हज्ज=मक्केची यात्रा]

**हाजीर**—वि. उपस्थित; विद्यमान; हजर. [अर. हाझिर्] म्ह० हाजीर तो वजीर=वेळेला जो कोण असेल त्याचें काम साधणें. ०**जबाब-जाब**-पु. त्वरित उत्तर; समयसूचक उत्तर. -वि त्वरित उत्तर देणारा; समयसूचकता असलेला. [फा.] ०**जबाबी-जाबी**-वि. हजीर जबाब अर्थ २ पहा. [फा.] ०**जामिनकी**-स्त्री. हाजीरजामीनाचा हुद्दा व काम. ०**जामीन**-पु. नेमलेल्या वेळीं आरोपीस (कोर्ट इ० त) हजर करण्यासाठीं घेतलेला ओलीचा माणूस; हमीदार. ०**निशी**-स्त्री हाजीरनीसाचें काम व हुद्दा. [फा.] ०**नीस**-पु. सैन्याची हजेरी घेणारा व तत्संबंधीं कामें करणारा अधिकारी. [फा.] ०**बाशी, हाजरबाशी**-स्त्री. वास्तव्य; मुलाजमत. 'दरबारीं हाजरबाशी करून सरकारची दौलतखाई चिंतीत आहों.' -चिरा ३५. [फा.] ०**बिगार**-स्त्री. तयार ठेवलेल्या बिगाऱ्यांकडून केलेली सामानाची वहातूक. [हिं] ०**बिगारी**-पु. हजीरबिगार करणारा बिगारी, माणूस. [हिं.] ०**मजाल(लो)स**-स्त्री. १ खटला ऐकावयाची दिवाणाची कचेरी; न्यायमंदिर; दरबार. २ अशा कोर्ट-दरबारांतील सभासद. ३ कोणत्याहि प्रसंगीं हजर असलेली सर्व मंडळी, समाज. ४ मामलेदार, मुन्सफ वगैरे तक्रार ऐकणाऱ्या सरकारी अधिकाऱ्याकडे केलेली लेखी तक्रार, अर्ज. -क्रिवि. १ भर न्यायकचेरीत, प्रत्यक्ष; सभेसमोर; सरकारी कोर्टापुढें. २ जगासमोर; लोकांपुढें; चारचौघांसमक्ष. 'मी तुला घरांत सांगणार नाहीं हाजीरमजालीस कायतें सांगेन.' **हजीरमजालिसीची याद**-स्त्री. सभेंतील जमलेल्या सर्व लोकांच्या सह्या घेतलेला कागद, निकालपत्र. **हजेरीची फौज**-स्त्री. नेहमींचें खडें सैन्य.

**हाजुमा**—स्त्री. दाट मैत्री; घरोबा. -शर. [अर. हुज्म]

**हाट**—पु. (बे.) स्त्रियांचा मासिक रजःपात; विटाळ. [का. हाट्ठु]

**हाट**—पु. बाजार; विशेषतः फिरता बाजार; जत्रा. [सं. हट्ट; का. हट्टि] म्ह० हाट गोड किंवा हात गोड=पक्वान्नास स्वादिष्टपणा बाजारच्या पदार्थांनीं येतो कां सुग्रणपणानें येतो? ०**कर-करी**-वि. बाजारकरी; बाजारचा. 'हाटकरी सकळ जन।' -तुगा ४२५७. ०**गाणें**-न. बाजारांतील गाणें. 'केवळ सत्त्वशुद्धीविण। जाहल्या गुरुवाक्याचें श्रवण। तें हाटगाण्या ऐसें जाण। अनोळखपण स्वस्वरूप।' -एभा १३.१६५. ०**चोहोटा**-पु. (महानु.) बाजारांतील चौक; भरबाजार. 'हे हाटचोहोटा बोलावे।' -सुपा वि. १.५२. ०**धारण**-स्त्री. (महानु.) बाजारभाव. 'कीं संभोग-सुखाचिअे हाटधारणे।' -शिशु ४७. ०**बाजार**-पु १ सामान्यतः बाजार; बाजारहाट. २ जिन्नसखरेदी. 'सकाळपासुन हाटबाजार केला आणि आतां शेरभर अन्न आणलें.' ०**वका**-पु. (महानु.) बाजारांत घेतलेलें सामान. -शर. ०**वट**-पुस्त्री बाजार; बाजारांतील दुकान; बाजारपेठ. 'उत्तर-दक्षिण कासारांची हाटवटी।' -ऋ ११४. 'कीर्तन केलें पोटासाठीं। देवा मांडिले हाटवटीं।' -दा ५.८.१९. **हाटकेवयाचा**-वि. बाजरांतून आणलेला (माल). 'वामनभटी हाटकेवयांचा वाटुगा मस्तकीं घेतला।' -उच.

**हाट**—पु. हट्ट. 'मागे तेव्हां देऊं हाट त्याचा पाहूं।' -रामदासी २.७७. [हट्ट] **हटावलें**-वि. हट्टी. 'नेदितां विषयदान हटावलें क्षोभें मन।' -एभा २०.२०४. **हाटु-ठु**-वि. (महानु.) हट्टी. 'बळेसी हाठु.' -भाए ३५८.

**हाटक**—न. सोनें; सुवर्ण. 'वीट उत्तम हाटकाची।' -नव २३.४४. [सं.] ०**रस**-पु. १ सोन्याच्या रंगाची शाई; सोनेरी शाई. २ सोन्याचा रस.

**हाटणें**—उक्रि. घाटणें; अहाटणें पहा.

**हाटील, हाटेला**—वि. हट्टी; आडदांड; कडवा; बेपर्वा. 'ते राठोड रजपूत हाडे परम हाटेले, त्यांचे ध्यानांत गनिमाची फौज नाहीं.' -भाव ९; -ऐपो २७९. [हिं.]

**हाटुशापाणी**—पु. मुलींचा एक खेळ. -मखेपु २८४.

**हॉटेल**—न. १ फराळाचें दुकान. २ खाणावळ. [इं.]

**हाड**—न. १ अस्थि; हाडूक. २ (ल.) मूळ जात; उत्पत्ति. 'त्या मनुष्याचें हाड खरें.' ३ अंगकाठी; शरीररचना; बांधा (जनावर, माणूस इ० चा). [सं. हड्ड; हिं. हड्डी] म्ह० १ हाड तितकें शेपूट जाड तोंड पाहून जेवण वाढ. २ (गो.) हाडली पड खाली पड-हातावरचें पोट **हाडचा**-वि. १ मूळचा; जातीचा; वर्णाचा. 'हा हाडचा ब्राह्मण.' २ स्वभावाचा. 'हाडचा गरीब आहे.' **एका हाडाचा-हाडामासाचा**-वि. एकाच जातीचा, कुळाचा. **हाडाचा खंबीर-कणखर-कठीण-बळकट-खबरदार**-वि. कणखर प्रकृतीचा-शरीराचा-बांध्याचा शरीरानें मजबूत. **हाडाचा खरा-चांगला-भला**-अस्सल; जातीवंत; टिकाऊ (मनुष्य, वस्तु). 'हा रुपया वरून वाईट दिसतो पण हाडाचा खरा आहे.' **हाडांचा चुना-चुरा-चूर-हाडांचीं काडें-हाडांचें पाणी-हाडांचे मणी-हाडांच्या फुंकण्या-करणें-होणें**-शरीर झिजविणें; फार परिश्रम करणें. शरीर खराब होणें; रोडावणें; झिजणें. **हाडांला-हाडीं खिळणें**-१ सर्व अंगांत मुरणें, शिरणें; दृढमूल होणें (भावना, रोग, गुण, दुर्गुण). **हाडाला-हाडीं लागणें**-१ (जिव्हारीं लागणें; वर्मी लागणें. २ त्रासदायकपणें चिकटणें. ३ (मूल, कर्ज, धंदा इ० बद्दल). फार काळजी लागणें; अभ्यास-चिंता-शोध इ०चा विषय होणें. **हाडांला-हाडीं-फासण्या घालणें-मारणें**-जिव्हारीं टोचून बोलणें; एखाद्यास लागेल असें बोलणें. **हाडांवर-हाडीं घाव घालणें**—१ वर्म मर्मच्छेद करणें. २ कडक रीतीनें, कठोरपणें वागविणें. **हाडावर चोट असणें**-(वना.) तोशीस लागणें. **हाडांशीं लग्न लावणें**-म्हाताऱ्याशीं किंवा अत्यंत रोडक्या माणसाशीं मुलीचें लग्न लावणें. **हाडीं विसावणें**-हाडीं शिरणें व तेथें थांबणें (जबर शत्रूचें शत्रुत्व, स्वतःच्या दुष्कृत्याचा पश्चात्ताप, असाध्य रोग). **हाडीं शुद्ध**-जातीनें, मनानें शुद्ध, चांगला. **हाडें उजविणें-भाजणें-शेकणें**-कसें तरी लग्न करणें; लग्न होणें. (अविवाहित, ब्रह्मचारी मृत झाला असतां त्या प्रेताचा समावर्तन व विवाह संस्कार करून मग दहन करतात. हा प्रेतसंस्कार कसा तरी उरकून घ्यावा लागतो यावरून ल.) **हाडें घुसळणें**-१ अतिशय काम करणें. २ सतावणें; गांजणें; जर्जर करणें. **हाडें निघणें-पडणें**-हाडें दिसणें; फार अशक्त, रोड होणें. **हाडें मोडणें-घुसळणें-खिळखिळीं करणें**-अतिशय गांजणें; निष्ठुरपणानें छळणें; त्रास देणें. सामाशब्द-०**कपाळ्या**-वि (हाडाच्या कपाळाचा-कपाळावर नशीब लिहिलें असतें म्हणून) दुर्दैवी; कमनशिबी; कपाळकरंटा. **हाडकपाळी**-वि. हेकड; शिरजोर; सरट; बेपर्वा; उपदेश; ताकीद इ०स न जुमानणारा. **हाडकी**-स्त्री. १ लहान हाड. २ मेलेल्या जनावरांचीं हाडें इ० ठेवण्यासाठीं महारांना दिलेली जमीन. हडकी पहा. **हाडकुरकुटी**-स्त्री. हाडीज्वर. **हाडकुळा-ळी-ळें**-वि. हाडें निघालेला; अशक्त; रोड. **हाडकेंकाडकें**-नअव. १ शेतीचीं जनावरें व आउतें. २ झिजलेलें व हाडहाड उरलेलें शरीर (क्रि० होणें; रहाणें; उरणें). **हाडखाईर**-न. हाडवैर. 'म्हणोनि समर्थेंसीं वैरा। जया पडिलें हाडखाईरा।' -ज्ञा १३.५५० **हाडखाऊ**-वि. (तिरस्कारार्थी) मांसभक्षक (शूद्र-यवनादिक जाती) **हाडगळ**-वि. रोडका; हाडें वर निघालेला; कृश. [हाड+गळणें] **हाडगात**-न. शरीरयष्टि, बांधा. 'हा पोटानें दुबळा झाला आहे पण हाडगात मोठें आहे.' [हाड+गात्र] **हाडजर, हाडीं ज्वर**-पु. हाडांत मुरलेला ताप. **हाडति-हडौति**-स्त्री. गळ्याखालच्या अर्धचंद्राकार हाडावरील खळगा. 'मुख मळिण वदन उभा हाडतिये घोणे।' -तुगा १२२. **हाडपरब**-पु. (व.) पितृपक्ष. **हाडपेर**-न. अंगकाठी. हाडगात पहा. **हाडबोड**-पु. (गो.) मासळीचा डोकें इ० भाग. **हाडभाऊपणा**-पु. भाऊबंदकी. 'वडीलकीचे अथवा हाडभाऊपणा सिद्ध करणारे महजर सांपडतात.' -अखिवऱ्याची महालक्ष्मी ६. **हाडमोर्डी**-स्त्री. एक बांडगुळासारखी वेल. हिला पानें नसून शेराप्रमाणें कांड्या असतात. **हाडवळा**-पु. हाडोळा पहा. **हाडवैर**-न. अत्यंत तीव्र व फार जुनें वैर. **हाडशिंगारी-सांधण**-स्त्री. एक वेल. **हाडसंद-संधी**-स्त्री. (वै.) हाडशिंगारी पहा. त्रिधारी कांडवेल. ही ठेचून ३ दिवस मोडलेल्या हाडावर बांधल्यास तें बरें होतें. **हाडहाड-हाडोहाड**-क्रिवि. प्रत्येक हाडांत. **हाडळ**-वि हाडकुळा पहा. **हाडांचा पंजर-सांपळा**-पु. हाडांचा सांगाडा. **हाडी जखम**-स्त्री जबर दुखापत **हाडीज्वर-ताप**-पु. हाडज्वर पहा. **हाडूक**-न. लहान हाड. (**गळ्याशीं-दाराशीं**) **हाडूक बांधणें**-१ एखादी बाई ठेवून घेणें, रखेली राखणें. २ त्रासदायक काम अंगावर ओढून घेणें. **हाडूक दाराशीं-दाराला-रोवणें-लावणें, पुरणें**-जातीबहिष्कृत करणें. **हाडेंकाडें**-नअव. हाडांचा सांपळा; कृश शरीर. (क्रि० होणें; रहाणें; उरणें -शरिराचें). **हाडोहाड**-क्रिवि. हाडहाड पहा. **हाडोळा-ळी**-पुस्त्री. १ महाराला दिलेली जमीन. हडोळी पहा. २ असल्या जमीनीचें उत्पन्न. **हाड्या**-पु. १ (खा. व.) कावळा. 'जाय उडून रे हाड्या। नको करूं काव काव।' -कोलते. २ (खा.) गाडी जमीनीवर टेकण्याचें जुंवाखालील लांकूड, खुंटा. -वि. १ हाडकुळा. २ फार हट्टी; हेकड. **हाडा रजपूत**-पु. फार हेकट माणूस. (रजपुतांच्या स्वभावावरून पुढील म्हण आहेच). 'कुवा (विहिर) टळे पण रजपूत ना टळे.' **हाड्यावर्ण-व्रण**-पु. हड्यावर्ण पहा. हाडांत खोल गेलेला व्रण.

* **हांडक-कें**—पु. (व. ना.) लहान मडकें. [हंडी]

**हाडणें**—सक्रि. ( कों. गो. कु. ) आणणें.

**हाडवा**—पु ( जुन्नरी ) भाला.

**हाडसणी-णें**—हडसणी-णें पहा.

**हाडळ**—स्त्री. हडळ पहा. 'ते देखे इंद्रियांची हाडळि।' -भाए ५२१.

**हाडा**—पु. हंडा पहा.

**हाडी**—स्त्री. ( कु. ) घर.

**हांडी, हांडीबाग, हांडीमडकी, हांडेभांडें, हांडेमडकें**—हंडी, हंडीमडकी इ० पहा.

**हांडी**—स्त्री. ( नाविक ) १ गलबताचा पाण्यावरील सुकाणूकडचा कांहींसा भाग. २ ( गो. ) कमर; कडा. म्ह० (गो.) हांडीर असा चेडो, भोवतो सगलो वाडो=कमरेवर मूल पण सगळा गांव धुंडाळते. तुल० काखेंत कळसा, गांवाला वळसा.

**हाडुंग**—न. हडुंग पहा.

**हाडूबायल्या, हांडोण्या**—वि. ( ना. ) रांडयाराघोजी; भेकड.

**हांडूल, हांडोरें**—न. ( कों. ) लहान हांडा.

**हांडोरिया**—वि. अडाणी; अज्ञान. 'जाणवूनि गेला हांडोरिया पोरां.' -तुगा ३२२६. [ आंडोर ? ]

**हाण**—स्त्री. १ हानि; तोटा; नुकसान. २ घात;इजा; दुखापत. 'मुला वय तुझें लहान। तुला लागल्या तहान। उदक न मिळतांचि हाण।' [स. हानि] म्ह० आपली हाण लोकाची मरमर.

**हाणणें**—उक्रि. १ काठी इ० नें ताडण करणें; मारणें; ठोकणें. २ छाटणें; काटणें; कापणें. ३ ठार मारणें. ४ ( व. ) हांकणें; हाकून लावणें. [ सं. हन्=मारणें ] **हाणून पाडणें**-१ जमीनदोस्त करणें. २ ( ल. ) बिघडविणें; निष्फल करणें; मोडून काढणें. **हाणता**-वि. ठोकणारा; धोपटणारा; बडविणारा; छाटणारा, कापणारा; ठार मारणारा. म्ह० हाणत्यांच्या मागें पळत्यांच्या पुढें=अत्यंत भेकड माणसास उद्देशून म्हणतात. **हाण(णा) मार, हाणामारो, हाणाहाण-णी**-स्त्री. एकमेकांनीं एकमेकांस मारणें; आवेशानें ठोकणें; मारामारी. [ हाणणें+मारणें ] **हाणविणें**-उक्रि. ( हाणणेंबद्दल चुकीनें ) मारणें; मारविणें; बडविणें; ठोकणें. **हाणी**-स्त्री. हानि; तोटा. [ सं. हानि ]

**हात**—पु. १ हस्त;बाहु; खांद्यापासून बोटांपर्यंत शरीराचा भाग. कोपरापासून बोटांपर्यंतचा भाग. २ कोपरापासून मधल्याबोटाच्या टोकापर्यंतचें माप. 'हा पंचा साडेचार हात भरला.' ३ उजवी किंवा डावी बाजू, तरफ. 'आमचें घर वाड्याचे उजव्या हातास आहे.' ४ ताबा; आटोका; अधिकार; खातें. 'तुझें काम करणें माझ्या हातीं नाहीं.' ( कारक विभक्तींत प्रयोग ). ५ स्वतः, व्यक्तिगत मनुष्य. 'अपराधावांचून शिवी देणें हें माझ्या हातानें घडणार नाहीं.' ६ स्वामित्व; कबजा; मालकी; ताबा. 'सांप्रत माझ्या हातीं पैसा नाहीं.' ७ हातानें वाजविण्याच्या वाद्यावर मारलेली हाताची थाप. ८ डाव; खेळ ( काठी, लाठी, पट्टा इ० शस्त्रांचा ). 'पट्याचे दोन हात करून दाखव'. ९ कर्तृत्वशक्ति; अंग; हस्तकौशल्य ( एखाद्या विषयांतील, कलेंतील ). 'त्याचा चित्र काढण्याचा हात चांगला आहे.' १० कुलुपाची किल्ली; चावी. 'कुलपाचा हात इकडे दे बघूं.' ११ सोंगट्या, पत्ते इ० खेळांतील डाव, खेळण्याची पाळी, खेळ; खेळणारा गडी. 'अजून आमच्यांतील एक हात खेळावयाचा आहे.' १२ हस्तक; मदतनीस; साहाय्यक; हाताखालचा मनुष्य. १३ ज्यावर दंड, जोर काढावयाचे तो लांकडी, दगडी ठोकळा; हत्ती. १४ ( रंग देणें, सारवणें इ० कामीं ) वरून हात फिरविणें; हातानें दिलेला थर, लेप. १५ ठोसा; तडाखा; हस्तक्रिया ( भिन्नभिन्न प्रसंगीं त्या त्या अर्थानीं ). १६ ( तेली-घाणा ) कातरीस जोडलेला वांकडा लाकडी तुकडा. १७ हात टेकावयासाठीं, हातानें धरावयाचा कोणताहि पदार्थाचा भाग. 'खुर्चीचे-रहाटाचे-हात.' १८ हाताच्या आकाराची कोणतीहि वस्तु. १९ ( सोनारी ) हातांतील दागिना सैल करण्याचें एक हत्यार. २० ( नृत्य ) दोन हातांनीं मिळून करावयाचे अभिनयाचे प्रकार. हे ४० प्रकारचे आहेत. २१ ( शिंपी ) कापड मोजण्याचें बारा तसूंचें एक माप; गज. २२ पान्हा ( नट-बोल्ट फिरविण्याचा ). [ सं. हस्त; प्रा. हत्थ; हिं. गु. हाथ; बं. हात; आर्मे.जि.हथ, अथ; पॅलेस्टाईनजि. हस्त; पोर्तुजि. बस्त ] म्ह० १ हात ओला तर मैत्र भला-नाहींतर पडला अबोला-जोपर्यंत माणूस दुसऱ्यास देत असतो तोंपर्यंत त्याच्याशीं सगळे मित्रत्वानें वागतात. २ हात घशांत घातला तरी कोरडाच=कितीहि मदत केली तरी बेइमान राहणारा. ३ हातपाय रोडक्या, पोट लोडक्या; हातपाय काडक्या, पोट ढेऱ्या=पोटाचा तटतटीतपणा व अवयवांचा रोडकेपणा. ४ हात फिरे तेथें लक्ष्मी फिरे, तोंड फिरे तेथें अवदसा फिरे=उद्योगी माणसाचा हात श्रीमंती आणतो तर नुसत्या बडबड्याच्या हातून कांहींच होत नाहीं उलट दारिद्र्य येतें. ५ आपला हात जगन्नाथ ( जगन्नाथपुरीस आपल्या हातानें वाटेल तेवढा प्रसाद घेतां येतो त्यावरून ) वाटेल तेवढें व तसें घेणें; प्राचुर्य. ६ हातचें सोडून पळत्याचे पाठीस लागूं नये=जें खात्रीनें आपलें आहे ( आपणांस मिळावयाचेंच आहे ) तें सोडून जें अनिश्चित आहे तें मिळविण्याच्या नादीं लागूं नये. ७ हातच्या कांकणास आरसा कशाला ? ( हातांतील कांकण डोळ्यानें दिसण्यासारखें आहे, आरसा आणणें वेडेपणा )=जी गोष्ट उघड सिद्ध आहे ती दाखविण्यास पुराव्याची जरूरी नाहीं. ८ हातपाय ऱ्हावले काम करूं वायले=नाइलाज होणें. ९ हातपाय लुले तोंड चुरचुरां चाले=अशक्त पण तोंडाळ, मुजोर माणूस. १० हातभर लांकूड

नऊ हात ढलपी=अतिशयोक्ति करणें. ११ हातां नाहीं अडका बाजारांत चालला धडका=जवळ कवडी नाहीं पण डौल बादशहाचा (व.प्र.) ०आखडणें-देण्यासाठीं पुढें केलेली वस्तु एकदम मागें घेणें; देण्याचें प्रमाण कमी करणें, बंद करणें. ०आटोपणें-मारणें इ० हातानीं करावयाची कोणतीहि क्रिया बंद करणें. ०आवरणें-१ हात आटपणें २ कोणत्याहि कृत्यापासून परावृत्त होणें. 'ऐकेल वचन माझें आवरिल दुर्विकाळ हात रणीं।' -माकर्ण ४६.४४. ०इचकणें-(व.) हात मोडणें. ०उगारणें उचलणें-(एखा यास) मारावयास प्रवृत्त होणें. ०उचलणें-१ स्वयंस्फूर्तीनें, आपण होऊन बक्षीस देणें. २ हातीं घेणें (काम, धंदा). ०ओढविणें-१ घेण्यासाठीं झांप टाकणे. २ विटंबना, करण्यासाठीं तुच्छता दर्शविण्यासाठीं तोंडापुढें हात करणें. ०ओवाळणें-तुच्छता दर्शविणें. ०करणें-१ लाठी मारणें; शस्त्राचा वार करणें. हात टाकणें. 'स्त्रीचे अंगावर हात करूं नये.' २ पट्टा, बोथाटी वगैरेचे डाव करणें; फिरविणें ३ वादविवाद, युद्ध करणें. ०कापून-देणें-गुंतणें-लेखी कराराकरून स्वतःस बांधून देणें ०खंडा असणें-एखादें कार्य (दुष्कर) हमखास पार पाडण्याचें कौशल्य, पटाईतपणा अंगीं असणें. ०गहाण ठेवणें-उजवा हात खवास बांधून कोणत्याहि कामीं त्याचा उपयोग करावयाचा नाहीं असा नवस करणें. २ कोणत्याही कामास हात न लावणें. ०घालणें-१ (एखादें काम) पत्करणें; करावयास घेणें. २ एखादी वस्तु घेणें, धरणें, शोधणें यासाठीं हात पुढें करणें. 'मग विभु वसनांसी त्याचिया हात घाली।' -आनंदतनय. ३ (एखाद्या कामात, व्यवहारात) ढवळाढवळ करणें; आंत पडणें. ०घेणें-(पत्यांचा खेळ) हुकूम मारून अगर भारी पान मारून दस्त करून घेणें. ०चढणें-प्राप्त होणें. 'अनुताप चढलिया हात। क्षणार्धे करी विरक्त।' -एभा २६.२०. हाताचा आंवळा-मळ, हातचें कांकण-उघडउघड गोष्ट; सत्य. ०चा मळ-अत्यंत सोपें कृत्य; हात धुण्यासारखें सोपें काम; अंगचा मळ. ०चालणें-१ हातात सत्ता, सामर्थ्य, संपत्ति असणें, मिळविणें, मिळणें. २ एखादी गोष्ट करतां येणें. 'कशियावर माझा हात चालत नाहीं.' ०चालविणें-हत्यार चालविणें (संरक्षणार्थ). 'न्यायाच्या अभावीं ज्याला त्याला हात चालवावेसें वाटणें रास्तच होईल.' -टि १ २२. ०चेपणें-लांचाचे पैसे मुकाट्यानें एखाद्याचे हातांत देणें. ०चोळणें-फार राग आला असतां तळहात एकमेकांवर घासणें; कुंठित गति होऊन स्वस्थ बसावें लागणें. 'शल्य सुयोधन वाक्यें कोपे चोळी करें करा ...।' -मोकर्ण २१.१३. ०जोडणें-१ नमस्कार, प्रार्थना, विनति करणें. २ शरण जाणें, येणें. 'अपराध फार केले परि आतां हात जोडिले स्वामी।।' -मोआर्याकेका. ३ नको असलेला पदार्थ हात जोडून आजेवानें दूर सारणें; अव्हेरणें. 'दानश्री त्याहुनि बहु दुःखामहि हात जोडितो मीन।' -मोबृहद् ८ ०झाडणें-१ झिडकारणें; नापसंत ठरविणें. २ निराशेनें सोडून देणें ३ एखादें काम उरकून मोकळें होणें. ०टाकणें-१ पोहणांना पाण्यावर हात मारणें. २ (एखाद्यावर) प्रहार करणें; मारणें. 'बायकोमाणसाच्या अंगावर हात टाकणें तुम्हाला शोभत नाहीं' ०टेकणें-१ काम करण्यास असमर्थ असल्यानें पराभव पावल्याचें कबूल करणें. २ म्हातारपणानें अशक्त होणें. ३ दमणें, थकणें; टेकीस येणें. ०तोडणें-स्वतःच्या लेखानें आपणांस बांधून घेणें. ०थावरणें हात आवरणें; आटोपणें. '...थावरूनि हातरणीं।' -मोस्त्री ६.५१. ०दाखविणें-दावणें-१ हस्तसामुद्रिक जाणण्यासाठीं जाशापुढें तळहात करणें. २ अहितकारक परिणाम करणें. ३ स्वतःची शक्ति सामर्थ्य दाखविणें 'शक्र दिदेव असते तरि त्यामहि ह वितोंनि हात रणीं।' -मोभीष्म ३.४ ४ नाडीपरीक्षा करण्यासाठीं वैद्यापुढें हात करणें. ५ हातानें एखादी वस्तु दर्शविणें. ६ वडवून काढणें; पारिपत्य करणें; सूड घेणें; उणें काढणें इ० हात दावून नवलक्ष्मण चितोंगे, करणें. ०दाबणें-लांच देणें 'त्यानें आपल्यास मदत करावी म्हणून त्याचे हात दाबावे असें एकदा मनात येतें. -विवि १०. ९ २१० ०देणें-१ मदत करणें; तारणें. घडता अधःपतन मज पुण्यें देतिल न हात परिणामीं।' मामादि १९ ३०. २ चोरणें; उचलेगिरी करणें. ३ खाद्यपदार्थावर ताव मारणें ४ (बायकी, छप्पापाणी) छप्पू घातलेल्या मुलीस इतर मुलींनीं (तिनें उठावें म्हणून) हस्तस्पर्श करणें. ०धरणें-१ अडविणें; हरकत करणें; स्पर्धा करणें; बरोबरी करणें. २ लाच देणें. ०धरून जाणें-विवाहित स्त्रीनें एखाद्या परपुरुषाबरोबर पळून जाणें; जाराबरोबर निघून जाणें. ०धुणें-(ल) एखाद्या कामातून आपलें अंग काढून घेणें. ०धुवून पाठीस लागणें-एखाद्याचा नाश करण्याविषयीं हट्टानें प्रवृत्त होणें; चिकाटी धरून एखाद्याचा पाठलाग करणें. ०न बनणें-(व.) विटाळशी होणें; गुन्हा येणें. ०नाचविणें-चेष्टा करण्यासाठीं दुसऱ्याचे तोंडापुढें हातवारे करणें. हात ओवाळणें पहा. ०पडणें-१ एखादें काम अनेकांनीं लागून संपविणें; एखादा खाद्यपदार्थ अनेकांनीं एकसमयावच्छेदेंकरून फन्ना करणें. २ (ना.) जिवंतपणीं भेट नाहीं पण देहनापूर्वी तरी प्रेताचें दर्शन होणें. ०पसरणें-भीक मागणें. ०पाय खोडणें-१ अवयव आखडणें; विव्हल होणें. २ एखाद्यास प्रतिबंध, अडचण करणें. ०पाय गळणें-गाळणें-१ अशक्त होणें; रोडावणें. २ खचून जाणें; नाउमेद होणें; गलितधैर्य होणें ०पाय गुंडाळणें-१ अंतकाळच्या वेदनांनीं हातपाय आखडणें, क्रियाशक्ति रहित होणें. २ हरकत, अडथळा करणें. ०पाय चोळणें-१ सूड घेण्याची प्रतिज्ञा करणें; चरफडणें. २ रागानें तरफडणें; शिव्याशाप देणें. ०पाय

**झाडणें**-१ हातपाय गुंडाळणें अर्थ १ पहा. २ सुटकेसाठीं हातापायांचा उपयोग करणें. ३ धडपड करणें; चरफडणें. ०**पाय ताणणें**-सुखानें, निष्काळजीपणानें हातपाय पसरून पडणें ०**पाय धोडावप**-( गो ) आटापिटा करणें ०**पाय पसरणें**-१ हातपाय गुंडाळणें अर्थ १ पहा. २ मर्यादेच्या, आटोक्याच्या बाहेर जाणें; जास्त जास्त व्याप वाढविणें; पसारा वाढविणें. म्ह० भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी. ३ काम हातं नसल्यास सबबी सांगणें; कामांत आळस करणें ( काम करीन असें वचन दिलें असतां ). ४ मागणी वाढत जाणें, अधिकाधिक आक्रमण करणें. ०**पाय पाखडणें**-अंतकाळच्या वेदनेनें, फार सतापानें हातपाय झाडणें. ०**पाय पांघरून-पोटाळून बसणें** -आळशासारखें बसणें; जेठा मारून बसणें ०**पायं फुटणें**-१ उधळपट्टी सुरू होणें; संपत्तीला ( जाण्यास) पंख फुटणें. ' दौलतीला अलीकडे हातपाय फुटूं लागले आहेत.' २ लुच्चेगिऱ्या करण्यांत तरबेज होणें. ३ थंडीनें हातपायास भेगा पडणें. ०**पाय फोडणें-लावणें-फुटणें-लागणें**-१ मूळ गोष्टींत, अंदाजांत भर घालणें; वाढविणें. २ नटविणें; थटविणें; अलंकृत करणें. ३ मागून वाढविणें (काम, दर, खर्च इ० ). ४ लबाडया इ० नीं सजवून उजळून दाखविणें. ०**पाय मोकळे करणें**-फेरफटका करून हातपाय सैल, हलके करणें; फिरणें; सहल करणें. ०**पाय मोडणें-मोडून येणें-टाकणें**-१ तापापूर्वी अंग मोडून येणें; निरंगळी येणें. २ बलहीन, निःसत्त्व करून टाकणें; हरकत घेणें. ०**पाय सोडणें**-अंतकाळच्या वेदनांनीं हातपाय ताणणें, ताठ होणें. ०**पाय हालविणें**-उद्योग, परिश्रम, कष्ट इ० करणें; स्वस्थ न बसणें ०**पोंचणें**-कृतकृत्य होणें ( ढुंगणाला हात पोंचणें असा मूळ प्रयोग ). ०**फाटणें**-रुची वाढणें. ' जेथें जिव्हेचा हातु फाटे ।' -ज्ञा १८.२४९. ०**फिरणें**-लक्ष जाणें; व्यवस्थित ठेवण्याची काळजी घेणें; साफसफाई करणें. ०**फिरविणें**-१ लहान मुलास प्रेमानें कुरवाळणें. ' प्रेमें मजवरुनि हात फिरवूनी ।' -मोउद्योग १३.१८३. २ पुन्हां उजळणी, उजळा देणें. ०**बसणें**-१ एकसारखें लिहीत, वाचीत इ० राहणें. २ अक्षरांचें वळण बसणें; तें पक्कें होणें. ३ एखादें काम उत्तम प्रकारें करतां येणें; मनांत ठसणें; विशिष्ट क्रिया करण्याची सफाई हातास प्राप्त होणें. ०**बांधणें**-१ मर्यादा घालणें; स्वैर होऊं न देणें. २ अडथळा आणणें. ०**बोट लावणें-भार लावणें**-मदत करणें. ०**भिजणें**-१ दक्षणा देणें; (गो.) हात भिजविणें. २ लांच देणें; हात ओले करणें. ०**मारणें**-१ बळकाविणें (पैसा इ०) देणें. २ अधाशीपणानें खाणें; ताव मारणें. ३ एखाद्या वस्तूवर विविध क्रिया करणें. ०**मिट्टीला येणें**-( माण. ) हाताहातीं होईपर्यंत भांडणें. ०**मिळवणें**-१ घाव घालणें ' तस्करानें अलदीकरून हात मिळविला जाऊन ।' -ऐपो १९०. २ ( कुस्ती ) सलामी घेणें. ०**मोडणें**-१ असहाय्य, मित्रहीन होणें २ मिळत असलेली देणगी बक्षीस नाकारणें ०**र खर्चणें**-कुचराई करणें. ०**राखून खर्च करणें**-काटकसरीनें खर्च करणें. ०**लागा ना**-( गो. ) विटाळशी होणें. ०**लावणें**-मदत करणें. -**वसणें**-क्रि. हस्तगत होणें. ते ज्ञाननिष्ठा जेथें हातवसे । -ज्ञा १८.१२४८; -भाए २४०. ०**वाहणें**-१ हत्यार चालविणें. ' परि परमप्रिय अर्जुन त्यावरि याचा न हात वाहेल । -मोउद्योग १२.५४. २ प्रवृत्त होणें; कार्य करणें. ०**वळणें**-१ सराव, परिपाठ इ० नें हातास सफाई येणें. २ ( एखाद्या गोष्टीस, कृत्यास ) प्रवृत्त होणें. ०**सैल सोडणें**-सढळपणें खर्च करणें. ०**सोडणें**-१ पूर्वीप्रमाणें कृपा, लोभ न करणें. २ संगति, ओळख सोडणें. ०**हातांत देणें**-लग्न लावणें ' एखाद्या तरुणीचा हात माझ्या हातांत दे.' -भा ४९. ०**हालवीत येणें**-काम न होतां रिकामें परत येणें. **हातणें**-क्रि. सारवणें **हाताखालीं घालणें**-देखरेखीखालीं, अंमलाखालीं, कबज्यांत, ताब्यांत घेणें. **हातां चढणें**-प्राप्त होणें. ' जरी चिंतामणी हाता चढे ।' -ज्ञा ३.२३; -एभा १०.२८२. **हाताचे पायावर लोटणें**-आजची अडचण उद्यांवर ढकलणें; आजचें संकट लांबणीवर टाकणें. **हाताचे लाडू होणें**-खरजेनें हाताच्या मुठी वळणें, त्या न उघडणें **हाताच्या धारणेनें घेणें**-मारणें; बुकलणें. **हातांत कंकण बांधणें**-एखाद्या गोष्टीची प्रतिज्ञा करणें; चंग बांधणें ( यजमानानें यज्ञ करावयाच्या पूर्वी हातांत दीक्षासूत्र बांधण्याच्या चालीवरून ). **हातांत हात घालणें**-१ लांच देणें २ मैत्रीच्या भावानें वागणें, प्रेम करणें. ३ विवाहसंबंध घडवून आणणें. ४ विवाहित स्त्रीनें परपुरुषाशीं संबंध ठेवणें; निघून जाणें. **हातातोंडाशीं गांठ पडणें**-१ घास तोंडांत पडणें; खावयास सुरुवात करणें; जेवणाखेरीज इतरत्र लक्ष न जाणें. २ एखाद्या कार्यास घाईनें आरंभ होणें ३ बोंब मारणें. **हातातोंडास येणें**-१ तारुण्यावस्था प्राप्त होणें ( लग्न झालेली स्त्री, तरुण मुलगा इ० ). २ फल देण्याच्या स्थितीस येणें. **हातापायांचा चौरंग होणें**-पेटके वगैरेमुळें हातपाय आखडणें. **हातापायांचे डगळे होणें-पडणें-मोडणें**-अशक्तपणानें अंगास कंप सुटणें; अंग शिथिल होणें. **हातापायांचे ढीग पडणें-होणें**-भीतीनें, आजारानें अशक्त असहाय्य होणें. **हातापायांच्या फुंकण्या होणें**-अशक्तता, निर्बलता येणें. **हाता( तीं )पायां( यीं ) पडणें**-१ गयावया करणें, प्रार्थना करणें. २ शरण जाणें; नम्र होणें; दया याचिणें. **हाताबोटावर येणें, हातावर येणें**-आतां होईल, घटकाभऱ्यानें होईल अशा स्थितीस येणें; हस्तगत कबज्यांत, साध्य होण्याच्या अगदी बेतांत असणें. **हाताला चढणें**-प्राप्त होणें. ' संसार कशाचा अरि न हाताला चढली ।'

-राला ११२. **हाताला येईल तें**-जें कांहीं हातांत सांपडेल तें; ज्याचेवर हात पडेल तें. **हाताला लागणें**-गमावलेल्या, फुकट गेलेल्या, नासलेल्या, बिघडलेल्या वस्तूंतून अल्प अंश मिळणें. ' कापडांत पैसे घालूं नका, त्यांतून हाताला कांहीं सुद्धां लागणार नाहीं. ' **हाताला चंगण लावणें**-लांच देणें. -राको १३३७. **हाताला हात लावणें**-१ पति पुण्याहवाचनादि धर्मसंस्कारास बसला म्हणजे पत्नीनें त्याच्या हातास नुसता हात लावणें ( म्हणजे तिलाहि त्याचें फळ मिळतें ). २ स्वतः कांहीं न करतां दुसऱ्यानें केलेल्या कामाच्या फळांत वाटेकरी होणें; दुसऱ्याच्या कार्याला अनुमति देणें. **हातावर असणें**-पूर्णपणें साध्य असणें. **हातावर देणें-आणणें-काढणें**-तारण, गहाण न ठेवतां पैसे उसनें आणणें, काढणें, घेणें. **हातावर तुरी देणें-देऊन पळून जाणें-हातावर हात देऊन-मारून पळणें-पळून जाणें**-फसविणें; डोळ्यादेखत फसवून पळून जाणें; देखत देखत भुलविणें. ' सुभद्रा काबीज करण्यासाठीं श्रीकृष्ण परमात्म्याच्या मदतीनें बलिरामाच्या हातावर ज्या तुरी दिल्या...तें पाहून तरी आम्हांस कधीं विषाद झाला आहे काय ? ' -आगर. **हातावर दिवस काढणें-लोटणें**-मोठ्या कष्टानें संसार चालविणें. **हातावर धरणें**-हातांवर संभाळीत राहावयास लावणें ( मुलानें ). ' यानें मला सकाळपासून हातावर धरिलें. ' **हातावर पाणी पडणें**-भोजनोत्तर आंचवणें. ' हातावर पाणी पडलें कीं चालला बाहेर. ' **हातावर पिळकणें**-लांच देणें. **हातावर पोट भरणें-संसार करणें**-अंगमेहनत, भिक्षा, नौकरी करून उपजीविका करणें. **हातावर मिळविणें**-मिळवावें व खावें अशा स्थितींत राहणें. **हातावर येणें**-जवळ येऊन ठेपणें. **हातावर येणें-लागणें-दूध देऊं लागणें**-थानास वासरूं न लावतां किंवा पान्हवण ( सरकी इ० ) पुढें न ठेवतां जनावरानें दूध देणें, पान्हवणें. **हातावर शीर घेऊन असणें**-कोणतेंहि धाडसाचें कृत्य करण्यास सदां सिद्ध असणें. **हातावर हात चोळणें**-रागानें तळहात एकमेकांवर घासणें; चरफडणें. ' इंद्रें स्वतातघातक पाठीसी घातला म्हणोनि करें । कर चोळी... ' -मोआदि ७.४०. **हातावर हात मारणें**-१ एखादी गोष्ट, सट्टा इ० पटला म्हणजे दुसऱ्याचे हातावर आपला हात मारणें. २ वचन देणें. **हातास हात लावणें**-( देणाऱ्याच्या, घेणाऱ्याचे हातास स्पर्श होणें ) द्रव्यलाभ होणें. **हातास-हातां-हातीं चढणें**-प्राप्त होणें. ' तो किल्ला माझ्या हातीं चढला. ' ' नवनीत मंथनावांचून । हातां न चढे सहसाहि । ' **हातीं धरणें**-१ स्वतःच्या देखरेखीखालीं घेणें; एखाद्यास आपल्या आश्रयाखालीं घेणें. २ निरंकुशपणें मोकाट सोडणें ( जीभ, तोंड, पोट इ० इंद्रियें ). **हातीं घोंडे घेणें**-१ विरुद्ध उठणें. २ वेड्यासारखें करणें. **हातींपायीं**( अंग इ० ) **डेवणें-धावणें-येणें-रेवणें**-जाड्य, सुस्ती येणें; शिव्या देण्यास तयार होणें. **हातींपायीं उतरणें-सुटणें-मोकळी होणें**-सुखरूपपणें बाळंत होणें. **हातींपायीं पडणें, लागणें**-अतिशय विनवण्या, काकुळत्या करणें. **हातीं भोपळा घेणें-देणें**-भिक्षा मागणें, मागावयास लावणें. **आडव्या हातानें घेणें**-१ चोरून; चोरवाटेनें घेणें. २ झिडकारणें; भोसडणें; तुच्छता दाखविणें; कचकावून खडकाविणें; मारणें. **आडव्या हातानें घेणें, चारणें**-बाजूनें, तोंडांत हात घालून खाऊं घालणें; औषधोपचार करणें ( घोडा इ०स ). ( देणें-चोरून देणें-मारणें-मागल्या बाजूनें मारणें-ठोकणें ). **एका हाताचीं बोटें पण सारखीं नाहींत**-सारख्या परिस्थितींतील माणसें असलीं तरी त्यांच्यांत थोडाफार फरक असतो. **दोहों हाताचे चार हात करणें-होणें**-लग्न करणें, होणें **या हाताचे त्या हातावर**-क्रिवि. ताबडतोब; जेव्हांचे तेव्हांच ( दुष्कृत्याची फेड लवकर व खात्रीनें मिळते या अर्थी ). **या हाताचें त्या हातास कळूं न देणें**-अत्यंत गुप्तपणें करणें. **रिकाम्या हातानें**-जरूरीच्या साधनां-उपकरणां-सामग्रीखेरीज; कांहीं काम न करतां. **याचा हात कोण धरीत आहे ?**-याच्या बरचढ, बरोबरीचा कोण आहे ? याचा हात धरण्याची शक्ति कोणास आहे ? **हातांत काय तागडू मिळाला**-( व ) कोणता फायदा झाला ? **हातांत नारळाची आई ( नरोटी ) देणें**-भिक्षा मागावयास लावणें. सामाशब्द- ०**अनार**-पु. शोभेच्या दारूचा एक प्रकार. ०**इंद्**-न. ( कों. ) खेंकडे पकडण्याचें जाळें. ०**उगावा**-पु. १ एखाद्या किचकट, अडचणीच्या कामांतून, धंद्यांतून अंग काढून घेणें. २ सूड; पारिपत्य. ( क्रि० करणें ). ३ कर्जाची उगराणी; घातलेलें भांडवल परत मिळविणें. [ हात+उगवणें ] ०**उचल**-स्त्री. १ पेढींतून स्वतःची रक्कम आतां थोडी मग थोडी अशा रीतीनें खर्चण्यास घेणें. २ मूळ भांडवल; मुद्दल. उचल मध्यें पहा. ०**उचला**-वि. १ आपखुषीनें, हात उचलून दिलेला ( पदार्थ ). २ ज्याचा स्वतः करण्याबद्दल पत्कर घेतला आहे असा ( व्यवहार, उद्योग ). ०**उसणा-ना**-वि थोडा वेळ उसना घेतलेला; लवकर परत करण्याच्या बोलीनें आणलेला ( त्यामुळें लेख इ० लिहून न घेता दिला-घेतलेला ). ०**उसणें-नें**-न. थोड्या मुदतींत परत करण्याच्या बोलीनें ( लेख करून न देतां ) उसनी घेतलेली रक्कम. ०**कडी**-स्त्री. हातांतील बेडी. ' मन सितरील विवेकासीं । यालागी हात कडिया दोहींसीं । ' -एभा २३.५५१. ०**करवत**-पुस्त्री. हातानें चालविण्याची लहान करवत. ०**करवती**-स्त्री. लहान हात करवत. ०**करीण**-स्त्री. अबलाला हात लावितांच ( वासरूं न सोडतां किंवा आंबोण न ठेवतां )

पान्हा सोडून दूध देणारी गाय; म्हैस. ह्याच्या उलट पान्हवणकरीण. ०कार्पे-न. (गो.) लांडी, बिन बाह्यांची बंडी. ०काम-न. हस्तकौशल्याचें काम (यांत्रिक कामाच्या विरुद्ध); हस्तव्यवसाय. (इं.) हँडिक्रॅफ्ट. ०कैची-कचाटी-स्त्री. आलिंगन; मिठी. ०खंड-वि. १ मधून मधून कामांत मोडवणूक करणारा; मदतनीस (मूल, मित्र, शेजारी); अडल्या वेळीं आपल्या कामीं उपयोगी पडणारा. २ हात खंडा पहा. [हात+खंड=खळ, विसावा] ०खंडा-वि. निष्णात, करतलामलकवत् असलेली; म्हणाल त्यावेळीं तयार (विद्या, कला). ०खर्च-पु. किरकोळ खर्च; वरखर्च. ०ख(खं)वणी-स्त्री. लहान खवणी. ०खुंट-खुंटा-पु (विणकाम) वशारन पसरलेल्या लांबीपाशीं असलेल्या समोरच्या खांबापासून मागा पाशीं बसण्याच्या जागेजवळ उजवीकडे दोरी बांधावयाची खुंटी. ०खुरपणीचें लोणी-न. हातखुरप्या नारळाचें खोबरें. ०खुरपा-वि. हातानेंच आंतील खोबरें खरवडून काढण्याजोगा (कोंवळा नारळ). ०खुरपें-न १ हातखुरपा नारळ. २ गवत काढण्याचा लहान विळा. ०खे(खो)रणें-न. कलथा; उलथणें; झारा. (क्रि० लावणें-अन्नास, पैक्यास=पैका उकळण्याचा सपाटा). म्ह० हातखेरणें असतां हात कां जाळावा. ०खेवणें-न. १ हातवल्हें. २ मदतनीस; हाताखालचा माणूस. ०खेवा-ड्या-पु. हातखेवणें अर्थ २ पहा. ०खोडा-पु. हात अडकविण्याचा सांपळा. 'चंद्रसुर्याचा हातखोडा। काळा कैसेनि चालिजे।' -भाए ५९४. ०गाडी-स्त्री. हातानें ढकलून चालविण्याची गाडी. ०गुंडा-धोंडा-पु. १ हातानें फेकण्या-उचलण्या-जोगा दगड. 'कुश्चीतभावाचे हातगुंडे।' -ज्ञाप्र २६५.; २ असला दगड हातानें जेथवर फेंकला जाईल तितकें अंतर. ०गुण-पु. (बरेंवाईट करण्याचा योग, गुण) नशीब; हातीं (काम, माणूस) धरणाराचा प्रारब्धयोग. हस्तगुण पहा. ०घाई-स्त्री. १ हातानें वाजवावयाचें वाद्य जोराजोरानें, आवेशानें वाजविणें. २ (ल.) उतावळेपणा; जोराची हाल चाल. (क्रि० हातघाईवर, हातघाईस येणें=मारामारी करणें). ०चरक-पु. १ हातानें फिरवून रस काढावयाचा चरक. २ हात चाणी. ०चलाख-वि. चोर; उचल्या. ०चलाकी-खी-स्त्री. हस्तचापल्य; लपवाछपवी; नजरबंदीचा कारभार (गारुडी, सराफ इ० चा). ०चाळा-पु. १ हाताचा अस्थिरपणा; चुळबुळ; हातानें कांहीं तरी उगीच करीत रहावें अशी लागलेली खोड; हातचेष्टा. (क्रि० लागणें). २ अशा प्रकारानें होणारें नुकसान. (क्रि० करणें). ३ सदोदित हात गुंतलेला असणें; त्यांत निमग्न असणें (चाढता धंदा, व्यापार, खेळ इ० त); देवदेवींचा मोठा उद्योग. ०चिठी-चिटी-ट्ठी-स्त्री. १ अधिकाऱ्यानें शिक्का-



मोर्तब न करतां आपल्या हातच्या निशाणीनेंच पुरी केलेली चिठी, हुकूम. २ कोणाहातीं पाठविलेली चिठी-चपाटी. ०चे हातीं-च्या हातीं, हातोहातीं-क्रिवि. लगेच; तावडतोब; आतांचे आतां; क्षणार्धांत; पट्‌कन (करणें, घडणें). 'हा गडी हाताचे हातीं जाऊन येईल.' 'हाताचे हातीं चोरी-लबाडी-शिंदळकी' इ०. ०चोखणें-चुंफणें-न. तान्ह्या मुलास चोखण्यासाठीं हातांत देण्याची वस्तु. ०जतन-स्त्री. हातानें केलेली मशागत (मालीस इ०); रोज बरकशीर घेतलेली काळजी. 'हा घोडा नुसत्या हातजतनानें इतका हुशार आहे.' ०जुळणी-स्त्री. (ठाकूर) लग्न लागल्यानंतर मुलानें मुलीचे दोन हात धरणें. -बदलापूर १३८. ०झाड-स्त्री. आपोआप उगवलेलें नसून मुद्दाम लाविलेलें झाड. ०झाडणी-स्त्री. राग, तिरस्कार इ० नें हात झटकणें. ०झालणा-पु. हातजाळें; हातविड. ०झोंबी-स्त्री. परस्पराचे हात धरून केलेली झटापट; हिसकाहिसकी; झगडा. ०तुक-न. १ हातानें वजन करणें. 'नव्हती हाततुके बोल।' -तुगा ३४२३. २ अटकळ; अजमास. 'मग त्यागु कीजे हाततुकें।' -ज्ञा १८.१३१. ०दाबी-स्त्री. लांच. 'मालकानें हातदाबी केली म्हणजे माल त्यांना परत देतात.' -गुजा ६७. ०धरणें-न (खा.) सोंधणें; स्वयंपाकघरांतील भांडीं उतरणें इ० चें फडकें. ०धरणी माप-न. माप भरतांना त्याचे शेवटास डावा हात धरून, मापापेक्षां थोडें जास्त धान्य घेऊन केलेलें माप. बोटधरणी माप पहा. ०धुणी-स्त्री. १ राजाच्या हातधुणारास दिलेलें इनाम इ०. २ स्वयंपाकघरांतील मोरी. ०धोंडा-पु. १ हातानें उचलण्याजोगा धोंडा. २ धोंडा हातानें फेंकला असतां जेथवर जाईल इतकें अंतर; टप्पा. ०नळा-पु. हातांत धरून सोडण्याचा, शोभेची दारू भरलेला नळा. ०नळी-स्त्री. चपटें कौल. ०निग्रा-गा-हातजतन पहा. हातजपणूक. ०नेट-क्रिवि. १ (व.) हाताचा जोर, भार देऊन. २ (व.) हाताजवळ. ०पडत-पात-वि. हातीं असलेलें; अगदीं जवळ असणारें; लागेल त्यावेळीं तावडतोब मिळणारें. ०पहार-स्त्री. हातभर लांबीची पहार. ०पा-हातोपा-पु अंगरखा इ०ची बाही. ०पाटिलकी-स्त्री. १ हातानें ठोकणें; चोपणें, बडवणें. तोंडपाटिलकीचे उलट. २ बोलण्यापेक्षां प्रत्यक्ष कृति, काम. 'तोंडपाटिलकी सगळयांस येते हातपाटिलकी कठीण.' ३ हस्तचापल्य; उचलेगिरी. ०पाणी-न. १ लग्नांत रासन्हाणीचे वेळीं वधूच्या सासूनें तिचे हातांवर ओतावयाचें पाणी. (क्रि० घालणें). २ लग्नांत मांडव परतण्याचे दिवशीं सासूनें सुनेची कोहोळ्यावर ओटी भरून, किंवा मांडवांत न्हातेवेळीं नवऱ्यानें केशरी रंगांत बुडवून तिचे हातांत घालावयाची अंगठी. ३ लग्नांत मुलाच्या हाताखालीं मुलीचा हात ठेवून त्यांवर समंत्रक पाणी घालणें. -बदलापूर

२०५. ०पान-पु. कोंका पडण्यापूर्वीचें केळीचें पान. ०पान्हा-पु. हातकरीण गाय, म्हैस इ० नें सोडलेला पान्हा ( वासरूं किंवा अंबोण दाखविल्याशिवाय ). हातपान्ह्यास लागणें, येणें, हातपान्ह्याची गाय इ० प्रयोग. ०पालवी-स्त्री. हात पोंहोचेल इतक्या उंचीवरील पाला. ०पावा-वि. ( कों. ) हाताच्या आटोक्यांतील, हात पोहोंचेल इतक्या उंचीवरील ( वेलीचें फूल इ० किंवा खोली-विहिरींतील पाणी इ० ). [ हात+पावणें ] ०पिटी-स्त्री. १झोंबाझोंबी; गुद्दागुद्दी. २(ल.)हातघाईची मारामारी. 'तंव राउतां जाली हातपीटी ।' -शिशु ९६८. [ हात+पिटणें ] ०पेटी-स्त्री. हातानें भाता चालवून वाजवावयाची बाजाची पेटी; हार्मोनियम. २ सरकारी कामाचे कागदपत्र ठेवण्याची पेटी. -स्वभावचित्रें २४. ०पोळी-स्त्री. चेंडूफळीचा एक प्रकारचा खेळ. -मखेपु ५६. ०फळ-न ( बे. ) मेर ओढण्याचें फळ. ०फळी, हातोफळी-क्रिवि. हातोहातीं; लवकर. ०बळ-न. हस्तसामर्थ्य. 'हातबळ ना पायबळ, वेरे देवा तोंडबळ.' ०बांधून डंकी-स्त्री. (कुस्ती) जोडीदारास खालीं आणल्यावर त्यानें आपला एक पाय धरला तर आपण दुसऱ्या पायानें जोडीदाराचे पाठीवरून झोंका घेऊन उडी मारून त्यास चीत करणें. ०बेडी-स्त्री. कैद्याच्या हातांत अडकवावयाची बेडी; हातकडी. ०बोनें-न. हातांत घेतलेलें भक्ष्य. 'बुद्धीचेनि शाकें । हातबोनें निकें ।' -ज्ञा ६.२८२. ०बोळावन-स्त्री. हातांनीं मार्गाला लावणें. 'जाणो नेदी योग्यता । प्रहीं हातबोळावन करितां ।'-भाए ३४९. ०भाता-पु. हातांत घेऊन फुंकावयाचा भाता; लहान भाता. ०भार-पु मदत; साहाय्य ( विशेषतः द्रव्याचें ). ( क्रि० लावणें ). ०भुरकणा-भुरका-वि. हातानें भुरकून खावयाजोगा ( पेयपदार्थ ) ०भुरकणें-भुरकें-वरील प्रकारचा पातळ पदार्थ. ०भेटी-स्त्री. प्रेमानें हातांत हात घालणें. -एभा २८.५९२. ०मांडणी-स्त्री. पैसे पावल्याची पोंच म्हणून पैसे नेणाऱ्याची खतावणीवर घेतलेली सही. ०मात-स्त्री. हात टेकणें. ०मेटी हेटीमेटी-क्रिवि. आळसात; निरुद्योगीपणानें; हातांवर व गुडघ्यावर टेकून रमतगमत ( दिवस इ० ) घालविणें. 'दिवस गेला हातमेटीं चांदण्या खाली कापूस वेटी.' ०रगाडा-पु उंसाचा हातचरक. ०रवी-स्त्री. घुसळखांब, मांजरी यांचे विरहित हातानेंच फिरविण्याची लहान रवी. ०रहाट-पु हातानें ओढून पाणी काढण्याचा लहान रहाट. ०रिकामी-स्त्री. विधवा स्त्री. -बदलापूर १७४. ०रिती-वि (महानु.) रिकामी विधवा. -स्मृतिस्थळ. ०रुमाल-पु. १ तोंड वगैरे पुसण्याचा लहान रुमाल. २ नित्योपयोगी कागदपत्रें ठेवण्याच्या दप्तराचा रुमाल; चालता रुमाल; त्यांतील कागदपत्रांचें बंडल. ०रोखा-पु. दस्तक; चिठी; आज्ञापत्र. 'पाराजीपंत बाघ यांस हातरोखा बरोबर पाठवून अति आग्रहें अंतरवेदींत घालविलें.' -भाव १०२.

०लाग-पु. हाताचा टप्पा. ०लागास-लागीं येणें-असणें-कक्षा, आंवाका, आटोका, अवसान इ०त येणें, असणें. ०लागा-लाग्या-वि. अनुकूल असणारा. 'तुमचे हातलागे लोक असतील.' -वाडबाबा १.६. ०लावणी-स्त्री. १ वेश्येचा चिरा उतरणें; कौमार्यभंग. ( क्रि० करणें ). २ हाताची पेरणी; लागवण. -वि. हातपेरणीचें. ०लावा-ल्या-वि हाताळ; चोरटा; चोरी करण्यासाठीं हात फुरफुरत असलेला. ०वजन-न. १जिन्नस हातांत घेऊन केलेलें वजन. २ अशाप्रकारें वजन काढण्याची लायकी. ०वटी-हातोटी-स्त्री. १ हस्तकौशल्य; हस्तचातुर्य. २ ( सामा. ) कसब; नैपुण्य; चलाखी. 'अहो चंद्रकांतु द्रवता कीर होये । परि ते हातवटी चंद्रीं कीं आहे ।' -ज्ञा ९.२९. ३ विशिष्ट पद्धत, रीत, प्रकार. [ हिं. ] भाषणाची-पोहण्याची-व्यापाराची इ० हातोटी. ०वडा-हातोडा-पु. सोनार, कासार इ० चें ठोकण्याचें हत्यार. ०वडी हातोडी-स्त्री. लहान हातोडी. ०वणी-न. १ हात धुतलेलें पाणी. २ ( कों. ) हातरहाटाचें पाणी पन्हळांतून जेथें पडतें तेथील जमीनीचा उंच केलेला भाग; हातणी. ०वल्हें-न. हातानेंच वल्हवावयाचें लहान वल्हें. ०वश-वि. हस्तगत. ०वशी-स्त्री. हात उगारणें. -शर. ०वळा, हातोळा-पु हातवटी पहा म्ह० गातां गळा; शिंपतां मळा, लिहितां हातवळा. ०वारे-पु.अव. हातांनीं केलेले हावभाव; हाताची हालचाल. ०विड-न. ( राजा. ) हात झालणा पहा. ०विरजण-न. अजमासानें घातलेलें विरजण ०विरजा-विरंगुळा-वि. कामांत मदत करण्याच्या लायक, लायकीस झालेला ( पुत्र, शिष्य, उमेदवार इ० ) [ हात+विरजणें ] ०शिंपणें-न. सोडवणी न देतां शेलणें इ० साधनानें भाजीपाल्यास उडवून द्यावयाचें पाणी; असें पाणी शिंपणें. ०शेकणें-न. ( उसाचा चरक ) चुलाण्यांत जाळ घालणारास त्याच्या मेहनती बद्दल द्यावयाचा गूळ. ०शेवई-स्त्री. हातानें वळलेली शेवई; याचे उलट पाटशेवई. ०सर-न. बायकांचा हातांतील एक दागिना, गजरा. 'हे पाटल्या हातसरांस ल्याली ।' -सारुह ६.२६. ०सारवण-न. खराटा, केरसुणी न घेतां हातानें जमीन इ० सारवणें. ०सुख-न. १ दुसऱ्यास, शत्रूस हातानें मारून त्यामुळें अनुभविलेलें सुख ( क्रि० होणें ). २ हातानें दिलेला मार. ०सुटका-स्त्री. १ एखाद्या व्यवहारांतून, धंद्यांतून स्वतः अंग काढून घेणें; मोकळें होणें. २ हातविरजा पहा. ३ हाताचा सढळपणा. ०सुटी-स्त्री. औदार्य. 'हे हातसुटीक्षीरसागरा । बांचौनि नाहीं ।' -भाए७६९. ०सुनकी-स्त्री. पाथरवटाचें दगड फोडण्याचें हत्यार. ०सून-न. चातीवर हातानीं काढलेलें सूत. ०सोको(के)ल-सोका-वि. हाताच्या संवयीचा; अंगाखांद्यावर घेण्यास संवकलेला. 'केल कुत्रा हातसोका ।' 'घडो नेदि तीर्थयात्रा ।' -तुगा २९५४. ०सोडवण-नस्त्री. हातसुटका अर्थ १, २ पहा. ०सोरा-ऱ्या

सुरा-ऱ्या-पु. कुरडया इ० करण्याचा सांचा. ०हालवणी-स्त्री. प्रवाशांवरील एक जुना कर ( त्यांच्या हात हालवण्याच्या क्रियेबद्दल हा कर असे ). हातचा-वि. १ हातानें दिलेला; स्वाधीनचा; हातांतला; हातानें निर्मिलेली, मिळविलेली, दिलेली ( वस्तु, काम, उत्पादन इ० ). 'शूद्राचे हातचें पाणी स्नानमध्येंस घेऊं नये.' 'रोग्यास औषध देणें मनुष्याच्या हातचें आहे-आयुष्य घालणें नाहीं.' २ ( अंकगणित ) पूर्णांकाची बेरीज करतांना बेरजेच्या संख्येंतला अंक ज्या स्थानाचा त्या स्थानीं मिळविण्याकरितां उरलेला अंक. ( क्रि० येणें; रहाणें; ठेवणें ). ३ लवकर हातीं येणारें; अवसानांतील ४ ताब्यांतील; कबजांतील. म्ह० 'हातचें सोडून पळत्याचे पाठीस लागूं नये.' ०चा पाडणें-१ हातांतील सोडणें. २ एखाद्यास त्याचे ताब्यांतील वस्तूस मुकविणें. ०चा-धड-नीट-वि. नीटनेटकें काम करणारा ( लेखक, कारागीर ). ०चा फोड-पु. फार प्रिय माणूस. तळहाताचा फोड पहा. ०चा मळ-पु. सहज घडणारी गोष्ट. 'सरळ, सोपी आणि बालिकाबोध भाषा कशी वापरावी हें म्हणजे माझ्या हाताचा मळ आहे.' -कीच. ०चा सुटा-वि. सढळ हाताचा. हातवा-पु १ ( बायकी ) गौरीपूजनाचे सगांत हळदीकुंकवानें हात भिजवून जमिनीवर छाप मारणें. २ लग्नांत नवऱ्याच्या मिरवणुकीच्या मागें धरावयाचा कणकेचा दिवा. ३ घोडयाचा खरारा, साफ करण्याचा काथ्याचा पंजा. ४ काडवात मनको. ५ ( कऱ्हाड ) न्हाणवली बसवितांना, मखर बांधावयाचे ठिकाणीं, कुंकू पाण्यांत भिजवून हातानें पांच उलटे पांच सुलटे ठसे उठविणें. हातळ, हाताळ-ळु-वि. चोरण्याची संवय असलेला; चोर; भामटा. हातळणें, हाताळणें-उक्रि. १ हात लावणें; चोळवटणें; चिवडणें, २ हाताळ माणसानें वस्तु चोरणें. हातळी, हाताळी, हाताळें-स्त्रीन. १ घोडयाचा काथ्या इ० चा खरारा. २ भात्याची बोटांत, हातांत अडकवावयाची चामडयाची वादी. ३ ( कर. ) भाकरी. हाता-पु. हातांत राहील इतका जिन्नस, पसा ( फळें, फुलें इ० पांच-सहा इ० संख्येचा संच एकेक वेळ हातांत घेऊन बाजूस ठेवतात). हाताखालचा-वि. १ मदतनीस; हाताखालीं काम करणारा. २ उत्तम परिचयाचा; माहितींतील. ३ हातांतील; कबज्यामधील; स्वाधीन. ४ दुय्यम; कमी दर्जाचा. हाताखालीं-क्रिवि. १ सत्तेखालीं; दुय्यम प्रतींत. २ स्वाधीन. ३ जातांजातां; हातासरशीं; सहजगत्या. 'मी आपला घोडा विकावयास नेतोंच आहे, मर्जी असली तर हाताखालीं तुमचाहि घोडा नेईन आणि विकीन.' हाताचा उदार, मोकळा, सढळ-वि. देणगी इ० देण्यांत सढळ. हाताचा कुशल-वि. हस्तकौशल्यांत निपुण, प्रवीण. हाताचा जड-बळकट-थंड-वि. १ चिक्कू; कृपण. म्ह० हाताचा जड आणि बोलून गोड. २ मंद ( लेखक ). हाताचा जलद-वि. काम करण्यांत चलाख हाताचा फटकळ-वि. फटाफट मारणारा; मारकट. हाताचा बाण-पु वर्चस्व, पगडा, वजन पाडणारें कृत्य, गोष्ट ( क्रि० गमावणें; दवडणें; सोडणें ) हाताजोगता-वि. १ हातांत बसेल; मावेल; धरतां येईल असा. २ हात पोंहोचण्याजोगें. हातानिराळा-वेगळा-वि १ पूर्ण; पुरा; सिद्ध केलेला; पुन्हां हात लावण्याची जरुरी राहिली नाहीं असें ( काम. धंदा इ० ). 'हा दुर्निवह कोश एकदां हातानिराळा झाला म्हणजे दुसरें काम घेतां येईल.' २-क्रिवि एकीकडे; बाजूस. 'कामापुरती भांडीं वहिवाटींत ठेवा बाकीं हातानिराळीं ठेवा.' हातापद्धति-स्त्री दलाल माल घेणाऱ्याच्या हातावर रुमाल टाकून गुप्तरीतीनें मालाची किंमत माल घेणाऱ्याकडून अजमावतो ती पद्धत. हाताची थट्टा-स्त्री. थट्टेनें मारणें ( थापटी इ० ); चापट देणें. ( तोंडी थट्टा नव्हे ). हाता( ता )फळी-स्त्री. गुद्दागुद्दी; मारामारी; कुस्ती; हातझोंबी; धक्काबुक्की. 'मजसीं भिडे हातोफळी।' -ह्व १९.१४३. -क्रिवि. पटकन; चटदिशीं; तत्काळ; हातावर हात मारून. [ हात+फळी ] हातावरचा संसार-हातावरचें पोट-पुन. मजुरी, कामधंदा करून स्वतःचें कसेंतरी पोट भरणें ( क्रि० करणें; चालविणें ) थोडया पगाराची, कष्टाची नोकरी करून उदरनिर्वाह. हातावीती-क्रिवि. हातोहात पहा. 'सर्वज्ञ हातावीती पुढें जाती।' -पुच. हातासन-न. हातवटी. 'अन्योपदेशाचेनि हातासनें।' -ज्ञा ६.११९. हातासरसा-क्रिवि. त्याच हातानें, प्रकारानें; तसेंच; त्याच बरोबर; चालू कामांत आहे तोंच. 'उष्टी काढतो आहेस तों हातासरशीं भांडीं घास मग हात धू.' हातिणें-अक्रि. मारणें. -मनको. हातिवा-स्त्री. काडवात. 'उजळोनि दिव्य तेजा हातिवा।' -ज्ञा १६.२३. हातुवसोया-वि. एक हात अंतरावरील. 'हातवसिया कळांगंगा पार्वती।' -धवळे३१ हानोणी-स्त्री. ( व. ) खरकटें पाणी; हातवणी. हातोपा-हातपा पहा. हातोपात-ती-क्रिवि. एका हातांतून दुसऱ्या हातांत, वरचेवर; हातोहात. -ज्ञा १८.१५६. हातोरी-क्रि. ( ना. ) हातानें; साह्यानें. हातोवा-पु. ( महानु. ) अंजली; ओंजळ. 'हातोवा केवि आटे अंभोनिधि।' -भाए २१७. हातोसा-पु. मदत; हातभार. ( क्रि० देणें ), हातोहात-तो-क्रिवि. १ हातचेहातीं; हातोपात. २ चटकन; भरदिशीं. ( क्रि० येणें=मारामारी करणें ). 'दिवाळयाचे दिवसांत दुपार हातोहात भरते.' हातोळा-हातवळा पहा. हातोळी-स्त्री. ( व. ) लग्न. हात्या-पु. १ पाणरहाटाचा दांडा. २ घोडा धामण्याची पिशवी; खरारा. हाताळी अर्थ १ पहा. ३मागाच्या फणीची मूठ. ४ काहिलींतील गूळ खरवडण्याचें खुरपें. ५ ( कर. ) मोठी किल्ली.

हात—स्त्री. संवय; खोड. 'तरुणपणाची ऐट आणण्याची विलक्षण हात होती.' -महाराष्ट्रशारदा, नोव्हेंबर १९३६.

**हातणी-न-नी**—स्त्री. ( कु. कों. राजा. ) विहिरीच्या काठावर बैलरहाटाचें पाणी पन्हळांतून पडतें त्या ठिकाणीं बांधलेली उंच जागा; बांधावरून ( पाटाचें ) पाणी नेण्याकरितां केलेली वाट; बैल-पाय-रहाट लावावयाच्या विहिरीचे बाजूस कैणेकडाचे टोंक किंवा रूख टेकण्यासाठीं केलेला चौथरा. -आडिवऱ्याची महालक्ष्मी १५४. [ सं. हस्त ]

**हातणी-नी**—स्त्री. १ घोडा वगैरे धुतांना हातांत घालण्याची काथ्याची पिशवी; खरारा. २ खळ्यांतील खराटा, केरसुणी. ३ ( चांभारी ) चामडें ठोकण्याचें अवजार. [ सं. हस्त; हिं. हथनी ]

**हातमली**—स्त्री. ( बुद्धिबळें ) प्रतिपक्षाचा हत्ती व राजा आणि आपला हत्ती, राजा व एकच प्यादें राखून प्यादी करणें.

**हांतर-री**—पुस्त्री. बांबूची मोठी चटई: ( गो. ). हातर पाटो.

**हांतरणें-हांथरूण**—अंथरणें इ० पहा.

**हाथरूं**—न. ( निंदार्थी ) हत्ती.

**हातळ**—स्त्री. धुऱ्यांवर जोखड ज्या दोरीनें बांधतात ती दोरी. -बदलापूर २८७.

**हाता**—पु. ( कों. गो. ) केतकी; केवडा; सोनकेवडा, त्याचें कणीस.

**हातियार-येर-येरु, हातेर**—न. हत्यार पहा. 'तरी मनासि करावा मारु। तेथ न चले हातियेरु।' -एभा २३.७१५.

**हांतुलें**—स्त्री. लाकडाचें परळ. -शर.?

**हातुल्यो**—उद्गा. मुलांचे खेळांत, अटींतून मुक्त होण्याचे वेळीं उच्चारण्याचा शब्द; थुथुल्यो, थुंगुरयाप्रमाणें.

**हाते( त्या )ण**—न ( घोडी, गाढवी ) माजावर येणें; वाफ; माज. ( क्रि० करणें ). 'पडल्या एका शिंगयाकरूनि हातेणें।' -मोउद्योग १३.२१७. **हात्याणास येणें**-माज करणें.

**हातेर**—न. ( कों. ) पाटील, खोत इ० च्या शेत इ० मधील कुळांनीं किंवा रयतांनीं करावयाची बिगार.

**हात्यार-त्येर, हात्यारबंद**—हत्यार इ० पहा.

**हाथरणें, हाथरूण**—आंथरणें इ० पहा.

**हाथि(ए)येर**—हातियेर. हत्यार पहा. 'हें कां हो जी उसासिलें। हाथिएरविण।' -भाए ७६.

**हांदकळणें**—अक्रि. ( बे. ) डचमळणें; हिंदकळणें पहा.

**हादगा**—हदगा पहा.

**हादरणें**—हदरणें पहा. 'पदराच्या वाऱ्यानेंसुद्धां बायकांचं हृदय हादरायला लागतं.' -एक ६५.

**हांदा**—पु. पैरा; इरजीक; पडकेल; डाळें; परस्परांना मदत करण्याची शेतकऱ्यांची रीत. **हांदेकरी, हांदलेकरी**-पु. हांदा करण्यासाठीं दिलेला माणूस, बैल इ०. हांदा केला आहे ते परस्पर.

**हादाल, हादालपार्वती**—हदाल इ० पहा.

**हादी**—पु. वाटाड्या. -पेद ३.१८३;३,११०. [ अर. ]

**हांदु( द )ळणें**—उक्रि. १ आंदुळणें पहा. फळें पाडण्यासाठीं झाड गदगदां हालविणें. २ झोके देणें; पुढेंमागें करणें. -अक्रि. हालणें; डोलणें; झोका खाणें. [ सं. आंदोलन ] **हांदुळ-हिंदूळ-हिंदळ**—स्त्री. झोका; आचका; पुढें मागें करणें. झोकाझोकी.

**हादोशी**—स्त्री. ( कु. ) हांव; लोभ. -वि. लोभी.

**हान**—उभ. अन्; आणि. -शर.

**हानजा**—पु. ( नाविक. ) यारी.

**हानाव**—पु. ( नाविक. ) तिरपा सांधा.

**हानि-नी, हान, हाण**—स्त्री. १ नुकसान; तोटा; बुड. २ घात; दुखापत; धोका; उध्वस्तता; बिघाड; नाश. [ सं. ] **म्ह०** आपली हानि जगाचें हासें. **०पंचक**-न. ( ज्यो. ) एक कुमुहूर्त. चोरपंचक पहा.

**हापटणें**—आपटणें पहा.

**हांपा**—पु. धांप; दमा; श्वास. ( क्रि० भरणें; टाकणें; देणें; सोडणें ). [ हिं. हापना. ध्व. ]

**हाफीज**—पु. कुराण तोंडपाठ म्हणणारा मुसलमान. [ फा. हाफिझ् ]

**हाब**—न. (माण. धनगरी) बिरोबासाठीं बकरें मारून त्याच्या मांसाचें घातलेलें जेवण.

**हाबक**—स्त्री. ( व. ) कटकट; त्रास. ( क्रि० मिटणें ).

**हाबकणें**—उक्रि. हबकणें पहा. **हाबका**-हबका पहा.

**हाबड**—स्त्री. ( ना. ) तोटा; नुकसान.

**हांबडणें**—क्रि. ( कु. ) गुरें हांकणें. आंबडणें अर्थ २ पहा.

**हांबरणें, हांबरडा**—हंबरणें, हंबरडा पहा.

**हाबशी, हाबसाण**—हपशी, हपसाण पहा.

**हाबसाहुबशी, हामसाहामशी**—स्त्री. स्फुंदणें; हुंदका. -क्रिवि. ओक्साबोक्शी. [ ध्व. ]

**हाबळणी-णें**—हेबाळणी-णें पहा.

**हाबासणी**—स्त्री. ( दादर ) जोरानें ओरडणें, खेंकसणें.

**हांबेट**—उद्गा. ( गो. ) खेळ थोडावेळ बंद करावयाच्या सूचनेचा शब्द; थुथुल्यो; थुरयो. [ ध्व. ]

**हामी, हामीदार-री**—हमी इ० पहा.

**हाय, हा**—बहुवचनाचा फारशी प्रत्यय ( हा बहुधा निर्जीव वस्तु दर्शविणाऱ्या नामांना लागतो. पण मराठींत प्रादेशिक नामांनाच लागतो. उदा० देहेहाय, जिल्हेहाय, महालहाय. [ फा. हा ]

**हाय**—स्त्री. हयात; आयुष्य. [ अर. हइ ] **हायत, हायात**-हयात इ० पहा.

**हाय**—उद्गा. १ सुखानुभवाचा उद्गार (दुःखाचा प्रतिकार होऊं लागला म्हणजे तोंडांतून निघणारा. २ शरीर, मन यास दुस्सह वेदना झाली असतां निघणारा सुस्कारा, दुःखोद्गार; हां, चूं, कुं, कटकटा, इ०. —स्त्री. (बालभाषा) तिखट, विस्तव, दिवा, तीक्ष्ण शस्त्र, क्षत इ०. [ध्व.] **०खाणें-घेणें**-१ जिवास लावून घेणें; धास्ती घेणें; घाबरून जाणें. २ (तापाची, खाण्याची) भीति वाटणें, धडकी घेणें. **०पतकरणें-मोकलणें**-पश्चात्ताप करणें; चुकी-बद्दल दुःखोद्गार काढणें. **०सोडणें-देणें-घालणें**-उसासा टाकणें. **०घालणें**-ध्यास घेणें; धोसरा काढणें. **हायास येणें-आणणें**-जीव मेट्यास येणें; थकणें; भागणें; अशक्त करणें, दुर्दशेप्रत आणणें. **०दोस्त-दोस-दुल्ला-धुल्ला, हायदोस**-उद्गा. [मुसलमान लोक ताबुताचे पुढें हसन व हुसेन हे त्यांच्या लग्नानंतर लवकरच लढाईंत मरण पावले, म्हणून हाय! मित्रा! नवरदेवा! असा दुःखोद्गार काढून नाचतात त्यावरून] नाचणें, ओरडणें; दंगल; धुमाकूळ. (क्रि० घालणें; माजणें; उठणें; मांडणें; करणें) [हिं. हाय! दोस्त! दुल्हा=नवरा] **०सा**-वि क्रिवि. हाय! असा; समाधानाचा, आनंदाचा उद्गार उच्चारावयाच्या स्थितींत असलेला; दुःखकारक स्थितींतून सुटका झाल्यामुळें सुखी झालेला. (क्रि० होणें). 'त्या दाटीमध्यें माझा जीव अगदीं कासावीस झाला होता, मी अंमळ बाहेर येतांच हायसा झालों.' **हायसें वाटणें**-आनंद, स्वस्थता वाटणें (दुःखप्रतिकारानंतर). **हाय-हुय**-दुःखोद्गार. —स्त्री. करुणोद्गार; वेदनांमुळें विवळणी. **हाया, हायाहुया**-हाय पहा.

**हायकोर्ट**—न. वरिष्ठ न्यामंदिर. [सं.]

**हायन**—न. वर्ष. 'तेरा पळेंहि नसती माता हें हायन चवदावें हो।' -मोउद्योग ७.५१. [सं.]

**हायल, हायेल**—वि. भयंकर. 'लेकीन हा मझेला हायेल होय.' -रा ५.१५७. [अर. हाईल्]

**हायवडा**—पु. (व.) हव्यास.

**हांयस**—न. (गो.) आमिष; आविस. [सं. आमिष]

**हायस्कूल**—न. इंग्रजी दुय्यम शिक्षणाची शाळा. [इं.]

**हार**—अ. (कु.) पाशीं; जवळ. 'माझ्या हार नाय.'

**हार**—पु. (गो.) आर; अजगर. आर पहा.

**हार**—स्त्री. १ नुकसान; तोटा; खोट. (क्रि० येणें; बसणें). 'आंब्याच्या व्यापारांत मला मोठी हार आली.' २ पराभव; अंगावर डाव येणें, लागणें (युद्ध, जुगार इ० त). (क्रि० येणें). ३ -पु. अपहार; हरण; लूट. ४ (अंकगणित) भाजक; छेद. [सं. हृ=हरण करणें, चोरणें] **०खाणें-घेणें-जाणें**-पराभव पावणें; माघार घेणें; तोटा सोसणें, कमी दर्जाचे आहों असें कबूल करणें. 'त्यानें त्यांचा यथायोग्य समाचार घेऊन त्यांस हार खावयास लावलें' -नाना-महादजी. **०जाणें**-कमीपणा पतकरणें; पड खाणें; पराभव पावणें; मागें राहणें. 'चलाखपणांत आम्हीं कोणत्याहि लोकांस हार जाणार नाहीं अशी आमची खात्री आहे.' -नि. **०घेणें-पत्करणें-मानणें**-नुकसान सोसणें. म्ह० १ हार मानली झगडा तुटला. २ हार मानली पण झगडा तुटो=कोणीकडून तरी तंटा मिटो. **हारीं जाणें**-पराभव पावणें; पत्करणें. **हारक**-वि. १ हरण करणारा; लुबाडणारा; लुटणारा. २ निवारण करणारा; नाहींसें करणारा. उदा० पित्तहारक-वातहारक इ० (औषध) हारी मध्यें पहा. ३ (अंकगणित) भाजक. **हारजीत**-स्त्री. जयापजय. 'हारजीत कोणाचे स्वाधीन नाहीं.' [हारणें+जितणें] **हारणें**-उक्रि. १ जिंकणें. 'म्यां त्याला १०० रुपयांस हारलें.' २ हरणें पहा. **हारतणें**-हरण करणें. 'मुक्तीचा ठेवा हारता।' -भाए ८८. **हारतेलपण**-न. हरवलेपण; नसतेंपण; नाहींपणा 'हें आथी तरी कायिसें। हरतले पण।' -अमृ ७.१०४. **हारपणें**-अक्रि. हरवणें; हरपणें पहा. **हारवणें-विणें**-उक्रि. गमावणें; घालविणें; हरविणें पहा. **०सडणें-हारसरणें**-अक्रि. (राजा.) पराभव कबूल करणें; हार खाणें; शरण जाणें. **हारी**-स्त्री. हार; पराभव; तोटा. हार पहा. -एभा २८.६८५. -वि. १ हारक पहा. (दुखहारी, ज्वरहारी). २ मोहक; आकर्षक. **हार्य**-वि. हरण करण्यास शक्य, योग्य. [सं.] **हार-सडणें**-उक्रि. (राजा.) आटोक्यांत येईल इतपत कमी होणें, करणें; समावणें; सहज करतां येईल येथपर्यंत आकुंचित होणें, करीत आणणें. [हारणें+सडणें किंवा हार=रांग, ओळ] **हार-सडीस आणणें**-आटोक्यांत, मर्यादेंत आणणें; आटोपशीर करणें (मोठा उद्योग, धंदा इ० हळू हळू विल्हेवाट लावून). 'एक वर्षाचें लिहिणें तुंबलें आहे, सारा गोंधळ झाला आहे, एवढें हारसडीस आणून दे, मग मी शेवटास नेईन.' **हारसडीस येणें**-आवाक्यांत येणें.

**हार**—पु १ गळ्यांतील एक कंठा; माळ (फुलें, रत्नें इ० ची). 'हार कंठीं साजरा।' २ रेशमाच्या लड्या एकत्र ओंवून माळेसारखा करतात तो आकार. —स्त्री. ओळ; रांग; पंक्ति. [सं.] **हारोहार**-क्रिवि. १ एका अखंड ओळींत; एका ओळीनें; रांगेंत; मागोमाग. २ अव्याहत क्रमानें; एकामागून एक (घडलेल्या गोष्टी, प्रसंग). 'त्या बायकोस हारोहार चार खेपा मुलीच झाल्या.'

**हारा**—पु. मोठी बांबूची पाटी; हरा. **०डेरा**-पु. १ मंगळागौरीचे पूजेच्या वेळीं कणकेच्या डेऱ्यांत पुरण भरून देवीजवळ ठेवतात तो. २ विवाहांत वराचे घरीं वरांत आल्यावर एकावर एक तीन तपेलीं ठेवून, त्यांत काय आहे म्हणून वधू;

वरास विचारते व वर उत्तर देतो कीं नवरत्नाचा हार आहे, या प्रकारास हाराडेरा म्हणतात. ३ (व.) वरातीबरोबर न्याव याचा वधूकडील कलश; करादिवा.

**हाराष-स**—पु. तोटा; नुकसान; खोट. (क्रि० येणें; होणें; बसणें). [सं. ऱ्हास]

**हारिख**—पु. आनंद; हर्ष. [सं. हर्ष]

**हारिद्र**—वि. हळदीचें; पिवळें. [सं.]

**हारी**—स्त्री. रांग. **हारी**-क्रिवि. १ कडे; दिशेस; बाजूस. 'तो शेताहारीं गेला.' २ कडे; हातीं; जवळ. 'त्या हारीं माझे दहा रु० आहेत.' ३ इतरअर्थी कडे शब्द पहा. ४ जवळ; पाशीं. 'गांवाहारीं, डोंगराहारीं.' **हारेमोहरे, हारेमोहरेस, हारेम्होरे-स, हाऱ्यामोहऱ्यास**-क्रिवि. जवळ; आसपास; समोर; पुढें; आजूबाजूस. (नकारार्थी प्रयोग). 'म्यां एकवेळ त्या पोरास मार दिल्हा, तेव्हांपासुन तो माझे हारेमोहरेस उभा राहत नाहीं.' 'त्याचे हारेमोहरेस तुम्ही उभे राहूं नका, तो सोदा आहे.'

**हार्णाळ**—स्त्री. ओघ; प्रवाह. 'केली हार्णाळां अंघोळी।' —तुगा ४१२५.

**हार्द-र्द्र**—न. १ इंगित; हृद्गत; कल. २ उद्देश; आशय; अभिप्राय; झोंक (कृति, भाषण इ० चा). —वि. मनांतील. [सं. हार्द]

**हाल**—पु. जलदी; त्वरा. [हिं.] **हालका**-क्रिवि. जलदीनें. 'चार हजार घोडा। हालका धराया चालला।' —ऐपो १४. [अर. हाल=आता]

**हाल**—पु. आपदा; कष्ट; निकृष्टावस्था; दैना; तारंबळ (बहुधा अनेकवचनी प्र०). (क्रि० काढणें; भोगणें; सोसणें; घेणें; होणें; देणें; पाडणें; करणें). [अर. हाल्] म्ह० हाल असे झाले कीं कुत्रे खाईना. ०**अपेष्टा-आपदा**-स्त्री. हाल; दुर्दशा; नानाप्रकारचीं संकटें; आपत्ति. ०**हवाल**-पु.स्त्री. दुर्दशा; हालअपेष्टा. 'हालहवाल असेल तत्रापी हे खंडणी सोडतात असा अर्थ नाहीं.' —ख ११४५. —वि. संकटग्रस्त; दुर्दशा असलेला. 'फौज हाल हवाल झाली.'

**हाल**—स्त्री. १ निश्चय; हट्ट; निर्धार; पण. (क्रि० बांधणें, सोडणें). 'मज कोण्ही न लगे आणीक संगाती। राखावी बहुतीं हाल माझी।' २ पैज; होड; प्रतिज्ञा; स्पर्धा; चढाओढ; शर्यत. (क्रि० बांधणें).

**हाल**—हालत पहा. 'लश्कर पायमालानें रयतीचा हाल राहिला नाहीं.' —रा १८.५३.

**हाल**—वि. हल्लींचा. —क्रिवि. १ सध्यां; हल्लीं; वर्तमान. २ सतत; नेहमीं; एकसारखें. 'हालबसूल.' —बाडथोमा १.९३. [अर. हाल्] ०**अंमल**-पु. सध्याचें सरकार; अंमल. ०**अहवाल-हकीकत**-स्त्री. १ कैफियत. 'एणें प्रमाणें आपला हाल अहवाल खातरेसी आणितां...' —रा १८.३१०. 'आमची हाल हकीकत विदित करून...' —इऐ ५.४८. २ वर्तमान. ०**खुद्द-द्द**-क्रिवि. आहे त्या स्थितींत; ठायीचे ठायीं. 'आपण शिवाजीवरी जातों, त्यास हालखुद्द ठेवितों।' —सभासद ५९. ०**खुशामती**-वि. नेहमीं नव्यानें हांजीहांजी करणारा खुशामती पहा. म्ह० 'हाल खुशामत ताजी रोटी.' ०**फिलाल**-क्रिवि. आतांचे आतां; या क्षणीं. ०**साल**-न. चालू वर्ष. —क्रिवि. या वर्षी. ०**हवाल**-पु. हकीकत; वर्तमान; सद्यःस्थिति. 'रयतीचा हाल हवाल जाहीर केला.' —रा १८.५३. [अर.]

**हालीं-हाल्लीं**-क्रिवि. सांप्रत; आतां. —रा ३.९७. [फा. हाली]

**हाली(ल्ली)माजी**-स्त्री. १ सरकारी अधिकाऱ्यांची बदलाबदली; राज्यकारभारांत बदल; फरक; फेरफार. 'तूर्त हालीमाजीमुळें...' —बाडथोमा १.३३५. 'आमचे दौलतींत हालीमाजी होत गेल्यामुळें कागदपत्र दाखलेशीर राहिला नाहीं.' —रा १.३१२. २ येजा; जुनें जाणें, नवें येणें. **हालोहाल**-क्रिवि. या क्षणीं; आतांच; हातचे हातीं. [हिं.]

**हॉल**—पु. दिवाणखाना. 'दरबार हॉल.' [इं.]

**हालउंडा**—पु. (गो.) तांदूळ, साखर इ० चें एक पक्वान्न. [हालगो+उंडा?]

**हालगो**—पु. भाताची एक जात. [हळवा?]

**हालणें**—अक्रि. १ सरणें; ढळणें; गती येणें; सरकणें. २ गडबडींत, दंगलींत, गोंधळांत असणें (देश, गांव, घर). ३ हलकलणें. [हिं. हालना] **हालकडी**-स्त्री. नथेंतील किंवा मोत्यांची कडी, घोंस. हलकडी पहा. [हालणें+कडी] **हालचाल**-स्त्री. १ सजीव अवस्थेची द्योतक क्रिया; चेतना. २ चळवळ; चालना; उद्योग; वळवळ; चलनवलन. [हिं.] **हालता नारळ**-पु. हालविला असता आंतील पाणी वाजणारा नारळ. **हालबोंद्रा-बोंद्रा-बेंद्रा**-वि. १ घाणेरडा; अजागळ; मूर्ख. २ वेडगळ; हेकाड. ३ नालायक; कुचकामाचा; नपुंसक; दुबळ मनाचा. ४ (हेटकरी.) एक शिवी. चिंध्या लावणारा. [हालणें+बोंदर-री; हलका+इंद्रिय] **हालविणें**-सक्रि. सरकविणें; गति देणें; सारणें; धामधूम करणें; जागृत करणें; चेतविणें; चेवविणें. **हालवून जागा करणें**- १ आयासानें, प्रयासानें प्रवेश करणें. २ उठविणें; चेतना आणणें (सांगून, सुचवून).

**हालत**—स्त्री. हाल; सुस्थिति; त्राण; जोर; दम; हाल. 'मुलकांत हालत कांहीं राहिली नाहीं.' —मदबा १.२१३. [अर. हालत्]

**हालपा**—पु. (जुन्नरी) मेंढराच्या गळ्यास होणारा एक रोग. (क्रि० होणें; उतरणें).

**हालबं(बिं)ड्या, हालबा(बे)लंडी-डें**—हलबेलंडी इ० पहा.

**हालमस्त**—वि. गरीब पण गर्विष्ठ. हालमस्त पहा. म्ह० हालमस्त कीं मालमस्त. [अर. हाल्+फा-मस्त]

**हालहूल**—स्त्री. गडबड; गोंधळ; आरडाओरड; धिंगाणा; बेदिली (देशांत परचक्र आलें असतां किंवा लूटमार होत असतां होणारी).

**हालाहल**—पु. हलाहल पहा.

**हालिक**—वि. नांगरासंबंधीं. [सं.]

**हाली**—क्रि. (महानु.) हाणितेली; हाणली. 'कां करुणा केली हाली।'-भाए १११. [सं. हा.]

**हालीमवाली**—वि. उच्चनीच; गरीब श्रीमंत. अहालीमवाली पहा. [अर. अहाली+मवाली]

**हाली हरामी**—हलीहरामी पहा.

**हाल्या**—पु. रेडा; हल्या पहा.

**हांव**—सना. (गो.) मी. [सं. अहं; हिं. इं.]

**हाँव**—पु. (गो.) मधाचें पोळें; मोहोळ.

**हाव**—स्त्री. गप्प; वदंता. [अर हवा]

**हाव**—पु. १ कामोद्दीपक चेष्टा; नखरा; नट्टापट्टा. २ (अव) शृंगारचेष्टा; प्रेमकला. ३ (अव.) हावभाव. [सं.]

**हाव**—स्त्री. १ तीव्र इच्छा; औत्सुक्य; बळकट आशा. (क्रि० भरणें; लागणें; धरणें). २ हिंमत; धमक; धाडस; दम. 'हजार रुपये खर्चीन अशी त्याची हांव आहे.' ३ तेज; प्रभा. -शर. ४ हव्यास; लोभ. [अर. हवा=आयुष्य, वारा] **०घालणें**-(काव्य) आशा धरणें. 'मार्जारें देखिला लोणियाचा गोळा। लावूनिया डोळा हाव घाली।' **हाव करणें**-मिळविण्यासाठीं धडपडणें; घाबरे होणें. **०भरी भरणें-होणें**-अतिशय उत्सुक होणें; लोभ उत्पन्न होणें. **हावेस-नें-हावें भरणें**-१ उत्सुकतेनें पत्करणें (असामान्य, विक्षिप्त योजना). २ मन घालून पाठपुरावा करणें; चिकाटी धरणें. ३ फार महत्त्वाकांक्षी बनणें, होणें. ४ हव्यास पेटणें. 'तों त्यावरि उठे भरले दोघेहि संगरीं हांव।' -मोकर्ण ४५.३४. **०भरी**-वि. १ लोभयुक्त; हावरा; वासनायुक्त. २ महत्त्वाकांक्षी; अति उत्साही; एखाद्या गोष्टीसाठीं वेडा झालेला. (क्रि० होणें). **हावर-रें**-पु.स्त्री.न. अतिशय इच्छा; लोभ; हव्यास. (क्रि० सुटणें; भरणें). **हावरा, हांवरा**-वि. १ अत्यंत लोभी; कितीहि मिळालें तरी हवेंच अशा स्वभावाचा; आशाळभूत. २ उतावळा; हळवा; असहनशील (दुःख, ईप्सित वस्तु इ० संबंधीं). **हावळा**-वि. हवळा. हळवा पहा. **हावा**-पु. हव्यास. 'भणौनि तळौनि काढिला हावा। अमृतरूप।' -ऋ ८१.

**हावडें**—न. (क.) अतिशय कष्ट, श्रम. खरड पहा. (क्रि० काढणें). 'त्यानें माझें हावडें काढलें.'

**हांवदुळणें**—हांदुळणें पहा.

**हावबोर**—पु. बचल्याचें बी. -मुंव्या ११३.

**हावभाव**—पुअव. १ भावनादर्शक अभिनय, भाव, चळवळ आणि हातवारे; आंतरभावदर्शक क्रिया. 'तंव नेत्रकटाक्ष हावभाव। दावितां नाना लाघव.' २ नखरे; चेष्टा. ३ अनुमान; अंदाज; तर्क. (क्रि० बांधणें). [हाव+भाव]

**हावर**—पुस्त्री. गळूं, फोड इ० फुटल्यानंतर पुन्हां जो गुबारा धरला जातो तो. (क्रि० धरणें).

**हावरी-रा**—स्त्रीपु. (व.) पांढरा तीळ.

**हावळा**—पु. हिरवा वाटाणा, हरभरा यांचा केलेला हुरडा. हुळा पहा.

**हॉवा**—न. (गो) लग्नाचें वऱ्हाड.

**हावा**—(प्र.) व्हावा. [होण]

**हावाव**—स्त्री. शोभा. -मनको. [हाव+आव]

**हा(हां)वाळी**—स्त्री. (कु.) १ दमा; श्वास. २ सांथ. [ध्व. हां]

**हावेली**—स्त्री. मोठें घर; वाडा. हवेली पहा.

**हाशम**—हशम पहा. शिबंदी. 'हाशमाकडील फडणीसीची असामी.' -वाडदुवा २१७.

**हाशा-शी, हांशा-शी**—पुस्त्री. हशियाहशी; बारतोंडी; एक झाड. पानें चार बोटें रुंद व लांबट असुन; फळ बोराएवढें असुन मुळापासुन पिवळा रंग होतो. -वगु ६ ३८.

**हाशा-हाशीया**—पु. वस्त्राची दशी; किनार. [अर हाशिया]

**हाशीखुशी, हाशीखेळी**—हशीखुशी पहा.

**हाशी(सी)ल**—न. १ हशील पहा. २ फायदा; नफा [अर. हासील] **०करणें**-(उप.) गमविणें; घालविणें.

**हास**—स्त्री. (व.) गळ्यांतील सरी; हासळी.

**हास**—पु. हास्य; हसणें. [सं.] **हासणें**-हसणें पहा. **हासी**-स्त्री. हंसें; उपहास. 'असी किरे प्रीत वाढल किर्ते जनांत न होय हासी।' -सला १०. **हासीन(ज)णें**-अक्रि. (काव्य) हसणें. 'तेव्हेळीं विस्तिमुखें हासीनली।'-शिशु १९०. **हासें**-हंसें पहा. **हास्य** न. १ हंसा; हसें. २ आनंदाचें हसुं; सुखाची भावना. ३ नवरसांपैकीं एक रस. ४ थट्टा; उपहास. ५ विनोद; मौज. हास्याचे चार प्रकार-स्मित, हसित, हास्य, अट्टहास्य. **हास्यक**-न. हास्याला कारणीभूत होणारी गोष्ट; विनोदविषय;

हास्यकारण. (इं.) खूमरला प्रतिशब्द. –हास्यविनोद-मीमांसा, प्र ६. [सं.] ०कारक-वि. १ हंसें उत्पन्न करणारें. २ उपहासास्पद. ०मुख-वदन-वि. १ नेहमीं हंसरा; हंसत-मुख; हसऱ्या तोंडाचा; आनंदी. २ विशेषप्रसंगीं हास्ययुक्त वदन ज्याचें झालें आहे असा. ०रस-पु. नवरसांतील पांचवा रस; हास्य-हांसणें. हास्यास्पद-वि. हंसण्यासारखें; उपहास-थट्टा यांचा विषय होण्याजोगें.

**हासडणें, हासडा, हांसणें, हांसडा, हांसळी, हांसू, हांसें**—हसडणें इ० पहा.

**हांसाबाजी**—स्त्री. हंसाबाजी पहा.

**हासिया**—स्त्री. किनार. हाशा पहा. –ऐटि १.१४. [अर. हाशिया]

**हांसेगहूं**—पु. एक जातीचा गहूं.

**हाहा**—उद्गा. दु:खोद्गार; अरेरे!, हाय, हाय!. 'हाहा! हाहा! ऐसें म्हणताचि हतशेष बळ पळालें हो!' –मोभीष्म ११.११६. [ध्व.] ०कार-हाहा:कार, हाहाकार-पु. १ मोठा शोक; विलाप. 'चोहोंकडे पाण्याचा हाहाकार पडला.' २ एखाद्या पदार्थाचा अभाव, हाकाटी पडणें.

**हांहां**—उद्गा. थांब! खबरदार! मागें सर! असें बजावणारा उद्गार. (क्रि० म्हणणें; करणें). [ध्व.] ०म्हणतां-म्हणेतों-क्रिवि. हातचेहातीं; चटदिशीं; त्वरेनें; चटकन. 'चिरक्षुधित ब्राह्मण हांहां म्हणतांहि वाढिल्या तारीं।' –मोकृष्ण ८६२२.

**हा हू, हां हूं**—स्त्रीन. १ भय, सावधान, जागृतपणा इ० सांगण्यासाठीं काढलेला उद्गार; खांकरणें; हूं करणें इ०. २ तळमळ; विवळणें ३ कांकू; साशंकता; अनिश्चितपणा. [ध्व.]

**हाहाकार**—पु. छांद्रं. [ध्व.]

**हाहाट**—पु. ओरड; आक्रोश. 'मुक्या नाकीं भरे मुरकुट। तें फेंफें बेंबें करी निकृष्ट। न कळे रडे करी हाटाट ते खटपट वाउगी।' –एभा २१.२२८. [ध्व. आटाआट]

**हाळ**—स्त्री. १ हारा; टोपली. २ (त्यावरून) विक्रीचे जिन्नस घेऊन परगांवीं जाणें किंवा खेडोखेडी विक्री करीत हिंडणें. उदा० हाळी जाणें–चालणें–निघणें. ३ (अशा तऱ्हेनें विकावयाचा माल; जिन्नस. ४ या मालाचा विक्रीचा पैका, नफा. ०बाजार-पु. माल घेऊन खेडोखेडीं विकत हिंडणें. (क्रि० करणें).

**हाळ**—स्त्री. लागवड करतांना जमीनींतून काढलेल्या किंवा पूर्वी असलेल्या झाडाची खूण.

**हाळ**—पु. १ गुरांसाठीं बांधलेला पाण्याचा मोठा हौद; डाकी. २ लांब व खोल घर; लांबट, खोल चूल; विस्तवाची खाई; चंपाषष्ठीचे दिवशीं खंडोबाचा गोंधळ चालू असतां त्याचे भक्त ज्या वरून चालत जातात तो विस्तव, खाई. आहार–ळ पहा. ३ (कर्ना.) डोंगरावरून वाहाणारा ओढा, झरा. त्याचें बनलेलें खडबडीत पात्र. ०करी-पु. हाळांत मोटेचें पाणी भरणारा माणूस.

**हाळ**—पु. नाश. [का. हाळु] ०करणें-(क.) गमावणें; उधळणें.

**हाळजणें**—अक्रि. (माण. व.) वाळंत होणें.

**हाळवुली**—स्त्री. हळद-हळवुली पहा.

**हाळी**—स्त्री. (महानु) एक प्रकारची पळी. 'हाळीया पाळीया।' –सिद्धांतसूत्र.

**हाळी**—स्त्री. (कु.) हांक; आरोळी.

**हाळीज-स**—न. (व.) नांगराची धुरा; आडवी दांडी; इसाड. [सं. हलिज]

**हाळीव**—न. अहाळीव (धान्य) पहा.

**हाळोपाळ**—क्रिवि. (व.) आसपास; जवळ; शेजारीं. [आळी द्वि. का. हळ्ळी+पळ्ळी]

**हि**—अ. देखील; आणखी. [सं. अपि ?]

**हिक**—स्त्री. (व.) घाण.

**हिकडचा-ला-ली, हिकडणें, हिकडील, हिकडून, हिकडनतिकडन, हिकडे, हिकडेतिकडे**—इकडचा इ० पहा.

**हिकणें**—उक्रि. (अश्लील) संभोग करणें.

**हिंकणें**—उक्रि. (राजा. तिरस्कारार्थी) खाणें; बोकणा भरणें.

**हिकमत**—स्त्री. १ शहाणपण; चातुर्य. २ कावा; मसलत; जादू; युक्ति. [अर. हिक्मत्] हिकमती-त्या-वि. १ शहाणा; हुन्नरी; कसबी; हुशार. २ कावेबाज; लबाड.

**हिंका, हिंके (हिक्के) खोर**—हेंका, हेंकेखोर पहा.

**हिकाती**—स्त्री. (क.) अयोग्य, खोटी सबब; अडचण दाखविणें; फालतू कारण, तक्रार; आडफाटे. हिकाती-त्या, हिकात्याखोर-वि. सबबी सांगणारा; आडफाटे आणणारा; तक्रारी करणारा. [अर. हिकायत्]

**हिकायत**—स्त्री. कथा; गोष्ट; कहाणी. [अर. हिकायत्] हिकायती-स्त्री. चार रकान्यापर्यंत ओढलेली रेघ (पूर्वीच्या लिहिण्यांत). रेघ पहा. –वि. १ हिकाती पहा. २ गोष्टी सांगणारा.

**हिंकुणवती**—स्त्री. दुर्भिक्ष; दारिद्य. 'त्यांच्या कपाळीं आपली हिंकुणवती.' –खेड्यांतील स्वभावचित्रें ९८. [हिंकुणवती या वैदिक मंत्रावरून अडाणीपणें बनविलेला चुकीचा अर्थ]

* **हिक्का**—स्त्री. उचकी. [सं.]

**हिक्का**—पु. हेका पहा.

**हिंग**—पु. अति उग्र वासाचा एक चीक. हा मसाला, फोडणी इ० त घालतात. [ सं. हिंगु ] **०लावणें-लावून विचारणें-मानणें-मोजणें-**( नकारार्थी प्रयोग ) मानणें; आदर देणें; महत्त्व देणें ( हिंग महाग असल्यानें महत्त्वाच्या पदार्थांतच वापरतात, यावरून ). **०हगणें**-रोग इ० नीं झिजणें; रोडावत जाणें; पिचत पडणें. **हिंगडा**-पु. १ हलक्या प्रकारचा हिंग; वाईट हिंग. २ ( निंदार्थी ) हिंग. **हिंगणें वाफणें**-उक्रि. १ ( पदार्थास प्रथम हिंग लावून मग फोडणी देतात त्यावरून लक्षणेनें-नकारार्थी प्रयोग करून ) करावयाचें कृत्य अपुरें असणें; आरंभहि नसणें. 'अझून शेत हिंगलें नाहीं वाफलें नाहीं; इतक्यांत पेरणी काय म्हणून केली.' 'रोजगाराचा ठिकाणा नाहीं अझून हिंगला नाहीं वाफला नाहीं.' २ ( शेतजमीन ) वाफणें पहा. ३ शेत भांगलणें. ४ अजारांतून बरें होऊं लागणें. [ हिंग+वाफ ] **हिंगतूप-धूप**-पु अव. नेहमीं होणारा संसाराचा किरकोळ खर्च ( विशेषतः देवधर्म, जेवण-खाण इ० चा ). ( क्रि० जाणें; उडणें; खरचणें ). ( पैसा कसा उडतो हें दाखवितांना वापरतात ). 'हिंगतुपास-तुपाखालीं-वारी-त्यानें सर्व संपत्ति उडविली.' **हिंगरडूं-रूड**-न. हिंग खाल्ल्यामुळें व्रणावर उठणारें बेंड; हिंगुरडें. **हिंगवणी**-न. हिंग लावलेलें पाणी. **हिंगाचा अंगारा**-पु. बाळंतिणीचे पांचवे व सहावे दिवशीं हिंग व हळद पाण्यांत कालवून बाळंतिणीस व घरांतील मुलाबाळांस लावतात तो अंगारा. **हिंगाचा खडा**-पु. १ एखादी त्रासदायक, निष्कारण फाटे फोडणारी व्यक्ति, वस्तु. २ गडबड्या, तल्लक माणूस. **हिंगाचा वास**-पु. संपत्ति, शक्ति, अधिकार इ० नाहींसें होऊन मागें राहिलेला निव्वळ लौकिक; काप गेले, भोंकें राहिलीं या अर्थी. म्ह० हिंग गेला पण हिंगाचा वास राहिला. **हिंगाचें पोतें**-न. वरील लौकिकवान् व्यक्ति. **हिंगा-लोण्याचा**-वि. ( ना. ) अशक्त व नाजूक प्रकृतीचा. **हिंगाष्टक**-न. सुंठ, मिरें, पिंपळी, ओवा, सैंधव, जिरें, शहाजिरें व हिंग या आठ औषधांचें समभाग चूर्ण. हें जठराग्नि प्रदीप्त करतें. [ हिंग+अष्टक ] **हिंगु**-पु. हिंग व त्याचें झाड. [ सं. ] **हिंगुनिर्यास**-पु हिंग. **हिंगुरडें**-हिंगरडूं पहा.

**हिंग**—क्रिवि. ( व. कुणबाऊ ) इकडे. हंगे; हिंगे पहा. [ का. ई-हीगे ]

**हिंगण-णा-णी, हिंगणबेट-टी**—पु स्त्री. एक झाड. 'कल्पतरु आणि बाभूळ। हिंगण आणि मलयागर।' [ सं. इंगुदी ] **हिंगणबेट-मिठा**-न.पु. वरील झाडाचें फळ. यांत बंदुकीची दारू भरून आपटबार इ० करतात. **हिंगणमूळ**-न. हिंगणीचें मूळ.

**हिंगणें**—न. ( राजा. ) एक प्रकारचें बांबूचें शिपतर.

**हिंगरावांगर**—स्त्री. ( व ) ( लहान मुलांची ) झोंबा-झोंबी; भांडण; तंटा.

**हिंगलाट**—न. ( कु. ) हिंगरडूं पहा. घट्टा; चामखीळ.

**हिंगा**—पु ( माण. ) एक किडा; भुंगा **हिंगे पडणें**-( माण. ) बाजरीच्या पिकावर लहान किडे पडणें.

**हिंगारी**—स्त्री. ( माण. ) रब्बीचें पीक; याचे उलट मुगारी. [ का. हिंगु, हिंदे=मागें ]

**हिंगुल-गूळ, हिंगोळ, हिंगळूक-हिंगुळूक**—पु पारा व गंधक यांचें एक मिश्रण; पाऱ्याची अशोधित धातु [ सं. हिंगुल ] **हिंगळी लाख**-स्त्री. हिंगूळ मिसळलेली लाख. **हिंगुळी**-वि हिंगुळासंबंधीं ( रंग, रसायन, पारा इ० ).

**हिंगू( गो )दाखविणें**—अक्रि. चकविणें; फसविणें; चोंदी देणें. **हिंगो तिंगो** स्त्री. टाळाटाळ; चालढकल.

**हिंगे-गे**—क्रिवि. १ ( अशिष्ट ) हंगे; इकडे; येथें. २ आतां. [ का. होगे=असें; याप्रकारें ? ] **०तिंगे**-न. १ ( इकडे-तिकडे ) असंबद्ध व टाळाटाळीचें भाषण; टोलवाटोलव. ( क्रि० करणें; लावणें; मांडणें; चालवणें; म्हणणें ). -क्रिवि. १ असंबद्ध-पणें; दुटप्पीपणानें. २ अजमासें; सरासरी; उणेंपुरें. ( क्रि० म्हणणें; बोलणें; करणें ).

**हिचक, हिचका, हिचकाविणें, हिचडणें हिचडा**—हिसकणें इ० पहा.

**हिचण**—पु. वन्य पशूंचा सुळा, दांत.

**हिचमिचणें**—अक्रि. ( कसें तरी, मोठ्या कष्टानें ), थोडा विसांवा घेणें; थोडेसे हातपाय हालविणें; चलनवलन करणें, हातपाय ताणून अंग मोकळें करणें; इकडे तिकडे हलणें. 'या दाटींत कसें बसावें; अंमळ हिचमिचेन म्हटलें तर जागा नाहीं.' [ ध्व. हिच्+मिच् ]

**हिंचुटा**—वि. हिंपुटा; हिमटा; हिंपुटा पहा. [ हीन+पुटा ( पुटा ) ? ]

**हिजड( र )णें**—अक्रि. ( व. ) रागानें अंगावर धसकून जाणें; रागावणें. 'तो माझ्यावर फार हिजरला.'

**हिजडा**—पु. १ पुरुषवेषधारी नपुंसक; षंढ; यांची विशिष्ट जात. २ ( ल. ) निर्लज्ज, बीभत्स हावभाव, भाषण करणारा माणूस. ३ निःसत्त्व, दुबळा, पौरुषहीन माणूस. कांहीं हिजडे स्त्रीवेषांत गांवांत दरसाल गरीब श्रीमंतांकडून पैसे उकळतात त्यांस वतनदार हिजडे म्हणतात **हिजडी**-स्त्री. स्त्रीवेषधारी नपुंसक. **हिजडें**-न. हिजडा-हिजडी यांस सामान्यतः म्हण-

तात. म्ह० (गो.) हिजड्यांनीं जोडचें, मुंड्यांनीं खावचें=एकानें मिळवावें, दुसऱ्यानें खावें.

**हिजरा-रा, हिजरी साल**—पु स्त्री न. एक अरबी वर्ष; मुहम्मद पैगंबर मक्का सोडून मदिनेकडे गला त्या दिवसापासून म्हणजे १६ जुलै इ० स० ६२२ पासून सुरू झालेला शक. [अर. हिज्रा=वतनत्याग] **हिजरी**-वि. हिजरासंबंधीं. **हिजरात**-स्त्री. सामुदायिक देशत्याग.

**हिजे करणें**—(व.) उपहास करणें.

**हिटगा**—वि. (व.) मनाचा हलका; क्षुद्र बुद्धीचा. **हिटगेपणा**-पु. हलकेपणा.

**हिड**—पु. (गो) गुरांचा कळप.

**हिडक**—स्त्री. घिरत, जातें यांतील टांकीची वाटोळी खाच, शीर.

**हिडगा**—पु. १ छांदिष्ट, लहरी माणूस. २ भटक्या, उनाड माणूस. म्ह० १ हिडग्याची व्याली गाय आणि खांद्यावर वासरूं जत्र्याला जाय. २ व्यसनी, फंदी, टवाळ माणूस. ३ आळशी, दुर्लौकिक असलेला, अव्यवस्थित माणूस. अनेकवचनी व भाई या शब्दाबरोबर उपयोग. उदा० 'हिडगेभाई मिळाले आणि मसलत बिघडली.' **हिडगेचार**-पु अव. स्वैर वर्तन; गचाळ वर्तणूक.

**हिंडणें**—अक्रि. भटकणें; फिरणें; भ्रमण करणें. [सं. हिंडन] **हिंडणवारे**-पु.अव उगीच इकडेतिकडे भटकणें; उद्योग सोडून भटकी मारणें; उनाडक्या. (क्रि० करणें; लागणें). [हिंडणें+वारा] **हिंडन**-न. फेरी; भटकी; भ्रमण. **हिंडण्या, हिंडफिऱ्या**-वि. १ भटक्या; प्रवासी. २ (ल.) जुजबी; उडत-उडत असलेलें. 'या पिटुकल्या हिंडण्या लिहिण्याची किंमत मोजूं लागल्यास काडीचीहि नाहीं.' –खेया. [हिंडणें+फिरणें] **हिंडावें मुंडावें**-न. तीर्थयात्रा करणें व संन्यास घेणें. 'नलगे हिंडावें मुंडावें कांहीं । साधनाची आटाआटी ।' [हिंडणें+मुंडणें]

**हिडशा-शी-सा**—वि. घाणेरडा; किळसवाणा; ओंगळ; बीभत्स; हिडीस (व्यक्ति, वस्तु इ०). [सं. हिड्=धिक्कारणें, हिडीस] **हिडसणें**-उक्रि. धिक्कारणें, अपमान करणें; विटंबना करणें; कस्पटाप्रमाणें लेखणें; हिडीसफिडीस करणें. **हिडसावणें**-उक्रि. १ झिडकारणें; धुडकावणें. २ घाण करणें; मळविणें; लिडबिडीत करणें (भांडीं इ०). 'भांडीं सारीं हिडसावून टाकलीं कीं हो बेट्यानें!' **हिडी(ड)स**-न. उकीरडा; घाण; खातेरें. –वि. हिडशा पहा. [सं. हिड] **हिडीसपि(फि)डीस**-न. अनादराची, तुच्छतेची वागणूक. –क्रिवि धिक्कारून; धुडकावून; तिरस्कारानें (क्रि० करणें).

**हिंडळणें**—उक्रि. डुचकळणें; हिचमिचणें, हिंदळणें पहा [ध्व.]

**हिंडा(डो)ळा**—पु. हिंदोळा पहा.

**हिडिंबा**—स्त्री हेडंबा पहा.

**हिंडोर**—न. (बे.) शेतातील ढेकळें फोडण्याचें एक औत [का हेंडे=ढेकूळ]

**हिंडोल**—पु. गायनांतील एक राग. [सं. हिंदोल]

**हिण-णें**—न हीण पहा. [सं. हीन] **हिणकस-कट-वट-कसी**-वि हीणकस इ० पहा. **हिणवणी, हिणावणी**-स्त्री कमी करणें; हिणावणें; मानखंडणा. ०वणें-विणें, **हिणा(व्या)(व)विणें**-उक्रि. १ दोष, अपराध, चूक इ० दाखवून मानखंडणा करणें; हीनपणा काढून लाजविणें. २ कमी करणें; उतरविणें. (गो.) हिणवुचें. 'परी एकाधें कां आंग । हिणावती जे ।' –ज्ञा १७.३८८. **हिणवर**-पु. १ (कर.) प्रथम लग्नाचा, बिजवर नसलेला नवरदेव. २ हीणवर पहा. **हिणसुंरा**-पु. (व.) थकवा. –वि. (व.) फार श्रमलेला; थकलेला. (क्रि० होणें). **हिणाव-वो**-पु. फजीती; लाज; हलकेपणा. 'तें अगाधपण जाईल । हिणावो अंगा येईल ।' –ज्ञा २.२१७.

**हिणगे**—न. (को) बांबूची एक प्रकारची टोपली.

**हित**—न लाभ; कल्याण; बरेपणा; फायदा. (क्रि० शोधणें). –वि. १ उपयुक्त; फायद्याचें; योग्य; रास्त. [सं.] म्ह० (व.) हिताची हितखोर अन जन्माची फजीतखोर. (सुनेला उद्देशून). ०कर-वि. कल्याणकारक; फायदेशीर. ०गूज-न. १ स्वतःचे कल्याणाची गोष्ट. 'सत्य वचन राखण्यास नढळा कथितों ह्या हितगुजा ।' –अफला २ आपल्या मनांतील गोष्ट; गुप्त गोष्ट; कानगोष्ट (क्रि० सांगणें; बोलणें; राखणें). 'माझ्या मनिचें हितगुज सारें ठाउक कृष्णाला ।' –सौभद्र. [हित+गुह्य] ०चिंतक-वि. १ कल्याण चिंतणारा; हितेच्छु २ सार्वजनिक संस्थेस विशिष्ट रक्कम (वर्गणी) देणारा सभासद. (इं.) सिंपथायझर. ०बुद्धि-वि. हित चिंतणारा, करणारा ०शत्रु-वि. अकल्याण, अहित करणारा; हिताच्या आड येणारा. 'मुलास खेद होईल म्हणून चांगली शिक्षा लावीत नाहीं अशा बापास हितशत्रु म्हणावें।' –बायबल-प्राव्हर्ब १३.२४. ०वादी-वि. कल्याणाची गोष्ट, सल्ला सांगणारा. ०संबंध-पु. १ हितासाठीं येणारा संबंध. २ मैत्री; मलोखा. **हितान्वेषण**-न. कल्याण शोधणें. **हिताळ-ळा-ळू**-वि हितकर्ता; उपकार कर्ता. 'हित कर गे हिताळे, अनहित कर गे बोळाळे'; हितकर्ता हिताळू अनहित कर्ता ओढाळू.' **हितेच्छु, हितैषी**-वि. कल्याण इच्छिणारा; हितचिंतक. **हितोपदेश**-पु. कल्याणकारक सल्ला. **हितोपदेशी**-वि. असा सल्ला देणारा.

**हितचा, हितपर्यंत, हितवर, हितून**—इथचा, एथचा इ० पहा.

**हिंताल**—पु. एक प्रकारचें खजूरीचें झाड.

**हिंद**—पु १ हिंदुस्थान देश. 'हा हिंददेश माझा।' २ या देशांतील लोक ( हिंदु आणि मुसलमान ). [ सं. सिंधु-सिंध: अर. सिंध: फा. हिंद् ]. ०वानी, **हिंदवी**-वि १ हिंदू: हिंदुस्थानं संबंधीं. 'हिंदवी स्वराज्य.' २ हिंदी **हिंदी**-स्त्री उत्तर हिंदुस्थानातल्या लोकांची भाषा. -वि. हिंदुस्थानचा. **हिंदु-दू**-पु. भरतखंडांतील परंपरागत सनातनधर्मानुयायी, त्या धर्मातील व्यक्ति. **हिंदुस्थान**-पु न. १ हिंदूंचा देश; सर्व भारतवर्ष. २ नर्मदोत्तर भारतवर्ष; उत्तर हिंदुस्थान. **हिंदुस्थान सरकार**—न. हिंदुस्थानचा राज्यकारभार पाहणारी संस्था; गव्हर्नर जनरल-इन-कौंसिल. **हिंदुस्थानी**-स्त्री. ऊर्दूभाषा. ऊर्दूमिश्रित हिंदी भाषा. -वि हिंदुस्थानसंबंधीं.

**हिंदकळणें हिंदळणें**-उक्रि. डुचमळणें; हिसळणें; हेलकावे खाणें, देणें. [ सं. हिंदोल ]

**हिंदण-न. हिंदाण-हिंयान**—न. १ नेम मारण्यासाठीं केलेले चिन्ह; लक्ष्य. २ आणीबाणीची वेळ. ३ नेम. ( क्रि० धरणें; बांधणें ). विंधणें पहा. [ सं. विधन ]

**हिंदग-न. हिंदाण-न**—न. १ युक्ति; चातुर्य; विंदान पहा. २ ( ना. ) शिकवण.

**हिदहिदणें**—अक्रि. बिलबिलीत होणें ( फळ, गळूं इ० ). [ ध्व. ? ] **हिदहिदीत, हिदहिदा**-वि. बिलबिलीत झालेला.

**हिंदुळा. हिंदोल, हिंदोळा**—पु. १ पाळणा; चोपाळा; झोंपाळा २ झोंका; हिसका; धक्का. ३ एक राग. यांत षड्ज, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाती औडुव-औडुव. वादी धैवत, संवादी गांधार वेळ रात्रीचा चौथा प्रहर. [ सं. हिंदोल ] **हिंदोळणें**-सक्रि. हालविणें. 'ज्या हिंदोळला कैलास।'—वेसीस्व ४९३.

**हिंयान**—न. ( व. घाटी ) नेम; हिंदण पहा.

**हिनसुरा**—वि. हिरमुसलेला. —मनको.

**हिंपुटा-पुट-पुटा**—वि. ( काव्य. ) खिन्न; खेदयुक्त; कष्टी. 'बहु हिंपुटी होइंजे मायपोटीं।'—मनाचे श्लोक २०; —तुगा ८३३. —स्त्री. शून्य-शर. ( साहि० अद्वया ). ३. [ हीन= आकुंचित+पुट=ओठ; तुल० अर. हम्म्=चिंता ]

**हिफाजत**—स्त्री. १ संरक्षण. 'पटणकरूचे हिफाजती करितां अगोदर नबाबांनीं सिताबराव अमील यास...पाठविलें.' —रा ५.११९. २ आश्रय. 'सिद्दी अबदुला बेदरचे हिफाजतीस जात होता.' —रा ५.६१. [ अर. हिफ़ाझत् ]

**हिम**—न. १ धुकें. २ बर्फ. ३ थंडी; थंडपणा; गारठा ( हवा, शरीर यांत ). ४ हींव; सर्दी. ५ ( -पु न. ) औषधी पदार्थ भिजत घालून त्याचें घ्यावयाचें पाणी. ६ थंड पदार्थाचा राशी. -पु. १ चंद्र. २ हिमालय पर्वत. ३ चंदनाचें झाड. ४ कापूर इ०. -वि. थंड. [ सं. ] ०कर-पु चंद्र. ०केदार-पु. हिमालयांतील केदाराश्रम; बद्रिकाश्रम. 'त्या दोघीं मातापितरीं। वाटे तप केलें हिमकेदारीं। तरीच मांडीवरी श्रीहरी। रात्रंदिवस खेळतसे।' —ह ५.८४. ०गिरी-पु. १ ध्रुव प्रदेशांतील बर्फाचे डोंगर. पुढें पुढें हे समुद्रांत वहात येतात. २ हिमालय. ०ज्वर-पु. हिंवताप; शैत्यज्वर. ०तेल-न. नारळाच्या रसावर थंडीच्या दिवसांत येणारा मलईसारखा थर. ह तेल महारुग्णाधीवर गुणकारी असतें. ०नग-वंत-वान्—पु. हिमालय पर्वत. ०नगजा-स्त्री. पार्वती. ०भानु, **हिमांशु**—पु. चंद्र. ०वान-वि. थंड; गार; बर्फमय ०वृत्त-पु. ( भूगोल ) ज्या उंचीवर नेहमीं बर्फ असतें ती उंची अथवा असा प्रदेश दर्शविणारी भौगोलिक रेषा. **हिमाचल हिमाद्री हिमालय**—पु. १ भरतखंडाच्या उत्तर सीमेवरचा प्रचंड पर्वत. २ ( ल ) अजस्र ढीग. 'चुकयांचा हिमालय.' **हिम्य**-वि. थंडीचें; बर्फाचें.

**हिमकरणी**—वि. ( व. ) हिमटा; कृपण. [ सं. हीन+कृ—कर ? ]

**हिमजी**—पु सुरवारी हिरडा. —मुंव्या १७२.

**हिमट, हिमटतोंड्या**—वि. हिंपुटा; खिन्न [ सं. हिम ? ]

**हिमटा-टा-ट्या**—वि. चिक्कू; कृपण. **हिमटाण**-पु. ( गो. ) कंजूषपणा.

**हिमटी काढून रडणें**—( कु. ) ओक्साबोक्शीं रडणें. [ हीमटा=ही ! असा ध्वनी ? ]

**हिमत हिम्मत**—स्त्री. १ धाडस; धैर्य; शौर्य. 'सर्वोचीं ज्ञानें, हिंमत-मर्दानपणा मजला ठाऊक आहेत. पानपतवर भाऊस टाकून शालेत.' —ख १४८१; —मराआ १३. २ निग्रह; हिय्या; उत्साह; उमेद; धमक; अवसान. [ अर. हिम्मत् ] म्ह० हिम्मत मर्दा तर मदत खुदा. ०हरणें-धैर्य, अवसान, उत्साह इ० नाहींसा होणें; गडबडणें. **हिम्मतदार, हिम्मती, हिम्मतीचा**-वि. धाडशी; धैर्यवान्; निधड्या छातीचा. ०बहादर-वि. १ शूर, वीर. २ एक पदवी. —स्वप १३२.

**हिमलाण**—पु. ( कु ) मासळीची घाण.

**हिम(मू)ळ**—वि. १ बेचव; निःसत्व; पाणचट. 'तापवून निवविलेलें गोड पाणीहि हिमळ लागतें.' २ कोंबट. [ हीनबळ ? ]

**हिमाईत-यत**—स्त्री. १ संरक्षण; मोठ्याचा आश्रय; आधार; मदत. 'पेंढारी यांची हिमाईत करून स्वामींचा क्रोध होऊन स्वामी उपोषणें करितात हें काय?' -ख ९.४५४८. २ जोरावारी; दंडेली. 'आऊंधकर हिमायेतीनें आउतें धरितात.' -रा ६.१३. [अर हिमायत्] **हिमाइ(य)ती-त्या, हिमाइतीचा, हिमाईतदार-गार**-वि. १ आश्रित; संरक्षित. २ आवडता दोस्त. **हिमाइतीचा गाढव-र्चा गधडी**-पुस्त्री. १ आवडतें गाढव. २ (ल.) आवडता पण नालायक आश्रित. म्ह० हिमाइतीचा गाढव तेग्याला लाता मारी. **हिमायत-येत, हिमायतदार** हिमायती-हिमाईत इ० पहा. 'हिमायतीच्या बळें गरीबगुरिबाला गुरकावूं नको.'

**हिमायल**—पु. (जंबिया) आपल्या जंबियानें जोडीदाराच्या गळ्याजवळील बरगडीच्या खड्डयांत केलेला वार याचे उलटा व सीधा असे दोन प्रकार आहेत. [अर. हमायल=ताईत]

**हिम्दाद**—स्त्री. मदत -सासंईतह २.

**हियें**—न. १ (काव्य) छाती; हृदय. 'तेणें दुःखें हियें फुटेल।' -ज्ञा १.२३४. २ धैर्य. [सं. हृदय; प्रा. हिअय; हिं. हिया] ०**घालणें**-छाती फुटणें; काळजाचा ठाव सुटणें. 'जो गाजत जंव आइकती। तंव उभेचि हियें घालिती।' -ज्ञा १. ९६३. ०**फोडणें**-अंतःकरण खुलें करून गुप्त गोष्ट सांगणें. 'येणें मानें जीवाचें हियें फोडावें।' -ज्ञा ९.३५. **हिय्या**-पु. हिंम्मत; धैर्य; अवसान; छाती. [हिं.] **हिय्येदार-बाज**-वि. धाडसी; हिंमतवान.

**हियो-ह्यो**—उद्गा. नांगर फिरवितांना बैलांना द्यावयाचा इशारतीचा शब्द. [ध्व.]

**हिर**—हीर पहा.

**हिरक**—स्त्री. घिरट, जातें यांतील टांकीची खांच, शीर.

**हिरकूट**—नपु. (तिरस्कारार्थी) हीर पहा. **हिरका**-पु. १ ताड, माड, पोफळ इ० च्या झावळींतील, लांकडांतील रेषा. २ सुपारींतील रेषा. हीर पहा. ३ खापरपोळी इ०च्या पोटीं रेघांनीं भिन्नभिन्न झालेला अवयव.

**हिरगण**—न. खांब व तुळई यांच्यामधील + अशा आकाराचा तुकडा; पिढें.

**हिरगुंडा कापशी**—स्त्री. एक झाड.

**हिरडा**—पु. १ हरडा; एक औषधी फळ. याचे जंगली, रंगारी, चांभारी, बाळ, सुरवारी इ० अनेक प्रकार आहेत. २ (ल.) हिरड्याच्या आकाराची वस्तु (गळ्याची घाटी, निशाणाचे काठीचा शेवटचा भाग इ०) [सं. हरीतकी; प्रा. हरडई] **हिरडी**-स्त्री. वाळलेला बारीक कोंवळा हिरडा.

**हिरडी**—स्त्री. १ ज्याच्यामुळें दांत परस्परांशीं संबद्ध असतात व ज्यांत ते बसविलेले असतात तो मांसल भाग; दातांची खोबण; घर.

**हिरणें**—उक्रि. हरण करणें; बळात्कारानें छिनविणें, हिरावून घेणें. 'तोही मी कोल्हावा हिरें। मग तमचि होती एकसरें।' -ज्ञा १६.४१६. [सं.]

**हिरण्य**—न. सोनें. [सं.] ०**केशी**-पु. एक सूत्रकार. -वि. यजुर्वेदाची एक शाखा व सूत्र; त्या शाखेचा (ब्राह्मण). ०**गर्भ**-पु. ब्रह्मदेव. ०**श्राद्ध**-पु अन्नदाना ऐवजीं हिरण्यदान करून केलेलें श्राद्ध. **हिरण्मय**-वि. सोनेरी; सोन्याचें.

**हिरतणें**—सक्रि हिरावून घेणें. 'जेणें भ्रांतिपासुनि हिरतलें।' -ज्ञा ५.३४. [सं. हर्]

**हिरमुशी-मुष्ी, हिरमूस, हिरमोडी**-वि. निराश; उत्साहहीन; हतबल; धीर खचलेला. **हिरमुसणें**-अक्रि. निराश होणें; धीर सुटणें; विरस होणें. 'राजा मोठ्या डौलानें स्वारीस निघाला होता, पण हत्ती मरतांच हिरमुसून पडला.' [हीर=ईर्षा+मृष्] **हिरमोड**-पु. निराशा; धैर्य खचणें; उत्साहभंग; मनोभंग. [हीर=ईर=मोडणें]

**हिरमोड**—वि. (राजा.) हिरवट रंगाचा; गडद हिरवा नव्हे असा. [हिरवा+मोडणें]

**हिरली-लें**—इरली-लें पहा.

**हिरवा**—वि. १ पाच, शेवाळ, कोंवळें गवत इ० च्या रंगाचा. २ (ल.) कच्चा; अपक्व; अपुरा शिजलेला (फळ, अन्न, रसायन, वीट). ३ कोती (समजूत, विचार). ४ अपक्व वासाचा; कच्च्या रुचीचा. ५ (सांके.) भांग, गांजा किंवा तो ओढणारा इसम. ६ भांडखोर; ज्याचें कोणाशींहि पटत नाहीं असा; हिरवट. [सं. हरित] ०**एरंड**-पु. एरंडाची एक जात. ०**कंच-०गार ०चार**-वि. अतिशय हिरवा; गर्द हिरवा. ०**कच्चा**-वि. १ अर्धवट पिकलेलें (फळ इ०). २ अर्धवट शिजलेलें, भाजलेलें. (अन्न इ०). ३ अर्धवट केलेलें (काम) ०**चांपा-चांफा**-पु. एक फूलझाड. याच्या उलट पांढरा, पिवळा चांपा. ०**निळा-पिवळा**-वि. काळानिळा (राग, मत्सर, विष इ०मुळें झालेला-चेहरा, मुद्रा). ०**भाजला खाणें**-सदानकदा, कांहींहि झालें तरी अतिशय छळणें, त्रास देणें. **हिरवट**-वि. १ साधारण किंचित् हिरवा. २ किंचित अपक्व; कच्चा. ३ तंबाखूसह गांजा ओढणारा. ४ (ल.) अडाणी; अशिक्षित; रानवट. ५ अविचारी; तापट; एककल्ली; चिडखोर; तिरसट. 'मृत्यू ऐसा व्याघ्र। मुख पसरोनि समोर। तेथें हिरवटाचार। वेहधेनूतें केंवि रुचे।' -मुरंशु २८२. **हिरवटाण**-स्त्री. हिरवा चारा, फळ इ० ची घाण; हिरवा असल्याची घाण. [हिरवट+घाण] **हिरवंडा**-वि. १ हिरवट. अर्थ २ पहा. २ हिरवट घाण येणारें, हिरवट असलेलें (फळ, वीटइ०). **हिरवस**-वि. हिरवंडा. **हिरवसान**-पु. (गो.) हिरवटपणा; कच्चेपणा. **हिरव(वा)ळ, हिरावळ**-स्त्री. ओलें, हिरवेंगार गवत,

वनस्पति इ०चा समुदाय. 'सडकून पर्जन्य पडला म्हणजे आठा दिवसांत चोहींकडे हिरवळ होत्ये.' **हिरवळणें**-अक्रि हिरवा पाला फुटणें; पालेजणें. 'वाळलें काष्ठ हिरवळेना।' -दा ९.७.२९. **हिरवी घेवडी**-स्त्री. हिरव्या शेंगा येणारी घेवड्याची वेल. **हिरवीजमीन**-स्त्री. (कों.) जमीन प्रथम भाजल्याशिवाय, दाढ केल्याशिवाय जींत पेरणी केली आहे अशी जमीन. **हिरवी तमाखू**-स्त्री. (सांके.) गांजा. **हिरवें**-न. गुरांना खाण्यास उपयोगी असें हिरवें गवत, पाला इ० हिरवळ.

**हिरविणें**—हिरावणें पहा.

**हिरशी-सी**—वि. १ लोभी; खादाड. २ चिडखोर; अवहेलना करणारा; शिडशिडा. [अर. हिर्साहा] **हिरस**-स्त्री. १ (क्व.) लोभ; लोभीपणा; हांव. २ (ना.) मत्सर; स्पर्धा; ईर्षा. [अर. हिर्स]

**हिरसा**—वि. १ खेंकाळण्याची संवय असलेला (घोडा). २ उन्मत्त; नाठाळ. [हिंसणें] ०**तट्टू**-न १ खेंकाळणारें, नाठाळ तट्टू. २ बडाईखोर माणूस. ३ -वि. परदाराभिलाषी; व्यभिचारी; दुर्व्यसनी (माणूस). 'लंडेगुंडे हिरसेतट्टू त्यांची संगत धरूं नको.' -अफला.

**हिरहिरी**—स्त्री. १ हिरिरी पहा. २ हल्ला. 'अशा पांच सात हिरहिऱ्या जाल्या.' -भाव १४७.

**हिरा**—पु. एक पांढऱ्या रंगाचें महारत्न. परब, बिलंवी, मुखलसी, पलचा इ० याचे प्रकार आहेत. [सं. हीरक, हीर] म्ह० हिरा तो हिरा गार ती गार=थोर व हलका कोण हें तेव्हांच ओळखूं येतें. ०**दिवा**-पु. पुरा मूर्ख. ०**बोळ**-पु. एक प्रकारचा बोळ; कातबोळ. ०**हिंग**-पु. चकाकणारा उत्कृष्ट हिंग. **हिरेखाण**-स्त्री. हिऱ्यांची खाण. **हिरेदिवे**-पु.अव. मकरसंक्रांतीस ब्राह्मणास, दोन दिवे व दोन आरसे बायका दान देतात ते.

**हिराकस**—स्त्रीपु. शाई, रंग वगैरे करण्याच्या उपयोगाचा एक खनिजपदार्थ; लोहगंधकित. [हिंदी]

**हिराटा**—पु. (गो.) गिधाड.

**हिरामण**—पु. पोपटांतील एक जात. [हिं.]

**हिरावणें**—उक्रि. जबरीनें दुसऱ्यापासुन घेणें; हिसकाविणें. [सं. हृ-हरणें-हिरणें]

**हिरावळी**—स्त्री. बायकांची पांघरण्याची ओढणी (क्रि० पांघरणें). [तुल० तुर्की हिरावळ]

**हिरासा**—वि. १ भयभीत. 'दरोबस्त शीख हिरासा होऊन ... पानपतकडे गेले.' -दिमरा १.१६४. २ हैराण. 'ते हिरासा आहेत;' -दिमरा १.११७. [फा. हिरासान]

**हिरिरी**—स्त्री. १ वेग; आवेश; सपाटा; झपाटा. 'क्रोधाचे हिरीरीबरोबर मी एखादा वाईट शब्द बोलल्लों असेन.' २ निकराचा हल्ला; आवेशानें तुटून पडणें. 'फौजेनें पहिल्या हिरीरीस किल्ला घेतला.' [सं. वीर्य; म. ईर, हीर]

**हिरीस**—स्त्री. हांव; आधाशीपणा. [अर. हिर्स] **हिर्शी**-वि. लोभी.

**हिरुती, हिरोत**—न. (व.) कुटलेलें लाल तिखट. [वीर्यवती ?]

**हिरूनफिरून**—क्रिवि. हेरूनफेरून पहा.

**हिरोळी**—स्त्री. (कों.) एक वेल, हिचे कंदही खातात.

**हिलगड**—स्त्री. १ (देणेंघेणें इ० व्यवहारांतील) भानगड; लचांड. (क्रि० घालणें; ठेवणें; पडणें; होणें). 'तुमचे आमचे देण्याघेण्याची हिलगड ठेवूं नका.' २ अडथळा; गुंताडा; गुंतागुंत. [हिलगणें-लोंबणें] **हिलगडणें**-उक्रि. लोंबकळत ठेवणें, भिजत घोंगडें ठेवणें; शेवटपर्यंत पुरें न करणें (काम, फिर्याद इ०); एकादें काम सिद्धीस न जाऊं देतां अडथळून पाडणें. 'आमच्या लग्नाचें काम त्यानें हिलगडलें.' -अक्रि. निकाल न लावतां अनिश्चितपणें लोंबत रहाणें. **हिलगडा, हिलगण, हिलंगवण**-पुस्त्री हिलगड. **हिलगणें, हिलगाव(वि)णें**-उक्रि. हिलगडणें; ढिलें बांधणें; लोंबत ठेवणें; सरासरी जुडणें; टांचणें (कागदाच्या गड्ड्या इ०); अडकविणें. -अक्रि. १ लोंबकळत पडणें; लोंबत राहणें. २ गुंतणें; अडकणें. ३ एखाद्या कामांत गुरफटून जाणें. 'मी दिवसभर हिलगलो.' [हिं. हिलगना]

**हिलणें**—हालणें पहा. [हिं. हिलाना]

**हिलफिरकी**—स्त्री. (चांभारी) बूट घोटण्याचें एक हत्यार. [इं. हिल=टांच+फिरकी]

**हिलामत**—नअव. (गो.) लग्नांतील वरातीचें चवरी, अब्दागीर इ० साहित्य.

**हिलारी, हिलारणी**—स्त्री. १ हल्ला; हिरिरी पहा. २ दौड; चाल (घोड्याची). (क्रि० देणें).

**हिलाल**—पु. १ दिवटी; टेंभा; पलिता; मशाल. 'सोयऱ्यांचे मंडपांत पुरुष व बायका रात्रीचें जाण्यायेण्यास हिलाल दिवट्या अगोदर बातमी राखोन सिद्ध करून ठेवाव्या.' -पया २८८. २ चन्द्रकोर; चन्द्रजोत. [अर. हिलाल्] **हिलालच्या**-वि. मशालजी.

**हिलावणें**—सक्रि. हलविणें.

**हिल्ला**—पु. १ लबाडी; युक्ति; कारवाई; ढोंग; बतावणी; सबब; टाळाटाळीची युक्ति; खोटी अडचण. 'त्यास कांहीं एक हिल्यानें दूर घालावयाचें ऐसें मनांत आणून लांबविलें असेल तर ईश्वर जाणें.' -ख १२.६६७५. २ निर्वाहाचें साधन (आश्रय, उद्योग, धंदा, रोजगार इ० चें). [अर हीला] ०**हरकत**-स्त्री. १ युक्तिप्रयुक्ति; सबबी; बतावण्या (कर्ज पगार, निकडीचें काम

इ० टाळण्यासाठीं ). २ विरोध; हरकत. ३ हला हरकत पहा. [ अर. ] हिल्लेबाज-वि. छट; दंगेखोर; हरकत्या.

**हिल्लारी**—स्त्री. आरोळी; हांक. हुलड पहा. 'एकचि हिल्लारी करा म्हणती। '-निगा ४८. [ ध्व. ]

**हिंव**—न. १ थंडी; वस्तु, हवा यांतील गारवा; गारठा. २ शिरशिरी; सर्दी. ३ हिंवताप. ४ थंडीच्या कडाक्यानें खराब झालेलें पीक. ( क्रि० जाणें; फिरणें ). [ सं हिम ] ०ज्वर-ताप-पु. थंडीचा ताप; हिमज्वर. **हिंवडणें, हिंवणें**-अक्रि. थंडीनें कुडकुडणें; हुडहुडी भरणें; गारठणें; कांपणें. 'एकां उभयांचि प्राण गेले। कांगांचे दांत बैसले। बिडदांचे दादुले। हिंवताती।'-ज्ञा १.१३५ **हिंवडी**-स्त्री.(को ) थंडीची हुडहुडी. **हिंवत हिंवत जमीन**-पुस्त्री. १ हिंवाळ्यांत नांगरून पावसाळ्यापर्यंत तशीच ठेवलेली पड जमीन. 'हें नवरान हिंवताकडे टाकलें.' २ ( डांगी ) एकवेळ पड टाकून पहिल्या हंगामांत लागवडीस आणलेली माळजमीन. **हिंवताची नांगरणी**-स्त्री. वरील जमीनीची नांगरट. **हिंवताड**-न. (तिरस्कारानें) हिंवत. **हिंवताळा**-पु. (व.) हिंवाळा. **हिंवली**-स्त्री. थंडी. 'हिंवली जैसी आंगिकें। हिंवो नेदी निजांग।'-ज्ञा १७२२९. **हिंवशी**-स्त्री. (व.) थंडी. **हिंवशी पटक**-स्त्री.(व ) फार थकवा. **हिंवश्या पाण्याच्या भाकरी खाणें**-(व.) काळजी नसणें. **हिंवस**-स्त्री. १ (कों ) सर्द हवा. २ शीत तुषार. -वि. (व.) थंडगार. **हिंवसणें**-अक्रि. १ थंडीची, सर्दीची बाधा होणें. २ (ल.) निराश होणें; हिरमुसणें; म्लान-मलूल होणें; थिजणें; उत्साहहीन होणें. **हिंवसा**-वि. १ थंड; सर्द (पाणी हवा इ० ). २ रागीट नसलेला, सौम्य (माणूस). **हिंवसाण**-स्त्री सर्द झालेल्या व बिघडलेल्या वस्तूची घाण. [ हिंव+घाण ] **हिंवाडी**-हिंवडी पहा. **हिंवारें**-न. हिंवताप. 'जळसोस आणि हिंवारें।'-दा ३.६.२६. **हिंवाळा-ळी**-पुस्त्री. थंडीचा ऋतु

**हिंवर**—पु. एक मोठें कांटेरी झाड. म्ह० हिंवर तरूची शीतल छाया=नपुंसकाच्या हातीं पद्मिनी, सुळावरची पोळी. याप्रमाणें निरुपयोगी, निषिद्ध. ( हिंवराच्या छायेंत बसूं नये असा संकेत आहे ).

**हिंवळणें, हिंवळावणें, हिंवाळणें**—अक्रि. विवळणें पहा.

**हिंवळाण**—स्त्री. ( गो. ) मासळीची घाण.

**हिंवावचें**—सक्रि. ( गो. ) पसरणें; वासणें.

**हिंवाळें**—न. ( कु. ) बिन विषारी साप. वयाळें पहा.

**हिशे(शो)ब**—पु. १ अंक; आंकडे; व्यावहारिक जमाखर्चाचें, आवकजावकाचें गणित; गणती; मापन; संख्याफल. २ गणना; अंकगणिताप्रमाणें मेळ पहाणें. ३ गणित करून रकम निश्चित करणें; गणितानें निघालेली रकम. ४ कागदावर छिपलेला जमाखर्च; कर्ज, खर्च इ० चें टिपण. ५ जमाखर्चातील एखादी बाब. ( क्रि० धरणें ). ६ ( ल. ) सरळपणा; न्यायीपणा; न्याय, वाजवी रीत; सरळ मार्ग. ७ ( ल. ) पर्वा; महत्त्व; लौकिक. [ अर. हिसे(सा)ब् ] ०किनेब-ठिशेब-पु. सामान्यपणें जमाखर्च; जमाखर्चाचे कागद इ०; गणित. **हिशे(शो)बी**-वि. १ हिशेब, गणित, जमाखर्च यासंबंधीं २ हिशोबाचे कामांत वाकबगार; कुशल; दक्ष; व्यवस्थित; सरळ. ३ न्याय्य; योग्य; रास्त; बरोबर. ४ चोख; व्यवस्थित ( माणूस ). ५ कांटेकोर; पैन पै हिशेब देणाघेणारा.

**हिस**—स्त्री. ( व. ) कदर; मान. ( क्रि० वाटणें; मानणें ). [ अर. हिस्स् ]

**हिसकणें**—उक्रि. १ जोरानें, झटक्यानें ओढून घेणें; झटकणें; हिसडणें; जबरदस्तीनें घेणें. २ (ल.) उपटणें; उकळणें; हासडणें ( पैसा इ० ). ३ फिसकटविणें; बिघडविणें ( काम; योजना; मसलत ) [ सं. हिष्कर्षण ? हिं. हिसकना ] **हिसकणी**-स्त्री हिसडा; झटका; हिसकणें पहा. **हिसका**-पु. १ हिसकणी; झटक्यानें ओढणें व त्यापासुन झालेली स्थिति. ( क्रि० देणें; बसणें ). २ अकल्पित बसलेला तडाखा; झपाटा; सपाटा; आचका; हिसडा आणि त्यापासुन उद्भवलेला त्रास, होणारा परिणाम. ३ (ल.) ( चालू काम, धंदा ) एकदम बंद पडणें; विघ्न येणें; तूट येणें; विघ्न; अडथळा. ४ ( ल ) निष्फळ व दगदगीचा प्रवास; खेप; हेलपाटा. [ हिं. ] **हिसकावणी**-स्त्री. जोरानें ओढून घेणें; हिसडणी. **हिसकाविणें**-उक्रि. हिसकणें; जोरानें ओढून घेणें; अन्यायानें व बळानें घेणें; बळकावणें. **हिसकाहि(कि)सक**-स्त्री. ( अनेकांनीं केलेली ) ओढाताण; झटापट; ओढाओढी. **हिसडणें**-उक्रि. हिसकणें; हिसका देणें. **हिसडा-डो**-पुस्त्री. हिसका; झटका.

**हि(हिं)सणें**—अक्रि. ( घोडा ) खेंकाळणें. [ सं. हेष्. ध्व.] **हिंसाण**-न. खेंकाळणें. 'वाऊ करिती हिंसाण।' -गीता १.४८४.

**हिंसणें**—उक्रि. ( काव्य ) हिंसा करणें; इजा करणें; ठार मारणें; खून करणें. [ सं. हिंस्‌न ] **हिंसक, हिंस्र**-वि. १ खुनी; हत्यारी; घातक. २ ( ल. ) क्रूर; उग्र; भयंकर ( व्याघ्र-सिंहादि प्राणी ). **हिंसा**-स्त्री. १ हत्या; खून; ठार मारणें. २ इजा; पीडा; दुखापत. हिंसेचे तीन प्रकार-मानसिक ( द्वेष; मत्सर इ० ), शाब्दिक ( शिव्या; शाप ), शारीरिक ( वध, खून ). [ सं. ] **हिंसालु**-वि. हिंसक पहा.

**हि(हिं)सळणें**—अक्रि. १ उसळणें; उसळी खाणें; हेंदकळून सांडणें ( भांड्यांतील पातळ पदार्थ ). २ (ल.) अनावर, बेफाम पळणें; उधळणें ( घोडा, बैल ). ३ शितोडे उडणें.

**हिस(सा)ळा**—पु. कणसांवर पडणारा एक रोग. 'हिसा-ळयानें गेलें शेत।' –एभा २३.१२८.

**हिसा**—हिस्सा पहा.

**हिसा**—वि. थंडगार (पाणी, वस्तु). हिंवसा पहा. [हिंव]

**हिसाडणें, हिसाडा-डी**—हिसडणें इ० पहा.

**हिसाब, हिसाबकिताब, हिसाबी**—हिशेब इ० पहा. 'त्याचा हिसाब काय धरावा.' –मराचियोशा ४३. 'ऐसें हिसाबीकिताबी असतां.' –रा १५.२६.

**हिसार**—पु. किल्ला; गड. 'बजानब कारकुनानी हिसार जावळी.' –रा २०.१५९. [अर. हिसार्]

**हिसेंमिरें**—न. (तंजा.) कंकोळ. [हिंवसें+मिरें]

**हिंस्र**—हिंसणें पहा.

**हिस्सा**—पु. वांटा; भाग; अंश; पाती. [अर. हिस्सा] **हिस्सेरशी-रसीद्**-स्त्री. १ (गणित) वांटावयाचें द्रव्य व वाटेदारांची संख्या हेच भाज्यभाजक मानून त्रैराशिकाच्या रीतीनें विभाग करण्याचा प्रकार. (क्रि० घालणें). २ हिशेबानें काढलेला वांटा; पाती. (क्रि० येणें; बसणें). 'मशारनिले याच्या वियमानाची शिबंदीची हिसेरसीद बेहडयाच्या अज मासें निवडून पाठविली आहे.' –पया ९२. [फा. हिस्सा+रसद्] **हिस्सेदार**-वि. पातीदार; भागीदार; वांटेली; वाटे-करी. [फा. हिस्सा+दार्]

**हिहिहि**—स्त्री. उपहास; फिदीफिदी. –क्रिवि. निंदार्थी कुत्सित, हसण्याच्या आवाजाचें अनुकरण करून. [ध्व.]

**हिळणें, हिळणेंमिळणें**—अक्रि. वळणीस येणें; कह्यांत येणें; रुळणें; माणसाळणें. [मिळणें द्वि.; हिं. हिलाना]

**हिळभर**—न. (बे.) नांगराची मूठ. [सं. हल]

**ही**—अ. १ देखील; सुद्धां. २ तसेंच; आणखी. हि पहा.

**हीट**—न. (गो.) तांदुळाच्या पिठाचें एक पक्वान्न. [का. इट्टु=पीठ; तुल. सं. पिष्ट]

**हीड**—स्त्री. (कों.) वळचण.

**हीण-न**—न. १ हलक्या प्रतीची धातु. २ (ल.) क्षुद्रता; हलकटपणा. ३ (हिणवायाजोगें) व्यंग; दोष; उणीव. –वि. १ क्षुद्र; हलका; नीच. २ उणा; रहित; हीन पहा. ३ कमी प्रतीचा; गौण. [सं. हीन] **म्ह०** रीण फिटेल पण हीण फिटणार नाहीं. **०कट-कस-घट-कसी**-वि. १ भेस ळीचें; मिश्रित. २ आंत हीण (कमी किंमतीचा धातू) घालून कमी किंमतीचें बनविलेलें. ३ कमी कसाच्या सोन्या चांदीचें (नाणें, अलंकार). **०कौल**-पु. भर आकारापेक्षां कमी सान्यानें जमीन देण्याचा लेखी करार. **०वर**-पु. ०१ नवरीपेक्षां वय, उंची इ० नी कमी असलेला नवरामुलगा २ असल्या जोडप्यांतील विजोडपणा. ३ सर्वसाधारणपणें ठेवण, रुबाब इ० बाबींत हलका भरणारा धनी, वरिष्ठ. 'धिक् जिणें ज्याचा स्वामी हीन। मरण तें बरें भलें मग।' –तुगा १२७६. [हीन+वर]

**हीन**—वि. १ न्यून; रहित (विवक्षित गुणधर्मादिकांनीं); उणा. 'द्रव्य-संपत्ति-बुद्धि-सामर्थ्य-तेज-कौर्य-हीन.' २ क्षुद्र; गौण; हलका. 'हीन-जाति-वर्ण-दातृत्व-भाग्य इ०.' [सं.] **०दंती**-वि. पांच दांत असणारा (घोडा). –अश्वप १. ९४. **०वर**-हिणवर पहा. **०वाद्**-पु. (कायदा) अयोग्य, अस्वीकरणीय साक्ष. **०वादी**-पु. अशी साक्ष देणारा तो. **०वीर्य**-वि. निःसत्व; गुणहीन; पराक्रमहीन; पुरुषत्व नष्ट झालेला.' **०शक्त-क्ति**-वि. अशक्त; कमजोर. **०सख्य**-न. हलक्या जातीच्या, धंद्याच्या लोकांशीं मैत्री. **०सेवा**-स्त्री. हलकट धन्याची किंवा हलक्या प्रकारची नोकरी. **हीनांग**-वि. व्यंग असलेल्या शरीराचा; विकलांगी.

**हीर**—पु. १ माड, पोफळ इ० च्या पातींतील काडी. 'कुठें हिरा तो कुठें हीर हा।' २ हिरका पहा. ३ शिजलेल्या भातांतील न शिजलेला तांदूळ, कणी. ४ हिरकूट; कुसळ; घस, सडी. (क्रि० भरणें; शिरणें; सलणें; उपटणें). **०भाजणें**-(सडीचें टोंक जाळून बोथट करणें, पेरण्याच्या दाण्याचे डोळे मोड इ० भाजणें, यावरून) शौर्य; तेज इ० चा नाश करणें; मऊ आणणें. 'काळाग्नि हा रुद्ररूपी रामराजा तुझा भाजिल हिरवा हीर।' –मध्व ६६.

**हीर**—स्त्री. ईर्ष्या; चढाओढ. [वीर्य; ईर] **०मोड-सांड**-पुस्त्री. १ उत्साहभंग; उमेदमोड; नाउमेदीची स्थिति. २ हेलसांड.

**हीर**—पु. (महानु.) प्रकाशकिरण; कीळ. 'तया रंगाचे हीर।' –भाए ६४५. [सं]

**हीर, हीरक**—पु. हिरा; रत्न. [सं.]

**हींव**—न. हिंव (सर्व अर्थी) पहा. [सं. हिम; पोर्तुगि. हील, हीर]

**हीही**—स्त्री. फिदिफिदी हास्य. –क्रिवि. असल्या प्रकारें हसून; खिदळून. [ध्व.]

**हीळ**—स्त्री. (हेट.) झावळीची काडी. हीर (१) पहा.

**हुं, हुः, हुंऊ-हुंहूं**—उद्गा. मान्यतादर्शक शब्द, उच्चार, हुकार. [ध्व.] **०म्हणणें-करणें**-१ ऐकतों आहे, करतों आहे इ० दर्शविणें. २ मान्यता देणें; संमति देणें. 'क्रोधें अकर्ण विजया पृथ्वी करतोंचि बोल बापा हूं।' –गोडबोले वेणीसंहार.

**हुपल**—स्त्री. (कु. गो.) आरोळी; ओरड; बोंब. [ध्व. तुल० इं. येल्]

**हुकणें**—अक्रि. १ दगड, गोटी इ० बरोबर नेमानें न लागणें; नेम, मार चुकणें. २ असा नेम मारतां न येणें, मारण्यास चुकणें. ३ चुकणें; भुलणें; न साधणें (वेळ, गाडी). [हिं. हुकना] **हुकचूक**-स्त्री. १ चूकभूल; फसगत; विसर. २ (सामान्यपणें) चुकणें; कार्यसिद्धि न होणें. 'हुकचूक आहे, एखाद वेळ गोळी लागत नाहीं.' [हुकणें+चुकणें]

**हुका(क्का), हुकामुका**—पु. १ धूम्रपान व चुंबन. २ स्त्रीपुरुषांचा स्वैर संबंध; विलास; विहार; क्रीडा. [हुक्का+मुका]

**हुं का(की) चूं, हूं चूं, हुचू**—न. कुरकूर; निषेध; अवाक्षर (नकारार्थी प्रयोग). [ध्व.] **हुंकार**-पु. १ प्रश्नकर्त्यास उत्तरादाखल, कथा गोष्ट सांगणारास अवधानदर्शक करावयाचा उच्चार. २ राग, धाक, दर्शविणारा उच्चार. 'ऋषीनें हुंकार टाकला तर भस्म होशील' ३ हंबरणें. 'जेवी वत्साचेनि हुंकारें। धेनु स्त्रवत चाले क्षीरें।' -एभा २९ ४२४. **हुंकारा**-पु १ हुंकार अर्थ १ पहा. २ धनुष्याचा टणत्कार; गर्जना. [हूं+कार] **हुंकीर**-पु. (गो.) हुंकार करणारा एक पाण्यांतील लहान मासा. **हुं कूं**-हुं का चूं पहा. (क्रि० करणें; म्हणणें).

**हुकार**—पु हिंदूंच्या 'श्री' कारा सारखा अरबी-फारशी पत्रांचे माथ्यावर लिहावयाचा शब्द. [अर. हू=तो म्हणजे देव]

**हुकावणें**—अक्रि. १ नादीं लागणें; उतावीळपणें मागे लागणे. २ अतिशय निमग्न होणें; गढून जाणें. [हुकी]

**हुकी-क्की**—स्त्री. १ कोल्ह्याचें ओरडणें. २ वाऱ्याचा झोत. ३ एकाएकीं मनांत आलेली अनावर इच्छा; नादीं लावणारी कल्पना-विचार-लहर-उकळी. (क्रि० येणें; उठणें). 'लहानपणीं शाळेंत शिकत असतां जोसेफला समुद्रावर सफर करावयाची हुकी आली.' -केळकर, ग्यारिबाल्डी. [ध्व.]

**हुकीर**—न. (कु.) उकीर; उंदीर वगैरेनी बिळांतून उकरून काढलेली माती. [उकीर]

**हुकूम, हुक्म**—पु. १ आज्ञा. २ अनुरोध; सांगी. ३ (गंजिफा) सर पान, ज्यास वरचढ दुसरें पान नाहीं असें पान. याच्या उलट चोर पान. (पत्ते) डावापुरता ठरलेला जोरावर रंग; त्या रंगाचें पान. [अर. हुक्म] ०**अहकाम**-पु अधिकार; सत्ता. 'तालुक्यांत सर्व हुकूम-अहकाम त्याजकडील.' -रा ७.४९. ०**खुदाई**-स्त्री. देवाज्ञा; मृत्यु. 'मल्हारभटास हुकूम खुदाई जालियावरी।' -रा १०.३४६. [खुदाई=ईश्वराचा] ०**गारदाई**-स्त्री. सैन्याची (राजसत्तेविरुद्ध) उठावणी; शिपायांचें बंड. गारदाई पहा. ०**दाज**-वि. आज्ञा करणारा. 'हुकूमदाज तुका। येथें कोणी फुंदो नका।' -तुगा ३२५५. ०**नामा**-पु. १ दिवाणी खटल्याचा निकाल झाल्यानंतर खरा ठरलेल्या पक्षास कोर्टाकडून मिळणारें निर्णयपत्रक; दाव्यांत मागितलेल्या दादीपैकीं सगळ्या किंवा कोणत्याहि दादीसंबंधानें पक्षकाराच्या हक्कांचा निरुत्तर रीतीनें दिलेला निर्णय; अम्मलबजावणीचे दृष्टीनें कोर्टानें दिलेला हुकूम. (इं.) डिक्री. २ (सामा.) लेखी हुकूम; आज्ञापत्र [अर. हुक्म्नामा] ०**बंदा**-पु. हाताखालचा इसम. -वि. 'हुकमती' पहा; आज्ञाधारक. [फा.] ०**बंदी**-वि आज्ञेंतील; आज्ञांकित. ०**बरदार**-वि. आज्ञाधारक. ०**हाकमत**-स्त्री. स्वामित्व व ताबा; अंमल व अधिकार; सार्वभौम सत्ता. [अर.] **हुकमत**-स्त्री. १ अधिकार; सत्ता; ताबा; अंमल; छाप. २ (कायदा) कोर्टाचा अधिकार. (इं.) ज्युरिसडिक्शन. [अर. हुक्मत] **हुकमतपन्हा**-पु. हुकुमाखालच्या प्रजेचा रक्षणकर्ता; सत्ताधीश; एक पदवी. **हुकमती**-वि. १ ताब्यांतील, अंमलाखालील अधिकारी; सत्ताधीश. 'मोगलाईंत हुकमती केसांची टोळी दाढीखालीं लोंबत होती ती मराठशाहींत कवटीवर चढली।' -राजसंन्यास २०. **हुकमा**-क्रिवि. १ आज्ञेबरहुकूम; जसा हुकूम मानावा त्याप्रमाणें. २ खात्रीनें; हटकून (मनाई केलेल्या गोष्टीसंबंधानें). 'नको जेवूं म्हटलें असतां हा हुकमा जेवतोच.' **हुकमाचा**-वि. आज्ञेंतील; ताब्यांतील, हुकमी. -क्रिवि. खात्रीनें; हटकून; अचूक. **हुकमा बाहेरचा**-वि. अनधिकृत; नामंजूर; आज्ञेविरहितचा. **हुकमी**-वि. १ हुकमाचा पहा; हुकमाप्रमाणें वागणारा. २ अचूक. हुकमाचा (-क्रिवि.) पहा; जसें 'हुकमी-गोळा-तीर-निशाण'=अचूक लागणारा इ० (क्रि० लावणें; पाडणें; मारणें). 'हुकमी-पाऊस-फासा-मात्रा-पुडी-लढाई-शिस्त-हत्यार (भाला, बरची, तलवार, सोटा इ०)-बाब (हक्क, येणें)' =हटकून लागू पडणें, येणें, होणें, लागणें इ०. ३ मंजूर केलेलें; आज्ञा दिलेलें; संमत. ४ अवलंबून असलेला; आज्ञेंतील; नियमाखालील. उदा० 'हुकमी कारभार'=स्वतःची अक्कल न चालवितां आज्ञा केल्याप्रमाणें पार पाडावयाचें काम. 'हुकमी-राज्य-चाकर'=घालून दिलेल्या नियमाप्रमाणें कारभार चालणारें राज्य; चाकर. ५ हुकमासंबंधींचें; आज्ञानोंदणीचें. हुकमी-दफ्तर=आज्ञा, हुकूम ज्यांत नोंदले आहेत असें दफ्तर; नियमावली. **हुकमी पत्र**-न. कामगिरीवर रवाना होण्याविषयींचा लेखी हुकूम. **हुकमें**-क्रिवि. हुकुमान्वयें. हुकमा पहा. **हुकमें हुकूम**-(पत्ते) हुकूमपत्ता; एकसारखीं हुकमाचीं पानें झाडून दस्त करणें.

**हुक्क**—स्त्री. पहाटेचें तांबडें; उषःकाल. (क्रि० फुटणें).

**हुक्क**—स्त्री. हूक पहा.

**हुक्का-का**—पु १ गुडगुडी. २ ज्वालाग्राही द्रव्यांनीं भरलेलें पात्र; बाँब. 'दारूगोळा, बाण, हुके.' -मराभा ५. [अर. हुक्का] **०पाणी**-न. खाणेंपिणें इ० व्यवहार. **०पाणी बंद करणें**-जातीबहिष्कृत करणें; वाळींत टाकणें. **हुक्केबरदार**-पु. गुडगुडी तयार करून देणारा चाकर. [फा. हुक्कबर्दार] **हुक्केबाज**-वि गुडगुडीचें व्यसन असणारा.

**हुंग**—स्त्री. वास; घेतलेला, आलेला वास; गंध. (क्रि० काढणें; घेणें). 'हें कुत्रें हुंग काढतें.' **हुंगणें**-उक्रि. १ वास घेणें; आघ्रात करणें. २ गुप्त गोष्ट, मसलत इ०चा सुगावा काढणें, ती उघडकीस आणणें, शोधून काढणें; लक्षणादिकांवरून जाणणें. ३ नाकानें वास वर ओढणें, ओढून घेणें; सुंगणें. ४ (ना.) तुच्छतेनें विचारपूस करणें. [वेप्रा सुंघ; सुंघना] **हुंगाडा-ड्या, हुंग्या**-वि. गुप्त गोष्टींचा सुगावा काढणारा; गुप्तपणें गुन्हे इ० शोधून काढणारा; हेर; गुप्तपोलीस.

**हुग्गी**—स्त्री. (बे.) गव्हाची खीर. [का.]

**हुच**—उद्गा. बकरें इ० स किंवा लोकांस पुढें जाण्यास प्रोत्साहन देतांना उच्चारावयाच्या शब्दाचें अनुकरण. [ध्व.] **हुच्च-च्चा**-वि. १ प्रपंचाकडे लक्ष्य न घालतां, ख्यालीखुशाली, कुचेष्टा इ० त काळ घालविणारा. २ हलकट; नीच. [हिं. हुच्च; का. हुच्चा=वेडा] **०भाई-मणी**-पु. क्षुल्लक, हलकट. कुचकिंमतीचा माणूस. **हुचेदिवाणी**-वि. हुचभाई; बेफामपणें हुरळून जाऊन साहसाचें काम करणारी व्यक्ति; हूड.

**हुजम(मु)ली**—स्त्री. (बुद्धिबळ) प्यादेमातीचा एक प्रकार; प्रतिपक्षाचें उंट व राजा आणि आपला उंट, राजा व एकच प्यादें राखून प्यादेमात करणें.

**हुज(ज्ज)त, हुज(ज्जु)ती**—स्त्री. १ वितंड वाद; घासाघीस. २ अडथळा; विघ्न; अडचण. ३ टाळाटाळीची सबब; तक्रार; बहाणा. (क्रि० घालणें). ४ पोत्यास ऐवज जमा झाल्याची पावती. 'जमा असत म्हणोन हुजत लिहून दिल्ही असे.'-बाडबाबा २.४४; -तुगा २३५९. [फा. हुज्जत] **०खोर-खाऊ, हुजती-त्या**-वि. १ तक्रारी, घासाघीस करणारा; वितंडवादी. २ सबबी सांगणारा.

**हुजूर**—पु. १ राजदरबार; राजसभागृह. २ स्वतः राजा; राज्याधिकारी; सरकार; हजरत. ३ जिल्ह्याची मुख्य कचेरी. याचे उलट महाली. -शअ. समक्ष; समोर; दरबारांत. 'माझे हुजूर तो असें बोलला.' -क्रिवि. मुख्य सरकारांत. 'महालीं चोर धरले असतील ते हुजूर पाठवून द्यावे.' **०खर्च**-पु. राजाचा खर्च. **०खजिना**-पु. सरकारी खजिना. **०चाकरी-दप्तर-शिबंदी-शिलेदार-स्वार**-स्त्री.न.स्त्री.पु. सरकारची चाकरी दप्तर इ०. **०अर्जी**-स्त्री. राजा, राजसभा यांच्याकडे केलेला अर्ज. **०कामगार**-पु. १ खुद्द राजाचा (राज्याचा नव्हे) सेवक; खास अधिकारी. २ राजाचा चिटणीस. **०चौकशी-तपासणी**-स्त्री. राजानें, राजसभेनें केलेली चौकशी, तपास. **०जमा**-स्त्री. सरकारी खजिन्यांतून महालांत पाठविलेला पैसा. **०नवीस**-पु. राजानें दिलेल्या सनदा व आज्ञा नोंदून ठेवणारा अधिकारी; राज्याचा चिटणीस. **०नेमणूक**-स्त्री. १ राजाचे खर्चासाठीं ठरविलेला पैसा. २ राजाची नेमणूक. ३ सरकारी नोकरी. **०पक्ष**-पु विधिमंडळ इ० तील सरकारपक्षीय सभासद; सरकारी पक्ष. **०पागा**-स्त्री. राजाचा रिसाला, पागा. **०पाग्या**-न. १ हुजुरपागेवरील मुख्य अधिकारी. २ त्या पागेंतील स्वार किंवा घोडा. **०बाजार**-पु. मुख्य पेठ; त्या पेठेवरील अधिकारी. **०मामला**-पु. सरकारांतून सरदार इ०कांस जे गांव इ० इनाम देतात त्यांत सरकारचा अंशतः जो अंमल असतो तो. **०मोकदमा**-पु राजसभेनें, राजन्यायाधिशानें निकाल देण्यास योग्य असा खटला; बाब. **०सनदी**-वि. १ थेट राज्यांतून मिळालेल्या सनदेवरून ताब्यांत असलेली (जमीन). २ -पु असली जमीन भोगणारा इनामदार. **०साब**-पु. नांदेड येथील शीखांचें गुरुद्वार. **०हशम**-पु. खास राजाचा अंगरक्षक, सैनिक, शिपाई. **हुजरात**-स्त्री. १ खुद्द राजाची खडी फौज; राजाचें खाजगी घोडदळ, फौज; (सरकारच्या निरनिराळया सरदारांच्या हाताखालची फौज हिच्याहून निराळी असते). -मराभा १२. २ दासदासी, पशु; पक्षी इ० खटलें. [अर.] **हुजरात-ती**-वि १ हुजुरात सैन्यासंबंधीं २ सरकारी मंत्री, अधिकारी, राजाचे खास नोकर, शरीररक्षक इ० संबंधीं; याच्या उलट गैबी, गैबती=बाहेर असलेलें; गैरहजर असलेलें; निरनिराळया प्रांतात असलेलें. 'हुजरात आणि गैबती। सेवनमार्ग द्विधा असती। दोहींत मुख्य हुजुराती। सन्निध सेवा।' -मेस्तक ३८. **हुजरात पागा**-स्त्री. हुजरात अर्थ १ पहा. **हुजराहुजूर, हुजुराहजूर**-स्त्री. समक्षासमक्ष असण्याची स्थिति; प्रत्यक्ष विद्यमानता. (क्रि० करणें, होणें). -क्रिवि. १ समक्ष; विद्यमानें. **हुजीर**-क्रिवि. (कु.) २ दोन्ही पक्षांच्यासमक्ष; समक्ष; देखत. **हुजऱ्या**-पु. निकटवर्ती सेवक; खिजमतगार; शागीर्द; शिपाई.

**हुट(ट्ट)**—न. (बे.) वेणण्याचें औत; कोळपा. (क्रि० मारणें). [का. हुट्ट]

**हुटकणें**—उक्रि. १ झटकणें; हिसडणें; जोरानें हालविणें. २ (ल.) समरगशक्तीस चालना देणें. ३ उतावीळ, घाई करणें; निकड लावणें. [ध्व. हुट] **हुटकणी**-स्त्री. १ हिसका; झटका. २ घाई; निकड; टोंचणी. **हुटहुट-हुटी**-स्त्री. १ तीव्र इच्छा; उतावळेपणा; उत्सुकता. (क्रि० भरणें; येणें). 'सर्वत्रास हुटहुट होती कीं एकवेळ झुंज करावें.' -भाब ९९. २ हुरहुर; चित्ताची उद्विग्नता. ३ घाई; निकड. (क्रि० करणें; लावणें). **हुटहुटणें**,

**हुटाटणें**-अक्रि. उतावीळ होणें; अधीर होणें; गर्व, अभिमान बाळगणें. ' अथवा यज्ञदानादि किरीटी । कां तपे इन हुटहुटी । ' –ज्ञा ९.३६९. **हुटा.ट-टा**-पु. हुटहुट अर्थ १ पहा. ( क्रि० भरणें; येणें ).

**हुड**—उद्गा. १ पशु इ०नां हांकून लावण्याचा शब्द. २ तिरस्कार, धिक्कारदर्शक उद्गार; हड्. **हुडकावणें**-उक्रि. १ हांकलून लावणें; धुडकावणें; घालवून देणें. २ झिडकारणें; तिरस्कारानें वागविणें. **हुडुत्त**-उद्गा, हत्त; हुड अर्थ २ पहा.

**हुंड**—पु. १ मळलेला किंवा डांकी दागिना उजळ दिसावा म्हणून विटकर, मीठ इ० चा लेप करून मग त्याला आंच द्यावयाचा संस्कार. २ त्यासाठीं लागणारें विटकरीची पूड, मीठ इ० सांस्कारिक द्रव्य, त्याचा लेप. ( क्रि० देणें ). [ सं. हुड्= स्वीकार करणें ? ] **हुंडणें**-उक्रि. दागिना हुंड लावून उजळणें. **हुंडा**-पु. हुंड पहा. **हुंडाचपका**-पु. वरील उजळा देण्याची कृति. चपका पहा. ( क्रि० देणें, लावणें ).

**हुडक, हुडुक्क, हुडुक**—पुन. डमरू ( सरोदे, कुडबुडे जोशी, माकडवाले इ०च्या हातीं असणारा ). [ ध्व. ] **हुडुकहुडुक**-क्रिवि. विशिष्ट चालीच्या ध्वनीचें अनुकरण करून.

**हुडकणें**—उक्रि. शोधणें; धुंडणें; तपास काढणें, लावणें ( वस्तु, जागा इ०चा ). [ का. हुडुकु ] **हुडकणी**-स्त्री. शोध तपास; थांग; चौकशी, माहिती काढण्याचें काम. **हुडकावा**-पु. (कर.) हुडकणी. **हुडकी नजर**-स्त्री. बारीक नजर; भेदक दृष्टि.

**हुंडका**—पु. हुंदका पहा.

**हुंडका**—पु १ दूध सुटावें म्हणून वासरूं आईच्या कांसेस जी ढुशी मारतें तो; धडका. २ डोकें; खांदा यांनीं करावयाचा प्रहार; धडक; मुसंडी. हुंदडा पहा. **हुंडकी**-स्त्री. हुंडका अर्थ १ पहा.

**हुडकी**—पु. ( चांदा ) डोंगरांतील नाला.

**हुडगी**—स्त्री. ( कु. ) टोपली.

**हुंडण**—न. १ ढुश्शी; धडक; धक्काबुक्की. ( क्रि० मारणें ). २ तालीमखान्यांतील अशा प्रकारचा व्यायाम. ३ चिक्कारगर्दी; दाटी; घोळका; गोंधळ; झुंड ( माणूस, शिपाई, गुरें, मुंग्या इ० ची ). ( क्रि० फुटणें; लोटणें; लागणें; जमणें; येणें ). उदा० माणसाचें-शिपायाचें-गुरांचें-मुंग्यांचें हुंडण.

**हुंडणें**—अक्रि. इतस्ततः भटकणें; उनाडणें. **हुंडगी**-स्त्री. अवदाड; उनाड स्त्री. उंडगी पहा.

**हुडदी**—स्त्री. ( कर. बे ) दंगा; त्रास; गोंगाट. ( क्रि० चालणें ). [ हुंदड ]

**हुडवा**—पु. शेणीचा, गोवऱ्यांचा ढीग. ' परडयांत शेणींचा मोठा हुडवा रचलेला होता. ' –महाराष्ट्र शारदा मे १९३७. [ हुडा ]

**हुंडवा**—पु व्यापार विक्री इ० चा कुलमक्ता; त्याचा परवाना; ठराविक रकमेस विकत घेतलेला हक्क ( सारा वसूल जमा करणें इ० चा खोतीहक्कासारखा ); कंत्राट. २ खंड; कुळानें मालकास धान्य इ० देण्याचा केलेला ठराव, करार. [ हुंडा ]

**हुडसाम, हुडसुदुदु**—स्त्री. १ हुतुतूचा खेळ. २ हा खेळ खेळतांना तोंडानें म्हणावयाचा शब्द. ३ धाड; जोराची चाल; झुंड. ( क्रि० घालणें ).

**हुडहुड-डी**—स्त्री. १ ( थंडी, थंडीतापाचें ) कांपरें; (भरणें, भरून येणें ). २ ( ल. ) उत्कट इच्छा; अधिरता; हुकी अर्थ ३ पहा. ( क्रि० भरणें; येणें; करणें; मोडणें; जिरविणें; उतरणें ). [ ध्व. ] **हुडहुडणें**-अक्रि. १ ( थंडी, ताप इ० नें ) कांपणें; लटलटणें. २ फार अधीर होणें. **हुडहुडा ज्वर-ताप**-पु. थंडीताप; हिंवताप.

**हुडा**—पु. एकाद्या देवतेची जत्रा. ०**करणें**-( व. )जिवाचा आटापिटा करणें. ' जिवाचा हुडा केला तेव्हां हे दिवस पहिले.'

**हुडा**—पु. १ बुरूज; तट; कोट इ० ' जैसे पन्नासिलें गगनाचे हुडे । ' –ज्ञा ७.८०. ' मेरु ऐसे लंकेचे हुडे । ' २ शेणामातीनें लिंपलेला गोवऱ्याचा ढीग, गंज; कडबीचा गंज; रास. ३ माड्यावरील, गच्चीवरील लहानशी खोली ( निजणें, हवा खाणें इ० साठीं ). [ का. हुडा=किल्ला ]

**हुंडा**—वि. भुंडा; बिन शिंगांचा; शिंगें खालीं, मागें वळलेलीं, वाकलेलीं आहेत असा ( पशु ). ०**बैल**-( ल. ) मूर्ख. **हुंडया कपाळाचा**-वि. अरुंद कपाळाचा.

**हुंडा**—पु. १ वरदक्षणा; वधूपक्षानें वरपक्षास लग्नांत द्यावयाची रोख रक्कम; शुल्क. २ भाजून खाण्यास ठीं जोंधळा, मका इ०चें पक्कें नसलेलें कणीस. ३ एक प्रकारचा भरीव बांबू. ४ मक्ता. हुंडवा पहा. ५ विहिरहुंडा; बागाईत जमीनीवरील सारा; हा बिघ्यावरून न ठरवितां विहिरीच्या पाण्याची जेवढी भीज तीवरून ठरवितात. ' विहिरहुंडयाकडील तरम. ' –पैमा २.३४. ६ तेल्याच्या घाण्यांतील लाट. [ सं. हुड्=स्वीकारणें ] ०**पांडा**-पु. वरास द्यावयाचा पैसा, मानपान इ०. हुंडा अर्थ १ पहा. **हुंडेबंदी**-स्त्री. पाटस्थळ जमीनीवरील पाट, विहिर इ० हिशेबानें बसविलेला सारा. **हुंडेकरी**-वि. हुंडा घेतल्यावांचून कोणाची मुलगी न पत्करणारा प्रतिष्ठित ( वर ).

**हुंडाभांडा, हुंडेभाडें**—पुन. माल वाहून नेण्याचें एकंदर भाडें, मक्ता ( यांत जकात, सारा, नाकपट्टी इ० धरतात ); ठोक वाहतुकीचा करार. [ हिं. ]

**हुंडारणें**—न. पाण्याची धडक सोसण्याकरितां घातलेला गडगा, बांध. –उक्रि. १ पशूनें आपल्या डोक्यानें पलीकडे लोटणें, झुगारणें, दूर करणें; हुंदाडणें. २ ( सामान्यतः ) ढकलून.

देणें; झिडकारणें; धिक्कारणें. ३ लाथाडणें; भिरकावणें; हुंदडा मारणें. [ हिं. हंडाना ]

**हुंडी**—स्त्री. १ एका ठिकाणचें झाड दुसऱ्या ठिकाणीं नेऊन लावावयाचें असलें म्हणजे मुळांस धक्का लागूं न देतां मातीसकट उपटतात तें; तयार केलेलें झाडाचें लहान रोप. २ बुधल्याच्या तोंडास दोरी बांधून व फडक्यानें आच्छादून वर बसविलेलें मातकापड-शेणाचें लिंपण किंवा दट्टया.

**हुंडी**—स्त्री.अव. जोंधळयाची एक जात. हा उन्हाळयांत पेरतात.

**हुंडी**—स्त्री. जडयाचें हत्यार. –शर.

**हुंडी**—स्त्री. (तंजा.) वर्गणीची पेटी. (याला वर भोंक असतें).

**हुंडी**—स्त्री. १ परस्थळीं पैसे पाठवावयाचे असतां आपल्या ठिकाणच्या सावकाराच्या दुकानीं सदर रक्कम व वरखर्च इ० साठीं थोडेसे पैसे दिले असतां तो दुसऱ्या ठिकाणच्या सावकाराला सदर रकम देण्याबद्दल देतो तें पत्र. २ (ल.) अविवाहित मुलगी. ३ (ल.) देशांतरी गोत्रज मरण पावल्याबद्दलचें वर्तमान, पत्र इ०; त्याच्या मरणानें आलेलें आशौच [ सं. हुड्= स्वीकारणें ? हिंदी हुंडी ] **०लावणें-देणें**-हुंडीपत्र नेऊन दे॰ **०चिट्ठी-पत्र**-स्त्रीन. हुंडीचा कागद; हुंडी अर्थ १ पहा. **०पांडी**-स्त्री. (सामान्यत:) हुंडी-पत्र इ० कागद. **हुंडणावळ, हुंडावण**-स्त्री. हुंडीबद्दलचा बट्टा; कमिशन; बटाव. [ हिं. ]

**हुडुक, हुडुक्क**—न. आमटीसारखें एक तोंडी लावणें.

**हुंडु**—पु. १ (व.) मोठा फोड. २ बूच.

**हुंडुक, हुंडु, हुंडुका**—पु. १ प्रबल भावनेचा आवेग; उठाव (शोक, करुणा, प्रेम इ० चा). २ हुंदका पहा. (क्रि० भरून येणें; भरणें; येणें). [ हुंदका ]

**हुंडेकरी**—पु. १ कोठार इ० मध्यें ठराविक वेतन घेऊन माल वाहून नेणारा इसम. (यांत नाकें, जकात इ० भरण्याचा पैसा तोच भरतो, मालकास द्यावा लागत नाहीं), हुंडयाभाडयाचा व्यापारी; दलाल. २ स्टेशनावरून घरीं, घरून स्टेशनावर माल नेणारा आणणारा माणूस.

**हुणू(नू)क**—स्त्री. १ मुद्दाम गैरसमज करून देणारें भाषण; हूल. (क्रि० करणें; दाखविणें). २ चिन्ह; खूण (ओळखीची). ३ रीत; पद्धत; चाल. (क्रि० साधणें; येणें). चुणूक पहा.

**हुत**—वि. १ अग्नींत हवन केलेलें; होमांत टाकलेलें; जाळलेलें. २ जाळून राखरांगोळी केलेली (वस्तु इ०). [ सं. ] **०क**—न. हवनीयद्रव्य; आहुती. 'आणि हुतक वस्तु जें जें। तेंही मीचि।' –ज्ञा ९.२६८. **०वह-हुताश-हुतास-हुताशन**-पु. अग्नि. 'गुरुवाक्य हुताशीं। हवन केलें।' –ज्ञा ४.१२३. 'हुताशन नेणें धडकतां। सीत कैचें उरलें पैं।' **हुताशनी**-स्त्री. होळी.

**हुन**—वि. निमंत्रित; बोलाविलेला. [ सं. ]

**हुतका**—पु. १ (उवा, पिसवा, किडे इ० चा) बुजबुजाट; वळवळाट. २ (ल.) घरांतील मुलाबाळांचा सुळसुळाट; गर्दी; भिकारी; याचक इ० ची सभोंवतीं दाटी. ३ खरजेची कंड, खाज. (क्रि० येणें; सुटणें). ४ माशा, ढेंकूण इ० चा सुळसुळाट व चावा. ५ उत्कंठा; अधीरता; पुळका (बोलणें, गाणें, मारणें, धावणें इ० चा). (क्रि० येणें). [ ध्व ? ] **हुतकाड**–(निंदार्थी) हुतका पहा.

**हुतकाड**—पु. (ना.) लहानसा भाग.

**हुताट-टा, हुताटकी**—पु.स्त्री. पराकाष्ठेचा उतावीळपणा. हुटहुटी पहा. [ हुटहुट ] **हुताटणें**–अक्रि. उतावीळ होणें; हुटहुटणें. **हुताटया**-वि. उतावळया.

**हुती**—स्त्री. (कों.) वावटळ; वातचक्र.

**हुतुतु, हुतुतु हमामा**—पु. १ एक खेळ. यांत 'हुतुतु' असा शब्द म्हणत धावावयाचें असतें. २ (ल.) अभ्यास इ० सोडून मुलें दांडगाई, गोंधळ घालतात तो धिंगाणा. (क्रि० घालणें). [ ध्व. ]

**हुद(दु)क(ग)णें**—सक्रि. १ हालविणें; चालविणें; झडपणें (पंखा, कापड, इ०). २ जोरानें हांकणें. –अक्रि. १ दुडक्या चालीवर चालणें (घोडा). २ हबके खाणें; बसणें (घोडेस्वारानें). [ ध्व. ] **हुदक(ग)णी-हुदकणें**-स्त्री. १ हालचाल; हबका; हुडकी. २ कुरकुर; किरकिर; निकड; टुमणें. (मुलांची).

**हुंदका**—पु हुतका पहा.

**हुंदका-की**—पुस्त्री. रडण्याचा उमाळा; 'हुंडका-की' पहा. **हुंदणें**-अक्रि. हुंदका देणें; रडणें. 'अश्रुपात वाहताति हुंदतात घडिघडि।' –सला ११.

**हुंद(दा)डणें**—उक्रि. १ शिंगानें, डोक्यानें हिसडा, ढुश्शी मारणें, देणें. २ (ल.) घालवून देणें. ३ (ल.) दूर लोटणें; बाजूस करणें; खोडून काढणें (दोष, आरोप). –अक्रि. बागडणें; हुदडणें; नाचणें; धुडगूस घालणें (मूल इ० नें). [ ध्व. का. हुडीद ] **हुंद(दा)डा**-पु. १ हुंडका २ पहा. २ डोकें, खांदा यांनीं मारलेली ढुस्सी; धडक. ३ जरीमरीसारखा एक रोग आणि त्याची देवता. ४ धसमुसळया, मुसळकंद, आडदांड माणूस; मार्गांत कितीहि अडचणी आल्या तरी धडाक्यानें पुढें जाणारा माणूस. ५ (सोंगटया) एकच फिरती शेवटची सोंगटी. **हुंद(दा)डी**-स्त्री. दूध पितांना वासरानें कासेस दिलेली ढुशी. हुंडका पहा.

**हुंदळा**—पु. (बे.) पाळणा; झोपाळा. [हिं. हिंदोला]

**हुद्दा रुमाल**—पु. म्यानासह तरवार एका रेशमी जाड मोठ्या पिशवींत घालून त्या पिशवीचें तोंडास बांधलेला एक रुमाल. हा चवरीप्रमाणें देवीवर ढाळावयाचा असतो. –आडिवऱ्याची महालक्ष्मी १०६.

**हुदुक हुदुक, हुदडुक हुदडुक, हुदुक हुदुक, हुदुक चाल**—क्रिवि. घोडा, गाढव इ० प्रमाणें खुदुकखुदुक चालीनें चालून.

**हुदुदु, हुदुदुसुडुदु**—पु. हुतुतु खेळ पहा.

**हुद्दा**—पु. १ अधिकार; काम; जागा; नोकरी; नेमणूक. 'केवळ लिहिणें येईना, कमाविशीही न केली त्यास मुलकीचा हुद्दा न सांगावा.' –सभासद २४; ब्रंव ६१. २ ताशा, मरफा व ढोल हीं तीन वाद्यें व तीं वाजविणारे प्रत्येकीं. [अर. उह्‌दा] **हुद्देदार-करी**-पु. १ (हुद्दा असलेला) अधिकारी; नोकर. २ शस्त्रवाहक कामदार. –शर. [फा.] °**मामला**-पु. कामकाज. –रा ८.१३४.

**हुनई**—स्त्री. रेशमाची एक जात. –मुंग्या ९७.

**हुनमुखा**—पु. (माण.) विहिरीच्या वरवंडीवरील बाजूस बसविलेला दगड.

**हुन(न्न)र, हुनेर**—पु. कौशल्य; कला; कसब; कल्पकता; शोधकता. २ युक्ति; इलाज; योजना. 'हुन्नर ही नवाच केला.' –सभासद ३१. 'काय हुनेर करावा म्हणोन चिंताचूर जाहले.' –मदब ११.५३. [फा. हुनर] °**बंद, हुनरी, हुनेरी, हुन्नरवंत-द**-वि. १ कल्पक; कलावंत; कुशल; कसबी; शोधक. २ धूर्त; कावेबाज ३ युक्तिबाज. ४ शिल्पकार. –शर. 'समागमें शिल्पी कार हुनरबंद कारागर त्या देशींचे आणून.' –मदरु १.२२. [फा. हुनर्मेन्द] °**बंदी**-स्त्री. १ कल्पसी. २ कावेबाजपणा.

**हु(हू)प**—स्त्री. १ उत्सुकता. २ धैर्य. हुरूप पहा.

**हुंपट, हुप्पा**—पु. १ वानराच्या टोळींतील मुख्य; पुढारी. २ (ल.) भटक्या व लबाड माणूस. [ध्व. हूप!]

**हुपरोटो**—पु. (गो.) एक पक्वान्न.

**हुंब**—वि. (माण.) अडाणी.

**हुबकणें**—उक्रि. १ जोरानें एकदम खालीं ओढणें; आदळणें. २ चटकन पकडणें; हिसकणें. ३ (ल) चोरणें; लुबाडणें; कपटानें गिळंकृत करणें; हबकणें. [ध्व?] –अक्रि. एकदम, दणकन; खालीं पडणें; कलंडणें; कोसळणें. २ हादरणें. हबकणें पहा.

**हुंबणें**—अक्रि. (काव्य) कण्हणें; विव्हळणें; कुंथणें. 'एक घायाळ येती हुंबत।' –ह २४.५२. [ध्व.]

**हुंबतें**—न. भांडण; वाद. हुंबरी पहा.

**हुबर-री-ळी, हुंबल-ली-लें**—स्त्री. गुराख्यांचा सुर काबळीचा एक खेळ. (क्रि० घालणें; खेळणें). 'एकु हमामा घालिति हुंबली।' –दाव ८५.

**हुंबरड, हुंब(बा)रडा-डी**—पुस्त्री. गाईबैलांचें ओरडणें; हंबरडा. **हुंब(बा)रणें**-अक्रि. १ गाईबैलांनीं ओरडणें; हंबरणें. २ (ल.) गर्वानें गुरगुरणें. 'थाटले सह्या गायक। अभिमानानें हुंबारती देख।' ३ घुमणें. 'परमानंदेंहि हुंबरे। सुखोद्गारें तुष्टोनि।' –एभा ३ ६०१.

**हुंबरणें**—अक्रि. निस्तेज, फिकट होणें; पांढरें पडणें (तोंड-उष्णता इ० नीं). उबळणें पहा.

**हुंबरीतुंबरी**—हमरातुमरी पहा.

**हुंबा-ब्या**—वि. रडका; रडया. 'हुंब्यासीं हुंबा लाऊन द्यावा। टोणप्यास टोणपा आणावा।' –दा १९ ९.२९.

**हुबहु, हुबेहू हुबेहुब**—क्रिवि. (चुकीनें हुबरहु असेंहि रूप आढळतें.) सर्व प्रकारें एकसारखें; थेट असें; पूर्ण सादृश्यतेनें; अत्यंत सादृश्य असल्यामुळें तोच हा अशी प्रतीति होई असें; (क्रि० असणें; दिसणें; बोलणें इ०). [अर. हुबहु; ऊ-ब-ऊ]

**हुबाडा, हुम्माडा**—पु. (ना.) हुंदडा, हुंडका अर्थ २ पहा.

**हुब्बक**—पु. घोड्याचा एक रोग. –अश्वप २.१४७.

**हुब्बेवतन**—न. स्वदेशप्रेम. 'कबुतरांना उडविण्याची आम्ही फार खटपट करीत असूं पण तीं कसचीं जातात. त्यांच्या तही हुब्बेवतन असतेंच.' –उत्तरेकडील भिंती. [फा. हुब्बु-इ-वतन]

**हुमकलवें**—सक्रि. (गो.) टांगणें; लोंबकळणें.

**हुमण**—स्त्री. (गो.) मांसाची आंबटी.

**हुमण**—पु.न. हुम, हुम असा आवाज करणारा एक पक्षी. याचा शब्द अशुभ समजतात.

**हुमण दांडगा**—वि. (माण.) रानवट; अडाणी. [हणमदांडगा?]

**हुमणी**—स्त्री. झाडांच्या आळयांत किंवा खतांत होणारी कीड; ही कोंवळें पीक खाते.

**हुमणी**—स्त्री. १ धडक; ठोसा; हुंडका पहा. 'मागध क्षोभोनि उफराटी। हुमणी हाणी मस्तकीं।' –मुसभा ७.२७. २ वासरूं पितांना गाईस देतें तो हुंदडा; हुंडका.

**हुम(मा)रडा, हुमरणें**—हुंबरडा इ० पहा.

**हुमरणें, हुमारून येणें**—अक्रि. तापानें तोंड फुगून येणें; सुजणें; विद्रूप होणें. [उमलणें?]

**हुमरीतुमरी**—हमरातुमरी पहा.

**हुमरी-हुम-लु, हुम्मल**—स्त्री. हुंबर पहा. (क्रि० घालणें; खेळणें).

**हुमल-म्मल**—स्त्री. १ हुंबर प्रमाणें एक खेळ; त्यावरून. २ सबबी सांगणें; हुज्जत. ( क्रि० घालणें ).

**हुमला**—पु. झाडावर राहणारी व कडकडून चावणारी तांबडी मुंगी.

**हुमला**—पु. ( बडोदें ) हल्ला; चाल. ' सशस्त्र रजपूत लोकांनीं चावडीवर हुमला करून. ' –सयाजीराव चरित्र ४६८. [ गु. हुमलो ]

**हुमाणा-णें, हुमणें**—पुन. उखाणा; कोडें; कूट.

**हुमायून**—विना. दिल्लीचा एक बादशहा. -वि. पातशाही. ' फर्मान हुमायून. ' –रा २०.१०. [ फा. हुमायूनी ]

**हुमारडा**—पु. हुंबरडा पहा.

**हुम्मा-मा**—पु. १ एक काल्पनिक पक्षी. हा शुभकारक, नेहमीं आकाशांत फिरणारा, आपलेंच मांस खाणारा असून ज्याचे डोक्यावरून हा उडतजाईल तो राजा होतो अशी समजूत. २ घोडयाचा तुरा ( पक्ष्याच्या पिसांचा ). [ फा. हुमा ]

**हुमैंसें**—अक्रि. ( गो. ) घाम येणें. **हुमसाण**-स्त्री. घामाची घाण.

**हुम्या-हुमा**—वि. १ ( दुसऱ्याची कितीहि घाई असली तरी संथ राहून नुसतें हूं म्हणणारा ) घुम्या; तोंडातून अक्षरहि न काढणारा. २ टोणपा; ठोंब्या; मद्दड. [ ध्व. ]

**हुयेल**—स्त्री. ( कु. ) आरडाओरड; बोंब. [ तुल० इं. हौल ]

**हुर**—उद्गाअ.स्त्री. हुरे पहा.

**हुरकुंड**—पु. एक खेळ.

**हुरडणें**—उक्रि. भाजणें; होरपळणें; वरवर जाळणें. [ जाळण्याचा ध्वनि हुर्‌? का. हुरि=भाजणें ]

**हुरडा**—पु. मका; जोंधळा, नाचणा इ० च्या कणसाचे भाजलेले दाणे. २ अशा भाजून खाण्याच्या स्थितीस आलेलें दाण्याचें कणीस. याचे दोन प्रकार करड ( जून ) किंवा बामणी (कोंवळा). [ देप्रा.हुरड; हुरडणें पहा. ] **हुरडयास येणें**–कणीस हुरडयासाठीं तोडण्याच्या स्थितीस येणें. **हुरडा फुंकया**-वि. १ भाजलेलें हुरडयाचें कणीस चोळून फुंकणारा ( विशिष्ट कामाचा गडी ). २ ( ल. ) भित्रट; पळपुटा; लढाईस निरुपयोगी ( शिपाई ) ३ रिकामटेकडा; आडदांड; उद्धट. [ हुरडा+फुंकणें ] **हुरडभाज**-स्त्री. १ हुरडा भाजणें. २ ( ल. ) कसेंतरी, वरवर भाजणें; योग्य प्रकारें, बरोबर न भाजणें. **हुरडभूज**—स्त्री. ( कों. ) राब, काट, कवळ इ० अपुरा पडल्यानें कशी तरी शेतजमीन भाजणें. [हुरड+भुजणें ]

**हुरण**—न. १ मुंग्यांचा ( किंवा ल० नें माणसांचा ) समुदाय; थवा. '२ ( राजा. ) एक जातीची मुंगी.

**हुरणी, हुरणें**—होरणी; होरणें पहा.

**हुरदंग-गा**—पु. १ गडबड; दंगा; अशांति; कल्ला; धुडगूस. ( क्रि० घालणें; मांडणें; चालवणें; करणें ). -वि. १ अव्यवस्था, दंगा इ० नें युक्त. २ दंगेखोर; गोंधळ माजविणारा.

**हुरदावळ**—पु.स्त्री. हरदावळ पहा.

**हुरपळ-( ळा ), हुरपा( फ )ळा**—पु. १ वरवर भाजणें; परतणें; होरपळा. २ अशा प्रकारची स्थिति; आगआग. ३ वरवर दग्ध होणें. ( क्रि० करणें; होणें ). [ देशी ] **हुरपडणी-फळणी**-स्त्री. हुरपळ पहा. **हुरपळणें-पाळणें**-उक्रि. १ वरवर भाजणें; आंच देणें. २ व्यापारांत तूट येणें. -अक्रि. १ वरवर जळणें. २ ( शरीर, अवयव इ० ची ) आग होणें; जळजळणें. [ हुर्‌+पोळणें ]

**हुरपुरें-हुरें**—नपु. ( गो. कु. ) गोवर रोग.

**हुरमट**—वि. उर्मट; हूड पहा.

**हुरमत. हुर्मत-ती**—स्त्री. अब्रू; •पत; नांवलौकिक. ' दिल्लीपतीची हुरमत राखावी. ' –पाब १६. ' चिरंजीवाची हुर्मती आपण बचाविली हा उपकार विसरणार नाहीं. ' –रा ६.३२६. [ अर. हुर्मत् ] **०खाऊ-घेऊ-घेणा**-वि. मानहानि करणारा; खालीं पहावयास लावणारा; काळोखी लावणारा; अब्रू घालविणारा; लौकिक बुडविणारा ( धंदा, मनुष्य इ० ). **हुरमतीचा, हुरमतदार, हुरमती**-वि. अब्रूदार; पतदार; लौकिकवान.

**हुरमू( मो )ज**—स्त्री. विशिष्ट प्रकारची कावेसारखी तांबूस माती; रंग. [ अर. हुर्मुज=ओर्मझ बंदर; अहुरमज्द शब्दावरून बनलेलें नांव ] **हुरमु( मो )जी**-वि. १ हुर्मूज रंगाचा, रंगासंबंधीं. या रंगाचें इराणी आखातांतील उत्कृष्ट ( मोती ). ' तुमचें रूप जसें हुर्मुजी दाणा जी । ' –होला १६९. [ फा. हुर्मुझी ]

**हुररा-री**—पुस्त्री. ( व. ) ठोसा; गुद्दा.

**हुरेवडी, हुरली, हुरवावडी, हुर्रेवडी**—स्त्री. १ फजीती; हुर्यो; फटफजीती; बचेरी. २ फजीतीमुळें येणारी नामुष्की. [ हुर्रे+रेवडी, वावडी इ० ]

**हुरशी**—स्त्री. उमाळा; उत्साह; उमेद; अवसान; उत्सुकता; स्फुरण; शिरशिरी; झटका. [ हुर्रे ]

**हुरहुर**—स्त्री. १ चिंता; चुटपुट; फार काळजी. २ दुःख; शोक ( चुकी, आपत्ति, नाश इ० बद्दल ). ३ पश्चात्ताप; दिलगिरी; अस्वस्थता. ( क्रि० वाटणें; लागणें ). [ हुर ] **हुरहुरणें**-अक्रि. १ दुःख; शोक, वाईट वाटणें; काळजी, अस्वस्थता वाटणें, खेद करणें. २ आसुसणें; तळमळणें.

**हुरळ**—स्त्री. भूल; भुरळ; अविचारी उत्साह. [ का. हुरि ]

**हुरळणें, हुराळ( व )णें**-अक्रि. उद्युक्त करणें; भरीस घालणें.

'माझ्या पोराला तूं हुरळूं नकोस.' -अक्रि. अविचारी उत्साहानें एखादी गोष्ट करण्यास प्रवृत्त होणें. हुरावणें पहा. म्ह० हुरळली मेंढी लागली लांडग्याच्या पाठीस.'

**हुरळा**—पु. (व.) हुरडा पहा.

**हुरळे**—पु अव. (माण.) शेतांत कापून ठेवलेल्या कणसांसकट कडब्याच्या पेंढया.

**हुरा**—पु. १ शेर: एक प्रकारचा निवडुंग. २ एक कुडयासारखं झाड.

**हुराण**—न. (कु.) मुंग्यांचें झाडावरील घर. हुरण पहा.

**हुरावणें**—अक्रि. हुरळणें पहा. म्ह० हुरावली मेंढी लागली लांडग्याचे पाठीं.

**हुराळा**—पु. हुरपळा पहा.

**हुरूप**—पु.स्त्री उत्साह; हुरशी; उमाळा. हुरूम पहा.

**हुरूम**—स्त्री. चिकाटी; निश्चय; मनाची दृढता. [ अर. हुरिम्=मन ]

**हुरूरू**—पु स्त्री. हुरेवडी पहा.

**हुरोळा लागणें**—(माण.) फळविण्याकरितां गायीचे मागें बैल लागणें.

**हुर्दे**—न. (कों.) हृदय. 'हुर्दे ज्याचें भरून आलें।' -ऐपा ४२. [सं. हृदय]

**हुर्बुड**—न. (व.) जूं जुंपण्याचें कातडी साधन.

**हुर्भुष्ट**—वि. (व.) रंगेल; बेपर्वा.

**हुऱ्याण**—पु (कों.) मुंग्यांचा थवा त्यांचें घर. हुरण पहा.

**हुर्यो, हुररे, हुर्र**—स्त्री पु फजीती; फच्ची. -उद्गा. हांकलून, फेटाळून लावताना, फजीती करतांना उच्चारावयाचा शब्द. (क्रि० करणें; लावणें). ०**करणें**-१ हुरावणें. २ हुरेवडी करणें.

**हुलक, हुली**—स्त्री. (व.) कोरडी ओकारी. (क्रि० लागणें).

**हुलकट**—स्त्री. हुलड; गडबड; बंडाळी; दंगा. [हूल+कट] **हुलकटणें**-अक्रि. दंगा, बंडाळी करणें; बंड पुकारणें, माजणें. 'गंगातीराकडे अताशीं हुलकटलें आहे.'

**हुलकावणी**—स्त्री खरें कळूं न देणें; भाषण, हालचाल इ० नें भलतीकडे रोख दाखवून फसविणें; हूल; फसवणूक. (क्रि० दाखवणें). [हूल]

**हुल(लु)कें**—न. (व.) हिंव; थंडीताप.

**हुलको, हुलूक**—स्त्री. (कु.) पिसुं (किडा).

**हुलगा-गी, हुलवळा, हुलोळा**—पु स्त्री. कुळीथ नांवाचें धान्य.

**हुलगूड**—पु.न. होला; भिलकवडें नांवाचा पक्षी.

**हुलचूतिया-चुत्या**—पु. ठोंब्या, मूर्ख माणूस.

**हुल(ल्ल)ड**—स्त्री. १ गर्दी; ओरड; गडबड; हुलकट; बंडाळी; दंगा. 'पांच सातशें माणूस कापून काढले, मग हुल्लड शांत जाहाली.' -भाब ५२. २ (सामान्यतः) हल्ला; एखाद्या व्यक्तीनें केलेला जोराचा हल्ला. ३ नेटानें कामास लागणें. ४ कामाची पाळी. [हिं. हूलड]

**हुलप**—पु. १ (गो.) जाळ. २ (राजा. कुण.) आगीचा डोंब. [होळपणें] **हुलवप**-(गो.) वरवर भाजणें.

**हुलपा-पो**—पु. (गो. राजा.) उलफा पहा; शिधा. -मसाप ४.४.

**हुलरी**—स्त्री. खेळांतील गलबला. 'ती मात होतसे भारी। माजली भली ही हुलरी।' -रामला ३८. [हूल]

**हुलसरा**—पु मुलकी खात्यांतील एक अधिकारी.

**हुलसार-स्वार**—पु. हूलस्वार पहा [का.]

**हुलहुल**—स्त्री. निकड; घाई; धादल. (क्रि० लावणें; मांडणें लागणें). [ध्व. हिं. हूलना] **हुलहुल्या**-वि. गडबडया; धांदल्या.

**हुला**—वि. वेडा; खुळा. हुलचुतिया पहा.

**हुलुक**—पु आवेश. [फा. ?]

**हुलुसवार**—वि. नाजूक; अरुवार (प्रकृति, वस्तु).

**हुल्लारा**—पु. कांदे इ० ठेवण्याचा हारा.

**हुल्या मारणें**—अक्रि. (व.) व्यर्थ मेहनत करणें.

**हु(हा)वळा**—वि. नेता; पुढारी; मार्गदर्शक.

**हुंवार**—पु. (गो.) नदीचा पूर. और पहा. [अर ?]

**हुवाला-ली**—वि. (कर.) अडाणी. **हुवालेपणा**-पु. अडाणीपणा.

**हुवेल**—स्त्री. (गो.) ओरड; बोंबाबोंब. [तुल. इं. हौल]

**हुश(श्श), हुःश हुस्स**—उद्गा. १ विश्रांतीचा, ओझें उतरल्यानंतरचा, काम संपल्यावरचा सुस्कारा. २ अतिशय उष्णता भासमान झाल्याचा, दाटीचा, मानसिक त्रासाचा उद्गार. ३ पांखरांस हाकावयाचा शब्द. [ध्व.] ०**करणें**-एखाद्यास विवक्षित स्थान, पदवीवरून दूर करणें; हुसकावणें.

**हुशार**—वि. १ बुद्धिमान; चलाख; शहाणा. २ सावध; दक्ष. ३ ताजातवाना; उत्साहयुक्त; तरतरीत (दुखण्यातून उठल्यानंतर, चांगलें खाऊंपिऊं लागल्यावर). [फा. हुश्यार्] **हुशारणें**-अक्रि. सावध, जागें होणें; शुद्धीवर येणें; ताळ्यावर यणें. **हुशारी**-स्त्री. १ चलाखी; बुद्धि; शहाणपणा. २ सावधानता; सावधपणा; सावधगिरी. ३ तकवा; तरतरी; उल्हास. [फा. हुश्यारी]

**हुशा-सी**—स्त्री. उशी; आपटलेल्या चेंडूचें वर उडणें; हापटी (क्रि० खाणें; उडणें; लागणें). [उशी]

**हुसकचें**—क्रि. (गो.) काळजी करणें. [हुसका]

**हुसकटणें**—उक्रि. १ झिडकारणें; घालवून देणें; तिरस्कारानें हाकालपट्टी करणें; हाकून लावणें. २ अस्ताव्यस्तपणें इकडेतिकडे फेकणें; उसकटणें. ३ मोडणें; फिसकटविणें. ' त्या दुष्टानें माझ्या लग्नाचें काम हुसकटलें ' -अक्रि. घाबरणें; बुजणें; भिऊन थबकणें (पशु, इ० नीं); चुथडा होणें; बिघडणें (काम, धंदा, बेत इ०). [हुस्सा]

**हुसकणें, हुसकावणें**—उक्रि. १ हांकणें; हांकलून देणें (पशु, पक्षी इ०स). २ चुकणें; हुकणें (नेम, शिस्त, निशाण, टोला) ३ बिघडविणें; नाश करणें; फिसकटविणें. ४ एकदम हिसकावून घेणें. ५ उसकटणें. [हुस !]

**हुसका**—पु. मनाला सारखा लागलेला ध्यास; चिंता; हुरहुर; उचका पहा. [हुश्श=श्वास सोडणें]

**हुसकावणी**—स्त्री. हाकलणी; धुडकावणी.

**हुसकी**—स्त्री. (आटयापाटयाचा खेळ) कांडें चिरण्याच्या वेळीं द्यावयाची टाळी. **हुसक्या**-वि. १ हिसकाविणारा; धुडकावणारा. २ विस्कटाविस्कट करणारा.

**हुसके मोकळा**—वि. निष्काळजी; (गो.) हुसक्या मेकळो.

**हुसळणें, हुसळी**—उसळणें-ळी पहा.

**हुसूक**—स्त्री. १ फुसुक (दारु इ० च्या फुसक्या बाराचा शब्द); हुस्स; फुस्स (फुसकट बार); चुकलेल्या टोल्याचा आवाज. २ (ल.) निष्फळ प्रयत्न; ओंफस. (क्रि० होणें; जाणें; करणें). [ध्व.] **हुस्कार-रा, हुसकार** पु. सुस्कारा; उसासा; फुसकारा (साप, माणूस इ० चा) (क्रि० देणें; टाकणें; सोडणें). **हुसकारणें, हुस्कारण**-अक्रि. जोरानें वारा, सुस्कारा सोडणें; उसासा टाकणें, हुश्श पहा. **हुसहुस**-स्त्री. वारा सोडण्याचा, श्वास टाकण्याचा ध्वनि; सुस्कारा. (क्रि० देणें; सोडणें). -क्रिवि. हुश्श अशा आवाजानें; सुस्कारा टाकून.

**हुसेनी**—वि. १ हुसेनाविषयीं. २ (सामा.) मुसलमानी [फा.] ०**कानडा**-पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण, वादी तारषड्ज, संवादी पंचम, वेळ मध्यरात्र. ०**ब्राह्मण**-पु. बाटून मुसलमान झालेला ब्राह्मण. **हुसैनी**-स्त्री. समुद्रांतील एक मोठा काळा मासा.

**हुस्न**—न. १ सौंदर्य; लावण्य. २ चांगलेपणा. ' यांतील हुस्न लिहिलें. ' -रा ७; खरे २.१०३. [अर. हुस्न्] '

**हुहा**—स्त्री. हाहू पहा. [ध्व.]

**हुंहूं**—उद्गा. दुःखाचा उद्गार. [ध्व.]

**हुळका**—वि. (बे.) तोंडावर देवीचे वण असलेला. [का. हुळकु]

**हुळवाजणें**—अक्रि. १ माघार घेणें; अंग-पाय काढून घेणें. २ उनाडणें; भटक्या मारणें.

**हुळहुळ-चुळ**—स्त्री. १ गुदगुली; हुळहुळण्यासारखी खाज; कंड; शिरिरि (अवयवावरून केंस, माशी इ० फिरल्यानें होणारी). २ परद्रव्याच्या किंचित स्पर्शानें नाजुक किंवा दुखऱ्या अवयवास वरील अवस्था होणें. [स्पर्शध्वनि] **हुळहुळणें**-अक्रि. १ वरील अवस्था, गुदगुल्या होणें; केस, मुंगी इ० अंगावर फिरल्यानें असा परिणाम होणें; तसें होण्यास वरील वस्तू अंगावरून फिरणें. २ (ल.) अधीर, उत्कंठित होणें; खाजणें-(हात, पाय, जीभ इ० मारण्यास, बोलण्यास). ०**पुळपुळ-चुळचुळ**-स्त्री. अतिशय घाई; गडबड; चुळबुळ. **हुळहुळा**-वि. १ नाजूक; कोमल; परकीय वस्तु जवळ आली असता अंगावर शहारे उभे राहणाऱ्या प्रकृतीचा (मनुष्य, कातडी, अवयव). २ तशा प्रकारची झालेली (प्रकृति, कातडी). ३ स्पर्श सहन न होणारा; प्रक्षुब्ध. ४ बिन विचारानें एखादी गोष्ट करण्यास प्रवृत्त होणारा. **हुळहुळाट**-पु. अतिशय हुळहुळ. **हुळहुळी**-स्त्री. (गो) पिसू. **हुळहुळी मुंगळी-मुंगी**-स्त्री. धावरी मुंगी; जलद चालणारी काळी मुंगी.

**हुळहुळा, हुळा**—पु. भाजलेल्या हरभऱ्याचे घाटे; भाजलेला ओला हरभरा. [सं. होलक; हिं.]

**हुळहुळी**—स्त्री. (गो.) आंबटी करण्याचें एक प्रकारचें भांडें. [का. हुळी=आमटी]

**हुळूम**—पु. वांगी, मिरची इ० च्या मुळास लागणारी कीड.

**हूं**—उद्गा. १ प्रवृत्त करणें, परवानगी देणें, निकड लावणें, उत्तेजन देणें, संमती देणें, कबूल करणें इ० साठीं उपयोगांत आणावयाचा उद्गार; हं ! हां ! ! २ दुखापत झाली असतां काढलेला दुःखोद्गार; हाय ! चूं ! कूं ! उस ! (क्रि० म्हणणें; करणें). [ध्व.] **म्ह**० (गो.) हूं म्हळयार तपलें घास तूं=अनुमोदन दिलें तर तुम्हींच काम करा.

**हूक**—स्त्री. १ कमर, पाठ इ० त एकाएकीं निघालेली उसण; चमक. (क्रि० भरणें; निघणें). २ कोल्ह्याचें ओरडणें; कोल्हेकुई. ३ अफवा; उडत बातमी. (क्रि० उठणें; पडणें; निघणें;

पसरणें). ४ सूर्यकिरण; पहाटचें तांबडें; तांबूस प्रकाश; पहाट. (क्रि० फुटणें). 'सूर्याची हूक देखिली।' –कालिका ६.९. [हिं.]

**हूक**—पु. टांगण्याचा आंकडा. –विवि ८.३.४८. [इं.]

**हूड**—स्त्री. लीला –वि. १ तापट; अविचारी. २ अडदांड; धाडशी. ३ खोडकर; अचपळ. [हू!]

**हूंतूं**—न. वांकडेपणा. -शर.? [मी, तूं]

**हून**—अ. १ पासून. 'तो पुण्याहून आला.' २ पेक्षां. 'रामा गोविंदाहून मोठा आहे.' ३ (क्रियाविशेषणें, शब्दयोगी अव्यय यांना जोडून) बाजूनें; दिशेनें. उदा० इकडून, तिकडून, जवळून, आंतून, बाहेरून, खालून.

**हूप**—न. वानराचा भुभुःकार, ओरड. –क्रिवि. वानराच्या ओरडण्याप्रमाणें. [ध्व.]

**हूप**—स्त्री. १ धैर्य. २ उत्सुकता.

**हूल**—पु. (जंबिया) सिर मारल्यानंतर; जोडीदाराच्या डावीकड बेंबीपासुन बरगडीच्या शिंपीपर्यंत केलेला वार.

**हूल**—स्त्री. १ हुलकावणी पहा. (क्रि० दाखविणें). २ लोकांची आरडाओरड; दंगा. ३ सोंगट्याचे खेळांतील एक संज्ञा. ४ खूण; चिन्ह. ५ आवई; भयदायक बातमी; गप्प. ६ बतावणी. [हिं.] **०चाल**–स्त्री. हूल अर्थ २ पहा. **०स्वार**–पु. (शत्रु चालून येत आहे अशी हूल करतात यावरून) आघाडीचे स्वार.

**हूळ**—स्त्री. १ घाबरण्यासारखी घाई करणें. २ भयकारक, आरडाओरड, गडबड, दंगा (क्रि० करणें; लावणें; मांडणें). ३ गाढवावरून ताशे इ० वाजवीत काढलेली धिंड मिरवणूक. (क्रि० काढणें; मिरविणें; भोंवडणें; वाजविणें; निघणें; वाजणें; जाणें; चालणें). हुळवाजणें पहा. [धिंडका]

**हृत्**—वि. घेऊन जाणारा; हरून नेणारा; समासांत उपयोग. उदा० 'दुःख-पाप-प्राण-हृत्.' [सं. हृ]

**हृत्-द्**—न. १ हृदय; मन; अंतःकरण. २ काळीज; छाती. [सं.] **०कंप**–पु. छातीचें, काळजाचें धडधडणें. **०कमल–०पिंड**–पु. हृदय. **०कोश**–पु १ हृदयावरचें आवरण. २ हृदय व त्याचें आवरण, एकत्रपणें. **०ताप-संताप**–पु हृदयाचें दुखणें; दुःख, त्रास, पश्चात्ताप इ० ची मनास लागलेली टोंचणी. **हृदाकाश**–पु. हृदय; अंतःकरण. 'हृदाकाशीं मीपण स्फुरे जिवाशीं।' **हृदावर्त, हृदावळ-ळो**–हरदावळ-ळी पहा. **हृदिस्पृश**–वि. हृदयांतलें; आवडतें; प्रिय. **हृद्गत**–न. १ मनांतील हतु, अर्थ, अभिप्राय. –वि. १ मनांत, अंतःकरणांत असलेलें, ठसलेलें. २ आवडतें; प्रिय. ३ अंतःकरणावर खोदलें गेलेलें. **हृद्य** -वि. १ मना संबंधीं. २ हृदयंगम; सुंदर. ३ मनापासूनचें; खरें; कळकळीचें. ४ प्रिय; आवडतें. **हृद्रोग**–पु. १ छातीचा रोग. २ (ल.) अत्यंत काळजी; दुःख; चिंता. **हृद्वर्ती**–वि. छातींतील (दुःख, रोग, शूल) **हृद्विकार**–पु १ छातीचा बिघाड; छातीचा रोग. २ अंतःकरणाची कोणतीहि भावना, विकार, वासना. **हृद्विकास**–पु. अंतःकरण मोठें, उदार, कृपाशील, आनंदित असणें. **हृद्विलास**–पु. अंतःकरणाचा आनंद. **हृत्संताप**–पु. मनाचें अस्वास्थ्य; राग; खेद; औदासिन्य इ०. **हृन्मंदिर**–न. हृदयमंदिर.

**हृत**—वि. हरण केलेलें; नेलेलें. [सं.] **०सर्वस्व**–वि. ज्याचें सर्वस्व हरण करून नेलें आहे असा.

**हृद**—पु. पाण्याचा डोह. (प्र.) ऱ्हद पहा. 'काळा धाटी सुये जे हृद गहाणा।' –गस्तो.

**हृदय**—न. १ हृत्-द् पहा. २ वक्षःस्थल; छाती. ३ (ल.) मनांतील हेतु; आशय. ४ उद्देश; खोंच; मर्म (भाषण, वाक्य इ०तील). [सं.] **०भरून येणें, दाटणें**–गहिंवरणें. 'तों हृदय भरोनी येतें.' –संग्रामगीतें २४. **०फुटणें**–अतिशय दुःख होणें. **०कमल**–हृत्कमल पहा. **०देश**–पु. वक्षःस्थल; छाती. 'सभय हृदयदेशा अंचलें नित्य झांकी।' –सारुह २.५२. **०मंदिर**–न. हृदय; अंतःकरण; वक्षःस्थल. **हृदयंगम**–वि. चित्ताकर्षक; मोहक; हृद्य; आवडता; सुंदर; मनोहर. **हृदयवान्-हृदयालु-हृदयी**–वि. सकरुण; दयाशील; कोमल अंतःकरणाचा. **०विश्राम**–पु. (मनाचें विश्रांति स्थान) परमेश्वर. **०शून्य**–वि. १ निर्दय; निष्करुण; क्रूर. २ बुद्धि, मनाची शक्ति कमी असलेला. ३ उदासीन; नष्टचित्त; विमनस्क. **०स्थ**–वि. अंतर्यामी असणारा. **हृदयाराम**–वि. अंतःकरणास शांति, आराम देणारा; हृदयविश्राम; देवाचें अभिधान. 'निजजन हृदयारामा।' **हृदयीं–आलिंगणें**–हृदयाशीं धरणें; मिठी मारणें.

**हृषित हृष्ट**—वि. आनंदित झालेला; सुखी; हर्षित. [सं.] **हृष्टपुष्ट**–वि. सुखी; समाधानी; खाऊनपिऊन बरा. **हृष्टहृदय**–वि. आनंदित अंतःकरणाचा.

**हे**—उद्गा. सन्मानार्थी हांक मारण्याचें, संबोधनाचें अव्यय. अहो! अरे!. 'हे! राजा! तुझें कल्याण असो.' [ध्व. सं.]

**हे**—सना. १ हा चें अनेकवचन. २ (काव्य) ही (स्त्रीलिंगी). जसें ते=ती, जे=जी. [हा]

**हेकणें**—अक्रि. खोकणें (गुरांचें). [ध्व. सं. हेक्का]

**हे(हें)का, हेंकाहेंको**—पुस्त्री. आपलेंच म्हणणे धरून बसणें; हट्ट; आग्रह; छंद; नाद; दुराग्रह (क्रि० धरणें; घेणें; करणें; चालविणें). [हेंकार-हेंच असें करणें] **(आपला) हेका करणें**–आपलाच हट्ट चालविणें. **हे(हें)कट(ड), हेंक(ग)टी, हेकडवाईक-हेकड(ल)खोर, हेकाड, हेकेखोर, हेकेवाईक, हेकेबाज(करी)-हेकाखोर(वाईक)**-वि.

आपल्याच हेक्यानें चालणारा; हट्टी; दुराग्रही; एककल्ली; छांदिष्ट. 'इंग्रजांचे खरे दोष प्रगट केले असतां आमच्या रेवरेंड बंधूस व इतर हेकडखोर लोकांस न आवडोत.' -नि २०९. म्ह० हेकड कुणबी सातदां राबी. **हेकरी**-स्त्री. हेका; हट्ट. 'स्वधर्म भूमीपति हा न सोडी। तो आपली हेकरि हो न मोडी।'-सारुह ८.३५

**हेकणा-ना**—वि. (व.) काणा; एका डोळयानें आंधळा.

**हेकस, हेकोडा, हेकडा**—वि. (व. खा.) तिरपा; वांकडा; वांकडातिकडा.

**हेक्का**—स्त्री. उचकी. हिक्का पहा [सं. हिक्का]

**हेंगड-डा, हेंगडतिफड, हेंगाड-डा**—वि. १ ओबडधोबड; चमत्कारिक; वेडेविद्रे; कर्णकटु (भाषण, कामधंदा, बोली). २ राकट; कठोर; विद्रुप; विशोभित; रानटी; राक्षसी (रीत, वहिवाट, वर्तणूक, स्वरूप, अंग). ३ मूर्ख; रानवट; अडाणी (माणूस). ४ हट्टी; दुराग्रही. [का. हेंगसु=स्त्री] म्ह० हेंगाडा कुणबी दुणा राबे धन्याला खर्च फार लागे. **हेंगडतट्टू**-पु. हेंगाड-डा माणूस. **हेंगड(डु)मेंगड(डु), हेंगडा मेंगडा**-स्त्रीन. १ किरकोळ; क्षुल्लक माल, वस्तु. २ बडबड; गप्पा. -वि. १ हलका; क्षुद्र; घाणेरडा; मळकट; क्षुल्लक. (वस्तु, प्राणी, दागिना). २ अडाणी; रानटी; खेडवळ; राकट; ओबडधोबड. ३ विसंगत; असंबद्ध (भाषण). -क्रिवि. विसंगतपणें.

**हेंग(गा)डमत**—न. १ अडाणी मत; बुद्धि. २ हट्टीपणा, मंदपणा. ३ हेंगाड. **हेंगडाविणें**-उक्रि. १ बावळट, हेंगाडा, हट्टी इ० ठरविणें; नांवें ठेवणें (भाषण, कृति, व्यवहार इ०स). २ अवहेलना, विटंबना, कुचेष्टा, कुचाळी करणें. **हेंगाड दासी**-स्त्री. हट्टी, हेकाड स्त्री. म्ह० हेंगाड दासी दादला (ल्या) नाशी.

**हेंगडी प्रधान**—पु. १ मल्लारी (खंडोबा) चा प्रधान. २ (ल) ढिला, अजागळ, रेंग्या माणूस.

**हेंगल**—स्त्री. अडचण, सबब, अडथळा, तक्रार उपस्थित करणें (क्रि० घालणें, घेणें, लावणें). ०खोर, **हेंगली(ल्या)**-वि. हुज्जती; तक्रारी. [का. हेंगे=कसें?]

**हेंगसा**—वि. (कर.) बुळा; गांडया; नपुंसक. 'हेंगशा माणसाला तुमचें म्हणणें पटावें कसें?' [का. हेंगसु=स्त्री]

**हेंगाडेंगी**—स्त्री. तिटकाऱ्यानें झिडकारणें; तिरस्कार; झाडणी. (क्रि० करणें). -वि. (व.) निष्काळजी.

**हेंगाळणें**—उक्रि. धिक्कारणें; झिडकारणें; तिरस्कार करणें. **हेंगाळणी**-स्त्री. तिरस्कार; झाडणी.

**हेंगे**—क्रिवि. इकडे. हंगे पहा.

**हेजीब**—पु. १ जिल्हा अधिकाऱ्याचा मदतनीस; मदत कारकून. २ चाकर; नोकर. ३ वकील. ४ दूत. 'बोले नैषधेंद्रवाचा। नाम हेजीब इंद्राचा।' -नल. [अर. हाजिब्] **हेजिबत, हेजिबी**-स्त्री. १ वकिली; शिष्टाई. -मदरु १.२०. २ दूताचें काम, धंदा, वृत्ति.

शको. ७.४५

**हेट**—स्त्री. (नाविक) दक्षिणदिशा; ठम (हेटकरी). -वि. खालचा दक्षिणेकडील; तळकोंकणचा. -क्रिवि. १ खालीं; खालच्या प्रांतांत, प्रदेशीं, भागीं. २ किनाऱ्याच्या दक्षिणेस; दक्षिण दिशेकडे; विशेषतः कोंकणांतील सावित्री नदीच्या दक्षिणेकडे. 'यंदा हेटप्रांत चांगला पिकला.' [सं. अधस्थ; देप्रा. हेट्ठ; गु. हेठ] ०करी-पु १ दक्षिणेकडील (हेटप्रांतांतील) रहिवासी. २ तिकडील बरकंदाज, शिपायी. ०चा वारा-पु. दक्षिणेकडील वारा. ०बाहेरचा वारा-पु नैर्ऋत्येकडील वारा. **हेटणें**-अक्रि. (कु.) तुफानी वारा सुटणें.

**हेटकी**—वि. (व) पायांत पाय घालून चालणारी (गाय, व्यक्ति). [सं. हेठ] **हेटुक लावणें**-क्रि. (माण.) वांकडें लावणें; तेढें बोलणें.

**हेटा-टी**—पुस्त्री. (व. ना.) १ हातगा. २ शेवगा (झाड).

**हेटा, हेटाशेटा**—वि. हलका; क्षुद्र; दुर्लौकिकाचा (माणूस, व्यवहार इ०).

**हेटाळणी, हेटाळी, हेटाळकी, हेटाळा**—स्त्रीपु. अवहेलना; टवाळी; तिरस्कारानें वागविणें. [सं. हेडन] **हेटाळणें**-उक्रि. अवहेलना करणें; धिक्कारणें; झाडसणें; निंदा करणें.

**हेटी**—स्त्री. गौळीवाडा; गायरान. 'ढोरें हेटीवर गेलीं।'

**हेटी-डी**—स्त्री. (व.) रानांतील वस्ती, तळ. 'लमाणांची हेटी रस्त्यांत लागते.' [का. हट्टी]

**हेटीमेटी**—स्त्री. १ हेटाळणी; पाणउतारा; अवहेलना; तिरस्कार. २ निष्काळजीपणा; बेफिकिरी; अगत्य नसणें (क्रि० करणें). -क्रिवि. निष्काळजीपणें; बेफिकीरपणानें. [हट+मठ] म्ह० दिवस गेला हेटाहेटी (हेटीमेटीनें किंवा हातींमेटीं, रेटारेटीं) चांदण्याखालीं (दिवा लावून) कापूस वटी. **हेटीमेटी खालीं(वारी)नेणें-घालविणें**-हलगरजीपणानें दूर लोटणें, सारणें.

**हेड**—स्त्री. विक्रीसाठीं नेलेलें गुरांचें खिल्लार, दावण, कळप. -तुगा २०५०. [सं. हेडावुक?] **हेडया**-वि १ खिल्लारी, हेडीचा व्यापार करणारा. २ पुरा माहितगार; धूर्त; पुष्कळ ओळखी असणारा. **हेडचें**-अक्रि. (गो.) खिल्लार घेऊन फिरणें.

**हेंड**—न. १ झोंबटपणा; झोंबी. २ मैथुन. 'श्वानाचें हेंड तत्काळ सुटे। मनुष्याचें आकल्प न सुटे।' -एभा १३.२११. ०गूळ, **हेंडूक हेंडूकमेंडूक**-न. कुत्र्याचें गुप्त इंद्रिय; कुत्र्याचें मैथुन. (क्रि० गुंतणें; लागणें).

**हेंडगा**—पु. १ डोईवरील भातण, नाचणकांड साव्याण, सरमाड, काड, विपाड इ० चा भारा, बोजा. २ वरील प्रकारची पांजरणाच्या कोपऱ्यास लाविलेली पेंडी. ( क्रि० बांधणें ).

**हेडणें**—क्रि. ( नाविक ) तुफान होणें. हेटणें पहा.

**हेडंबा-बी**—स्त्री १ भीमाची एक राक्षसजातीची स्त्री. २ (ल.) धिप्पाड व विद्रूप स्त्री. ३ ओंगळ, किळसवाणी स्त्री. [ सं. हिडिंबा ]

**हेडमास्तर**—पु शाळेवरचे मुख्य शिक्षक. [ इं. ]

**हेडली**—स्त्री. ( कों ) एक पिशाच; विधवा स्त्रीचें भूत.

**हेंडवा**—पु ( व. ) गोणी; पोतें.

**हेड( डी )स, हेड( डी )स फेड( डी )स**—स्त्री. धिक्कार; अपमान; हेटाळणी, विटंबना (क्रि०करणें; बोलणें; मांडणें; लावणें). -वि. हिडीस पहा. ओंगळ. -क्रिवि. झिडकारून; फेटाळून; हेटाळून ( क्रि० करणें ). [ सं हिड्=तिरस्कार करणें ] **हेडसा-विणें, हेडा( ड )वि( व )णें**-उक्रि. हेटाळणें पहा; हिडसणें पहा. 'काय लागे त्यासी बळ हेडावितां कोण काळ।' -तुगा १२५९.

**हेडसरी**—स्त्री. एक वृक्ष.

**हेडा**—पु. ( नाविक ) मासे मारण्याचें एक आयुध.

**हेडा**—पु. ( कों. ) खाजणांत उगवणारें व गुरांना मानव-णारें गवत. [हेड?]

**हेंडा**—पु. ( बे. ) मोठें ढेकूळ. [ का. ]

**हेंडाळणी, हेंडाळी, हेंडाळणें**—शेंटाळणी इ० पहा.

**हेंडाळू**—पु. गोराडू पहा.

**हेडू**—पु. हेद, हेदू पहा. ( कों. ) एक इमारती मऊ लाकडाचें झाड.

**हेंडे होळकर**—पुअव. १ होळीचे होळकर; होळीचे दिवशीं धुडघुस घालणारे, खेळणारे. २ ( ल. ) दंगेखोर; बंडखोर.

**हेण्याचा**—पु. ( कों ) एक समुद्रांतील मासा.

**हेत**—पु. हेतु पहा. 'आपल्या डोळयादेखत मुलाचें लग्न व्हावें एवढा मात्र हेत राहिला आहे.' 'जपतो पुरवावया तुझा हेत।' -मोकर्ण ५.८. **०प्रीत**-स्त्री. १ मनांतला उद्देश, इच्छा. २ कृपालोभ; प्रेम; मैत्री.

**हेतु**—पु. १ इच्छा; वासना; वांच्छा. २ कारण; उद्देश; आधार; प्रसंगकारण; निमित्तकारण. ३ बेत; उद्देश. [ सं. हेतु ] **०गर्भ**-वि. हेतु गर्भित असतो असा; अंतर्भूत कारण, अर्थ असलेलें ( भाषण, शब्द, कर्म इ० ); सहेतुक. **०मंत**-वि. सकारण बोलणारा. **०मान्**-वि. हेतु, प्रेरणा असलेलें ( कार्य ). **हेतुक**-वि. हेतु असलेला; कामनिक. **हेतुकपण**-न. अभिलाष; इच्छा. **हेतू**-स्त्री. ( ना. ) आठवण; स्मरण. **हेत्वाभास**-पु. १ भ्रामक हेतु; दाखविलेलें चुकीचें कारण, हेतु. २ ( न्याय. ) व्यभिचार, विरुद्धता, असिद्धि, बाध व सत्प्रतिपक्षता या पांच दोषांनीं युक्त असलेलें विधान.

**हेती**—स्त्री. तरवार; शस्त्र. [ सं. ]

**हेद-दू-द्रू**—पुस्त्री. कोंकणांतील एक मोठें, मोठ्या आणि वाटोळ्या पानांचें, इमारती लाकडाचें झाड. या लाकडावर लाखी रंग सुबक बसतो. **हद्दी**-वि. हेदाच्या लाकडाचे.

**हेद-त**—पु. एक समुद्रमासा.

**हेंदकाळणें, हेंदोलणें, हेंदोवणें**—उक्रि. हलणें; डुचमळणें; हेलकावणें ( भांड्यांतील द्रव पदार्थ, समुद्रांत तारूं इ० ). 'तारूं सागरिंचें अवचितें। हेंदोवलें आलें येथें।' -तुगा ४१०६. [ सं. हिंदोलन ]

**हेंदर, हेंदररेंवड**—स्त्रीन. घाण; केरकचरा; विष्टा; घाणीची रास; उकिरडा. **हेंदरा( डा ), हेंद्रा**-वि. १ घाणेरडा; गचाळ; ओंगळ; अमंगळ. २ मूर्ख; अडाणी; वेडगळ. **हेंदोडा**-वि (व.) हेंदरा पहा.

**हेदर**—पु. ( दगडी बांधकाम ) बंद; भिंतींत अंतराअंतरावर बसविलेला लांब गळजोडीचा दगड. यानें बांधकाम आवळून एकजीव होतें. [ इं. हेडर ]

**हेदाडा**—पु. ( ना. ) दटावणी; रागें भरणें; दरडावणी; धसाडा.

**हेदावणें**—अक्रि. ( व. ) थकून जाणें; शिणणें. 'चालण्यानें जीव हेदावून गेला.'

**हेपणें, हप( पा )लणें**—उक्रि. संभोगक्रिया करणें; झवणें. **हेपतवल्ला**-वि. १ ( ना. ) स्त्रीसंगासाठीं उत्सुक झालेला. २(ल.) तारतम्य नसणारा; अर्धवट. **हेपल्या मारणें**-हेपलणें. **हेपल्लाट्या**-वि. ( व ). गचाळ. **हेपसलिंगा( लुंगा ), हेपुसलुंगा**-वि. १ नपुंसक; गांडया. २ दुर्बळ; क्षुद्र. ३ गरीब; कमकुवत. [ हेपलणें+लिंग ]

**हेपल( ळ )णें**—सक्रि. ( व. ना. ) खाणें; पुरखा झोडणें; गट्ट करणें.

**हेबडगुबड**—न. कपट; काळेंबेरें. 'मनांत कांहीं हेबडगुबड आलें.' -वि. ( व. ) वांकडातिकडा, ओबडधोबड.

**हेंबाड भुतऱ्या**—वि. ( व. ) मूर्ख; वेडगळ. [ हेंगाड+भूत ? ]

**हेबा(ब)ळ(ल)णी, हेंबाळणी**—स्त्री. ओढाताण; चोळटा-चोळट; धसकाफसक; धसमुसळेपणानें घेणें, :वापरणें, हालविणें; हिसकाहिसकी. **हे( हें )बा(ब)ळणें, हेबालणें, हेबलणें**-उक्रि. १ दाडगेपणानें हाताळणें; धसकफसक करणें; ओढाताण करणें. २ रटणें; धक्का मारणें, चेंगरणें. -अक्रि. उसळणें; उचंबळणें; हेलकावे खाणें ( नदीचें पाणी, लाटांत सांपडलली नाव इ० ).

**हेबे तेबे, हेबेतेबे**—पुअव. (व.) दगदग; फुकट खेप, येरझार याचा त्रास. –क्रिवि. नाहक; विनाकारण.

**हेम**—न. सोनें. [सं.] ०**कट**–वि. सोनेरी. 'दंत शुभ्र सदट। रत्नजडित हेमकट।' –दा १.२.१५. ०**कल्याण**–पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. आरोहांत धैवत वर्ज्य; जाती षाडव–संपूर्ण; वादी षड्ज; संवादी पंचम; समय रात्रीचा पहिला प्रहर. ०**कूट**–पु. हिमालयाचे उत्तरेचा, गंधर्ववस्तीचा एक पर्वत; सप्तपर्वतांतील एक. ०**गर्भ**–पु. सोनें घालून केलेली एक औषधी मात्रा. ०**दग्ध**–पु. (महानु) सोनार. 'हेमदग्धा हाटी। सुवर्णा आटाआटी।' ०**धर**–पु. मेरु पर्वत. **हैम**–वि. सोन्याचें.

**हेमटा**—वि. हिमटा पहा.

**हेमटी**—स्त्री. ढुशी; थडक; हुंडका पहा. (क्रि० मारणें; देणें).

**हेमंत, हेमंत ऋतु**—पुन. मार्गशीर्ष व पौष हे दोन महिने मिळून होणारा ऋतु; यावेळीं सूर्य वृश्चिक व धन या दोन राशींस असतो. [सं.]

**हेमाडपंती**—वि. हेमाडपंतानें प्रचारांत आणलेली (देवळांची बांधणी, लिपी इ०).

**हेय**—वि. त्याज्य; टाकून देण्यास योग्य. [सं.]

**हेर**—वि. येर; इतर; क्षुल्लक; कुचकामाचें; क्षुद्र. 'नृपा तुला उत्तम कारि जाली। दैवें निघाली परि हेरि जाली।' –सारुह ३.१०. [येर]

**हेर**—पु. १ गुप्त दूत. २ बातमीदार. –स्त्री. टेहळणी; गुप्त पहाणी. [सं. हेरक; देप्रा. हेर; हिं. हेर, हेरना] **हेरणी, हेराहेरी**–स्त्री. टेहळणी. **हेरणें**–उक्रि. १ टेहळणें; बारीक, गुप्तपणें चौकशी करणें; सूक्ष्म दृष्टीनें पहाणें; न्याहाळणें. २ स्पष्ट दिसणें; सांपडणें. ३ तर्क करणें; ध्यानांत येणें; समजणें. **हेऱ्या**–वि. गुप्त बातमी काढणारा; टेहेळ्या; न्याहाळणारा. **हेरफेर, हेरी(र)फेरी, हेरीहेरी**–स्त्री. हिंडता हिंडता टेहळणी, पहाणी करणें. 'रानांतून हेरफेर कर.' **हेरी, हेराफेरी**–स्त्री. प्रवास; फिरती; येरझार.

**हेरफेर**—पु. १ थोडासा बदल; फरक; फेरबदल (परस्पर दोन वस्तूंत). २ विसंगति; तफावत; अंतर (हिशेब, जमाखर्च इ० मध्यें). ३ बदली (पहारेकऱ्यांची); आवजाव (सैन्यांची); येरझार. [हेर=क्षुल्लक+फेर. किंवा फेर द्वि.] **हेरून फेरून**–क्रिवि. फेरफार करून; उलथेंपालथें करून; इकडेतिकडे; पुन्हा पुन्हां; वारंवार.

**हेरंब**—पु. गणेश देवता.

**हेरवां-वीं**—एरवां-वीं पहा.

**हेरसूं, हेरसून**—क्रिवि. (राजा. कु.) व्यर्थ; उगाच; निष्फळपणें.

**हेरूच**—वि. (कु.) इतर; दुसराच.

**हेरें-ऱ्यें**—न. (नाविक) गलबताचें शीड बदलणें. (क्रि० घेणें). ०**बोऱ्यें**–न. वाऱ्याच्याविरुद्ध दिशेनें गलबत हांकारणें. 'कोणीकडला तरी वाव असावा म्हणजे हेऱ्येबोऱ्ये करून गलबत नेतां येईल.'

**हेल**—पु.स्त्री. १ नवीन मूल जन्मेल त्या घरीं पाणी, दूध दहा दिवस पुरविणें (कुणबिणी किंवा इतर स्त्रिया थोरांच्या घरीं या प्रकारें करतात). (क्रि० घालणें). 'हेल घालिती अठरा पगड जातीच्या नारी।' –गापो ५.३५. २ असलें पाणी, दूध इ० पदार्थ. ३ याच कारणासाठीं अशा थोरा–मोठ्यांच्या घरापुढें कांहीं दिवस पाण्याचा सडा टाकणें.

**हेल**—पु. बोलणें, गाणें, रडणें इ० तील लांबट काढलेला सुर. (क्रि० काढणें; निघणें). –स्त्री. आट्यापाट्यांतील डावाचे शेवटाची एक संज्ञा. [ध्व.]

**हेल**—न. (बांदा) पाण्याचें मडकें.

**हेल**—पु.स्त्री. १ ओझें वाहण्याचा धंदा (क्रि० वाहाणें). २ असलें वाहावयाचें ओझें. गवत इ० ची ओझ्याची गाडी; ढीग. ३ तें वाहण्याची मजुरी; भाडें. ०**करी**–पु. ओझें वाहणारा; मजूर; हमाल. ०**करीण**–स्त्री. १ ओझें वाहणारी. २ (व.) मालकाच्या शेतांत काम करणाऱ्या नोकराची बायको. ०**पाटी**–स्त्री. १ ओझें वाहाण्याचा लहान हारा. २ हेलकऱ्याचें काम; हातमजुरीचा धंदा; मोलमजुरी. [हेल+पाटी] ०**पायकी**–स्त्री. (कु.) निष्कारण हेलपाटा, हेलपटनिशी पहा. [हेल+पायकी]

**हेलकावा**—पु. १ आंदोलन; झोंका; लाट; मागें पुढें होण्याची क्रिया (समुद्राच्या पाण्याची, झाडाची फांदी इ० ची). २ माणूस जहाज इ० चें हालणें; झुलणें; झोका खाणें (लाटा, वारा इ० नीं). (क्रि० बसणें; खाणें). ३ हिसका; धक्का; झोका (क्रि० देणें). ४ (ल.) (अजेदार इ० चा) फुकट हेलपाटा; वृथा येरझार. (क्रि० देणें). [सं. हेला=क्रीडा, खेळ] **हेलकावणें**–अक्रि. १ आंदोळणें; हेंदकाळणें; डोलणें (लाट इ० नें). २ लाटांच्या माऱ्यानें तारूं इ० नें खालींवर उशा खाणें; लाटा खाणें; झोंके खाणें. ३ इकडून तिकडे झुलणें (पाळणा इ० नें). ४ आचके बसणें; हिसका खाणें; मागेंपुढें होणें; हबका सोसणें (घोडेस्वार, उंटस्वार यांनीं–चालतांना). ५ (सामान्यतः) झोंके खाणें. **हेलकाविणें**–सक्रि. १ हलविणें; झोंके देणें; डोलविणें; हेलकावा देणें. २ ओढाताण करणें; पुढेंमागें करणें. ३ हेलपाटा; उगीच दवडणें. ४ धुडकाविणें; तिरस्कारानें हांकलून लाविणें; घालविणें.

**हेलकी**—स्त्री. भटकी; उनाड स्त्री; गप्पिष्ट बाई.

**हेलगठ**—पु. (तिरस्कारार्थी) हल्या; रेडा; हेला. [सं. हेला]

**हेलगड**—स्त्री. 'हिलगड' पहा.

**हेलगा**—पु. रेडा; हेला.

**हेलना**—स्त्री. अवहेलना; अपमान; हेटाळणी; अनादर; तिरस्कार. [सं.]

**हेलप(पा)टणें**—उक्रि. १ व्यर्थ येरझार करावयास लावणें; निष्कारण खेप करविणें; क्षुल्लक निरोपासाठीं हेलपाटा घालावयास लाग(व)णें. २ बिघडविणें; फिसकटविणें; निरुपयोगी करणें (उपाय, मसलत, श्रम इ०). —अक्रि. १ (कों.) वाऱ्यानें उमळून पडणें; नाश पावणें (झाड, झोपडें). २ नासधूस होणें; चुराडा होणें. [सं. हेला=फेरा] **हेलप(पा)टणी**-स्त्री. निरोपाचा व्यर्थ हेलपाटा; फेरा. **हेलप(पा)टनिशी**-स्त्री. निष्कारण हेलपाटे खाण्याचा प्रकार; वरचेवर व्यर्थ खेपा करणें. [हेलपटा+फा. नविशी] **हेलप(पा)टा**-पु. १ फुकट खेप; येरझार; त्रासदायक फेरा, चाल. (क्रि० पडणें; बसणें; देणें; करणें). २ रस्त्याचें लांबचें वळण; गैर माहितीनें या वळणानें जाणें; त्यामुळें झालेले श्रम; फिरकांडा (क्रि० बसणें; खाणें; होणें).

**हेलमी**—पु. (नाविक) तुफान; तुफानी वारा व पाऊस.

**हेल(ळ)सांड-सांडणी**—स्त्री. १ अनादर; हेलना पहा. २ दुर्लक्ष; निष्काळजीपणा. [सं. हेला+सांडणें] **हेळसांडणें**-उक्रि. १ तिरस्कारणें; क्षुद्र लेखणें; अवहेलना करणें. २ हलगर्जीपणा करणें; कानाडोळा, दुर्लक्ष्य करणें.

**हेला-ळा**—पु क्षण. 'ऐसें येकि हेळा बोलिला।'-ज्ञा २.८३. -क्रिवि. क्षणांत; सत्वर; सहज; अनायासें. ०**भर**-क्रिवि. (महानु.) थोडावेळ. 'मा हेलाभरा पानीया जाईन.' -ऋष १५. ०**मात्रें**-क्रिवि. लीलेनें; सहजासहजीं. 'दर्शनहेळामात्रें तया होय मुक्ति।' -आरती विठ्ठलाची. [देप्रा. हेला=वेग]

**हेला**—स्त्री १ खेळ; क्रीडा. २ धिक्कारणी; फेटाळणी; अनादर; अपमान; हेटाळणी.

**हेला**—पु. रेडा. [सं.] **म्ह०** १ हेल्याच्या कानीं किंगरी वाजविली तरी तो आपली द्रोंय सोडींत नाहीं=मूर्ख सदुपदेशानें सुधारत नाहीं. २ जन्मा आला हेला पाणी वाहतां मेला=खायला काळ भुईला भार असा वृथा माणूस.

**हेलावणें, हेलावा, हेलाविणें**—हेलकावणें इ० पहा. 'हेलावला नळ पयोधि दयारसाचा.' -नल ५५

**हेलि(ळी, ळु)**—पु. सूर्य. 'किं हेलि उगवतां निशेष। दोषा सरे प्रगटे प्रकाश।' [सं.]

**हेलेसें**—न. वल्हें (क्रि० मारणें). 'आम्ही त्या कोळ्यांबरोबर हेलेसीं मारूं लागलों.' -किर्लोस्कर-आगस्ट १९३७.

**हेवड**—पु. गुंताडा. 'ढिलेपणें हेवड आलें।' -दा १५.१.५. ०**देवड**-स्त्री. १ इरजीक पहा. २ आदलाबदल.

**हेवड**—वि. (व.) हेकड.

**हेवा, हेवादेवा**—पु. १ मत्सर; द्वेष; शत्रुभाव. २ स्पर्धा. [का. हेव] **म्ह०** १ शेजी गेली देवा हा मला सुटला हेवा. २ हेवादेवा नकटी गेली चांगदेवा. **हेवाखोर, हेवेखोर**-वि. द्वेषी; मत्सरी.

**हेवा**—पु. १ लोभ; हव्यास. 'धनधान्य हेवा। नाड कुटुंबाची सेवा।' -तुगा ३२२. २ हाव; सोस. 'बायकोला दागिन्याचा हेवा असा कीं, आंग दुखलें तरी सोडीत नाहीं.' ३ इच्छा; मनीषा. 'तुजवांचून आमुचा हेवा। कोण माधवा पुरवील।' [अर. हवा=इच्छा]

**हेवाळ**—पु. (गो. कु.) विरोळा; पाणसर्प.

**हेषा**—स्त्री. घोडयाचें खिंकाळणें. [सं.] **हेंसणें**-अक्रि. खिंकाळणें.

**हेस**—स्त्री. (कों.) तुषार; वर उसळलेले पाण्याचे किंवा द्रव पदार्थाचे थेंब.

**हेसळणें**—अक्रि. हिंसळणें पहा.

**हेसा**—पु. काजळ-ळी.

**हेळ**—स्त्री. १ गुरांना पाणी पिण्याकरितां बांधलेला हौद. २ (माण.) पाण्यासाठीं खणलेला खोल झरा; ओढयांतील विहिर. -के १०.११.३६. हाळ पहा.

**हेळण-णा-णी**—स्त्री. हेलना पहा. 'कुरूप म्हणून केलें हेळण।' -नव १८.१२४. [सं. हेलना] **हेळणें**-सक्रि. तिरस्कारानें वागविणें; धिक्कारणें. **हेळसण, हेळा**-स्त्री. अवहेलना; हेलना. **हेळसणें**-सक्रि. हेळणें. 'हांसति बहु हेळसोनि हंसातें।' -मोकर्ण २८.४२. **हेळसांड**-स्त्री. हयगय; दुर्लक्ष; हेलना. हेलसांड पहा.

**हेळणें, हेळणेंमेळणें**—अक्रि. मिळूनमिसळून वागणें; घरोबा ठेवणें. [मेळणें द्वि.] **हेळीमेळी**-स्त्री. घरोबा; स्नेहसंबंध. -क्रिवि. खेळीमेळीनें. [मेळ द्वि.] **हेळीमेळीचा, हेळीमेळीनें हेळीमेळीतला** असे रूढ प्रयोग.

**हेळंबी**—स्त्री. (नाविक) भयंकर वादळ. हेलमी पहा.

**हेळा**—स्त्री. दृष्टि. -मनको.

**हेळा**—पु. (कों.) बेहडयाचें झाड.

**हेळ्ळ**—पु. अळ्ळ पहा.

**हैक, हैकहैक, हैकथैक**—उद्गा. गुरांना हांकलण्याचा शब्द. -स्त्री. टोंचणी; टुमणी. [ध्व.]

० **हैकत**—स्त्री. दुर्दशा; हयकत पहा.

**हैकोल**—पु स्त्रियांच्या गळयांतील एक अलंकार; हयकोल पहा.

**हैगई, हैगय-यी, हयगई**—स्त्री. हयगई-य पहा.

**हैजा**—पु. (ना.) पटकी; कालरा. [अर. हैसा]

**हैता**—वि. हयता पहा.

**हैतुक**—वि. हेतुक; हेतु, कारण यासंबंधीं. [सं.]

**हैद्**—पु. समुद्रांतील एक मासा.

**हैद्न्या**—वि. एक जातीचें भात.

**हैदोस**—पु. गोंधळ; हायदोसदुल्ला पहा.

**हैप(ब)त**—स्त्री. धाक; धास्ती; भीति; दरारा (क्रि०घेणें; खाणें; धरणें; बसणें). 'फौजेनें हैबत खाली. आतां तह ठरवावा.' –होके १२. [अर. हैबत्] **०खाल्ला, खाल्लेला**-वि. भ्याड; घाबरट. **हैबती**-वि. भीतिग्रस्त. **हैबतीगैबती**-वि. अजागळ; गबाळ. [गैबती द्वि.]

**हैम**—वि. बर्फ, थंडी, हिवाळा इ०चें; हैमन. [सं. हिम] **हैमवती**-स्त्री. १ पार्वती. २ श्वेतवखंड.

**हैयत-ती**—हयात पहा.

**हैर**—पु. (कु.) सापासारखा पिवळा मासा, याला धरून त्याचे अंगावर चण्याचें पीठ चोपडून त्याच्या बोळाच्या गोळया करतात. या औषधी असतात.

**हैरत**—स्त्री. हैपत पहा. 'लढाईची जुरत न ठेवितां हैरत खाऊन फरारी जाले.' –चिरा १७. [अर. हैरत्]

**हैराण**—वि. १ त्रस्त; त्रासलेला; खंगलेला (आजार, शीण, दुःख इ० नें) व्याकुळ; आजारी; अस्वस्थ. २ हतबुद्ध; दंग; आश्चर्यचकित. –भाइ १८३४; –वात्र २०८. [अर. हैरान्] **०गत**-स्त्री. १ आजार; दुःख. २ दुर्दशा; व्याकुळता; आपदा. ३ गोंधळ; घोंटाळा; मानसिक त्रासाची अवस्था. **हैराण(न)गी, हैराणी**-स्त्री. हैराणगत. 'तेणें करून आपली हैरानगी जाली.' –रा १५.२९०. [फा. हैरानी] **हैराण परेशान**-वि. त्रस्त व चिंताक्रांत. 'फिरंगाणच्या मनसुब्यामुळें हैराण परेशान जाहले.' –ब्रच ७६.

**हैवा**—पु. ब्राह्मणांतील एक पोटजात.

**हैवान**—पु. (ल.) पशु; जनावर. –वि. दुर्बळ; मूर्ख; पशुतुल्य. [अर. हैवान्]

**हो**—उद्गा. १ आदरपूर्वक हांक मारण्याचा शब्द; अहो! 'सुनिर्मळ तुझीं पदें कधितरी विलोकीन हो।' –केका १५. २ थांबण्यास सांगण्याचा शब्द. 'हो हो अमळ हो.' ३ मान्यता, कबुली, परवानगीदर्शक शब्द; होय. ४ (काम इ० करण्यास सांगतांना) हटकून करण्यासाठीं, जोर देण्यासाठीं, दिशा दाखण्यासाठीं किंवा लाडानें उच्चारावयाचा शब्द. 'काम सांगितलें आहे तें कर हो, विसरशील.' 'मुला! भुकेला आहेस, जेव हो.' [ध्व.] **होस हो मिळविणें-म्हणणें-लावणें-जोडणें-करणें-देणें; हो म्हणणें-भरणें-करणें**-कोणी कांहीं म्हणेल त्यास संमति देणें. **०ना**-होय कीं नाहीं. (क्रि० म्हणणें; सांगणें; करणें). **०ना करणें**-कचरणें; अनमान, कांकूं करणें. **होका(क)रणें**-अक्रि. १ मोठयानें बोलावणें; हांक मारणें. २ संमति देणें; होकार देणें. 'म्हणतात होकरा यास।' –मोशांति ३.४३. ३ थांबविणें. 'वाजतिया वायूतें जरी होकरी।' –ज्ञा ९.१२५. **०कां**-उद्गा. बरें तर! होय कीं! 'हो कां म्हणितलें महानुभाव।' –दावि २३७; –ऋ ३८. **०कार**-पु. रुकार; संमति; अनुज्ञा; परवानगी. **०कारणी**-स्त्री. मोठयानें मारलेली हांक; हांकारणी. **०बा**-होयबा.

**हो**—उद्गा. होवो. 'सुतात्मज तेजोवध वर बहु तेणेंचि भद्र महिवर हो।' –मोभीष्म१.९८. [सं. भू=होणें] **होआवें**-व्हावें. 'आम्हां पती होआवा।' –दाव १४४; –ज्ञा १५.२५५. **होइजे**-व्हावें. 'जगीं होइजे धन्य या रामनामें।' –राम. **होईक**-न. १ होणारी गोष्ट होष्यमाण; भविष्य. २ भवितव्य. 'आईक जें होईक वर्तविते.' **होऊन**-क्रिवि. १ होणें धातूचें ऊन प्रत्ययांत अव्यय. २ कोणाच्या प्रेरणेवांचून; आपलें आपण (करण्यास प्रवृत्त होणें). 'त्यानें होऊन बोलाविलें?' 'आपण होऊन.' ३ पासून. 'विजयनगराहोऊन.' –इमं ७. ४ स्वतः; खुद्द; जातीनिशीं. **होए**-होई. 'अंतरीं न वेधिजे पाषाणें। जरि होए तापा हानि।' –ऋ? **होऔनि**-क्रिवि. होऊन. 'पृथिवी सादव होऔनि गळतां।' –दाव १३०. **होणार**-पु. भविष्यकालचा. 'नाना होणार परीक्षा.' –दा ५.५.१८. **होणें**-अक्रि. १ घडणें; असणें; उत्पत्तीस पावणें; प्राप्त होणें; घडून येणें. 'तुझे बायकोस पुत्र झाला.' २ रूपांतरानें बदलून दुसरा एखादा गुण इ० येणें; बनणें. 'अंबा पक्क झाला.' ३ घडून येणें; अस्तित्वांत येणें. ४ संपणें; शेवट होणें; खलास होणें. 'मजपाशीं रुपये होते तितके झाले, आतां कोठून देऊं?' ५ पार सत्यानास पावणें; रसातळास जाणें. **होणें**—याचा एक उपयोग सतत क्रियावाचक हि आहे. उदा० 'देते व्हा, जेवते व्हा.' याचा काव्यांत भूतकालीन उपयोग होतो. उदा० 'बोलता झाला, सांगता झाला.' [सं. भू; भूत; प्रा. होत्था, होइ] **होऊन जाणें**-१ जवळ जवळ होणें. २ खलास होणें; थांबणें; चुकणें; बारगळणें. **होती नव्हती तितकी केली**-खूप खरडपट्टी काढली. **होतव्य**-न. १ भविष्य; भवितव्य; होईक पहा. २ (ल.) दैव; नशीब. **होता**-वि. (काव्य) १ होणारा. 'दे देवदूत दर्शन...विमूढ होत्यासि।' –मोआदि ३.३५. २ चालता; अनुकूल (काल). उदा० 'आजपर्यंत आमचा होता काळ होता.' –भाब ७२.

